कु. कुरअतुलऐन हैदर यांचा जन्म उत्तर प्रदेशातील एका खानदानी मुस्लिम कुटुंबात झाला. अलीगड मुस्लिम विश्वविद्यालयातून त्यांनी इंग्रजी साहित्य हा विषय घेऊन एम. ए. ची पदवी मिळविली.

कादंबरी-लेखनाला त्यांनी लहान वयातच प्रारंभ केला होता. त्यांच्या लेखनशैलीने उर्दू कादंबरीला एक नवी दिशा दाखविली. यांची गणना उर्दूच्या प्रथम श्रेणीच्या साहित्यिकांमध्ये केली जाते.

कु. हैदर यांनी काही काळपर्यंत इंग्लंडमध्ये राहून तेथील 'डेली टेलिग्राफ' वृत्त-पत्रामध्ये बातमीदार म्हणून काम केले. त्यानंतर त्या तेथेच बी. बी. सी. च्या उर्दू विभागात काम करीत होत्या. १९६१ साली भारतात परत आल्यानंतर त्या 'इंप्रिंट'च्या संपादक-मंडळात काम करीत होत्या. सध्या त्या 'इलस्ट्रेटेड वीकलि'च्या सहसंपादक म्हणून काम करीत आहेत.

आतापर्यंत त्यांच्या सुमारे सहा कादंबऱ्या, तीन कथासंग्रह, काही अहवाल व परकीय भाषांतून उर्दूत केलेले अनेक अनुवाद, येवढे साहित्य प्रकाशित झाले आहे.

आंतरभारतीय पुस्तकमाला

# आगीचा दर्या


कुरअतुलऐन हैदर

अनुवादक

श्रीपाद जोशी





नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

पहिली आवृत्ति : 1971 (शाके 1892)
चौथी आवृत्ति : 1990 (शाके 1912)

Original Title : Aag Ka Darya (Urdu)
Marathi Translation : Aagicha Darya
रु. 20.50
संचालक : नैशनल बुक ट्रस्ट, इंडिया, ए-5 ग्रीन पार्क, नवी दिल्ली-110 016 द्वारा प्रकाशित

मला देव–देवतांविषयी विशेष माहिती नाही
पण माझ्या मते सागर
एक शक्तिवान दैवत आहे — तो तापट, क्रोधी,
आपल्या ऋतूंचा व आक्रोशाचा मालक
विनाशक :
आम्हाला जे विसरायचे असते
त्याचीच नेमकी तो आठवण देत असतो;
तरी आम्हाला तो आदरणीयच आहे कारण —
सागर आमच्या अंतःकरणात आहे, समुद्राने आम्हाला घेरून टाकलंय
आमच्या निःस्वर चित्कारांना अंत कुठे आहे?
पतझडीत मुकाटपणे कोमेजणाऱ्या फुलांना तरी अंत कुठे आहे?
बिचारी मूकपणे आपल्या पाकळ्या टाळतात —
जहाजांच्या, बारीक-बारीक वहात्या तुकड्यांना तरी अंत कुठे आहे,
अंत कुठेच नाही — फक्त वृद्धी आहे;
तसाच दिवस रात्रीचा, निसटणारा अव्याहत क्रम!
त्यातून आम्ही आमच्या यातनांचे क्षण धुंडून काढले
साराच भ्रम —
भ्रम हे या यातनांचे मूळ आहे ही आमची खरी व्यथा नव्हे
ना आम्हाला अवास्तव गोष्टींची आकांक्षा ना त्यांचे भय
हे क्षण स्थायी आहेत, जसा समय स्थायी आहे —
आम्ही या गोष्टी स्वतःच्या यातनांपेक्षा
दुसऱ्यांच्या यातनांतून
अधिक चांगल्या तऱ्हेने समजू शकतो
कारण आमचा भूतकाल कर्मरूपी धारांमध्ये
लपलेला आहे;
परंतु परदुःख एक विशुद्ध अनुभव आहे
जो कधी जुना होत नाही!
लोक बदलतात, हसू खेळू लागतात, पण
यातना बरोबर राहते
प्रेते व काटेकुटे मजेने आपल्या बरोबर
वाहून नेणाऱ्या दर्यासमान —

सहा

(काल संहारक आहे, स्थिती रक्षकही आहे —)
मी नेहमी विचार करतो—भगवान
श्रीकृष्णाचे तत्त्वज्ञान हेच होते ?
भविष्य एक अंधुक गीत आहे
व त्याकरिता पस्तावण्यासाठी त्यांनी जन्म घेतलेला नाही
पस्ताव्याचा एक लाल गुलाब
अशा एका पुस्तकाच्या पिवळ्या पानात ठेवलेला आहे
की जे कधी उघडलेलेच नाही !
भूतकाळापासून दूर व्हा यात्रिक हो, पुढे चला !
तुम्ही भिन्न जीवन वा भविष्याच्या दिशेने
वाहणार नाही का ?
पुढे व्हा, तुम्हाला वाटते तुम्ही प्रवास करताय—
पण बंदरे मागे टाकणाऱ्यात तुम्ही नाही
पैलतीरीही तुम्ही पोहोचणार नाही
या क्षणाच्या दोन्ही तटांमध्ये काळ स्थगित आहे,
भविष्य व भूतकाळावर सारखीच नजर ठेवा
हा क्षण कर्म वा निष्कर्माचा नाही !
लक्षात ठेवा, मृत्युसमयी मानव चेतना शक्तीच्या
ज्या बिंदूवर केंद्रित असेल (प्रत्येक क्षणच मृत्युक्षण आहे)
तो मात्र एक कर्म आहे,
जो दुसऱ्याच्या जीवनात फलीभूत होईल !
कर्मफलाची आशा धरू नका, पुढे चला !
हे यात्रिकांनो व नावाड्यांनो !
तुम्ही ज्या घाटावर उतराल आणि
तुम्ही ज्यांच्या शरीर समिंदराचे निर्णय सहन कराल
तुमच्या नशिबी जे काय असेल
तेच तुमचे घर
कृष्णाने युद्धक्षेत्रात अर्जुनाला उपदेश केला—
प्रस्थान नको—पुढे चला,
यात्रिक हो — !

—टी. एस. ईलियट

१

नदीवर अजून पावसाचे तुरळक थेंब पडत होते. काठावरील नारिंगी व लाल फुले हिरव्यागार झुडपांमध्ये गुलालगोट्यांसारखी लुकलुकत होती; आणि हिऱ्यांसारखे चकाकणारे पाण्याचे सर ओघळून हिरवळीवर पसरले होते. घाटावर नावा उभ्या होत्या आणि दूरवर कोणातरी रंगेल नावाड्याने जोरजोरात श्रावणगीत गायला सुरुवात केली होती. कदंबांच्या झाडीत एक मोर एकटाच पिसारा फुलवून उभा होता.

घाटापासून थोड्याच अंतरावर तीन तरुणी वडाच्या झाडाखाली बसल्या होत्या. त्यांच्यापैकी एकीने केशरी साडी नेसलेली होती आणि तिच्या केसांत चाफ्याचे फूल चमकत होते. दुसऱ्या मुलीने आपल्या भुवया निळ्या रंगाने रंगविल्या होत्या; आणि तिच्या एकूण हावभावावरून ती राजकुमारी असावी असे वाटत होते. तिसऱ्या तरुणीने त्या दोघींचे पावसापासून रक्षण करण्यासाठी रेशमी झालर असलेली छत्री उघडून त्यांच्यावर धरली होती. ती त्या दोघींची दासी होती. वडाच्या झाडाखाली एक लहानसे तळे होते. त्यात शिंगाड्याचा वेल पसरलेला होता आणि लाल कमळे उमललेली होती. केशरी साडी नेसलेली तरुणी पंचवीस-सव्वीस वर्षांची दिसत होती. परंतु तिच्या भांगात शेंदूर नव्हता. तिच्या केसांत चाफ्याचे फूल डौलदारपणे शोभत होते. बहुधा त्यामुळेच तेथून थोड्याच अंतरावर पळसाच्या झाडीत उभा असलेला एक श्वेत-वस्त्रधारी नवयुवक तिच्याकडे मोठ्या आश्चर्याने व अत्यंत तन्मयतेने केव्हापासून टक लावून पाहात होता. त्यानंतर अकस्मात त्या तरुणाने मान खाली घातली आणि तो झपझप नदीच्या दिशेने चालू लागला.

ढगांमध्ये वीज चमकली आणि आतापर्यंत निःस्तब्धपणे नदीकडे पाहात असलेली केशरी साडी नेसलेली ती मुलगी विमनस्कपणे म्हणाली, "पाऊस येणार..."

निळ्या भुवयांच्या मुलीने यावर काही उत्तर दिले नाही; कारण तिला तो श्वेतवस्त्रधारी ब्रह्मचारी दिसला होता.

श्रावस्ती गुरुकुलाच्या शेवटच्या वर्षातील विद्यार्थी गौतम नीलांबर पळसाच्या बनातून बाहेर पडला आणि नदीकडे वळला. ब्रह्मचारी असल्यामुळे त्याच्या हातात छत्री नव्हती आणि तो अनवाणी होता. त्याचे काळेभोर केस त्याच्या खांद्यांवर रुळत होते. त्याने आपला उदास व देखणा चेहरा वर उचलून आकाशाकडे पाहिले. इंद्राच्या हत्तींप्रमाणे

क्षितिजाकडून पुढे सरकत येणारे काळे ढग त्याला दिसले. ते वन अत्यंत रमणीय होते. नदी, नावा आणि कदंबाच्या वृक्षाखाली उभा असलेला मोर. तसेच, पावसामुळे धूसर बनलेल्या वातावरणात ज्यांचे चेहरे चंद्रासारखे चमकत होते अशा त्या घाटावर बसलेल्या तीन सुंदर मुली...श्रावस्ती अजून तब्बल पंचवीस कोस दूर होती. गौतमाने आपल्या समोवतालच्या सुरम्य व मर्मस्पर्शी दृश्यावर एक नजर टाकली आणि पाण्यात उडी मारली. पाण्याच्या थंड सुखद लाटा आणि पावसाचे शीतल सुखद थेंब यांनी त्याचे शरीर सखोल समाधान अनुभवून थरारले. तो किनाऱ्याच्या दिशेने पोहण्यात तल्लीन होऊन गेला.

"या विद्यार्थ्यांचं जीवन मोठं खडतर असतं. बिचाऱ्यांना नावेतसुद्धा बसता येत नाही." घाटावरील तरुणींच्या दासीने आपल्या मनातील विचार व्यक्त केला.

निळ्या भुवयांची राजकुमारी निर्मला नदीकडे पाहात राहिली. तो अपरिचित विद्यार्थी प्रवाहाविरुद्ध पोहत कोण्या अज्ञात दिशेकडे चालला होता. त्याच्यावर तिची नजर खिळून राहिली.

तिने दासीला काही उत्तर दिले नाही; कारण यावेळी तिला आपल्या भावाची आठवण येत होती. तो असाच असंख्य नद्या, ओसाड मैदाने आणि दुर्गम पर्वत ओलांडून खूप दूर तक्षशिलेला गेला होता. या गोष्टीला दहा वर्षे होऊन गेली होती; परंतु तो अजून परत आला नव्हता.

आपल्या भावाच्या आठवणीने निर्मला खूपच उदास झाली.

राजकुमारीचा उदास चेहरा पाहून दासीच्या मनात विचार आला, महाराजकुमार तक्षशिलेहून परत आले असते तर कुमारी चंपकचे त्यांच्याशी लग्न झाले नसते काय? पण आता कुमारी चंपक कविता करते आणि दूरच्या देशाहून आलेल्या चिनी विद्वानांशी लांबलचक वादविवाद करते. हा विचार मनात येऊन दासी दुःखी झाली. राजकुमारी निर्मलेने खाली वाकून शिंगाड्याच्या वेलीचे एक पान तोडले. मोराने मान वळवून या मुलींकडे एकदा बघितले आणि आपल्याच तोऱ्यात सावकाश पावले टाकीत तो केळींच्या बनात अदृश्य झाला.

गौतम एव्हाना नदीच्या मध्यावर जाऊन पोहोचला होता. त्याने मध्येच मागे वळून ज्या घाटावर आतापर्यंत त्या मुली बसल्या होत्या त्या घाटाकडे पाहिले. समोरच्या काठावर वेताच्या फांद्या, गवताची पाती आणि निळ्या फुलांच्या घनदाट वेली पाण्यावर वाकलेल्या होत्या.

काठावर पोहोचल्यानंतर गौतमाने आपले कपडे पिळून टाकले आणि कसल्यातरी काळजीत व्यग्र होऊन अनघड दगडांनी बांधलेल्या मंदिरात तो गेला. या मंदिराच्या एका कोपऱ्यात आपले पाथेय चंडी देवीच्या स्वाधीन करून तो अयोध्येला गेला होता.

सगळीकडे अगदी सामसूम होती. तो मंदिराच्या अंगणात उभा राहिला असता त्याला एकदम कसली तरी भीती वाटली. निराकार ब्रह्म जेव्हा साकार होऊन प्रकट होते तेव्हा आपल्याला भीती का वाटते? माणसाला दुसऱ्याच्या अस्तित्वाविषयी विश्वास वाटत नाही काय? गौतमाने अनेक रात्री आपल्या या भयाच्या भावनेचे विश्लेषण करण्यात घालविल्या होत्या. जीवनाचे भय! मृत्यूचे भय! जिवंत राहण्याचे भय! ऋग्वेदात लिहिले आहे की आरंभी 'अहं' होता, तोच पुरुषाच्या रूपाने प्रकट झाला. त्याने चोहोकडे नजर फिरविली. त्याला त्याच्याखेरीज दुसरे कोणीच तेथे दिसले नाही. तो म्हणाला, "हा 'मी' आहे." म्हणून तो स्वतःला 'मी' समजू लागला. तो एकटा होता म्हणून त्याला भीती वाटत होती. याचा अर्थ असा की जो एकाकी असतो त्याला भय वाटते. नंतर त्याच्या मनात विचार आला, माझ्याखेरीज येथे कोणी नाही, तर मग मला कसले भय? म्हणून त्याने आपल्या मनातून भीती काढून टाकली. तरीपण त्याला सुख वाटले नाही; कारण एकाकीपणात उदासीनता असते.

"मला माझ्या आत्म्याच्या एकाकीपणाची भीती वाटता कामा नये." गौतम स्वतःशीच म्हणाला.

साल आणि पिंपळ यांच्या वृक्षांमधून वारा यूं सूं करीत वाहत होता. या ठिकाणी शेतजमीन संपत होती. तेथून पुढे शिसवीची घनदाट अरण्ये आणि नदीनाले होते. ते सारे ओलांडून त्याला आपल्या आश्रमात पोहोचावयाचे होते. मंदिराच्या पायऱ्या उतरून तो गावाकडे निघाला. शरयू नदीच्या पलीकडे अयोध्या नगरीतील दिवे काजव्यांसारखे लुकलुकत होते. पावसाच्या धुकट वातावरणामुळे सारे दृश्य निळे व अधःकालासारखे दिसत होते. त्यामध्ये नारिंगी रंगाच्या रेघा पसरल्या होत्या. गौतमाने गावात जाऊन पहिले दार ठोठावले. ते लिंपलेले-सारविलेले एक मातीचे घर होते. त्याच्या दारात दिवा तेवत होता. मध्यम वयाचा एक गृहस्थ त्या प्रकाशात बसून काही वाचीत होता. ओसरीच्या बाहेर दाट काळोख होता. गौतमाचा आवाज ऐकून तो दिवा घेऊन बाहेर आला. दिव्याच्या प्रकाशात त्याला ब्रह्मचाऱ्याचे पांढरे कपडे दिसले.

"आजकाल इथं शाक्यमुनींच्या भिक्षूंची एक टोळी आलीय. मला वाटलं, तुम्ही त्यांच्यापैकीच असाल." तो गृहस्थ म्हणाला, "हे नवं वारं सुरू झाल्यापासून तरुणांची गोष्ट तर जाऊ द्याच, पण मुलीसुद्धा घरदार सोडून वनांत जाऊ लागल्या आहेत."

"मला थोडी डाळ हवीय." गौतम अत्यंत गंभीर स्वरात उद्गारला.

पण त्या बडबड्या गृहस्थाने आपली टकळी चालूच ठेवली. "समोरच्या नगरात एक मुलगी आहे. रेणुकाराणीसारखी रूपवती. काल माझी पत्नी बाजारहाट करण्यासाठी

शहरात गेली होती तेव्हा तिनं राणीवशातल्या दासींकडून ऐकलं की ती पोरसुद्धा कुठल्याशा विहारात जाणार आहे. जग कुठं चाललंय, देव जाणे!'

इतक्यात त्याची पत्नी शिधा घेऊन आली. ब्रह्मचाऱ्याने आपले उपरणे पसरून त्यात तो शिधा घेतला. तो गृहस्थ बोलतच राहिला. "विचित्र काळ आलाय. मी तर म्हणतो, आईबाप आपल्या मुलींच्या लग्नाच्या काळजीतून सुटले. आजकालच्या मुली निर्वाणाच्या शोधात बाहेर पडल्या आहेत ना!"

तांदूळ व डाळ यांच्या पुरचुंड्या बांधल्यानंतर ब्रह्मचारी ओसरीच्या खांबाला टेकून उभा राहिला. बौद्ध विद्यार्थ्यांची एक तुकडीही या बाजूला आली आहे, हे ऐकून त्याला फार बरे वाटले. ते लोक भेटले तर आजची रात्र मजेत जाईल. "ईश्वर तुम्हांला भरपूर दुभत्या गायी, सुपुत्र आणि धनधान्य देवो." त्याने त्या गृहस्थाला आशीर्वाद दिला आणि तो मंदिराच्या दिशेने भरभर चालू लागला.

गृहस्थाने कट्ट्यावर ठेवलेला दिवा उचलला आणि तो आत निघून गेला. गौतम थोड्या अंतरावर जाऊन थांबला आणि मागे वळून त्या घरातील दृश्य पाहू लागला. आत मुले खेळत होती. गृहिणी चुलीजवळ बसली होती. दाराच्या चौकटीजवळ डोंगरी मैनेचा पिंजरा टांगलेला होता. या शांततापूर्ण दृश्याचीही त्याला भीती वाटली. चुलीतील आगीच्या मंद उजेडात चमकणारा त्या स्त्रीचा चेहरा, ओसरीवर वाकलेली केळीची हिरवीगार पाने, पंखांत चोच खुपसून झोपलेली मैना—या गृहाग्नीचेच एके दिवशी चिताग्नीत रूपांतर होईल! चितेच्या निखाऱ्यांतून आणखी एका घरातील चुलीचा पाया घातला जाईल. हीच आग घेऊन संन्यासी घरातून बाहेर पडतो. हे सारे क्षण प्रत्येक मनुष्याच्या जीवनात येतात. ते माझ्याही जीवनात येणार?...नाहीतर असल्या दृश्यांचा अर्थ काय?

श्रावस्तीमध्ये त्याच्या वडिलांचा तीनमजली वाडा होता. त्या वाड्याच्या ओसरीवरील खांबांवर हत्तींची मस्तके कोरलेली होती. त्याच्या शिक्षणाचे हे शेवटचे वर्ष होते. शिक्षण संपल्यानंतर सारे जग त्याच्या पायांशी लोळण घेणार होते. काळ त्याला अनुकूल होता. तो अत्यंत उदारपणे सारी दर्शने पडताळून पाहात होता. परंतु त्याच-बरोबर प्रत्येक गोष्टीची त्याला भीतीही वाटत होती. याचा अर्थ काय?—त्या घाटावर बसलेल्या, पावसात भिजणाऱ्या मुली, वडाचे बन, त्या बनात कोठेतरी भटकणारी केशरी वस्त्रे परिधान केलेल्या भिक्षूंची टोळी, या मध्यम वयाच्या बडबड्या गृहस्थाची पत्नी—ही सारी त्या ब्रह्माचीच वेगवेगळी प्रतिबिंबे होती. पूर्ण ब्रह्म!

गौतमाने एक पिकलेले बेलफळ गवतावरून उचलून घेतले आणि तो देवळात परत आला.

तेथे त्याने लहानसा खड्डा खोदून चूल बनविली आणि एका गडूत भात शिजत ठेवला. समोर नदीवर अंधार दाटून आला होता. चंद्र ढगाआड लपला होता. वातावरणात ताज्या फुलांचा सुगंध होता. सारे जंगल काळोखात सूं सूं करीत होते. अचानक त्याला कोणाच्या तरी पावलांची चाहूल ऐकू आली. कोणीतरी अंधारात हळूच हसले. पुन: निःस्तब्धता पसरली. गौतम खडबडीत भिंतीला टेकून बसला होता. खालून कोणीतरी टाचा वर उचलून अंगणाच्या दारातून डोकावून पाहिले. अंधारामध्ये गौतमाला त्याचा चेहरा दिसला नाही. कारण आता ढग खूपच दाटून आले होते.

"तू कोण आहेस, बाबा?" खालून कोणीतरी विचारले, "असा अंधारात एकटाच बसला आहेस तो?"

"मी आहे!" गौतमाने उत्तर दिले.

"छान! फार छान!! तुला काही नावगाव नाही?"

"'मी' ला कोणतंही नाव असत नाही. माणसाच्या आत्म्याला नाव कसं देता येईल?"

पुन: शांतता पसरली. गौतम काहीसा निराश झाला. थोडा वेळ स्तब्ध राहिल्यानंतर तो स्वतःच बोलू लागला,

"या खेपेला मी जन्म घेतला तेव्हा श्रावस्तीच्या पंडितांनी—जे स्वतःला जीवन-रहस्याचे ज्ञाते म्हणवितात त्यांनी—माझी जन्मपत्रिका बनवून असं ठरवलं की मला गौतम नीलांबर या नावानं संबोधावं."

"निळ्या अस्मानातल्या भाई गौतमा, जमिनीवर ये." त्या अज्ञात व्यक्तीने सांगितले.

"जमीन ओली आहे. तिथं साप असतील. तूच का वर येत नाहीस?"

"वर–खाली हा सारा नजरेचा खेळ आहे. तुला काय माहीत, ज्याला तू उंच स्थान समजतो आहेस ते पाताळाहूनही अधिक खोल असेल कदाचित!"

"तू भागवत आहेस काय?" गौतमाने त्या भिंतीवरून खाली न पाहाताच प्रश्न केला.

"कोणत्याही प्रश्नाचं अंतिम उत्तर देता येत नसतं." खालून आवाज आला.

असं! म्हणजे हा कोणीतरी विक्षिप्त जैन संन्यासी दिसतोय—गौतमाने मनाशी विचार केला. आजकाल पाटलीपुत्राच्या राजकुटुंबाने जैन पंडितांना फारच डोक्यावर बसवून ठेवले आहे. हा कोणीतरी बौद्ध विद्वान असण्याचीही पुष्कळच शक्यता आहे. शाक्यमुनी गौतम सिद्धार्थाच्या या बुद्धिवादी अनुयायांशी वादविवाद करण्यात गौतमाला खूप मौज वाटे. सारी रानेवने या बुद्धिवाद्यांनी भरून गेली होती. तेथे जागजागी कुतार्किक, संशयवादी व नास्तिक विवाद करीत असलेले आढळत.

हा देखील त्यांच्यापैकीच कोणीतरी मनमौजी असावा, असे गौतमाला वाटले. गेल्या शतकातच तर कपिलवस्तूच्या राजकुमाराने वनाचा रस्ता धरून ही परंपरा पुढे चालविली होती. त्यांच्या काळी बासष्ट मत-मतांतरे किंवा पंथ-संप्रदाय आपल्या वेगवेगळ्या शाखांसह प्रचलित होते. मतमतांतरांच्या या सुमल्यापी साम्राज्यात शाक्य मुनी सिद्धार्थ हे नामाभिधान प्राप्त झालेल्या त्या पुरुषाने आपली एक नवीन वसाहत स्थापन केली होती.

बासष्ट विभिन्न दृष्टिकोन!...आणि जीवन एक आहे...आणि माणूस एकाकी आहे.

"हे अपरिचित मित्रा, तू कोण आहेस?" त्याने पुनः विचारले. त्याच्या मनातील अज्ञात भीती परत आली होती.

"नाव म्हणजे केवळ काही ध्वनींचा समुदाय असतो, भाई गौतम!" उत्तर मिळाले, "जे लोक असं समजत होते की ते मला ओळखतात, ते मला हरिशंकर या नावानं संबोधीत होते. परंतु ते केवळ माझ्या नावाशी परिचित होते."

"या ठिकाणी तू नवा आहेस?"

हा प्रश्न ऐकताच तो अपरिचित माणूस एकदम संकोचला. "मी नुकताच वायव्येकडून येतो आहे."

"तुझं शिक्षण कुठं झालं?" गौतमाने विचारले.

"तक्षशिलेला!"

"तक्षशिला! आपणही तिथं जावं असं मला किती वाटतंय!" गौतम म्हणाला.

"पण तिथं जाता आलं नाही म्हणून वाईट वाटून घेऊ नकोस. कोणत्याही गोष्टीमुळं काही फरक पडत नाही. तक्षशिलेमुळंही काही फरक पडत नाही."

"तू आपलं शिक्षण संपवलंस, भाई हरिशंकर?" गौतमाने अधिकच प्रभावित होऊन विचारले.

"होय. त्यानंतर मी नद्यांच्या मार्गानं एका खूप लांबच्या प्रवासाला निघालो. मी मथुरेला गेलो. ब्रह्मावर्तात हस्तिनापुराचे भग्नावशेष मी पाहिले. आपल्या नावेत बसून दूरच्या पूर्वदेशापर्यंत मी जाऊन पोहोचलो. प्रत्येक ठिकाणी काळ माझा पाठलाग करीत राहिला. गौतम, माझी अशी कल्पना आहे की काळ ही एक महाभयंकर गोष्ट आहे. तुला कधी काळाची भीती वाटली आहे काय?"

"तू गौतमबुद्धांना मानतोस?" गौतमाने समाधानाचा दीर्घ निःश्वास सोडीत विचारले.

"होय. तूही संघात आहेस काय?" खालून आवाज आला आणि एक देखणा तरुण तटावरून उडी मारून देवळाच्या ओसरीत आला. वादविवादाच्या आवेशात त्याने आपल्या खडावा काढून एका बाजूला फेकून दिल्या आणि तो ओट्यावर बसला.

"तू इथंच कुठंतरी काशी-मिथीला शिकतोस वाटतं?" त्याने गौतमाच्या शुभ्र वस्त्रांकडे पाहात विचारले.

"श्रावस्तीच्या गुरुकुलात हे माझं शेवटचं वर्ष आहे." गौतमाने काहीशा गर्वाने उत्तर दिले, "काशीच्या पाठशाळा तर केवळ महापंडित तयार करतात."

"तुझ्या जीवनाचं उद्दिष्ट काय आहे, भाई गौतम नीलांबर?" त्या अपरिचिताने प्रश्न विचारला.

"तूही या काळोखातून प्रकट होऊन मला हाच प्रश्न विचारायला आला आहेस?" गौतम चिडून म्हणाला.

आता हवेत कोरडेपणा येऊ लागला होता.

चंद्राच्या अंधुक प्रकाशात गौतमाने आपल्या या नव्या सोबत्याकडे टक लावून पाहिले. त्याचा सुंदर चेहरा गौतमाला काहीसा ओळखीचा वाटला.

हा चेहरा मी यापूर्वी कुठं बरं पाहिलाय? अगदी नुकताच पाहिल्यासारखा वाटतोय. गौतम चमकून विचार करू लागला. यानं जर आपले हे कुरळे केस कापून टाकले तर याच्या जागी कदाचित दुसरीच एखादी व्यक्ती दिसू लागेल.

"तू मुंडन का केलं नाहीस? असला कसला भिक्षू तू?" त्याने उदास स्वरात विचारले, "आपल्या संघाचे नियम तू पाळत नाहीस?"

"मी स्वतंत्र आहे; आणि यापेक्षाही अधिक स्वातंत्र्याच्या शोधात मी आहे." येवढे बोलून तो भिक्षू दूरवर असलेल्या अयोध्येच्या दिव्यांकडे पाहू लागला.

"याचा अर्थ असा की आता तुझा वेदांवर विश्वास उरलेला नाही." थोड्या वेळाने गौतम म्हणाला.

त्याने मनाशी निश्चय केला, आता मोका आला आहे. गौतम सिद्धार्थाच्या बुद्धिमान शिष्याशी रीतसर मक्कम वादविवाद सुरू करण्यास ही चांगली संधी आहे.

"शाक्य मुनीसुद्धा अखेर याच कोसल देशाचे रहिवासी होते. त्यागाचं तत्त्वज्ञान आणि तुमची सारी परिभाषा उपनिषदांत विद्यमान आहे. शाक्य मुनींवर कपिलाच्या दार्शनिक दृष्टिकोनाचा प्रभाव पडलेला होता. कोणतीही गोष्ट विचारांच्या विश्वात आपल्या शुद्ध रूपात आणि असंबद्ध असत नाही. तू शब्दांचा वापर का करतोस? शब्द संबंध स्थापन करतात." त्याला आठवले, गावातल्या त्या गृहस्थाने घरदार सोडून जंगलात जाणार असलेल्या अयोध्येच्या राजकुमारीचा उल्लेख केला होता. "आणि आता तर मुलींना सुद्धा या विचारांचं वारं लागलंय." त्याने काहीशा रागाने म्हटले.

हरिशंकर हसला.

"हसतोस काय? तुमच्या त्या आनंदावरच काय प्रसंग ओढवला होता ते

पाहा ना!" गौतमाने आणखी चिडून म्हटले.

"तुझं तुलाच समजेल." भिक्षू अगदी हलक्या आवाजात म्हणाला आणि तो जमिनीवर लवंडला.

"तू असा पळून का चालला आहेस?" गौतमाने पुनः प्रश्न केला.

"तू कशाच्या शोधात आहेस?" हरिशंकराने उत्तरादाखल विचारले.

"तू फारच घमेंडखोर आहेस, भाई शंकर. एका आंधळ्याने दुसऱ्या आंधळ्याला मार्ग दाखवावा त्याप्रमाणे ज्ञानी लोक आपल्या गर्वाच्या व घमेंडीच्या भ्रमात गुरफटून एकाच वर्तुळात फिरत आहेत."

"नुसते शब्द!" हरिशंकर म्हणाला.

"तू पाणिनीचं अध्ययन केलं आहेस?" गौतमाने दरारा बसविण्याच्या ढंगात विचारले. "शब्दांच्या सीमा भेदून आत गेल्याखेरीज त्यांच्या रहस्यापर्यंत तुम्ही पोहोचू शकत नाही."

"शब्दांच्या अंतिम व्याख्येपर्यंत पोहोचता पोहोचता त्यांचे अर्थ बदलून जातात. अर्थाचा शोध घेण्यासाठी मी धावपळ करू लागलो तो वाट चुकून कुठल्या कुठं जाऊन पोहोचलो."

"शब्द शाश्वत आहेत." गौतमाने उत्तर दिले, "शब्द ईश्वर आहे. ॐ या शब्दातली तीन अक्षरं आणि सा, प, सा, हे तीन स्वर यांच्यातच तर सृष्टीचं सारंअस्तित्व बांधलं गेलेलं आहे. ध्वनी हा आकाशाचा एक गुण आहे."

"पण तुझ्यासारखंच गौतम हे नाव धारण करणाऱ्या ऋषीनं तर म्हटलं होतं की ध्वनी हा जर शाश्वत असेल तर शब्द तोंडातून बाहेर पडण्यापूर्वीच तो ऐकू आला पाहिजे; कारण आकाश आणि आमचे कान यांत कसलाही अडथळा नाही."

"शब्दांवर विश्वास न ठेवणारा तू असला कसला दार्शनिक? शब्दांच्या मार्गाखेरीज विशुद्ध विचारापर्यंत तुला कसं जाऊन पोहोचता येईल? ध्वनी हा शब्दाचा प्राकृतिक गुण आहे. वस्तू-पदार्थ शाश्वत आहे आणि तेच ब्रह्म आहे."

"काळ हाच नित्य आहे असं गृहीत धरून तुम्ही मंडळींनी फार गोंधळ करून सोडलाय." हरिशंकर सौम्य स्वरात उद्गारला.

"तू अजून वेदान्ताच्या पुढं गेला नाहीस, हे आश्चर्य आहे."

"अन्ताच्या पुढं काय असू शकतं?"

"तुला ते माहीत असायला हवं." हरिशंकरने उत्तर दिले.

"परमात्मा आणि जीवात्मा यांमध्ये अविद्येमुळं द्वैत आहे. म्हणूनच शब्द आणि अशब्द ही दोन वेगवेगळी ब्रह्मं आहेत. शब्दाचं ध्यान करूनच अशब्दाची अभिव्यक्ती करणं शक्य असतं."

"तो अशब्द मी स्वतः आहे." हरिशंकर म्हणाला.

गौतम गप्प राहिला.

"कार्य आणि कारण यांचा नियम स्वयंपूर्ण आहे. कोणतीही वस्तू दुसऱ्या कोणत्याही वस्तूसारखी असत नाही. केवळ आपल्या क्षणिक अस्तित्वाव्यतिरिक्त कोणत्याही वस्तूचा दुसऱ्या कोणत्याही वस्तूशी संबंध नसतो. सर्व क्षणिक आहे आणि सर्व दुःख आहे. 'सर्वं दुःखं दुःखम्'." हरिशंकर म्हणाला, "शरीर आणि आत्मा दोन्ही नश्वर आहेत. दोघांच्या एकत्र होण्यानंही एखादं शाश्वत अस्तित्व जन्माला येत नाही. आत्मा शाश्वत नाही. माणूस दिव्याप्रमाणं विझून जातो. फक्त घटना आणि भाव यांचा क्रम बाकी राहातो ......झोपलास वाटतं, भाई गौतम ?"

"छेः ! चालू दे तुझं."

"संगीताची नगरी असलेल्या अयोध्येत एक मुलगी होती. मी शाश्वत अस्तित्वावर विश्वास ठेवावा म्हणून तिनंही मला ते पटवून द्यायचा प्रयत्न केला. मेघस्वरांमध्ये तीही देश आणि काल यांना बांधून टाकीत होती."

"तू गीत आणि शब्द यांना मान्यता दिली नाहीस. पण तू पाहाशील की स्वर हे बाकी राहातील. स्वर अटळ आहे." गौतम म्हणाला.

"मी जेव्हा उत्तर कोसलाच्या सीमेवर परत आलो तेव्हा गुप्त स्थानाच्या सीमारक्षकांनी मला दरडावून विचारलं, 'तू कुठून येतो आहेस ?' मी त्यांना सांगितलं, 'मी इथूनच गेलो होतो आणि इथंच परत आलो आहे; आणि इथंच तुम्हां सर्वांचा शेवट होणार आहे. या चक्रातून सुटण्याचा काही तरी उपाय शोधून काढा.' पहारेकऱ्यानं आपल्या साथीदाराला विचारलं, 'तुला याचा अर्थ समजला ? हाही कुणीतरी दार्शनिक दिसतोय.' आणि ते दोघे पुनः आपल्या कवड्यांच्या खेळात गुंग झाले. परंतु मी अयोध्येला पोहोचलो तेव्हा मला समजलं की स्वर अजून बाकी आहे. भाई गौतम ! जीवनाचा विस्तार फार मोठा आहे. देश, वस्त्या, नवे-नवे लोक, नाना प्रकारच्या भाषा. मी खूप भ्रमण केलंय. परंतु मेघहिंडोलाचे स्वर सतत माझा पाठलाग करीत राहिले. तेव्हा मग मी अनेक वर्षे तक्षशिलेत राहिलो आणि त्यांचा विसर पाडून घेतला. इथं परत आलो तर पुनः तेच स्वर माझ्या कानांवर येत आहेत. शब्द आणि ध्वनी यांच्या नित्यत्वाची गोष्ट तू मला सांगतोस ?...मला विचार !...मला माहीत आहे. हा सारा वेगवेगळ्या स्थानांच्या जादूचा प्रभाव आहे. त्यात काहीही वास्तविकता नाही. सर्वं दुःखं दुःखम्."

गौतम मूर्तिवत होऊन ऐकत राहिला.

"पावन शरयू ! ऋग्वेदात उल्लेख असलेली नदी. हे माझ्या माते, आज रात्री मी आश्चर्यचकित होऊन तुझ्याकडे पाहातो आहे. हे अयोध्ये, तुझे हे दिवे असेच कुठवर

चमकत राहातील? अयोध्या म्हणजे अजाचं, ब्रह्माचं नगर. त्याला कुणी जिंकू शकत नाही. कालांतरानं तुझं हे ऐश्वर्यही नाहीसं होणार? चिरस्थायी अशी कोणतीच वस्तू नाही काय? तिचं नाव चंपक आहे; कारण ती चाफ्याच्या फुलासारखी पिवळी अन् सुंदर आहे. इथंच माझ्या घरचे लोक माझी वाट पाहात आहेत—माझे आईबाप आणि माझी लाडकी बहीण. परंतु मी बहिणीच्या प्रेमालाही, प्रीतीच्या निष्ठा आणि भावना यांच्याबरोबर हृदयातून काढून टाकलं. रामानं चौदा वर्षांच्या वनवासानंतर परत येण्याचं वचन दिलं होतं. तसाच मीही परत आलो आहे. परंतु सिद्धार्थ गौतमांनी मला वचनाच्या बंधनातून मुक्त केलं. पाहा, शब्दांनी पुनः मला फसवलं." इतके बोलून तो उदासपणे थांबला.

बाहेर झाडांवर पाऊस पडण्यास सुरुवात झाली होती.

वाऱ्याच्या झोताने दिवा विझून गेला होता. शंकराने विटांची उशी बनवून तिच्यावर डोके ठेवले. गौतमाने आपले पांढरे उपरणे पांघरूण म्हणून अंगावर घेतले आणि कूस बदलून भिंतीकडे तोंड केले. दोघेही थोडावेळपर्यंत अंधारात निःशब्दपणे डोळ्यांची उघडझाक करीत राहिले. नंतर पूर्वेकडील वाऱ्याच्या झुळुकींनी त्यांनाही झोप लागली.

त्या रात्री गौतमाला चित्र-विचित्र स्वप्ने पडली. चंडी देवी देवळाच्या गाभाऱ्यातून निघून आपल्या गौरीच्या रूपात छुमछुम करीत बाहेर आली. नंतर ती हळूहळू केशरी साडी नेसलेल्या सकाळच्या मुलीमध्ये रूपांतरित होऊ लागली. थोड्या वेळानंतर पुनः तिचे वेगळेच रूप दिसू लागले. प्रथम ती नववधूच्या रूपात सती बनली, नंतर ती बघता-बघता कालीपेक्षाही अधिक भयंकर अशी म्हातारी बाई बनली आणि त्याच्या उशाशी फतकल मारून बसली; आणि जोरजोराने रडू लागली. "आई! आई ग! आई!" गौतम भीतीने थरथरा कापत उद्गारला. परंतु त्या म्हातारीने दातओठ खात उत्तर दिले, "मी तुझी आई नाही! अरे मी तर वैशालीची..." तिचे वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच बेलाच्या झाडावरून एक बेलफळ धप्पकन खाली पडले; आणि त्या आवाजाने गौतम खडबडून उठून बसला. शंकर अत्यंत निश्चिंतपणे झोपलेला होता. पाऊस थांबला होता. नदीच्या काठी चांडाळ कुणाचे तरी प्रेत स्मशानात घेऊन चालले होते. तो घाईघाईने मंत्र जपू लागला. मग बऱ्याच उशिराने त्याला झोप लागली.

भल्या पहाटे शंकर जागा झाला तेव्हा गौतम चंडीपाठ करण्यात तल्लीन झाला होता. घाटावर ब्राह्मण खाकरून खोकरून तोंड धूत होते. पक्ष्यांच्या चिवचिवाटाने आंबराई दुमदुमली होती. पूजापाठ संपवून गौतम बाहेर आला तेव्हा हरिशंकराने त्याच्याकडे पाहून मंद स्मित केले. अकस्मात गौतमाने त्याला विचारले, "वैशालीत कोण राहात होतं?"

शंकर या प्रश्नाचे उत्तर देण्याऐवजी हसू लागला. त्याच्या त्या असंबद्ध हसण्याचा गौतमाला भयंकर राग आला. दोघेही देवळाच्या पायऱ्या उतरून अरण्याच्या रस्त्यावर आले.

"तू आता श्रावस्तीला परत चालला आहेस?" शंकराने विचारले.

"होय! तूही माझ्याबरोबर चल. श्रावण महिन्यात तुला आमच्या आश्रमात राहाता येईल."

"ऋषींनी सांगितलंय की हा मार्ग वस्तऱ्याच्या धारेपेक्षाही अधिक धारदार आहे. भाई गौतम, तू माझ्या मार्गात येऊ नकोस. मी तुला सावध करून ठेवतो."

"पायवाट अरुंद असेल आणि दोन पादचारी एकमेकांसमोर येऊन उभे राहिले असतील तर त्यांच्यापैकी एकानं बाजूला झालं पाहिजे, नाहीतर दोघेही खड्ड्यात जाऊन पडतील. असंच की नाही?" गौतमाने विचारले.

'होय." शंकराने उत्तर दिले.

ते दोघेही श्रावस्तीच्या दिशेने चालू लागले.

आकाश निरभ्र झाले होते. वातावरणात कोवळ्या कळ्यांचा सुगंध भरून राहिला होता. संध्याकाळच्या सुमारास ते दोघे मोर पाळणाऱ्या लोकांच्या एका गावाच्या तटाच्या आत प्रविष्ट झाले. गौतम आणि हरिशंकर विहिरीच्या कट्ट्यावर बसले. हां हां म्हणता गावात बातमी पसरली की दोन विद्यार्थी आपल्या गावात आले आहेत.

शंकर डोळे मिटून बसून राहिला. एक सुंदर तरुणी मोरपिसांचे दोन छानदार पंखे भेट म्हणून घेऊन आली. गौतमाने तरुणीच्या हातून एक पंखा घेतला; आणि उलटून पालटून तो पंखा पाहू लागला. हे पंखे कुठे-कुठे, कोणकोणत्या शहरांना आणि देशांना पाठविले जातील? हा पंखा, ज्याला मी कुरवाळतो आहे, तोच अयोध्येच्या बाजारात विकण्यासाठी जाईल आणि कदाचित ती चाफ्याचे फूल घातलेली तरुणीच हा विकत घेईल...त्याने तो पंखा परत दिला; आणि तो घाईघाईने म्हणाला, "आम्हांला चैनीच्या वस्तू घ्यायची परवानगी नाही. आम्हांला तुझे हे पंखे नकोत. मोरांचे पंख वनात पाहूनच आम्हांला आनंद होतो." त्या मुलीने तो पंखा परत घेतला आणि ती प्रणाम करण्यासाठी खाली वाकली.

"तुझं नाव सुजाता तर नाही ना?" गौतमाने हसून तिला विचारले आणि शंकराकडे पाहिले. तो अजूनही डोळे मिटून बसलेला होता.

"छेः छेः! माझं नाव नंदबाला आहे. सुजाता ही माझी थोरली बहीण." त्या मुलीने निष्कपटपणे उत्तर दिले; आणि विहिरीच्या कट्ट्यावरून खाली उतरून ती गावात परत गेली.

"भाई गौतम, प्रत्येक युगात, रस्त्यांच्या प्रत्येक वळणावर तुला कोणीतरी नंदबाला, कोणीतरी सुजाता भेटेल; आणि ती तुझ्याजवळ येऊन तुझी आराधना करू पाहील. अजून वेळ गेलेली नाही. डोळे उघड." हरिशंकर म्हणाला.

सकाळी ते पुनः पुढच्या प्रवासाला निघाले.

आता श्रावस्ती फार दूर नव्हती. शिसवीची जंगले संपल्यानंतर लोकवस्ती सुरू झाली. चालता चालता मध्येच थांबून हरिशंकराने गौतमाला उद्देशून म्हटले, "भाई गौतम, वैशालीची एक अंबपाली होती. ती आणि चंपक, सुजाता आणि नंदबाला सगळ्या एकच आहेत. तू आपल्या मनाला विकारांपासून मुक्त ठेव."

इतके बोलून हरिशंकर अचानक पायवाटेवरून बाजूला झाला; आणि पुन्हा शिसवीच्या जंगलांच्या दिशेला वळला. गौतम त्याला हाका मारीत राहिला; परंतु एव्हाना तो नजरेआड झाला होता.

## २

श्रावस्ती हे सुंदर नगर राप्ती नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर दूरवर पसरले होते. त्याच्या उत्तरेला थोड्या अंतरावर हिमालयाचे गुलाबी व निळे डोंगर उभे होते. या डोंगरांच्या कुशीत हिरवीगार शेते डोलत होती आणि आसपास तराईच्या जंगलांत व वेतांच्या वनांत वाघ व चित्ते हिंडत होते.

उत्तर कोसलाच्या राज्यातील लहानमोठी नगरे व गावे या हिरव्यागार मैदानात वसलेली होती. आता लोकवस्ती वाढत होती आणि जंगलतोड चालू होती.

श्रावस्ती हे मोठे चैतन्यपूर्ण नगर होते. दूरदूरच्या देशांतून आलेले लोक येथे राहात असत. रथकार, मातीची भांडी बनविणारे, कलाल आणि वेताच्या टोपल्या बनविणारे शहराच्या बाहेर राहात होते. शहराच्या लोकवस्तीपासून अगदी अलग चांडाळांची वस्ती होती. त्यांचा पंचम वर्ण चार वर्णांहून हीन होता. फक्त प्रेते वाहून नेणे आणि त्यांचे दहन करणे एवढेच त्यांच्या नशिबात लिहिलेले होते. तोच त्यांचा पेशा. केवळ प्रेतांवरील वस्त्रेच त्यांना वापरता येत असत. त्यांनी फुटक्या भांड्यांत जेवले पाहिजे आणि फक्त काशाचेच दागिने वापरले पाहिजेत, अशी त्यांच्यावर सक्ती होती.

परंतु, आजपासून केवळ सत्तर-ऐंशी वर्षांपूर्वीच श्रावस्तीमध्ये कपिलवस्तूचे शाक्य मुनी येऊन राहिले होते; आणि त्यांनी व त्यांच्या शिष्यांनी आपल्या प्रवचनांमध्ये

असे सांगितले होते की माणूस हा जन्मानुसार नव्हे तर कर्मानुसार म्लेच्छ अथवा शूद्र बनत असतो; आणि आता भगवी वस्त्रे धारण करणाऱ्या भिक्षूंच्या टोळ्या गावोगाव जाऊन चांडाळांना व शूद्रांना सत्कर्म करण्याचा उपदेश देत होत्या.

* * *

मौनव्रतधारी ब्राह्मणांप्रमाणे, वर्षभर गप्प राहिल्यानंतर, बेडकांनी वादळवाऱ्याच्या व पाण्याच्या देवाकडून जीवनाचे चैतन्य प्राप्त केले आहे आणि आता ते घसा फाडफाडून ओरडत आहेत. ज्याप्रमाणे विद्यार्थी आपल्या गुरूचे शब्द सगळे मिळून एकदम उच्चारतात त्याप्रमाणे एक बेडूक दुसऱ्या बेडकाच्या आवाजाची नक्कल करीत आहे. सगळे जण तळ्यात बसून वर्षाराग आलापण्यात दंग झाले आहेत.

गौतमाने पुस्तक मिटले आणि मान वर करून समोर पाहिले. धो धो पाऊस सुरू झाला होता. बेडूक डराँव डराँव करीत होते, मोर केकावत होते, चातक 'पिऊ पिऊ' म्हणून ओरडत होते, श्रावणमेघ दाटून आले होते. अनेक शतकांपूर्वी ऋग्वेदामध्ये वर्षाऋतूच्या ज्या दृश्याचे शब्दचित्र रेखाटण्यात आले होते ते दृश्य हुबेहूब जसेच्या तसे त्याच्यासमोर उभे होते. तो झोपडीच्या पडवीत बसून श्रावणाचे हे आवाज ऐकत राहिला. आश्रम शहरापासून दूर अशोकाच्या बनात होता. नदीच्या काठाकाठाने असलेल्या झोपड्यांमध्ये विद्यार्थी राहात होते. गौतमाच्या गुरूंना आचार्यपद मिळालेले होते. तो त्यांच्याजवळ अनेक वर्षांपासून शिकत होता. या अवधीत त्याने नाटके लिहिण्यात व चित्रे बनविण्यात विशेष ख्याती मिळविली होती. त्याच्या गुरूने असा विचार केला होता की, हा जर जन्मजात कवी आहे, तर याला पुरोहित बनविण्यात काय फायदा ? गौतमाला लिहिण्यावाचण्याची विशेष आवड नसती तरी तो इंद्रप्रस्थाला जाऊन पांचालांच्या सैन्यात नोकरी करू शकला असता. परंतु त्याने मनाशी असे ठरविले होते की आपण केवळ नाटके लिहावयाची, कलाविषयक सिद्धांतांवर ग्रंथ लिहावयाचे आणि चित्रे व मूर्ती बनवावयाच्या.

आज संध्याकाळी, तक्षशिलेहून नुकताच परत आलेला राजनीतीचा विद्यार्थी अखिलेश गौतमाच्या कुटीत बसून काही उत्साही नवयुवकांशी जोरजोरात वादविवाद करीत होता.

"अरे बाबा, फार मोठा गोंधळ माजणार आहे." अखिलेशला मध्येच अडवून श्रावस्तीतील घटना लिहून ठेवण्याच्या कामावर असलेला लिपिकार योगेंद्र म्हणाला, "दूधदही, मीठ, साखर, गुरं-ढोरं, अशी कोणती वस्तू आहे की जिच्यात पाटलीपुत्राचं सरकार वाटेकरी होत नाही ?"

"आणि एवढ्या मोठ्या सैन्याचा खर्च," गुणवर्मा म्हणाला, "देश सहन करतो आहे... प्रजा गप्प बसेल असं तुला वाटतं काय?"

"महाराज धननंद," श्रावस्तीचा मूर्तिकार बिमलेश्वर खिन्नपणे म्हणाला, "ज्वाला-मुखीच्या तोंडावर बसला आहे." आणि त्याने अखिलेशकडे वळून विचारले, "तू या चाणक्यासंबंधी काय सांगत होतास?"

"तू त्यांना भेटला आहेस?"

"कितीदा तरी भेटलोय तक्षशिलेत."

या मंडळींवर तक्षशिलेहून आलेल्या विद्यार्थ्यांची अशी काही छाप पडलेली होती की सर्व तरुणांचे लक्ष लगेच अखिलेशकडे वेधले गेले. अखिलेशने त्यांना चाणक्या-विषयी माहिती सांगण्यास सुरुवात केली. योगेंद्राच्या माहितीप्रमाणे तो पाटलीपुत्राला जाऊन पोहोचला होता. आता विचित्रविचित्र नावे घेण्यात येऊ लागली. वेगवेगळ्या घटनांची वर्णने सांगण्यात येऊ लागली. मते व्यक्त होऊ लागली.

गौतम या सर्वांमध्ये सामील असूनही दूर एका कोपऱ्यात बसला आहे.

"मगधाचे लोक नेहमीच लढाऊ वृत्तीनं वागत आले आहेत." योगेंद्र सांगत होता.

"परंतु मगधाशी आपली तडजोड कधीच होणं शक्य नाही." विमलेश्वर म्हणाला.

"बाबा रे, हा साऱ्या देशाचा प्रश्न आहे." अखिलेशने मांडी घालून बसत म्हटले. सारे तरुण त्याचे बोलणे लक्षपूर्वक ऐकू लागले.

"सबंध देशावर ब्राह्मणांचं आणि क्षत्रियांचं राज्य आहे. थेट सिंधूपर्यंत ब्राह्मण राज्य करताहेत; आणि मगध हा पूर्णपणे ब्राह्मणांच्या ताब्यात कधीच आलेला नाही. मगधातील उच्च जातींच्या लोकांनाही आपण कोसलवाल्यांनी कधी उच्च मानलेलं नाही; आणि अजातशत्रूच्या नातवाच्या मृत्यूनंतर तिथं शूद्रांचा कारभार चालू आहे, हे आम्हांला कसं विसरता येईल? धनवंश," तो तरुणांकडे दृष्टिक्षेप करून म्हणाला, "हा शूद्रांचा वंश आहे, आणि मगध हा खालच्या जातीच्या लढाईखोर लोकांचा देश आहे."

"मगधाची नवी राजधानी तर आता गिरिव्रज आणि राजगृह यांच्यापेक्षाही जास्त रुबाबदार झाली आहे." गुणवर्मा म्हणाला, "पाटलीपुत्र..."

"कुशीनगर, वैशाली आणि श्रावस्ती यांनी कोसलांशी एक होऊन अजातशत्रू-विरुद्ध आपलं संघटन बनविलं होतं, ही तर कालची गोष्ट आहे. त्यावेळी मगधाच्या मंत्र्यांनी यांचं आक्रमण थोपविण्यासाठी पाटली ग्रामाच्या सभोवती एक तट बांधला होता. अजातशत्रूचा नातू उदय यानं कुसुमपुराचा पाया घातला त्याला किती दिवस झाले? परंतु आज तेच कुसुमपूर इतकी सामर्थ्यशाली राजधानी झालं आहे की आपण इतके दूर असूनही आपल्याला त्याची भीती वाटते आहे." बिमलेश्वर म्हणाला.

गौतम दिव्याच्या प्रकाशात आपल्या सहकाऱ्यांचे चेहरे पाहात आहे. त्याच्या मनात विचार येतो आहे की, गौतम सिद्धार्थानं तर अशी भविष्यवाणी केली होती की, हे नगरसुद्धा अग्नी, पूर आणि युद्ध यांच्या मध्यस्थानी पडेल. वस्त्या अशाच निर्माण होत असतात आणि उद्ध्वस्त होत असतात—अंतःकरणाच्या वस्त्या आणि माणसांच्या वस्त्या. (मी फार एकाकी आहे.)

अखिलेश दुसऱ्या कोपऱ्यात बसून एका अल्पवयीन तरुणाला चाणक्यासंबंधी माहिती सांगत होता. तो आता जोराने ओरडून विमलेश्वराला म्हणाला, "तू आताच महाराज उदयांचं नाव घेतलंस, नाही काय? अरे माई, हे महाराज उदय तर इराणचा दारा पहिला याचे समकालीन होते." आणि पुनः त्या तरुणाकडे वळून सांगू लागला, "मी तुला चाणक्याचा राजनैतिक दृष्टिकोन, साम्राज्याविषयीचे त्याचे विचार यासंबंधी सांगत होतो. दारांचं इराण हेही एक साम्राज्य आहे. तुम्हां लोकांना माहीत नाही, त्याच्या सत्तेचं चक्र यावेळी सर्वत्र फिरतं आहे."

"सत्तेचं चक्र!" एक अल्पवयीन विद्यार्थी उद्गारला.

"इराण्यांनी जेव्हा गांधारावर आक्रमण केलं तेव्हा तेथील राजानं बिंबिसाराकडे आपला दूत पाठविला...आजकाल इराणी साम्राज्य सप्तसिंधूच्या वायव्य भागातून आपला कर वसूल करीत आहे. दारा म्हणाला होता 'मी दारयूश आहे.'" अखिलेश-चा आवाज गौतमाच्या कुटीत विचित्रपणे घुमला. "मी सम्राट, राजांचा राजा, या देशांचा शहेनशाह आहे. या देशांत नाना प्रकारचे लोक राहातात. मी गस्तास्पचा पुत्र, इराणी, इराणचा पुत्र, आर्य, आर्यवंशाचा पुत्र आहे. त्याच्या जल्यानांचे तांडे पावन सिंधूच्या काठांवर विहार करीत होते."

"शहेनशाह! शहेनशाह!" गौतमाने विचारले, "ही पारसिकांची भाषा आहे, नाही?"

"होय!" अखिलेशने उत्तर दिले. "आणि या दारयूशचा थोरला मुलगा अर्तख-शीश याने उत्तरापथाच्या या व्याप्त प्रांतांसंबंधी गर्वानं असं म्हटलं होतं, 'या भागात देवांची पूजा केली जात असे. तेथेच मी अहुरमुज्दाच्या आदेशानुसार देवळांचे पाये खिळखिळे करून टाकले.'"

गौतमाच्या अंगावर काटा उभा राहिला. सारी माणसे एकमेकांना गिळून टाकायला बसली आहेत. अहुरमुज्दाच्या आदेशानुसार देवाची देवळे जमीनदोस्त करण्यात आली.

"अहुरमुज्द कोण आहे?" तो अखिलेशाला विचारतो.

"ते ईश्वराचं इराणी नाव आहे."

"तर मग तुझा हा अर्तखशीश काय म्हणत होता?"

"ही राजनीती आहे, भाई गौतम!" अखिलेश त्राग्याने उद्गारला. नंतर इतरांकडे वळून तो बोलू लागला, "काही दिवसांपूर्वी काही व्यापारी परसीपोलिसहून प्राण वाचवून तक्षशिलेत आले होते. ते सांगत होते की इराणात मोठं भयंकर युद्ध सुरू झालंय. यवनांनी इराणच्या दास्यातून आपली सुटका करून घेतल्यापासून इराणी साम्राज्य दुबळं होत चाललं आहे. तुला एक गोष्ट सांगतो." असे म्हणून अखिलेश गौतमाकडे वळून म्हणतो, "विष्णुगुप्त तक्षशिलेत मला सांगत होता की, आपल्या देशालाही अशा एका प्रचंड साम्राज्याची जरूर आहे. ज्याचा विस्तार जगाच्या चारी कोपऱ्यांपर्यंत पसरलेला असेल असं शक्तिशाली साम्राज्य. परसीपोलिसचे व्यापारी सांगत होते की इराणचा तिसरा दारयूशही अत्यंत धाडसी सम्राट आहे. परंतु त्या बिचाऱ्याला यवनांचा सेनापती अलेक्झांडर यानं पराभूत केलं. तो दूर पश्चिमेकडून फार मोठं सैन्य घेऊन आला आहे."

गौतम आश्चर्यचकित होऊन ऐकतो आहे.

"आणि आता संपूर्ण इराण अलेक्झांडराच्या ताब्यात आहे." अखिलेशने सांगितले.

"याचा अर्थ असा की पारसिकांच्या ज्या प्रचंड साम्राज्याचा तू नुकताच उल्लेख केला होतास त्याचा मालक आता अलेक्झांडर आहे. असंच की नाही?" गौतमाने विचारले.

"होय. तोच आहे." अखिलेशने चाचरत उत्तर दिले.

"भाई अखिलेश, तू आहेस क्षत्रिय. राज्य स्थापन करणं आणि राज्य उलथून पाडणं हे तुझं काम आहे. मी तुला काय समजावून सांगणार?" गौतम म्हणाला.

"गौतम!" अखिलेशने दिव्यात तेल घालून तो पुनः मध्ये ठेवला; आणि गौतमाकडे रोखून पाहात तो म्हणाला, "तुला एखाद्या युद्धात सामील व्हावं लागलं तर तू काय लढायचं नाकारशील?"

"तुला काय वाटतं, प्रजा गप्प राहील?" झोपडीच्या दुसऱ्या कोपऱ्यात बसलेल्या योगेंद्राने आव्हानाच्या स्वरात गौतमाला विचारले. गौतम चमकून त्याच्याकडे पाहू लागला.

मगधाच्या राजकीय स्थितीसंबंधी पुनः जोरजोरात वादविवाद सुरू झाला.

* * *

दुसरे दिवशी संध्याकाळी गौतम खिडकीजवळ बसून आणखी एक भूर्जपत्र वाचण्यात तल्लीन झाला होता. इतक्यात हरिशंकर येऊन दारात उभा राहिला.

"ब्रह्मचारी मित्रा, मी तुझ्या पावन कुटीत येऊ शकतो काय?"

"ये मित्रा, ये. कसं येणं झालं?" गौतमाने भूर्जपत्र दसरात गुंडाळून बाजूला ठेवीत

घाईघाईने म्हटले. "मला तर वाटलं होतं की तू आता कायमचा लुप्त झालास." आणि त्याने झटपट जमिनीवरून केरसुणी फिरवून चटई अंथरली.

"भाई गौतम, इच्छा-आकांक्षा तुला फार त्रास देतात काय?" जेवणखाण झाल्यानंतर हरिशंकराने अचानक प्रश्न केला.

"म्हणजे?"

"उदाहरणार्थ, मांसाची इच्छा?"

"आता मी तुला एक प्रश्न विचारतो, भाई हरिशंकर," गौतम थांबत थांबत बोलू लागला. "माझ्या पार्श्वभूमीवर रक्त आहे, त्याला मी काय करणार? माझ्या सभोवार सगळीकडे रक्त आहे. एवढ्या साऱ्या रक्तपाताचं प्रायश्चित्त मी कसं करणार? माझे मित्र युद्धाच्या गोष्टी बोलताहेत आणि माझी तर लढायची इच्छा नाही."

"पण तरीही तुला लढावंच लागेल." हरिशंकराने उत्तर दिले आणि तो पुनः वाचण्यात गढून गेला.

बाहेर पळसाच्या झाडांच्या सावल्या लांब होऊ लागल्या. हरिशंकराने आणखी काही बोलावे म्हणून गौतम थोडा वेळ वाट पाहात राहिला. परंतु त्या विचित्र भिक्षूने पुनः मौन धारण केले. संध्याकाळ झाली. ते दोघे तसेच मूकपणे खिडकीत जाऊन उभे राहिले.

"जीवनासंबंधी मला काही तरी सांग." गौतम पुनः म्हणाला.

"तुझं जीवन हे तुझं स्वतःचं जीवन आहे. माझ्या जीवनाहून ते अगदी वेगळं आहे. मी तुला काहीच सांगू शकत नाही." हरिशंकर म्हणाला.

गौतमाने कोपऱ्यात जाऊन ताडाचे एक स्वच्छ पान उचलून घेतले. "मला शांततेसंबंधी काही सांग. मी लिहून घेतो." त्याने लेखणी घेतली आणि तो जमिनीवर मांडी घालून बसला. "मी माझ्या ग्रंथाचं दुसरं प्रकरण लिहितो."

"पण तुझ्या ग्रंथाचं शेवटचं प्रकरण कोण लिहिणार?"

"सारा इतिहास म्हणजे एक अथांग समुद्र आहे; आणि या समुद्रात मी आणि तू पानांप्रमाणं तरंगत आहोत. माझ्या पूर्वी आतापर्यंत जे काही माहीत झालं आहे त्याची जबाबदारी माझ्यावर आहे किंवा नाही? सांग, मी काय लिहू?" गौतमाने विचारले.

"कालनिश्चितीची काही जरूर नाही. सगळं कसं एखाद्या स्वप्नाप्रमाणं व्यतीत होत आहे. ते तसंच व्यतित होईल." हरिशंकराने उत्तर दिले.

"व्यतीत होईल की व्यतीत होत राहील?" गौतमाने विचारले.

"ही आता तुझी स्वतःची समस्या आहे." भिक्षूने संक्षिप्तपणे उत्तर दिले.

"मला अहिंसेसंबंधी काही तरी सांग." गौतमाने हट्टी मुलाप्रमाणे पुनः पूर्वपदावर येत म्हटले.

"तू ब्राह्मण असून अहिंसेचा उपासक बनू इच्छितोस?" हरिशंकराने हसून विचारले.

"तुला आठवतंय, आळारानं भावी बुद्धाला काय सांगितलं होतं?"

"काय सांगितलं होतं?" भिक्षूने विचारले.

"आळारानं भावी बुद्धाला असं सांगितलं की, मित्रा, तुझ्यासारख्या संताचा सत्संग आम्हांला लाभला याचा आम्हांला आनंद वाटतो. जे सिद्धांत आणि ज्या विद्या मी जाणतो त्या तुलाही माहीत आहेत; आणि ज्या सिद्धांतांशी नि विद्यांशी तू परिचित आहेस त्यांच्याशी मीही परिचित आहे! ज्याप्रमाणं जो तू आहेस तोच मी आहे, त्याप्रमाणं जो मी आहे तोच तू आहेस. म्हणून माझी तुला अशी विनंती आहे की चल, तू आणि मी, आपण दोघे संघाचे संयुक्त संरक्षक बनू या." इतके बोलून गौतमानेही मौन धारण केले.

* * *

शेतांच्या पलीकडे शेकोट्या पेटविल्या जात होत्या. गावाच्या टोकाला चावडीसमोर लोक जमले होते. भाट महाभारताची कथा सांगत होता. सायंकाळच्या निःस्तब्धतेत वाऱ्याच्या झोताबरोबर त्याच्या खणखणीत आवाजाची लाट तरंगत गौतमाच्या झोपडीवर येऊन आपटली. पुनः नीरवता पसरली. मधूनच जनसमुदायातून प्रशंसासूचक उद्गार निघत आणि पुनः त्या सर्वांवर भाटाचा आवाज पसरून राही.

"या निःस्तब्धता मला नाना प्रकारच्या कथा सांगत असतात. शब्द समाप्त झाले तरी मला मुक्ती मिळत नाही!" गौतम स्वतःशीच उद्गारला आणि हरिशंकराकडे पाहात राहिला.

कोण कुणापेक्षा श्रेष्ठ आहे, कोणी कुणावर जय मिळविला, कोण कौरव होते, कोण पांडव होते, याचा निर्णय कोण करणार?

"मगधाशी युद्ध सुरू झालं तर तू लढशील?" त्याने अकस्मात उच्च स्वरात प्रश्न केला.

"आपण केवळ आपल्या विचारांचे परिणाम आहोत." हरिशंकराने उत्तर दिले, "प्रत्येक माणसाच्या प्रकृतीप्रमाणं त्याच्या हातून कर्मे, गरजा किंवा दुर्घटना घडत असतात. मनुष्य स्वतंत्र नाही. उत्तरदायित्व किंवा जबाबदारी याला काही अर्थ नाही."

अचानक नदीवर खूप प्रकाशपुंज चमकू लागले.

"कुणाची तरी वरात चाललीय." गौतमाने विचार व्यक्त केला.

"हूं!"

"किंवा कदाचित सरकारी नौका इकडे आली असेल."

"चल, आपण बाहेर जाऊ." हरिशंकर एकदम घाबरून म्हणाला.

ते दोघे आश्रमाच्या उपवनातून बाहेर पडून गावाकडे जाणाऱ्या रस्त्यावर आले.

गौतम निमूटपणे शंकराबरोबर चालत राहिला. थोड्या वेळाने मध्येच थांबून, तो उदास स्वरात त्याला म्हणाला, "तू अहंपूजक आहेस, हरिशंकर, तुला दुसऱ्यांची चिंता नाही. आपल्या बुद्धीच्या बळावर स्वतःसाठी अर्हत्पद प्राप्त करून घेण्यात काय मोठा पुरुषार्थ आहे? इतरांचं काय होईल याची तुला काय पर्वा?"

"इतरांना काय सोसावं लागत असेल, याची मला पूर्ण कल्पना आहे." हरिशंकराने संक्षिप्तपणे उत्तर दिले. "चल, आपण तिकडे जाऊन काय चाललंय ते पाहू."

गौतम गप्प राहिला.

प्रकाशाने झगमगणाऱ्या नौका नदी ओलांडून किनाऱ्याला लागल्या होत्या; आणि दूरून नदीच्या घाटावर खूपच हालचाली चालू असल्याचे दिसत होते.

"ही कुणाची वरात आहे काय?" गौतमाने रस्त्याने चाललेल्या एका माणसाला विचारले.

"छेः छेः! अयोध्येहून राजन आले आहेत." त्या वाटसरूने उत्तर दिले.

गौतमाने चमकून शंकराला हाक मारली. नंतर मागे वळून चोहोंकडे नजर फिरविली. परंतु शंकर नेहमीप्रमाणे लुप्त झाला होता; आणि चावडीसमोर जमलेल्या गावच्या लोकांच्या गर्दीत त्याला शोधून काढणे कठिण होते.

गौतमाने उपरणे खांद्यावर टाकले आणि तो शहराच्या दिशेने चालू लागला.

शहराच्या मध्यभागी गेल्यानंतर त्याला आपल्या वाड्यातून येणारा प्रकाश दिसला. तो लगेच दुसऱ्या गल्लीत शिरला आणि झपाझप पावले टाकीत शहराच्या बाहेर पडला. त्या ठिकाणी एका आंबराईत एक मूक भवन पानांच्या गर्दीत मूकपणे उभे होते.

या भवनात शंभर वर्षांपूर्वी शाक्य मुनी येऊन राहिले होते—फक्त शंभर वर्षांपूर्वी!

परंतु त्या भवनाजवळ जाण्याऐवजी तो मधूनच परत फिरला आणि हळूहळू आश्रमाच्या दिशेने चालू लागला.

स्वातंत्र्य नाही. स्वातंत्र्य नाही. खुल्या वातावरणात, स्वरसागराच्या लाटांमध्ये, बुद्धीच्या विस्तारात, कुठेच स्वातंत्र्य नाही. मी बद्ध आहे. मी काही करू शकत नाही. मी काहीही करू शकणार नाही. अखेर एके दिवशी इतिहास नावाचा क्रम, देश-काल हे मला गिळून टाकतील.

नदीच्या काठी जाऊन पोहोचला आणि त्याने तेथील थंड गवतावर आपले शरीर झोकून दिले.

उपनिषदांत लिहिले आहे की ज्याला केवळ आपल्या आत्म्याची आकांक्षा आहे,

त्याच्यासाठी बाप बाप नाही, आई आई नाही, इहलोक इहलोक नाही, देव देव नाही, चोर चोर नाही, खुनी खुनी नाही. त्याला भल्याबुऱ्याची चिंता असत नाही; कारण त्याने मनाचे सारे क्लेश व दुःखे यांवर जय मिळविलेला असतो.

आणि शाक्यमुनींनी म्हटले होते, "ईश्वर असो किंवा नसो, सत्य केवळ हेच आहे की, दुःखाचं अस्तित्व आहे. आपण समजतो की आपण आहोत; परंतु आपण तर केवळ सापेक्षतेत बुडून गेलेले असतो. प्रत्येक वस्तू दुःखमय आहे. सर्व दुःखं! फुंकर घालून दिवा विझवावा तसा माणूस विझून जातो. फक्त घटना व अनुभूती यांचा क्रम निरंतर चालू असतो आणि तो तसाच चालू राहाणार."

पाण्याच्या लाटा किनाऱ्यापर्यंत येऊन-येऊन परत जात होत्या. गौतमाने अग्नीवरून आपली दृष्टी काढून घेऊन ती शांतपणे वाहाणाऱ्या नदीकडे वळविली.

... मी दुःख सहन करू इच्छितो. मी दुर्बल बनू इच्छितो. माझ्या मूर्खपणाचे दर्शन मी स्वतः घेईन. मी दुःख सहन करीन.

हृदय आणि मेंदू यांची दुःखे, क्लेश व परीक्षा. मला मुक्ती नको! हे शाक्यमुने, करुणा ही फार मोठी गोष्ट आहे. परंतु मला खुद्द तुम्हीच करुणा येत असण्याची शक्यता आहे. हे पावन राजकुमारा, कोणी कुणावर करुणा करावयाची हाही प्रश्न आहेच.

# ३

श्रावस्तीच्या उत्तरेकडे जाणाऱ्या तराईच्या मार्गावर दोन्ही बाजूंना दऱ्या-डोंगर आणि बोरूंची व पळसाची अरण्ये होती. नदी या अरण्यांतून मजेत वाहात होती. तिच्या पूर्व किनाऱ्यावर घाट होता. तेथेच रात्री सरकारी नावा येऊन लागल्या होत्या.

अयोध्या व उत्तर कोसल यांचा सत्ताधीश राजन आणि त्याचे साथीदार सकाळी शिकारीसाठी उत्तरेकडे कूच करणार होते. परंतु माहिती काढणाऱ्यांनी अशी माहिती आणली होती की हत्तींच्या क्षेत्रात अनपेक्षितपणे जोराचा पाऊस सुरू झालेला आहे. नावांतून उतरून राजनचे लोक हत्तींवर, पालख्यांमध्ये, रथांत व बैलगाड्यांत बसत होते. ही बातमी समजताच पुढचा प्रवास तहकूब करण्यात आला आणि पुरुषोत्तम गुरूंच्या आश्रमापासून काही मैलांच्या अंतरावर मोहाच्या झाडांच्या वनात तंबू उभारण्यात आले.

बघता बघता अरण्याला नगराचे रूप प्राप्त झाले. ज्या बागेमध्ये केवळ हरिणांचे कळप, पाणकोंबडे, बदके व मोर यांचे साम्राज्य होते, आणि जेथे क्वचित एखाद्या वेळी

चिंतनात निमग्न असलेला एखादा विद्यार्थी पायवाटेने जात असलेला दृष्टीस पडत असे, तेथे हां हां म्हणता जणू मोठी थोरली जत्रा भरली.

राजाच्या लवाजम्यातील तरुणी दिवसभर उद्यानात भटकंती करीत आणि अंधार पडल्यावर नदीत जाऊन डुंबत. कधी-कधी दिवसा त्या धनुष्यबाण घेऊन हरिणांची शिकार करीत.

दोन-तीन दिवसातच चंपकला त्या निरुद्देश्य जीवनाचा कंटाळा आला.

तीन दिवस सतत जंगलात राहून भटकंती व शिकार करण्याचा तिला वैताग आला. तिने राजकुमारी निर्मलेला बरोबर घेतले आणि ती गुपचूप गावाच्या दिशेने निघाली.

समोरच दाट आंबराई होती. तेथे खूपच शांतता व शीतलता होती. आभाळात सायंकाळचे लाल रंग विखुरले होते; आणि बागेत पाण्याचा रहाट चालू होता.

"तो पाहा गाण्याचा आवाज येतोय. चल, आपण तिकडे जाऊ." निर्मलेने कान देऊन ऐकत म्हटले.

पालापाचोळा तुडवीत त्या आंबराईकडे जाऊ लागल्या. झाडांच्या फांद्यांमधून दूरवर कोणत्यातरी आश्रमाच्या झोपड्या दिसू लागल्या.

"हे कोणतं ठिकाण आहे?" चंपकने कदंबाच्या फांदीवर हात ठेवीत थबकून विचारले.

"ही समोर कोण मुलं आहेत?" निर्मलेने अकस्मात विचारले. प्रत्येक ठिकाणी कोणी ना कोणी ब्रह्मचाऱ्याची वस्त्रे परिधान केलेला विद्यार्थी पाहून तिला आपल्या भावाची आठवण येऊ लागली.

* * *

गौतम नीलांबर सतत तीन दिवस आणि तीन रात्री उपाशी-तापाशी नदीच्या काठा काठाने इकडेतिकडे भटकत राहिला. रात्रीच्या वेळी तो तासन् तास थंड पाण्यात एका पायावर उभा राहिला. आणि मग वाळूवर बाभळीचे काटे पसरून त्यांवर झोपला.

परंतु चौथ्या दिवशी तो इतका वैतागला की त्याने पुन: परत जाण्याचा निश्चय केला.

संध्याकाळी मोठ्या कष्टाने पाय उचलीत तो आश्रमाकडे जाणाऱ्या रस्त्यावरून चालला होता. इतक्यात त्याला मागून कोणीतरी हाक मारली.

त्याने वळून पाहिले. अखिलेश हसत हसत त्याच्याकडे येत होता.

"भाई गौतम, गेले तीन दिवस तू कुठं गडप झाला होतास? सगळीकडे तुझा शोध चाललाय."

"मी तर इथंच होतो. तू यावेळी इथं काय करतो आहेस?" गौतमाने शांत स्वरात विचारले.

"जे तू करीत होतास तेच." अखिलेशने विनोदाने उत्तर दिले.

"मी तर परमेश्वराची लीला पाहात होतो."

"परमेश्वरी लीलेचं एक ओझरतं दर्शन तर मलाही काल घडलं होतं. धनुष्यबाण घेऊन कुणीतरी हरिणांचा पाठलाग करीत होती. मला पाहताच ती चटकन झाडावर चढली."

अखिलेश काय सांगतो आहे ते गौतमाच्या ध्यानात येईना. तो उदासपणे अखिलेशचा प्रसन्न चेहरा पाहात राहिला.

बाहुन्याची वाळलेली पाने वाऱ्यावरून उडत उडत आली आणि पायवाटेवर त्यांच्या आसपास विखुरली.

"वनदेवी! वनदेवी!" दूर झाडीतून कोणीतरी भजन गात चालले होते. "वनदेवी, तू दुरूनच ओझरतं दर्शन देऊन अदृश्य होतेस. कधी आमच्या गावातही ये ना!"—

"तुला माणसांची भीती वाटते काय?"

गौतम आणि अखिलेश वाऱ्याच्या मंद सुगंधाचा आस्वाद घेत गवतावरून चालत राहिले.

"वनदेवी मनात येईल तिथं थांबून विश्रांती घेते.
तिचा सुगंध दरवळतो. ती साऱ्या वनाची माता आहे."

गौतम आणि अखिलेश गात गात पुढे चालू लागले. थोड्या अंतरावर बासरी वाजविणाऱ्या मुलांचे एक टोळके गावाकडे चालले होते. अखेर गौतम थकून एका झाडाखाली थांबला.

"एकीकडे देवता, दुसरीकडे अप्सरा आणि वनातल्या यक्षिणी. या संधिकाळात, अशा या कातर वेळी झाडाखाली उभा राहू नकोस." अखिलेशने पूर्वीप्रमाणेच कृत्रिम गंभीरपणे म्हटले, "कारण झाडांवरच्या यक्षिणी माणसांना भुरळ घालून घेऊन जातात. इथं आणखी एखाद्या पाटलीपुत्राची पाया तर घातला जाणार नाही ना!"

"अरे, हे समोर कोण उभं आहे?" गौतमाने अकस्मात गोंधळून जाऊन पापण्यांची उघडझाप करीत म्हटले.

"कोण आहे?" अखिलेश म्हणाला; "महाभारताचा कवी विचारतो, 'तू कोण आहेस? कदंबवृक्षाची फांदी हातानं वाकवून उभी असलेली तू देवता आहेस की कुणी यक्षिणी? की अप्सरा?' या वृक्षाची रहस्यं मोठी अपार असतात, भाई गौतम!"

"कसले वृक्ष?"

"गौतम, विसरलास वाटतं? आपल्याला मुलींकडे पाहाण्याची परवानगी नाही!" अखिलेशने एकदम गंभीर होऊन उत्तर दिले; आणि तो डोळे मिटून एका झाडाच्या आड निघून गेला.

गौतमाने चमकून पुनः समोर पाहिले. कदंबाच्या झाडाखाली अयोध्येच्या घाटावर दिसलेली तरुणी उभी होती.

* * *

चंपकने गौतमाला पाहिले नाही. ती निर्मलेशी बोलत बोलत दुसऱ्या पायवाटेकडे वळली.

अखिलेश एका शिळेवर बसून ध्यानस्थ झाला होता. "चला, आपण आश्रमाकडे जाऊ." तो एक डोळा किलकिला करीत गौतमाला म्हणाला.

ते पुनः चालू लागले. गावाजवळ पोहोचताच गौतम थांबला. "मी भिक्षा घेऊन इतक्यात येतो."

अखिलेशाच्या तावडीतून स्वतःची सुटका करून घेऊन तो झपाट्याने त्या मुलींच्या मागोमाग गेला. घाईने काट्याकुट्यांतून गेल्यामुळे त्याच्या पावलांना जखमाही झाल्या.

चंपक पडावाजवळ पोहोचली तेव्हा पाचोळ्यावरून चालत कोणीतरी आपल्या मागोमाग येत असल्याचे तिच्या लक्षात आले. तिने वळून पाहिले.

तिच्या समोर शरयू नदीतून पोहून पैलतीराला जाणारा तो तरुण उभा होता. त्याचा रंग गोरा व डोळे काळेभोर होते. त्याने ब्राह्मण विद्यार्थ्याप्रमाणे शुभ्र कपडे घातलेले होते.

"अयोध्येची मंडळी इकडे आल्याचं मला समजलं होतं. मनाशी म्हटलं, आजची भिक्षा इथूनच घ्यावी." तो अत्यंत गंभीर स्वरात बोलला.

"अरण्यात वनदेवीचं भजन तूच गात होतास?" चंपकने हलक्या आवाजात विचारले.

"मी कोण आहे आणि जो भजन गात होता तो कोण आहे, हे मला सांगता यायचं नाही."

"तू चित्रं काढतोस? मी असं ऐकलंय की पुरुषोत्तम गुरूंच्या आश्रमातला गौतम नीलांबर फार छान चित्रं काढतो. तुझा चेहरामोहरा पाहून असं वाटतं की तुझंच नाव गौतम नीलांबर असावं. नावाच्या रहस्यावर माझा फार विश्वास आहे. नावांच्या रहस्यावर तुझी श्रद्धा नाही?"

"काही मूर्ख लोकांकडून ज्याच्यासंबंधी कदाचित तू काही ऐकलं असावंस तो मीच आहे."

"तर मग तू बहुधा माझंही चित्र काढशील. आज सकाळी इथं पुष्कळ चित्रकार आले होते."

"मी मूर्तिकार आहे. मी केवळ कल्पनेच्या आधारे, मनानं सूचना नि आव्हान दिलं म्हणजे चित्र काढतो." तो काहीशा अभिमानाने म्हणाला, "विश्वकर्म्यालाही माझा आदर करावा लागेल."

"तू नास्तिक नाहीस? आजकालचे विद्यार्थी कपिल आणि शाक्यमुनी यांच्यावर अधिक श्रद्धा ठेवतात."

"मला शिधा आणून दे. माझी निष्कारण खोटी होतेय." गौतम किंचित नाराज होऊन म्हणाला. या तरुणीला पुनः पाहाण्यासाठी तो कित्येक दिवस रानोमाळ भटकला होता. आणि आता ती त्याच्या समोर उभी असताना तो तिच्याशी भांडत होता. कारण त्याला अकस्मात वाटू लागले होते की ही तर माझी स्वतःची वस्तू आहे—माझ्या अस्तित्वाचे, माझ्या मनाचे व हृदयाचे एक अभिन्न अंग आहे. येथे द्वैताचा प्रश्नच निर्माण होत नाही. येथे कसल्याही संकोचाला, परकेपणाला, लज्जेला स्थान नाही. त्यांची आवश्यकताही नाही. मी तर हिला अनादिकाळापासून ओळखतो आहे.

त्याने दुसऱ्या मुलीकडे दृष्टी वळविली. ती त्याच्याकडे टक लावून पाहात होती. गौतमाने तिला पुनः जरा निरखून पाहिले. ती हरिशंकराची बहीण होती.

चंपक शिबिरात जाऊन पीठ घेऊन आली आणि तिने ते गौतमाच्या भिक्षापात्रात घातले.

"आता जा. पुनः कधी तरी ये." चंपक हलकेच म्हणाली.

तो तिला प्रणाम करून पडावाच्या बाहेर आला. या दोन मुली कोण आहेत आणि राजनच्या लवाजम्याशी त्यांचा काय संबंध आहे हे त्याला अजून माहीत नव्हते. शिबिराच्या आसपास इतर अनेक मुली इकडेतिकडे फिरत होत्या. परंतु या दोन मुली त्या समुदायात अगदी वेगळ्या आणि उठून दिसणाऱ्या होत्या.

"या दोन मुली कोण?" त्याने मोठा धीर करून एका म्हातारीला विचारले. ती म्हातारी घाईघाईने स्वयंपाकघर असलेल्या तंबूकडे चालली होती.

म्हातारीने आपल्या चमकदार डोळ्यांनी त्याच्याकडे रागाने पाहिले आणि ती कपाळाला आठ्या घालून म्हणाली, "तू तर ब्रह्मचारी दिसतोस. तर मग तुला या उठाठेवी कशाला हव्यात? त्यांच्यापैकी एकजण राजगुरूची मुलगी चंपावती आहे आणि दुसरी राजकुमारी निर्मला आहे. त्या दोघी राजनच्या बरोबर शिकारीसाठी आल्या आहेत. पण तुला त्यांच्याशी काय करायचंय? अन् हे बघ, पुनः कधी इकडे येऊ नकोस. आजकाल पुष्कळसे भुरटे चोर संन्याशांचा वेष धारण करून चोऱ्यामाऱ्या करीत असतात."

"कुंटीण कुठली! हडळ!" गौतम मनाशी उद्गारला आणि आश्रमाच्या दिशेने चालू लागला.

दुसरे दिवशी तो पुनः अंगावर उपरणे घेऊन शिबिराकडे गेला. तो सगळीकडे फिरला; परंतु त्याला ती दिसली नाही. राजघराण्यातील मुली सामान्य लोकांमध्ये फारशा येतच नसत. बहुधा शिबिरातल्या एखाद्या जरीच्या शामियान्यात बसून ती पोपटाला बोलायला शिकवीत असेल—हा विचार मनात येऊन तो हसला. पोपटाला शिकविणे हे थोरामोठ्यांच्या मुलींच्या मनोरंजनाचे एक साधन असते, हे त्याने ऐकले होते. कदाचित ती पालखीत बसून सहल करायला शहरात गेली असेल...किंवा मग...

"ही पाहा मी!" असे म्हणून ती कदंबाच्या झाडाच्या मागून उडी मारून खाली आली. तो जास्तच गोंधळला.

"तूही उदास आहेस? मला या उदासपणाचा आता अगदी कंटाळा यायला लागलाय. कालपासून निर्मलाही फार कष्टी झालीय."

"निर्मला का कष्टी आहे?"

"तिचा भाऊ राज्यपद सोडून कुठं तरी निघून गेलाय. काल तुला पाहिल्यानंतर तिला आपल्या लाडक्या भावाची आठवण झाली."

"मी असं ऐकलंय की आनंदानंही आपल्या प्रिय सुंदरीला सोडून दिलं होतं; आणि तेही केवळ सिद्धार्थ गौतमाच्या उपदेशावरून!"

ती गप्प राहिली.

"आणि आनंद परत आला तर? कारण मला माहीत आहे की तो अजून पुरा अर्हत बनू शकलेला नाही. तो पुनः पुनः परत येतो."

"ही तर फारच वाईट बातमी आहे." चंपक म्हणाली, "कारण मुक्ती ही फार मोठी गोष्ट आहे. त्याला म्हणावं, शाक्यमुनींनी महामतीला काय सांगितलं होतं ते तू विसरलास काय?"

"काय सांगितलं होतं?" गौतमाने काहीसे चिडून विचारले.

"शाक्यमुनी म्हणाले होते, 'हे महामती, ज्याप्रमाणं नाटकातली नाचगाणी, वीणा-वादन, चित्रकला आणि इतर कला यांतलं प्रावीण्य हळूहळू, क्रमाक्रमानं प्राप्त होत असतं त्याचप्रमाणं अर्हत सुद्धा एका दिवसात बनता येत नाही.' आमचे महाराजकुमार तर त्याग हीसुद्धा एक प्रकारची कलाच आहे असं समजून चालले आहेत."

ती बोलता बोलता शिबिराच्या मागील बाजूच्या बांधावर बसली.

"चल, मी तुला माझी चित्रं दाखवतो." तो गडबडीने म्हणाला.

"त्याचा मला काय फायदा होईल?" तिने खुषीत येऊन विचारले.

"तुला वाटत असेल, हाही इतर विद्यार्थ्यांसारखा अगदी निरुपयोगी, कल्पनेच्या साम्राज्यात विहार करणारा विदूषक असणार! परंतु चंपकराणी, एके दिवशी तू ऐकशील

की श्रावस्तीचा गौतम नीलांबर चित्रकलेचा फार मोठा आचार्य बनला आहे." तो लहान मुलाप्रमाणे रागारागाने म्हणाला; आणि चंपककडे पाहू लागला. ती बहुधा आता रागावणार आणि आपली चांगली खरडपट्टी काढणार अशी त्याची कल्पना होती. परंतु ती गप्प राहिली.

ती बांधावर स्तब्ध बसून राहिली; कारण आजच्याप्रमाणेच दहा वर्षापूर्वी हरी तिला म्हणाला होता, "तू मला इतर विद्यार्थ्यांसारखा निरुपयोगी कल्पनेच्या साम्राज्यात विहार करणारा विदूषक समजतेस काय ? पण चंपाराणी, एके दिवशी तू ऐकशील की अयोध्येचा महाराजकुमार फार मोठा गणितज्ञ बनला आहे."

अभिव्यक्ती ही उद्देशाच्या पलीकडली गोष्ट असते. वेदान्तात असे सांगितले आहे की आरम्याला, कामनांच्या दृष्टीने, ही सृष्टी तहानलेल्या हरिणाला वाळवंटात नद्या दिसाव्यात तशी मृगजळाप्रमाणे दिसते. त्याच मृगजळाने मला, हरीला, फार व्याकुळ बनविले होते.

उद्देश काय आहे ? मूळ उद्देश काय आहे ? ती बांधावरून उठली आणि म्हणाली, "तुझा आनंद तुला कुठं भेटला तर त्याला सांग की, सुंदरी मृगजळातूनही मुक्त झालीय. तू तिची काळजी करू नकोस."

"तू...विहारात जाणार आहेस, ही बातमी खरी आहे काय ?"

"कदाचित ! त्यात काय वाईट आहे ? तो अनुभवही घेऊन पाहिला पाहिजे."

"चंपक, तुझं वय काय ?"

"शेकडो वर्षांचं ! इतक्या शतकांचं की मला त्याची आठवणही नाही." ती हसून म्हणाली.

"काही दिवसांपूर्वी भाटांच्या तोंडून भीष्म आणि अर्जुन यांच्या कथा ऐकून माझ्या मनात विचार आला होता की चित्रांगदा आणि उलूपी या कशा असतील ?"

"मला पाहिल्यानंतर तुला ते समजलं ना ?" ती हसली आणि म्हणाली, "तू तर मूर्तिकार आहेस."

"होय ! पण तू विसरतेस की प्रत्येक कलाकृती हे नाम आणि रूप यांचं मिश्रण असतं. एकाची ओळख कानांना आणि दुसऱ्याची ओळख डोळ्यांना असते."

"परंतु जी वस्तू विशुद्ध गुणात्मक आहे, जिची जाणीव केवळ बुद्धीच्या द्वारेच होऊ शकते तिचा अनुभव घेता येत नाही. तसं नसेल तर तू स्वतःच आपल्या दृष्टिकोनाचं खंडन करतो आहेस, असं म्हणावं लागेल."

"विशुद्ध रूप केवळ गुण आहे, संयोजन नव्हे." गौतमाने उत्तर दिले, "एखाद्या भौतिक लक्षणाच्या द्वारा त्याचं सूचन होऊ शकतं; त्याला भौतिक लक्षणाप्रमाणं समजता येत नाही."

"आकाशे रूपं लक्षणम् !" चंपक हसून म्हणाली.

"विशुद्ध रूप," गौतम उत्तेजित होऊन म्हणाला, "अस्तित्वाची व्याख्या करतं ते स्वतः अस्तित्व नव्हे."

"तू काय होऊ इच्छितोस?"

"मी तुला सांगेन, एके दिवशी मी तुला अवश्य सांगेन की मला काय व्हायचं आहे."

मागून नूपुरांचा आवाज आला. निर्मला टोपलीत खूपशी पांढरी फुले घेऊन पायवाटेने येत होती. गौतमाला पाहून तिने टोपली बांधावर ठेवली आणि त्याला नमस्कार केला. गौतमाने मोठ्या विद्वान व पवित्र ब्राह्मणाप्रमाणे तिला आशीर्वाद दिला; आणि तो उलट पावली परत फिरला.

* * *

"ज्यांना शांती लाभली आहे ते धन्य होत." चंपक आपल्या मनात म्हणाली. गौतम सिद्धार्थांनी गयेमध्ये दिलेल्या प्रवचनाचे तिला स्मरण झाले. 'हे पुरोहिता, साऱ्या वस्तूंना आग लागली आहे. डोळे आगीत जळत आहेत. आकार-प्रकार, दृष्टी, इंद्रियांशी संबंधित पदार्थ, अतिशय तृष्णा, शब्द, गंध, बुद्धी, मेंदू, विचार, शरीर-कल्पना सारे काही या आगीत धडाधड जळत आहे! घृणा आणि प्रेम, जन्म, वृद्धत्व आणि मृत्यू, शोक, दुःख आणि निराशा यांनी, हे पुरोहिता, हे प्रचंड अग्निकुंड बनविले आहे.'

गुरुकुलाचा विद्यार्थी परत गेला होता. अरण्यामध्ये पूर्वेचा वारा सोसाट्याने वाहात होता. झाडांखाली बसलेल्या काही भिक्षुणी आपापली भिक्षापात्रे घेऊन आपल्या झोपड्यांकडे चालल्या होत्या. त्यांच्या मुखमंडलांवर केवढी शांती होती! त्यांनी प्रवाहात उडी घेतली होती. ज्या मार्गावरून कधी परत फिरणे होत नाही त्या मार्गाने त्या चालल्या होत्या. "मलाही प्रवाहात उडी घेता येणार नाही काय?" चंपक उदासपणे मनाशी विचार करू लागली.

## ४

"स्त्रियांविषयी आमचा दृष्टिकोन काय असला पाहिजे?" शंभर वर्षांपूर्वी याच श्रावस्तीत हा महत्त्वाचा प्रश्न विचारण्यात आला होता.

"त्यांच्याकडे पाहाताही कामा नये, आनंद!" उत्तर मिळाले होते.

"पण समजा, त्यांच्यावर नजर पडलीच तर?"

"त्यांच्याशी बोलू नका."

"परंतु त्या आपण होऊन आमच्याशी बोलू लागल्या तर?"

"सतत जागृत राहा."

कित्येक रात्री सतत जागे राहिल्यानंतर अचानक गौतमाच्या डोळ्यांवर भयंकर झोपेची झापड आली. तरीपण त्याने महत्प्रयासाने आपले डोळे उघडे ठेवले.

राजशिबिराच्या दिशेने झांजा आणि घुंगरू यांचे आवाज येऊ लागले होते. चतुर्दशीचा चंद्र डुलत-डुलत आश्रमाच्या अगदी माथ्यावर आला होता. त्याच्या प्रकाशात पुष्पलतांनी आच्छादलेल्या झोपड्या सखोल शांततेत बुडून गेल्यासारख्या दिसत होत्या. कुठे कुठे दिवे तेवत होते. इतर सर्व विद्यार्थी झोपी गेले होते. फक्त तो एकटाच जागा होता.

तो हलकेच उठला; आणि खांद्यावर उपरणे टाकून हलक्या पावलांनी आश्रमाच्या बाहेर येऊन मोहाच्या बनाकडे निघाला. वाळलेला पालापाचोळा त्याच्या पावलांखाली दबला जाऊन जोराचा आवाज होऊ लागला. इतक्यात त्याच्या पावलांची चाहूल ऐकून दचकलेली एक खार भुर्रकन इकडून तिकडे धावत गेली. आपल्याला कोणी ओळखत नाही ना, हे जाणून घेण्यासाठी इकडेतिकडे पाहात तो हळूच मशालींच्या उजेडाने झळाळणाऱ्या मोहाच्या बागेत प्रविष्ट झाला. तेथे मधोमध एक मंडप उभारलेला होता. त्या मंडपाच्या एका बाजूला गायकवृंदातील मुली स्वरमंडळे, सतारी व झांजा घेऊन बसल्या होत्या.

इतक्यात गौतमाची दृष्टी त्या म्हाताऱ्या दासीकडे गेली, जिने त्याला काल धमकाविले होते. तो घाबरून एका तंबूच्या आड लपला आणि एका मुलीचे नृत्य पाहाण्यात तन्मय झाला.

* * *

प्रेक्षक चमकले. एक तरुण छावणीच्या मागून पुढे आला. मंडपात येऊन त्याने खाली वाकून पायांत घुंगूर बांधले; आणि आपले शुभ्र उपरणे एका बाजूला फेकून देऊन मुक्तपणे, आनंदाने तांडव नृत्य करीत तो समोर आला.

जनसमुदाय मंत्रमुग्ध होऊन त्याचे नृत्य पाहात राहिला. असे वाटत होते, जणू तो स्वतःच नटराज आहे.

चंपक नृत्य करता करता थांबली. तिने नर्तकाकडे आश्चर्याने पाहिले.

मृदंग जोरजोरात वाजू लागला. अचानक तांडव नृत्य करीत तो मंडपाच्या मधोमध आला.

त्याने सर्वांसमोर नृत्याचे आठही रस व्यक्त करून दाखविले. हे शिवाचे नृत्य आहे.—त्याच्या मुद्रांमध्ये सृष्टीच्या साऱ्या विकास-क्रिया अंतर्भूत आहेत. त्याची वाणी हेच सर्वस्व आहे. चंद्र आणि तारे ही त्याची वस्त्रे आहेत. शंकर हा साक्षात तान आहे, साक्षात संगीत आहे. तोच सार्वभौम लयीचा द्योतक आहे.

चंपक आपल्या जागेवरून उठली आणि नृत्य करीत त्याला येऊन मिळाली.

ती गौरी होती आणि शंकराबरोबर नृत्य करीत होती.

चांदणे मोकळ्या मैदानावर संगीताची बरसात करीत होते. चांदीच्या रंगाचे ढग नदीवर तरंगत होते; आणि चंदेरी सारस पंखांत चोची खुपसून वाळूवर झोपले होते. कार्तिकातला पूर्णचंद्र फुलांवरून डोकावत होता.

परंतु ती रात्रही संपली. उत्सव साजरा करणाऱ्या लोकांचा कोलाहल कमी झाला. त्यांच्या गीतांचे व घुंगरूंचे आवाज मंदावले. पूर्वेला तांबडे फुटण्याच्या सुमारास राजाच्या छावणीवर नीरवता पसरली; आणि मांडवामध्ये फुलांचे काही गजरे व कळ्यांचे ढीग विखुरलेले पडून राहिले.

* * *

सकाळ झाली. हिमालयाच्या शिखरांवर धुके तरंगत होते. सरोवरात लाल कमळे उमलली होती. गावाच्या रस्त्यावरून जाणाऱ्या गवळणींच्या घागरी उन्हात चमकत होत्या. मोहाच्या पिवळसर फुलांभोवती घिरट्या घालणाऱ्या मधमाशा त्याच्या कानांत गुणगुणल्या. परंतु जेव्हा सूर्याचे प्रखर किरण त्याच्या पापण्यांतून आत घुसले तेव्हाच तो डोळे चोळत उठला. आपण तलावाच्या काठावरील पडक्या पायऱ्यांवर झोपलो होतो, हे त्याच्या लक्षात आले. त्याने घाबरून चोहोकडे पाहिले. आपण कोठे आहोत ? हे सारे काय आहे ? त्याने मेंदूवर खूप जोर देण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याला काहीच आठवेना.

तो आळस देऊन उठला आणि आळोखेपिळोखे देत पुनः पायरीवर बसला. अकस्मात त्याची दृष्टी मोहाच्या बनाकडे गेली. आता ते बन निःस्तब्ध होते. एक हरिण झाडाच्या मागून पळाले. खारी वेलफळे कुरतडत होत्या. हिरव्या पोपटांचा एक थवा फांदीवरून उडाला. जंगल शांत होते. तो स्तंभित व व्याकुळ होऊन तेथे बसला होता. हळूहळू त्याला एखाद्या स्वप्नाप्रमाणे पुसटपुसट आठवू लागले. या ठिकाणी गेल्या रात्री राजाची छावणी होती आणि त्या छावणीच्या मंडपात आपण रात्रभर नृत्य करीत होतो. त्या सर्वांनी नृत्य केले होते. नाचता नाचता जेव्हा तो थकून गेला तेव्हा राजाने त्याला बोलावून आपल्याजवळ बसवून घेतले होते. त्यानंतर त्याने

राजाबरोबर मनसोक्त मदिरापान केले होते, भाजलेले मांस खाल्ले होते. परंतु त्या साऱ्या रसरंगात त्याची नजर सतत चंपकला शोधीत होती. परंतु ती नृत्य संपताच राजकुमारीसह शिबिराच्या अंतःपुरात निघून गेली होती. तिची प्रतीक्षा करीत तो पहाटेपर्यंत तेथे बसून राहिला होता. नंतर जेव्हा तो मंडपातून बाहेर पडून झोकांड्या खात आश्रमाकडे परत जाऊ लागला तेव्हा त्याच्या डोळ्यांवर झोपेची झापड आली आणि तो तलावाच्या काठी अंग टाकून झोपी गेला. सकाळी प्रस्थानाची दुंदुभी वाजली आणि छावणी उठविण्यात आली. सरकारी डेरे हत्तींच्या शिकारीसाठी प्रस्थान करीत होते त्यावेळी चंपक निर्मलेबरोबर तलावाच्या काठी आली होती. निर्मला तिला म्हणाली होती, "किती विचित्र ब्राह्मण आहे! परवा तुझ्याशी चित्रकलेसंबंधी वादविवाद करीत होता; रात्री त्यानं नटराजासारखं नृत्य केलं आणि आता तो लहान मुलासारखा गाढ झोपी गेलाय. चल, आपण इथून जायच्या आधी त्याला जागे करून प्रणाम करू."

चंपक काही क्षण मूकपणे उभी राहिली. नंतर ती म्हणाली, "नको. कारण जो जागतो त्याला एके दिवशी झोप येते; आणि जो झोपतो त्याला एके दिवशी जाग येते; त्या लोकांकडे पाहा, जे सतत जागे असतात." आणि इतके बोलून ती आपल्या रत्नखचित पालखीकडे निघून गेली होती.

आणि आता मोहाच्या बनात संपूर्ण स्तब्धता होती. तो तलावाच्या पायऱ्यांवर बसून विचार करीत राहिला. त्या एका रात्रीत जणू तो अकस्मात मोठा झाला होता. त्याने हृदयाच्या जगाचा प्रवास केला होता. त्याने मायेचा प्रयोग केला होता आणि त्या प्रयोगाविषयी त्याला असमाधान नव्हते. परंतु हा अनुभव किती विचित्र होता! जणू शिवाच्या जागी तो होता आणि जीवनाचे सारे विष त्यानेच प्राशन करून टाकले होते. हा किती अद्भुत प्रयोग होता! या बाबतीत त्याने काही कपिलाशी पैज मारलेली नव्हती. आणि बिचारा हरिशंकर तर यावेळी कुठे तरी हजारो मैल दूर उभा होता!

परंतु ती जाताना मला भेटूनही गेली नाही. तिने जवळ येऊन मला नुसते जागेसुद्धा केले नाही.

सारांश काय की ती माझ्याशी एक शब्दही न बोलता पुढे निघून गेली. एक क्षणभर त्याला फार समाधान वाटले. ती आपल्याहून वेगळी नाही, आपल्या अस्तित्वातच तिचे अस्तित्व समाविष्ट आहे, हा त्याचा अनुभव अधिक तीव्र झाला. तिने माझ्याशी बोलण्याची गरजच काय होती? ती तर माझ्याशी दर क्षणाला बोलत असते. पण हेही मिथ्या आहे. निव्वळ बडबड! मी तर स्वतःलाच फसवितो आहे. मी मायाजालात भयंकर गुरफटून गेलो आहे. ती माझ्याहून वेगळी आहे. फार दूर आहे. कुठे मी आणि कुठे ती! हे सारे खोटे आहे.

"फार छान!" तो तलावाच्या पायरीवरून उठत म्हणाला. (इथेच ती त्या दिवशी घसली होती!) "तू आपल्या साऱ्या वैभवासह हत्तींची शिकार करायला गेली आहेस. आणि जीवन? ते तर तुझ्याशिवायही व्यतीत होईलच."

आश्रमाच्या रस्त्याने चालत असता त्याला आठवले—आपल्या अध्ययनाचे हे शेवटचे वर्ष आहे. लौकरच आपले वडील आपल्याला घरी घेऊन जाण्यासाठी येतील. गुरुजी निरोप देताना तेच नेहमीचे शब्द उच्चारतील : सत्यं वद, धर्मं चर! खरे बोल आणि धर्माचे आचरण कर. (धर्म?)! आश्रमातील सारे विद्यार्थी, इतक्या वर्षांचे आपले सहयोगी आपल्याला घाटापर्यंत पोहोचवायला येतील. प्रतिष्ठेची पगडी बांधून आपण आयुष्यात पहिल्यांदा डोळ्यांत अंजन घालू. कानांत रत्नखचित कुंडले धारण करू. केशरी वस्त्रे परिधान करून, खांद्यावर लोकरीची शाल टाकून, पायांत पादत्राणे घालून, केसांत साळिंदराच्या काट्यांचा कंगवा खोवून, डोक्यावर छत्री धरून आपण रुबाबात श्रावस्तीच्या रस्त्यांतून फिरू. अयोध्या आणि पाटलीपुत्र यांच्या राजसभांतून मिरवू. पुरोहिताच्या गादीवर बसू. राजाच्या मंत्रिमंडळात सामील होऊ. आणि त्याच वेळी ती बिचारी मूर्ख पोरगी मगधाच्या एखाद्या उजाड, भयंकर विहारात मुंडन करून, शाक्यमुनींनी सांगितलेल्या निर्वाणाची प्राप्ती करण्यासाठी तप करीत असेल.

तिला आपल्या स्वतःच्या प्रतिभेची एवढी घमेंड आहे, तर मला माझ्या श्रेष्ठत्वाचा काय कमी अभिमान असेल? आणि नुसत्या चित्रकलेत आणि शिल्पकलेत काय आहे? मी सूत्रकार होईन, स्मृती निर्माण करीन. मनू, कपिल आणि जैमिनी माझ्या पायधुळी-चीही बरोबरी करू शकणार नाहीत. मी मोठमोठ्या प्रतिमांचे जग एकदा हलवून सोडीन. ज्ञान माझे आहे. गणपतीची लेखणी माझी आहे. चंपक माझी झाली नाही म्हणून काय जग बुडाले? सरस्वती तर माझी आहे. ती मला अशी सोडून कधीही जाणार नाही.

आणि चंपकमध्येच असे काय आहे? सुंदर तरुणी जगात हजारो आहेत. निर्मला किती सुंदर होती!...चंपक! तसं पाहायला गेलं तर तू काही तेवढी सुंदरही नाहीस.

तिचे रूप तरी काय होते? त्याने चालताचालता रागाने तीनचार दगडांना ठोकर मारली. तुझं चित्र कालत्रयीही काढायचं नाही, येवढं तर मी नक्कीच ठरवलंय. तू स्वतःला समजतेस तरी काय? मी तुला मुळीच किंमत देत नाही. मला तर तुझ्या रूपाचाही विसर पडत चाललाय. रूप म्हणजे केवळ सांगाडा. माझ्या अंतःकरणात जे रूप सुरक्षित आहे त्याला ओळखण्याचं सामर्थ्य फक्त विश्वकर्म्यातच आहे.

तो आपल्या झोपडीत गेला. पुनः बाहेर आला आणि इकडेतिकडे भटकत राहिला. आश्रमातील विद्यार्थी त्याच्याकडे आश्चर्याने पाहात होते. कोणीतरी त्याला

विचारले, "काल रात्री तू दिसला नाहीस. कुठं होतास?" त्याने रुक्षपणे त्यांच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष केले.

अखिलेशला त्याने खोटेच सांगितले की, "मी रात्री नदीच्या काठी तपश्चर्या करीत होतो."

आजपर्यंतच्या आयुष्यात तो पहिल्यांदाच खोटे बोलला होता; आणि त्याला आता सर्वच खोट्या गोष्टीत गोडी वाटू लागली होती. त्याने संध्या केली नाही किंवा गुरुजींच्या दर्शनालाही गेला नाही. आश्रमाच्या कुंजांत उनाडपणे भटकत राहिला.

"मी तिचं चित्र मुळीच काढणार नाही. कला ही जीवनाच्या साऱ्या संबंधांहून उच्च असली पाहिजे."...तो वारंवार मनाशी म्हणत राहिला. परंतु अखेर त्याच्याने राहवले नाही. तो कलावंत होता. सृजनाच्या प्रेरणेने त्याला व्याकुळ केले होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी तो चित्रकलेचे व मूर्तिकलेचे सामान घेऊन मोहाच्या वनाकडे गेला. तलावाच्या काठी बसून गेरू (काव) वाटून त्यापासून त्याने लाल रंग बनविला. निळीची पुडी मातीच्या वाडग्यात घालून विरघळविली. हळद आणि केशर यांच्यापासून पिवळा व केशरी रंग तयार केला. इतर रंगांसाठी नाना प्रकारच्या वनस्पती उकळल्या. आणि शुभ्र चीनपट समोर पसरून तो चित्र काढण्यास बसला. परंतु रूप आणि अरूप यांच्यातील संघर्षाने पुनः कुंचली अडली. मी काय काढू? काय अर्थ आहे? वेदान्ती सांगतात की ईश्वर निराकार आहे, त्याला रूप नसते, तो अगम्य अगोचर आहे! प्रश्न असा आहे की विचार हा केवळ प्रतीकाच्या द्वारे पाहाणाऱ्यांपर्यंत पोहोचविता येतो; परंतु विचाराहून वेगळे जीवितअस्तित्व तर स्वतःच जीवन आहे, लक्षण नाही—गौतम विचार करू लागला. त्याच्याविषयी वाटणारे आकर्षण भावनेवर आधारलेले असते. तर मग कलाकाराने शुद्ध विचार कसा व्यक्त करावयाचा? त्याचा दृष्टिकोन निःपक्ष राहू शकत नाही. कलाकाराची वास्तविक कला म्हणजे ध्यान. ते ध्यान संपूर्ण राहू शकत नाही. शुद्ध आकृती, खुद्द वस्तूत असलेली वस्तूची कल्पना हे वास्तविक ध्येय आहे. वस्तूच्या वैयक्तिक अवस्थेला कसे प्रेरित करावयाचे? वास्तविक जीवनाकडे डोळेझाक करिता येत नाही.

अशा प्रकारे तलावाच्या काठी बसल्या बसल्या त्याने अनेक चित्रे काढली आणि ती पुसून टाकली. लाल मातीपासून अनेक मूर्ती बनविल्या आणि त्या मोडून टाकल्या.

त्याने आश्रमाच्या भिंतींवर माती, भुसा आणि चुना फासून गडद रंगांच्या आकृत्या बनविल्या. त्याने लाल मातीच्या मूर्ती बनविल्या. आतापर्यंतच्या पट्टिकांवर अधिकतर ब्रह्मज्ञानाची लक्षणचिन्हे उमटविण्यात आली होती:—त्रिशूळ, कल्पवृक्ष, पृथ्वीची कमळे, विश्व-चक्रे, कमळांची आसने व अग्नीचे स्तंभ. गौतम नीलांबराच्या पट्टिकांवर

ग्रामीण जीवनाची दृश्ये होती:—स्त्रिया, शेतकऱ्यांची मुले, गायी, कळ्या व फुले यांचे नमुने. या आकृतींमध्ये सामर्थ्य होते आणि जीवनाची आशा व ऊब होती. तेथे अलौकिक जीवनाऐवजी वास्तविक, पार्थिव जीवन होते. ती धरतीची स्वतःची सृष्टी होती.

पुढे एके दिवशी त्याने सुदर्शन यक्षिणीची मूर्ती तयार केली—कदंबाची फांदी वाकवून वृक्षाच्या खोडाला टेकून उभी असलेली सुदर्शन यक्षिणी!

नगरातील कलावंतांनी ते चित्र पाहून नापसंतीदर्शक मान हालविली. चित्रशाळा आणि मंदिरे यांनाही ते आवडले नाही.

टीकाकारांनी गंभीरपणे गौतमाच्या चित्रांची समीक्षा केली. परंतु त्याची प्रशंसा मात्र कोणीही केली नाही. सर्वजण केवळ चकित झाले होते.

कलाकार आणि बुद्धिवादी यांच्या मंडळांमध्ये गौतमासंबंधी वादविवाद होऊ लागले. गौतम शांतपणे सर्वांचे म्हणणे ऐकत राहिला. स्वतः काही बोलला नाही. त्याने दर्शनशास्त्राचा मार्ग सोडून दिला होता. त्यामुळे विशुद्ध सौंदर्यबोधाचा अनुभव ही वस्तुतः काय चीज असते, ती कशा प्रकारे प्राप्त होते आणि तिला इतरांपर्यंत कसे पोहोचविता येते हे त्याला सांगता आले नाही. रूप आणि अरूप, भाव आणि अभाव यांच्यातील मतभेदांचा निर्णय करणारा तो कोण होता? त्याला केवळ मनुष्यांना, त्यांच्या रहस्यांना पाषाणात बद्ध करण्याची इच्छा होती. वेदान्ताच्या उपासकाच्या दृष्टीने त्याने असा विचार केला की विशुद्ध सौंदर्यानुभूतीसंबंधीचा अनुभव हा एक वेगळा आनंद असतो. तो विजेसारखा अखंड व अविभाज्य असतो. तो स्वयं-प्रकाशित असतो. ज्याप्रमाणे कलाकाराची कल्पना विश्वकर्म्याच्या कल्पनेत निहित असते त्याचप्रमाणे द्रष्टा हा आत्म्यात किंवा 'अहं'मध्ये विद्यमान असतो. तो प्रतिक्षण पाहात असतो आणि त्याचे स्वरूप साऱ्या विश्वाचे द्योतक असते. विश्वाच्या रूपाला जो केवळ अहं समजतो, जो अहंच्या पार्श्वभूमीवर निर्माण केलेला असतो तोच सौंदर्याचा आदर्श दृष्टिकोन होय. तेच विशुद्ध अस्तित्व होय. विशुद्ध ज्ञान व विशुद्ध जीवन. हृदयाचे चित्रालय—जेथे सारी चित्रे उपस्थित आहेत, साऱ्या कल्पना विद्यमान आहेत, जेथे पोहोचल्यानंतर साऱ्या उपमा एक होऊन जातात, जेथे विभिन्न रंगीत दर्पणांमधून एकच प्रकाश चमकत राहातो; आणि पद्धतशीरपणे बनविली जाणारी वस्तूच पूर्ण-कलाकृती असते. कलाकार आणि प्रेक्षक या दोघांसाठी एकच मार्ग आहे. जाणकार प्रबुद्ध विद्वानांनाच तो कळू शकतो.

सुदर्शन यक्षिणीच्या निर्मितीबरोबर वास्तुकलेच्या एका शैलीचा प्रारंभ झाला. वास्तुकला विशुद्ध भौतिक बनली. त्या मूर्तीमध्ये शुद्ध वास्तववाद होता. कदंबाच्या व

अन्य वृक्षांशी संबंधित वनदेवता, इंद्रलोकातील देवकन्या या वस्तुतः अयोध्या व श्रावस्ती येथील आर्यकन्या होत्या, खेड्यांतील शेतकऱ्यांच्या मुली होत्या. त्या खरोखरीच दररोज पाणवठ्यावर पाणी भरण्यासाठी जात होत्या, श्रावणगीते गात होत्या आणि शेतात काम करीत होत्या.

सुदर्शन यक्षिणी कमरेत वाकून तिरपी उभी होती. तिचे दंड मांसल होते, डोळे टपोरे आणि शरीर भरदार व अत्यंत डौलदार होते. आकृती आणि समतोल गांभीर्य, लवचिकपणा व गती यांची अनुभूती यांचे ते संपूर्ण संयोजन होते. या शैलीत जिवंतपणा होता; गती व शक्ती, स्वातंत्र्य व संतोष यांची तीव्र भावना तिच्यात होती. तेथे बंधन नव्हते. कलावंताला अखेर बंधनातून मुक्ती मिळाली होती. आपण काय निर्माण करणार आहोत हे त्याला आता कळले होते.

एके दिवशी गौतम काही नवीन चित्रे घेऊन श्रावस्तीतील विमलेश्वराच्या चित्र-निकेतनात गेला. तेथे पूर्वीप्रमाणेच त्याच्या मित्रांचा आणि विरोधकांचा अड्डा जमलेला होता. त्या समुदायात त्याला काही लिपिक (लेखनिक) आणि इतर लोकही दिसले. त्याला काहीसे आश्चर्य वाटले. हे सगळे लोक एकेकाळी राजकारणावर चर्चा करण्यासाठी त्याच्या झोपडीत गोळा होत असत. सगळेजण गप्प होते. कसल्यातरी काळजीत, विचारात ते गढून गेलेले होते. त्यांनी माना वर करून त्याच्याकडे पाहिले आणि गप्प राहिले. तोही काही न बोलता खिडकीजवळ जाऊन बसला; आणि खाली चालू असलेल्या बाजारातील हालचाल पाहू लागला.

"तुला माहीत नाही ?" अखेर विमलेश्वराने बोलण्यास सुरुवात केली.

"काय ?" गौतमाने विचारले.

"तू काहीच ऐकलं नाहीस ? अरे, तू राहातोस तरी कोणत्या जगात ?"

इतक्यात बाहेरून कोणीतरी कडी वाजविली आणि अखिलेश आत आला. त्याला दम लागलेला होता आणि त्याचे पाय धुळीने भरले होते. तो खूप लांबून पळत आला असावा, असे दिसत होते.

"बंधूंनो !" तो हलक्या आवाजात म्हणाला, "आपापलं सामानसुमान आवरा आणि ताबडतोब इथून पळ काढा."

"का ? काय झालं ?" गौतमाने पुन: विचारले.

"मगधात युद्ध सुरू झालंय, भाई गौतम ! चंद्रगुप्ताचं सैन्य सारा देश काबीज करीत या बाजूला येत आहे. आता इथं गाढवांचे नांगर फिरणार. मैदानांमध्ये सुब्रह्मण्यमनं आपलं तांडवनृत्य सुरू केलंय. आता तुमचा काळ संपला ! युद्धाची दुंदुभी वाजवीत यम तुमचा पाठलाग करतो आहे—रूप आणि अरूप, भाव आणि अभाव यांच्यातलं द्वैत

नाहीसं करून टाकणारा यम!" अखिलेश थकून चटईवर बसला आणि त्याने डोळे मिटून घेतले. थोड्या वेळानंतर तो म्हणाला, "राजन शिकार करून परत येत होते. इतक्यात विष्णुगुप्ताच्या सैनिकांनी त्यांच्या सहकाऱ्यांवर हल्ला केला. सर्वच्या सर्व मारले गेले."

"सगळेच्या सगळे?" गौतमाने विचारले.

"होय! मी असं ऐकलंय की राजकन्या नदीतून पोहून पांचालाच्या राज्याकडे निघून गेल्या; परंतु सैनिक त्यांचा पाठलाग करताहेत."

आणि तो अकस्मात उठून उभा राहिला.

"तू कुठं चाललास, भाई अखिलेश?" गौतमाने ओढलेल्या आवाजात विचारले.

"मी लढायला चाललोय. परंतु, तू बहुधा लढणार नाहीस; कारण तू अहिंसेचा उपासक झाला आहेस ना?" त्याने आपल्या चपलांवरील धूळ झाडली आणि तितक्याच शांतपणे तो बाहेर निघून गेला.

गौतम घाबरून उभा राहिला. तो विमलेश्वराला म्हणाला, "इथं तुम्ही जे सगळे कलाकार आणि विद्वान जमला आहात त्यांच्यापैकी मला कुणीतरी समजावून सांगा की कोणत्या वेळी लढायचं असतं आणि कोणत्या वेळी लढायचं नसतं. कुणीतरी जाऊन हरिशंकराला विचारा की जीवहत्या ही केव्हा उचित असते आणि केव्हा निषिद्ध!" तो खोलीत इकडून तिकडे येरझाऱ्या घालू लागला. "मित्रांनो, राजा नंदाशी माझा काही संबंध नाही. विष्णुगुप्ताशी माझी ओळख नाही. चंद्रगुप्ताशी माझं कसलंही भांडण नाही. तर मग हे सगळे मिळून मला लढाईत का ओढताहेत? आणि मलाही इतरांना ठार मारावं लागेल? मला तर त्या सर्वांचे प्राण प्रिय आहेत. मला स्वतःलाही जिवंत राहायची इच्छा आहे. आता मी काय करावं?" त्याने खिडकीच्या दारावर डोके टेकून डोळे मिटून घेतले.

इतक्यात चित्रनिकेतनात गोळा झालेले लोक आपापली पादत्राणे घालून बाहेर पडू लागले. त्यांच्या पावलांची चाहूल ऐकून गौतमाने डोळे उघडले. सबंध खोली रिकामी झाली असल्याचे त्याला दिसले. तो त्यांच्या मागोमाग ओसरीपर्यंत धावत गेला: आणि जोरजोरात ओरडू लागला, "अरे! आपापल्या मूर्ती इथं टाकून तुम्ही कुठं जाता? या फुटून जातील. मित्रांनो, भाइयो!"

परंतु एकाएकी खालच्या बाजारात जणू प्रलय माजला. नगरावर लष्करी रथांचे व हत्तींचे आक्रमण सुरू झाले होते. बघता बघता साऱ्या बाजारपेठेला रणभूमीचे स्वरूप प्राप्त झाले होते. धूळ आणि हत्तींचे चीत्कार, बाणांचा सूं-सूं आवाज, तलवारी व ढाली यांचा खणखणाट, आणि बायकामुलांच्या आक्रोशांचा कोलाहल यांच्या भयंकर भोवऱ्यात त्याचा स्वतःचा आवाज बुडून गेला. तो ओसरीच्या पायऱ्यांवर मूर्तिवत उभा

राहून समोरचे दृश्य पाहू लागला. सारी बाजारपेठ उध्वस्त झाली होती. त्याच्या सहकारी चित्रकारांची प्रेते सडकेवर इकडेतिकडे पसरली होती . चाणक्याचे सैनिक मोठ्या सफाईने लोकांच्या माना उडवीत होते. गौतमाच्या डोळ्यांसमोर अंधार पसरला. अखेर तो झोकांड्या खात चित्रनिकेतनाच्या पायऱ्यांवरून खाली उतरला. त्याने मृत विमलेश्वराच्या हातातील तलवार हिसकावून घेतली आणि स्वप्नात वावरल्यासारखा तो तलवार परजत सडकेवर आला.

अंधार पडेपर्यंत गौतम लढत राहिला आणि अखेर अंगावरील जखमा असह्य होऊन एका गल्लीत कोसळला. तेथे सगळीकडे नागरिकांच्या प्रेतांचे खच पडले होते.

नगरापासून थोड्या अंतरावर, क्षितिजाच्या कडेला जैतवनाचा प्रासाद निमूटपणे झाडांमध्ये लपून उभा होता. त्याचा कळस अंधारामध्ये मंदपणे चमकत होता : जणू या साऱ्या प्रकाराकडे पाहून तो गालातल्या गालात हासत होता.

## ५

काळ चालला आहे. आता देशामध्ये मयूराचे राजचिन्ह असणाऱ्या सम्राटाचे राज्य आहे. या देशात एकछत्री साम्राज्य स्थापन करणाऱ्या पहिल्या राजाधिराजाचे, सम्राटाचे राज्य आहे. सम्राटांची वंशावळी लिहिणाऱ्यांची लेखणी येथे येऊन थांबली आहे. पाटलीपुत्राच्या राजसिंहासनावर आरूढ झालेला हा प्रियदर्शी नरचंद्र शूद्र आईच्या पोटी जन्माला आला. धनगरांनी त्याचे पालनपोषण केले आणि चाणक्याने तक्षशिलेत त्याला यशाच्या वारूवर चढविले. हा आता नवा इतिहास लिहविणार. दंतकथांचा काळ आता संपला आणि नंदांच्या, कुबेराशी स्पर्धा करणाऱ्या भांडारांच्या कहाण्या इतिहासजमा झाल्या.

हे नवे युग आहे.

चंद्रगुप्त मोठा शक्तिशाली सम्राट आहे. त्याच्या सत्तेचा डंका साऱ्या दुनियेत वाजत आहे. त्याची राजधानी जगातल्या महानगरांमध्ये गणली जाते. त्याच्या लष्करी सामर्थ्याने इतर देश भयभीत झाले आहेत. कारण विष्णुगुप्ताच्या सल्ल्याने तो राज्य करीत आहे. या विष्णुगुप्तालाच चाणक्यही म्हणतात आणि कौटिल्यही म्हणतात. त्याने महापद्मनंदाला आपल्या मुत्सद्दीपणाच्या जोरावर पराभूत केले होते. शाक्यमुनींनी सांगितले होते की विजयातून घृणा जन्माला येते कारण पराभूत लोकांना सुखाची

झोप लागत नाही. परंतु जय आणि पराजय यापासून अलिप्त राहाणारी शांत व्यक्ती सुखात असते.

परंतु प्रत्येक जय किंवा पराजय हे इतिहासाच्या मार्गावरील एक नवे वळण असते. त्यायोगे जग या ना त्या प्रकारे पुढे जात असते. या विजयानंतरच सामान्य जनतेला प्रथमच राष्ट्रीयत्वाच्या भावनेची ओळख झाली आहे. आपण एक राष्ट्र आहोत आणि एकराष्ट्रीयत्व ही अनेक वंश, जाती-जमाती व घराणी यांहूनही उच्च अशी एक वेगळी वस्तू असते, याची पुसटशी अनुभूती लोकांमध्ये निर्माण झाली आहे. ज्याने प्रियदर्शी चंद्रगुप्ताच्या नेतृत्वाने इराण्यांना आपल्या देशातून बाहेर हाकलून लावले असे एक राष्ट्र आपण आहोत. पाटलीपुत्राने यापूर्वी एवढे वैभव कधी अनुभविले नव्हते. नवे नवे प्रासाद निर्माण झाले आहेत. लोकसंख्या वाढते आहे. त्याचबरोबर भाषेतही बदल घडून येत आहे. शाक्यमुनींच्या काळातील मागधी आता नव्या प्राकृत भाषेचे रूप धारण करीत आहे. नाटक आणि संगीत या कलांची उन्नती होत आहे. बहुरूपी मांडवांतून नाटके करून दाखवीत आहेत.

काशीची एक नाटकमंडळी नवीन नवीन नाटके करून दाखवीत आहे. या नाटकांचा लेखक प्रथमच पाटलीपुत्राला आला आहे परंतु त्याची ख्याती त्याच्या आधीच येथे येऊन पोहोचली आहे. त्याच्यासंबंधी नाना प्रकारच्या गोष्टी लोकांच्या कानांवर येत आहेत. असे म्हणतात की तो फार मोठा गुणी कलावंत आहे. एके काळी तो शिल्पकार होता आणि मूर्ती बनवीत असे. तो नर्तक आहे. फार सुंदर नृत्य करतो. अभिनेता आहे. फार छान अभिनय करतो. भरतमुनींची सारी कला तो कोळून प्यायला आहे. त्याने अनेक वर्षे अयोध्येच्या गुणी लोकांच्या व गंधर्वांच्या संगतीत घालविली आहेत. सारे स्वर त्याच्या ताब्यात आहेत. तरीही त्याला चैन पडत नाही. सबंध देशभर तो फिरत असतो. कोणत्याही एका जागी टिकून राहात नाही. कोणत्याही एका कलेला आपले केंद्र बनवीत नाही. असे वाटते, जणू तो ढगाची छाया पकडू इच्छितो, पण ती त्याच्या हाती लागत नाही.

या नाटकाचा खूप गाजावाजा झाला आहे. सारे पाटलीपुत्र नाट्यगृहाकडे धाव घेत आहे. स्त्रियांचे रथ आणि पालख्या यांची रांग लागली आहे. राजकुमारी आणि श्रेष्ठी, मंत्री व व्यापारी यांच्या मुली, तसेच राज्यकारभारातील उच्चाधिकाऱ्यांच्या बायका, सगळ्याजणी रंगीबेरंगी साड्या, जरीच्या शाली आणि सोन्याचे कंबरपट्टे परिधान करून घाईघाईने नाट्यगृहात येऊन बसत आहेत. अविवाहित तरुणी या नटाला व लेखकाला पाहण्यास फारच उत्सुक असल्याचे दिसत आहे. त्यांनी असे ऐकले आहे की तो मोठा देखणा व रूपवान आहे आणि बायकांमधील एक मोठा दुबळेपणा

असा आहे की त्या कलेच्या बऱ्यावाईटपणाच्या प्रश्नाचा कलावंताचे रूप आणि शरीर यांच्याशी गोंधळ करून टाकतात...

शुभ्र पडदा एका बाजूला सरकविण्यात आला. नक्षीदार लाकडी रंगभूमीचा मागील पडदा कलश, शाली व चित्रे यांनी सजविलेला होता. वादकगण समोर बसले होते. वंदना करणाऱ्या मुलींनी सभोवतालच्या स्तंभांतून बाहेर येऊन महादेवाची स्तुती केली आणि त्यांच्यापैकी एक मुलगी आपल्या टोळीतून बाहेर येऊन कमरेवर हात ठेवून एका बाजूला उभी राहिली. ही नाटकाची नायिका होती. तिच्या लांबसडक वेणीत मोत्यांचा गजरा गुंफलेला होता. तिच्या सोनेरी कंबरपट्ट्यात रत्ने जडविलेली होती.

आणि मग इतका वेळ ज्याची प्रतीक्षा लोक करीत होते तो, रंगभूमीच्या शुभ्र, गुळगुळीत मंचावर प्रविष्ट झाला. तो मोठ्या अभिमानाने मान वर उचलून समोर शून्यात पाहात अत्यंत गंभीरपणे पावले टाकीत समोर आला आणि काही क्षण सर्वांवर दृष्टिक्षेप करून नेहमीच्या प्रथेप्रमाणे त्याने या नाटकाविषयी नटीशी संवाद सुरू केला. त्याचा गोड आवाज ऐकून प्रेक्षक मंत्रमुग्ध झाले. सर्वजण टक लावून, आपापल्या जागेवरून, चित्रवत, माना पुढे करून त्याच्याकडे पाहात होते.

संवाद चालू असता कोणत्या तरी मुद्द्यावर जोर देण्यासाठी त्याने प्रथम आपला उजवा आणि नंतर डावा हात हवेत फिरविला.

प्रेक्षक दचकले. त्यांच्या चेहऱ्यावर दुःखाची एक लाट तरळून गेली. स्त्रियांनी अत्यंत व्यथित होऊन आपले डोळे मिटून घेतले. त्या देखण्या व अद्भुत कलावंताच्या दोन्ही हाताची बोटे तुटलेली होती.

* * *

गौतम नीलांबराच्या समोर आणखी एक नगर होते, प्रेक्षकांचा आणखी एक समुदाय होता. हे नगर आणि हा समुदाय नेहमीप्रमाणे त्याच्याकडे श्रद्धेने व प्रेमाने पाहात होता. तो सर्वांना नाटक दाखवीत होता परंतु त्याचे नाटक मात्र कोणीच पाहिले नव्हते. रंगभूमीच्या शेवटच्या पडद्याच्या मागे आणखी एक रंगभूमी असते, जी प्रेक्षकांना दिसत नाही. तसेच त्याचे जीवन होते.

पाटलीपुत्राचे हे सभ्य व प्रतिष्ठित नागरिक पाठशाळेत बसून त्याच्या संवादांना माना डोलवीत होते. तो कसल्या कसल्या जगांचे भ्रमण करण्यासाठी बाहेर पडला आहे, त्याने जीवनासंबंधी सारे प्रयोग करून पाहिले आहेत आणि आता करण्यासारखे काही राहिलेले नाही, हे त्यांच्यापैकी कोणालाच माहीत नव्हते. त्याला वाटले होते की जीवन हे केवळ शून्य आहे किंवा केवळ प्रकाश, अथवा केवळ अंधकार.

परंतु येथे तर 'केवळा'चे अस्तित्वच नव्हते. तो जगाची वास्तविकता आपल्या मार्गातून दूर सारू शकत नाही. जग पावलोपावली आपल्या प्रत्येक रूपात त्याच्या समोर उभे राहून त्याला वेडावून दाखवीत आहे.

श्रावस्तीच्या बाजारपेठेत तो दिवसभर आक्रमकांशी लढत होता. रात्र पडेपर्यंत तो लढत राहिला होता आणि अखेर माऱ्याने घायाळ होऊन खाली पडला होता. तो शुद्धीवर आला तेव्हा त्याने मान वर करून पाहिले तो रात्रीचा अंधार आकाशातून विरळ होत आहे आणि आपल्या अंगावर भयंकर जखमा झाल्या आहेत व आपले हात रक्तबंबाळ झाले आहेत असे त्याला दिसून आले. त्याने पडल्या पडल्या मोठ्या प्रयासाने आपले रक्तबंबाळ झालेले हाताचे तळवे पसरले.

तेव्हा त्याला एका अटळ सत्याची जाणीव झाली. हाताची बोटे...सौंदर्यनिर्मिती-साठी निर्माण करण्यात आलेली हाताची बोटे. त्यांना रक्ताने न्हाऊ घालण्यात येत होते. एखाद्या शांत विहारात बसून तो हे सत्य खोटे ठरवू शकत नव्हता. कलाकार या नात्याने माणसाचा हात हे त्याच्या दृष्टीने फार मोठे प्रतीक होते. हाताची बोटे नृत्याच्या मुद्रांच्या द्वारे विश्वाच्या साऱ्या रहस्यांची, संपूर्ण जीवनाची अभिव्यक्ती करतात, भवनांची निर्मिती करतात, उद्यानांना पाणी देतात, बासरी वाजवितात, आणि बालकांना थोपटून झोपवितात; आणि दुसरे सत्य हे होते की हीच बोटे बाणांचा वर्षाव करतात, भाले तयार करतात आणि इतर माणसांना आपल्या पकडीत आवळून त्यांचे गळे दाबतात.

थोडीशी शक्ती आल्यानंतर तो उठला आणि प्रेते ओलांडीत गल्ल्यांच्या भिंतींचा आधार घेत आपल्या घराकडे गेला.

परंतु त्याचे घर निर्मनुष्य झालेले होते. तेथे तो वीस वर्षांनंतर अशा वेळी पोहोचला होता जेव्हा त्याची आई व वडील काही तासांपूर्वीच भयंकर युद्धात मारले गेले होते अंगावरील जखमा बऱ्या झाल्यानंतर तो श्रावस्तीतून बाहेर पडून सबंध देशभर भटकत राहिला.

* * *

हळूहळू देशात शांतता प्रस्थापित झाली. चंद्रगुप्ताची सत्ता दृढमूल झाली. गौतम फिरतफिरत काशीला जाऊन पोहोचला. तो एक सुयोग्य, सुशिक्षित ब्राह्मण होता. त्याच्या-जवळ आपल्या ज्ञानाशिवाय दुसरे काही भांडवल नव्हते. परंतु त्याला त्याची काळजी वाटत नव्हती. विद्यार्थी व ब्रह्मचारी असल्यामुळे त्याला पूर्वीपासूनच उपासमार व संकटे सहन करण्याची सवय होती. त्याला भटक्याचे जीवन तापदायक वाटले नाही. परंतु

आता तो विद्वानांच्या संगतीपासून व त्यांच्याशी वादविवाद करण्यापासून चार हात दूर राहू लागला.

काशीमध्ये एके दिवशी एका नाटकमंडळीच्या नायिकेशी त्याची भेट झाली. त्याला पाहाताच ती त्याच्यावर लुब्ध होऊन गेली आणि तिने त्याला आपल्या नाटकमंडळीत सामील करून घेतले.

हाताची बोटे तुटल्यामुळे आता त्याला चित्रे काढता येणे शक्य नव्हते, मूर्ती बनविता येणे शक्य नव्हते, नृत्य करता येणार नव्हते; केवळ अभिनयाच्या द्वारे आपल्या कलेचे प्रदर्शन करण्याचा मार्ग त्याच्यासमोर उपलब्ध होता. विद्यार्थीजीवनात त्याने नाटके लिहिली होती. त्यानंतर तो दार्शनिक, विद्वान व चित्रकार झाला होता आणि आता तो अभिनेता, नायक झाला होता.

बहुरूपता हे आणखी एक सत्य आहे.

वियोग हा नाटकाचा मुख्य विषय होता. गौतम नीलांबरानेही ही परंपरा पुढे चालू ठेवली. आपल्यासाठी तो वियोगाखेरीज दुसरा कोणता विषय निवडू शकत होता ?

नाटक मंडळीतील त्या सौंदर्यवतीचे नाव अंबिका असे होते. ती फार मोठी अभिनेत्री होती. मोठमोठ्या धनिकांचे बेटे आणि रंगेल पुरुष तिच्या नावाचा जप करीत होते. पण ती भाळली कुणावर ? तर एका दरिद्री ब्राह्मण विद्यार्थ्यावर, ज्याच्या हातांची बोटे तुटलेली होती !

तेव्हा गौतमाला आणखी एका सत्याची प्रचीती आली—तुम्ही जिच्यावर प्रेम करता ती व्यक्ती तुमची पर्वा करीत नाही; आणि जी व्यक्ती तुमच्यावर आपली जान कुर्बान करायला तयार होते तिच्याविषयी तुमच्या मनात कसलेच आकर्षण नसते. हाही जीवनाचा असा एक अनुभव होता की जो यापूर्वी हजारो व्यक्तींना आलेला होता. परंतु त्याला तो नवीन होता.

तो अंबिकेच्या नाटकमंडळीबरोबर सर्वत्र फिरला. मौर्य साम्राज्यात समृद्धी व संपन्नता पसरलेली होती. ललितकला अत्यंत लोकप्रिय झालेल्या होत्या. आता गौतमही श्रीमंतांच्या मुलांप्रमाणे मोठ्या थाटात राहू लागला. तो दारू पीत असे आणि नित्य नव्या तरुणींना आपल्या प्रेमाच्या जाळ्यात अडकवून टाकीत असे. पण त्याला लौकरच त्यांचा कंटाळा येई. अंबिका त्याची पुजारीण होती. त्याच्यातील हे सारे दुर्गुण दिसत असूनही ती त्याची आराधना करीत होती. तिच्या प्रेमाला प्रतिसाद देण्याऐवजी तो तिच्याशी अत्यंत निर्दयपणे वागे. तिला दुःख देण्यातच त्याला मनातल्या मनात सुख होई.

त्याने चंद्रकला शोधण्यासाठी दूरदूरचे प्रवास केले. त्याला वाटे, कदाचित ती

जिवंत असेलही, युद्धाच्या संहारातून कदाचित ती बचावली असेलही. परंतु ती त्याला कोठेही आढळली नाही.

अखेर निरुपाय होऊन त्याने तिचा शोध करणे सोडून दिले. अंबिकेच्या प्रीतीपुढे त्याने स्वतःचा पराभव कबूल केला.

आज तो पाटलीपुत्रात आला होता आणि नेहमीप्रमाणे अंबिकेबरोबर अभिनय करीत होता. प्रेक्षक त्याच्याकडे श्रद्धेने पाहात होते. प्रेक्षक हे बहुरूपीपणावर लुब्ध असतात. त्यांना खरा गौतम नीलांबर कधीच पाहावयास मिळत नसतो.

## ६

स्त्रियांनी अत्यंत दुःखीकष्टी होऊन आपले डोळे मिटून घेतले. स्वप्नांचा सौदा करणाऱ्या तरुणींनी आश्चर्य व दुःख यांनी तोंडांत बोटे घातली.

याच स्त्रियांमध्ये चंपक एका बाजूला बसल्या बसल्या आपल्या मैत्रिणींशी बोलत होती. तिने मान वर करून पाहिले तो तिला गौतम नीलांबर दिसला. तिच्या जिवाचा थरकाप झाला. तिचे डोळे पाणावले. त्या धूसरतेत गौतमाचा चेहरा विझणाऱ्या दिव्यासारखा तिच्या डोळ्यांसमोर मिणमिणू लागला.

गौतमाने खणखणीत आवाजात आपले भाषण करीत समोर पाहिले. प्रेक्षकांच्या समुदायात त्याला ती दिसली. काही क्षण आपला संवाद विसरून तो मूर्तिवत तिच्याकडे पाहात राहिला.

आणि लगेच त्याने आपली नजर खाली वळविली.

कारण, तपकिरी रंगाची साडी नेसून त्याच्या समोर बसलेली चंपक, इतकी प्रतीक्षा व शोध केल्यानंतर अकस्मात त्याला दिसलेली चंपक, त्याला अशा वेळी दिसली होती की ज्यावेळी तिच्या भांगात कुंकू होते आणि ती आपल्या लहान मुलाला मांडीवर घेऊन, नाट्यगृहाच्या जमिनीवर, आपल्या मैत्रिणींसह, मांडी घालून शांतपणे बसली होती.

तो एका क्षणात दुसऱ्या काठाला जाऊन पोहोचला. कारण, पूर्वी ती पवित्र होती तर आता ती पवित्रतर झालेली होती. ती माता होती.

त्याला हेही समजून चुकले की योगायोग, दुर्घटना व काळाच्या विचित्र लीला याही फार वास्तविक आहेत.

त्याने स्वतःला सावरले आणि पुनः तो पूर्वीप्रमाणे अभिनयात तल्लीन झाला.

* * *

ती नकळत आवंढे गिळत राहिली. एका माणसाने जगाचा त्याग केला; तरीही त्याची आठवण तिच्या मनातून पुसली जात नव्हती. तो हरिशंकर होता. दुसऱ्या एका माणसाने तिच्या आठवणीपासून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी जगाचा त्याग करण्याऐवजी त्याचाच आश्रय घेतला आणि तरीही तो वैरागीच राहिला. तो गौतम नीलांबर होता. ती स्वतः मात्र बिचारी जगाचा त्यागही करू शकली नव्हती अथवा जीवनाचा आनंदही मिळवू शकली नव्हती. हे सारे मायेचे खेळ होते.

स्त्री या नात्याने तिच्या नशिबात जे लिहिलेले होते आणि कदाचित तिचे जे कर्तव्य होते तेच तिला करावे लागले. राजनच्या वधानंतर तिला इतर राजकुमारींबरोबर कैद करून पाटलीपुत्राला आणण्यात आले. अयोध्येच्या राजघराण्यातील सर्व तरुणींशी त्यांनी लग्ने केली. तिचे लग्नही चाणक्य महाराजांच्या एका उच्च अधिकाऱ्याशी लावून देण्यात आले. हा अधिकारी साठ वर्षे वयाचा, जाडजूड व मोठा कावेबाज ब्राह्मण होता. तो अर्थखात्यात नोकरी करीत होता आणि अष्टौप्रहर अधिकाधिक पैसा कसा मिळविता येईल या विचारात गढून गेलेला असे.

त्याची पूजा व सेवा करणे हा चंपकचा धर्म होता कारण तो तिचा पती होता. त्याप्रमाणे ती त्याची सेवा करीत होती. पाटलीपुत्रातील इतर हजारो गृहिणींसारखी ती एक. त्यांच्यापैकीच ती एक होती. तिचे असे काहीच वैशिष्ट्य नव्हते. तिच्या मांडीवर तिचे मूल होते आणि ती आपल्या सखींशी गप्पागोष्टी करीत होती. दर्शनशास्त्रासंबंधी चर्चा करण्याचा काळ निघून गेला होता.

थोड्या वेळाने नाटकाचा पहिला अंक संपला आणि पडदा पडला. तेव्हा तिने आपल्या दासीच्या कानात हळूच काहीतरी सांगितले. दासी इकडे तिकडे पाहात झटकन बाहेर निघून गेली.

* * *

पहिला अंक संपल्यानंतर गौतमही रंगभूमीच्या मागील बाजूस असलेल्या रंगपटास गेला.

"एक दासी तुला भेटू इच्छिते." अंबिकेने आरशासमोर उभे राहून आपल्या गळ्यातील हार काढीत त्याच्याकडे वळून त्याला म्हटले.

"कोण आहे ?" गौतमाने हलकेच विचारले. त्याच्या स्वरातील सारी कटुता,

सारा चिडखोरपणा लुप्त झाला होता. त्याच्यातील हा आकस्मिक बदल पाहून अंबिका थक्क झाली. तो किती शांत दिसत होता!

"कोण जाणे!" अंबिका काहीशी अडखळत म्हणाली, "तू स्वतःच पाहा ना!" आणि ती आपले कपडे घेऊन इतर नटींकडे निघून गेली.

गौतम रंगपटाच्या पायऱ्यांकडे गेला.

खालच्या बाजूस एक सावळी दासी उभी होती. तिने किंचित वाकून गौतमाला प्रणाम केला आणि ती म्हणाली, "आमच्या बाईसाहेबांनी तुम्हांला प्रणाम सांगितले आहेत. त्यांनी विचारलंय, तुम्ही जाण्यापूर्वी त्यांना भेटून जाऊ शकणार नाही काय?"

तो एक पायरी उतरून खाली आला आणि थोडा वेळ निमूटपणे उभा राहिला. नंतर तो म्हणाला, "नाही! आपल्या बाईसाहेबांना सांग, जो जागत असतो त्याला एके दिवशी झोप येते आणि जो झोपलेला असतो तो एके दिवशी जागा होतो. जे सतत जागृत राहातात अशा लोकांकडे पाहा. त्यांना म्हणावं, आता मीही जागा झालो आहे आणि आता कोणतीही गोष्ट माझा मार्ग अडवू शकणार नाही. त्यांना असंही सांग की, पतिव्रता स्त्रीच्या दृष्टीनं परपुरुष म्हणजे केवळ छाया असते हे तुम्ही विसरलात काय?...आता तू जाऊ शकतेस."

ती पैंजण वाजवीत नाट्यगृहात गेली आणि थोड्या वेळाने परत येऊन म्हणाली, "माझ्या बाईसाहेब म्हणतात, तुमचं म्हणणं बरोबर आहे. तुम्ही आता तरी जागे झाला आहात हेही चांगलंच आहे. त्यांनी असंही सांगितलंय की, पतिव्रता या शब्दाचा अर्थ तुम्हांला काय कळणार? तरीपण ठीक आहे. कोणत्याही वस्तूला तुमचा मार्ग अडविण्याचा काही अधिकार नाही....आता तुम्हीही जाऊ शकता."

इतके बोलून ती डोक्यावरील पदर पुढे ओढून चेहरा झाकून घेत घाईघाईने प्रेक्षकांच्या गर्दीत दिसेनाशी झाली.

नाटक संपल्यानंतर गौतम प्रेक्षकांकडे न पाहाता रंगभूमीवरून आत गेला. रंगपटात जाऊन त्याने आपले रेशमी कपडे व आभूषणे काढून ठेवली आणि एक पांढरे उपरणे खांद्यावर टाकून, अनवाणी पायांनी, लोकांची नजर चुकवीत तो नाट्यमंदिरातून बाहेर पडला. नंतर तो नगराच्या वेशीकडे इतक्या झपाट्याने निघाला, जणू तो कारागृहातून पळून चाललेला कुणी कैदीच होता आणि पहारेकरी आपल्याला पुनः पकडतील की काय अशी भीती त्याला वाटत होती.

सगळीकडे धामधूम चालू होती. रुग्णालयांमध्ये रोगी पडल्या पडल्या मृत्यूची किंवा आरोग्यप्राप्तीची प्रतीक्षा करीत होते. बाजारांत चांदीची व तांब्याची नाणी खणखणत होती. शस्त्रास्त्रांच्या कारखान्यांत शस्त्रास्त्रे तयार होत होती. नदीकाठच्या बंदरांमध्ये

जहाजे बनविण्याचे काम चालू होते. दूरून राजभवनाचे उंच कळस दिसत होते.

या वेळी सम्राट आपल्या महालात पडल्या पडल्या चाणक्य महाराजांशी बुद्धिबळे खेळत असतील—हा विचार मनात येऊन तो हसला.

एक वेश्या त्याच्या जवळून, त्याच्याकडे रोखून पाहात निघून गेली. कदाचित ही सुद्धा इतर निपुण वेश्यांप्रमाणे गुप्तचर विभागात काम करीत असेल

तो मनाशी म्हणाला, चाणक्य महाराजांना कोणीतरी विचारावे, प्रश्न हा आहे की कोण कुणावर पाळत ठेवणार ? आणि तो पुनः स्वतःशी हसला.

आता काळोख दाटला होता आणि तटाच्या बुरुजांवरून पहारेकरी ललकाऱ्या देत होते. तो एका वेशीजवळ जाऊन थबकला. या तटाला चौसष्ट वेशी किंवा दरवाजे आहेत. कोणत्या दरवाजातून बाहेर पडले असता मला माझ्या ईप्सित ठिकाणाकडे जाण्याचा रस्ता मिळेल ?

पहारेकऱ्याने त्याला कोणीतरी प्रतिष्ठित ब्राह्मण समजून निमूटपणे बाहेर जाऊ दिले. तो रुंद खंदक ओलांडून राजमार्गावर आला. हा रस्ता प्रयागाकडे जात होता.

तो शोण नदी ओलांडल्यानंतर कित्येक दिवस प्रवास करीत राहिला. वाटेत अंधाराने भरलेली अरण्ये आणि नद्या-नाले होते. नद्यांच्या काठी असंख्य साधू तपश्चर्या करीत होते.

वानप्रस्थानंतर संन्यासाची पाळी असते. कदाचित मीही त्याच अवस्थेला येऊन पोहोचलो असेन. हा असा काळ असतो की जेव्हा मृत्यूचीही आकांक्षा नसते अथवा जीवनाचीही अभिलाषा उरलेली नसते....तो चालत राहिला. वाटेत नगरे होती, सरकारी होते, आश्रम, मोर पाळणाऱ्यांची गावे... ! माझे स्थान कोठे आहे ?

परंतु त्यात भिण्यासारखे काय आहे ? मी धरतीचा साथी आहे. धरती माझी माता आहे. त्याचे मन म्हणाले, "धरती तुला अंतर देणार नाही."

गवताचा ओला सुगंध, दगडांची शीतलता, आणि मातीचे सामर्थ्य यांचा अनुभव त्याच्या पायांच्या तळव्यांना येत होता. त्याने बाहू पसरून हवेला स्पर्श केला आणि तो मंद स्वरात गुणगुणू लागला, "धरतीमाते, तुझ्या टेकड्या, बर्फाने आच्छादलेले पर्वत आणि वने-उपवने स्मित करीत आहेत. मी तुझ्या पृष्ठभागावर उभा आहे. मी पराभूत झालो नाही. मला कसलाही आघात पोहोचलेला नाही. मला जखमा झालेल्या नाहीत. मी पूर्ण आहे. कोणीही माझा अंत करू शकले नाही.

"धरतीमाते, तुझ्या ठिकाणी काय काय भरलेले आहे ! हे धरती, मला स्थान दे. मला कुठंतरी जागा दे !"

चालता चालता कितीतरी दिवस निघून गेले. नाना प्रकारच्या झाडांच्या व फुलांच्या

फांद्या त्याच्या मार्गात आल्या. पक्षी त्याच्याबरोबर शीळ घालीत होते. श्रावणसरीचे थेंब कमळाच्या पानांवर जलतरंगाचे आलाप छेडीत होते.

तो एका बांधावर उभा राहिला आणि त्याने पाणावलेल्या डोळ्यांनी हे दृश्य पाहिले.

ढगांतून एक थेंब टपकन त्याच्या पापणीवर येऊन पडला—जणू स्वातीचा थेंब शिंपल्यात पडला होता.

क्षितिजावर काळे ढग गडगडत होते. तो आनंदमग्न होता. त्याच्या अंतरामध्ये तुफानी नदीच्या लाटा उसळत होत्या. त्याच्या मेंदूत सुस्वर झरे गाणी गात होते. इंद्र आपल्या साह्यासाठी उभा असलेला त्याला दिसला. रुद्र त्याच्या बरोबरच होता. एका वृक्षाच्या खोडाला टेकून त्याने डोळे मिटून घेतले. पावसाचे थेंब त्याच्या मोहक, उदास चेहऱ्यावरून झऱ्याप्रमाणे वाहात राहिले.

रात्रभर पाऊस पडत होता. नंतर सकाळ झाली आणि पाऊस थांबला. प्रकाश पसरला. कुंजांमध्ये शंख वाजत होते. नद्यांच्या काठी ब्राह्मण उषेची स्तुतिस्तोत्रे गात होते.

"हे देवांच्या माते, तू लखलखत राहा आणि आम्हांला राष्ट्रांमध्ये उच्चतम स्थान मिळवून दे."

ब्राह्मणांचे स्वर त्याच्या मागे नदीवर पसरत गेले. तो मंदिरांच्या पंक्तीसमोरून जाऊन पुनः अरण्याच्या रस्त्याला लागला.

समोर अयोध्या होती.

आता तो ओल्या मातीवर दोन्ही गुडघे टेकून बसला. त्याला असे दिसले की, चोहोकडे एक शून्य पसरले आहे आणि नेहमीप्रमाणे आपण एकाकीच आहोत—जगातील अनादी अनंत मानव, थकलेला, पराभूत, प्रसन्नचित्त, आशावादी मानव, जो परमेश्वरामध्ये आहे आणि स्वतः परमेश्वर आहे. समोर अयोध्येची सोनेरी नगरी होती. ती पावसाच्या धुक्यात अशी चमकत होती जणू ती सारीच्या सारी सोन्याने मढलेली होती आणि तिच्यातून देदीप्यमान किरणे बाहेर पडत होती.

नंतर तो ताठ उभा राहिला. त्याच्या स्वरात आत्मविश्वास, गर्व व स्वाभिमान होता. त्याने आपल्या परमेश्वराला खणखणीत स्वरात संबोधिले. तो म्हणाला,

"हे भगवन! तू अग्नी आहेस, तू सूर्य आहेस, वायू आहेस, चंद्र आणि तारे यांनी भरलेले आकाश तू आहेस, तू ब्रह्मा आहेस, जल आहेस, प्रजापती आहेस.

"तू स्त्री आहेस, पुरुष आहेस, युवक व युवती आहेस, आपली काठी टेकीत चालणारा तू वृद्ध आहेस, तू आपले तोंड प्रत्येक दिशेला करीत जन्म घेतोस.

"तू गडद निळ्या रंगाची माशी आहेस. तू लाल डोळ्यांचा हिरवा पोपट आहेस. तू वादळी ढग आहेस. तू सर्व ऋतूंचे रूप आहेस. तू समुद्र आहेस.

"दोन पक्षी, घनिष्ठ मित्र, एका वृक्षावर बसले आहेत. एक फळ खात आहे, दुसरा त्याच्याकडे टकमक बघत आहे. त्याच वृक्षावर मानव बसला आहे—उदासवाणा, आपल्या दौर्बल्याचे आश्चर्य करीत. परंतु जो इतरांना संतुष्ट झालेले पाहातो आणि त्यातील महानता ओळखतो, त्याचे स्वतःचे दुःख नाहीसे होते. जो ऋग्वेदाच्या या अविनाशी अस्तित्वाला ओळखत नाही, परंतु ज्याच्या ठिकाणी देव वास करतात, त्याला ऋग्वेदाचा काय लाभ झाला? जे त्याला जाणतात ते निश्चित बसले आहेत.

"ज्याने त्याला ओळखले, जो सूक्ष्माहून सूक्ष्मतर आहे, ज्याची अनेक रूपे आहेत, जो शिव अर्थात आनंद आहे.

"आणि, जेव्हा ज्योतीचा प्रसार होतो तेव्हा दिवसही उरत नाही आणि रात्रही उरत नाही. अस्तित्वही उरत नाही आणि नास्तित्वही उरत नाही. एकमात्र शिव उरतो. ती अनंत ज्योती सावित्रीची आहे. तिच्यातून बुद्धीचा जन्म झाला आहे.

"त्याचे सौंदर्य पाहाता येत नाही. त्याच्या ऐश्वर्याला व माहात्म्याला उपमा देता येत नाही. तो अंतरात विद्यमान आहे.

"तू अजन्मा आहेस. या शब्दांसह कोणी थरथर कापत तुझ्या जवळ येतो. हे रुद्रा, माझे रक्षण कर!

"तो विश्वातील एकाकी पक्षी आहे. तो समुद्रात अस्त पावलेल्या सूर्यासमान आहे. जो मानव त्याला ओळखील तो मृत्यूच्या पलीकडे जाईल.

"कारण याखेरीज प्रकाशाचा दुसरा मार्ग नाही."

त्याने पुनः डोळे उघडले. तंबोऱ्याच्या तारा थरथराव्यात तसे त्याचे शरीर थरथरत होते. त्याच्या पायांखालून पाणी वाहात असल्याचा आवाज येत होता. त्याने मान वर करून पाहिले. शरयू निर्लिप्तपणे वाहात होती. त्याने कपाळावर हाताची सावली करून सूक्ष्मपणे पाहाण्याचा प्रयत्न केला. त्याला काही दिसले नाही. नदीच्या दुसऱ्या काठावर भगवी वस्त्रे धारण करून काही माणसे भुतांप्रमाणे हालचाली करीत होती.

मग त्याने घाटावर बसलेल्या मुलीला विचारले (ही मुलगी केशरी साडी नेसलेली होती आणि तिने केसांत चाफ्याची फुले माळलेली होती.), "नदीच्या पलीकडे कोण राहातं ते तुला माहीत आहे काय?"

"काही भिक्षू आहेत." त्या मुलीने बेपर्वाईने उत्तर दिले आणि ती आपले पाय धुण्यात मग्न झाली.

"ठीक आहे, मी त्यांना जरा भेटून येतो."

"असली ही तुफानी नदी पोहून तू जाणार? यावेळी इथं नावही नाही."

"काही हरकत नाही. नद्या पोहून जाण्यासाठीच तर असतात."

हवा फार छान पडली होती. मोर ओरडत होते, चातक चिवचिवाट करीत होते, भ्रमर गुंजारव करीत होते. कित्येक फुले फांद्यांवरून गळून त्याच्या पायांवर पडली. त्याने खाली वाकून ती फुले उचलून घेतली आणि ती नदीत तरंगत सोडली. नंतर त्याने नदीत उडी मारली आणि तो पलीकडील काठाकडे पोहत निघाला.

इतक्यात एक जोराची लाट आली आणि तो तिच्याबरोबर किनाऱ्याच्या अगदी जवळ जाऊन पोहोचला. परंतु आता लाटा खूप मोठ्या झाल्या होत्या. त्याने आपली सारी शक्ती एकवटून हातपाय मारण्यास सुरुवात केली. परंतु पाण्यामध्ये त्याच्यापेक्षा जास्त शक्ती होती. अशा प्रकारे संघर्ष करीत असता त्याला पाण्यावर आलेली एक शिळा दिसली. चंडीच्या भग्न मंदिराचा तो एक भाग होता आणि तो पाण्यावर डोकावत होता. त्याने झटकन त्यातील एक कंगोरा पकडला. आता तो खूपच दमला होता. त्याला दम लागला होता म्हणून त्या दगडाला धरून त्याने क्षणभर डोळे मिटले. काळाचा प्रवाह पाणी वाहून नेत होता. सगळीकडे पाणीच पाणी पसरले होते. परंतु दगड हाताशी आल्यानंतर त्याला क्षणभर आपण सुरक्षित असल्याचा भास झाला कारण भूतकाळाशी संबंध असणारी शिळा भविष्यकाळीही अशीच राहील असे त्याला वाटत होते.

परंतु त्याच्या हाताची बोटे तुटलेली होती आणि तो फार वेळ त्या दगडावरील आपली पकड कायम ठेवू शकला नाही.

शरयूच्या लाटा गौतम नीलांबराच्या शरीरावरून वाहात राहिल्या. दुसऱ्या बाजूला अबुल मंसूर कमालुद्दीन याने नदीच्या किनाऱ्यावर येऊन आपला श्यामकर्ण घोडा वडाच्या झाडाला बांधला आणि चोहोंकडे नजर फिरविली. समोर नदी वाहात होती. दूर अंतरावर झोपड्या दिसत होत्या. देवळांतून घंटांचे आवाज येत होते. वडाच्या झाडाखाली कोणा पिराचा दर्गा होता. त्याने खाली वाकून पाण्यात आपली बोटे बुडविली. खडकाळ पात्रामुळे झालेल्या पाण्याच्या भोवऱ्यात त्याला आपला चेहरा दिसला आणि क्षणभर तो थक्क होऊन गेला. अखेर आपण इथे काय करीत आहोत ?

चंपा अजून आली नव्हती. त्याने पुनः नदीकडे पाहिले. कदंबाची फांदी फुलांनी लवली होती. काही फुले टपटप करीत त्याच्या डोक्यावर पडली. त्याने पगडी काढून त्या फुलांवरून हात फिरविला आणि आपल्या तलवारीच्या नक्षीदार मुठीला स्पर्श केला. फुलांच्या या समुदायात त्याला तलवार अगदीच विसंगत वाटली. त्याने हलकेच तलवार म्यानातून काढून गवतावर ठेवली.

एवढ्यात पाण्यातून पोहत चंपा घाटावर आली.

"मी तर समजले होते की तू पुनः कुठंतरी मारायला-मरायला निघून गेला असशील." ती हसत म्हणाली.

"मी तुला कितीदा सांगितलंय की मी लष्करी माणूस नाही; मी सुलतानाच्या ग्रंथालयाचं काम पाहातो."

"पण मग ही तलवार कशाला कमरेला लटकावतोस? ही महा भयंकर वस्तू आहे."

"चंपाराणी, हिला मर्दाचं आभूषण म्हणतात. ही आणि पगडी असल्याखेरीज आमचा पोशाख पूर्ण होत नाही. तुम्ही अवधवाल्यांनी माळव्याचे आणि बुंदेलखंडाचे राजपूत पाहिले नाहीत! पाहिले आहेस कधी? माझा एक दोस्त आहे—उदयसिंह राठोड. कनोजचा राजपूत आहे. काय फाकडा शिपाईगडी आहे म्हणतेस! आजकाल कुठं असेल कोण जाणे. ग्वाल्हेरच्या कीरतसिंहाच्या सैन्यात आहे, असं ऐकलंय. कदाचित माळव्यात कुठं तरी लढाई करीत असेल." कमालुद्दीन काही क्षण आपल्या रणांगणावरील मित्रांच्या आठवणीत मग्न झाला.

"हे पाहा," ती मुलगी आपल्या काळ्याभोर लांबसडक केसांतील पाणी झटकून त्यांचा आंबाडा बांधीत म्हणाली, "युद्धाच्या गोष्टी बोलू नकोस. जेव्हा मी तुला पाहाते आणि तुझ्याबरोबर ही तलवार पाहाते तेव्हा मला मोठा वहीम येतो."

"वहीम? ही काय चीज आहे बुवा?"

"तुला ते समजावून सांगणं व्यर्थ आहे." ती पुनः पायरीवर बसली. कमालुद्दीनने झाडांच्या लांब होत जाणाऱ्या सावल्यांकडे पाहिले.

"अच्छा चंपावती! तुला खुदाच्या हवाली करतो. खुदा हाफिझ." आणि तो आपल्या घोड्याकडे निघाला.

जवळून मुसलमान फकिरांचे एक टोळके गेले. त्यांच्यातील एका तरुणाने चंपा व कमाल यांच्याकडे पाहिले आणि मान खाली घालून तो पुढे निघून गेला.

"हे तरी कसे विदूषक आहेत बघ!" कमाल म्हणाला.

"ते विदूषक नाहीत. मोठे चांगले लोक आहेत. त्यांची टिंगल करीत जाऊ नकोस." चंपा एकदम रागाने म्हणाली, "एके दिवशी हेच लोक तुला साथ देतील."

"तू काशीला जाऊन आपल्या कबिराची चेली का बनत नाहीस?"

"काशीला जाताना मी तुलाही बरोबर घेऊन जाणार आहे. पण त्याआधी तुला ही तलवार टाकून द्यावी लागेल."

"अच्छा, खुदा हाफिझ!" कमाल उद्गारला.

तो नदीकडे वळला. "तिकडे पलीकडे मोडून पडलेल्या दगडांच्या ढिगासारखं काय आहे?" त्याने विचारले.

"ते...अरे ? ते तर फार प्राचीन मंदिराचे भग्नावशेष आहेत—शेकडो हजारो वर्षांपूर्वीचे !"

"आणि त्याच्याही पलीकडे, त्या झोपड्याशा दिसतात त्यात कोण राहातं ?"

"त्यातही सूफी लोक राहातात....भक्तगण...आता तू कुठं जाणार ?" तिने हलकेच विचारले.

"बहराइचला ! तिथं किती दिवस लागतील कोण जाणे !"

"पाऊस सुरू होणार आहे. सांभाळून जा. जिवाला जप."

"ठीक आहे. मी माझ्या जिवाला जपेन. खुदा-हाफिझ, वेड्या पोरी !"

तो तिला वेडी पोरगी म्हणत असे. त्या संबोधनात केवढे अथांग प्रेम साठविलेले होते ! तिने आवंढा गिळून स्मित केले. कमालुद्दीनने घोड्याचा लगाम पकडला आणि तो रस्त्यावर जाऊन पोहोचला. त्यानंतर उठलेल्या धुळीत तो दिसेनासा झाला.

## ७

बहराइच हे लहानसे शहर होते. येथील पिवळ्या रंगाची कच्ची घरे इकडेतिकडे विखुरलेली होती. धुळीने भरलेल्या रस्त्यांवरून बैलगाड्या चालत होत्या आणि एक विटकी, निनावी उदासीनता सर्वत्र पसरलेली होती. असे सांगतात की एके काळी श्रावस्ती नावाचे एक फार मोठे नगर विद्यमान होते. त्याचे सोमवंशी राजे अत्यंत तेजस्वी व प्रतापशाली होते. ज्योतिष्यांनी श्रावस्तीच्या सुहलदेवाला असे सांगितले होते की एक काळ येणार आहे जेव्हा उत्तरेकडून घिप्पाड तुर्क येऊन तुमा निकाल लावतील. त्याप्रमाणे खरोखरीच गझनीच्या महमूदाचा एक सेनापती इकडे आला. त्याचे नाव मसऊद गाजी असे होते. त्या मसऊद गाजीने सुहलदेवाचा निकाल लावला. दिल्लीच्या गादीवर कुतुबुद्दीन ऐबक आला आणि त्याचा सेनापती अहमद बख्तियार याने कोसल, मगध व बंगाल येथील सर्व मूर्तिपूजक राजांचा नायनाट करून टाकला.

परंतु ज्याप्रमाणे शाक्यमुनींना गेल्या दोन हजार वर्षांत विष्णूचा नववा अवतार मानण्यात आले होते त्याचप्रमाणे मूर्तिभंजक सेनापती मसऊद गाजी गेल्या दोन शतकांत बालेमियाँ या नावाने कोसल देशातील लोकांच्या दृष्टीने आणखी एक दैवत बनले होते. अबुल मंसूर कमालुद्दीन पहिल्यांदाच बहराइचला आला होता. तो सेनापती मसऊदच्या समाधीच्या भिंतीजवळच्या झाडाच्या सावलीत बसला आणि आश्चर्याने हिंदू स्त्रियांच्या

एका घोळक्याकडे पाहू लागला. त्या हातात पितळेच्या थाळ्या घेऊन समोरच्या समाधीवर नैवेद्य अर्पण करण्यासाठी आल्या होत्या.

नालंदा व विक्रमशिला, उज्जयिनी व अमरावती येथील आंतरराष्ट्रीय विद्यापीठे आता नामशेष झाली होती. श्रावस्तीचे प्राचीन आश्रम ओस पडले होते आणि विचित्र भाषांमध्ये लिहिलेल्या त्या पोथ्यांचा अर्थ करणारा आता कोणी उरला नव्हता.

परंतु काश्मीरचा सुलतान झैनुल आबिदैन व गौड देशाचा सुलतान अलाउद्दीन हुसैन शाह यांच्याप्रमाणे जौनपूरचा सुल्तान हुसैन शर्की हाही मूर्तिभंजनाऐवजी या पोथ्यांमध्ये रस घेण्यास सुरुवात केलेल्या बादशाहांपैकी एक होता.

सुलतान हुसैन शर्की याला दिल्लीचा सुलतान बहलोल लोदी आणि सुल्तान शिकंदर यांच्याशी लढण्यातून सवड मिळे तेव्हा तो आपला तंबोरा घेऊन रागांच्या दुनियेत विहार करी किंवा प्राचीन पांडुलिप्यांच्या अध्ययनात निमग्न होई. काही दिवसांपूर्वी त्याला अयोध्येच्या काही पंडितांकडून असे समजले होते की बहराइचच्या एका मठात दीड-पावणेदोन हजार वर्षांपूर्वीचे, संस्कृतचे काही जुने ताम्रपट आहेत. त्याने आपल्या ग्रंथालयातील नवयुवक निरीक्षक अबुल मंसूर कमालुद्दीन याला तेथील पंडितांना भेटण्यासाठी अयोध्येला पाठविले होते.

कमालुद्दीन अयोध्येला काही दिवसांसाठीच गेला होता. तेथेच अयोध्येच्या पंडितांपैकी एकाची बहीण त्याला दिसली. तिचे नाव चंपावती होते.

सुलतानाच्या आज्ञेवरून कमाल ज्यांच्या शोधार्थ शरयूच्या काठी राहणाऱ्या त्या पंडितांकडे गेला होता ती रूढ दर्शनशास्त्रे सोडून देऊन ते लोक एका नव्याच चक्रात सापडले होते. या चक्राचे नाव त्यांनी 'भक्ती' असे ठेवले होते. परंतु कमालाला भक्त कबीर किंवा दुसरा कोणी भक्त, संत अथवा सूफी यांमध्ये मुळीच रस नव्हता. तो इतिहासकार होऊ इच्छीत होता. सुलतानाने त्याला वेगवेगळे इतिहास लिहिण्यावर नेमले होते आणि त्याचा वेळ फार छान चालला होता. परंतु आता सुल्तानाने त्याला पंडितांच्या मदतीने संस्कृत, पाली, प्राकृत व अर्धमागधी भाषांमध्ये असलेल्या या असंबद्ध पुस्तकांचा फारसीत अनुवाद करण्याची आज्ञा केलेली होती.

प्राचीन ग्रंथांच्या शोधात तो सर्व मठांतून गेला. तो श्रावस्तीच्या भग्नावशेषांतून हिंडला. या भागाला आता सहेतमहेत असे म्हणत होते. तेथे ते भग्नावशेष बेवारशां-सारखे पडलेले होते. एके दिवशी त्याला याच भग्नावशेषांमध्ये दगड व वासे यांचा एक खूप मोठा ढीग दिसला. त्याच्या सभोवती गल्ल्या होत्या. या ठिकाणी एके काळी भपकेबाज बाजारपेठ असली पाहिजे आणि उंचउंच हवेल्या असल्या पाहिजेत. तो त्या इमारतीत शिरला. 'हा कुणाचा वाडा असेल कोण जाणे!' कमालाच्या मनात विचार

येऊन गेला. नंतर त्याने मठात जाऊन एका पंडिताला विचारले, "इथल्या भग्नावशेषां-मध्ये जो सर्वात मोठा भग्नावशेष आहे तो कुणाचा महाल होता?"

त्या पंडितानेही कमालाकडे आश्चर्यचकित होऊन पाहिले. जणू तो परदेशी विद्वान निरर्थक प्रश्न विचारीत होता. तो म्हणाला, "इथं असंख्य चक्रवर्ती राजे होऊन गेले आहेत. चंद्रगुप्त मौर्य, प्रियदर्शी अशोक, समुद्रगुप्त वगैरे! चंद्रगुप्त मौर्यांच्या आधी इथं मोठमोठे चित्रकार, मूर्तिकार आणि लेखक राहात होते. परंतु त्यांची नावं आम्हांला माहीत नाहीत. नावं पुसून जातात, माणूस जिवंत राहातो.".

"लाहौल विला कुवत! (हरे राम!)" कमाल मनात म्हणाला, "या देशाचा प्राचीन इतिहास लिहिणं अशक्य आहे." ज्या ताम्रपटांचे अनुवाद करवून घेण्यासाठी तो तेथे गेला होता त्या ताम्रपटांच्या लेखकांचीही नावे त्यांत नमूद केलेली नव्हती. तो पुन्हा त्याच भग्नावशेषाकडे परत गेला आणि एका मोडून पडलेल्या स्तंभावर बसून विचार करू लागला की, आता काय करावे?

एकाएकी त्याला बगदाद व नैशापूर यांच्या आठवणींनी त्रस्त करण्यात सुरुवात केली.

* * *

कमाल या देशात नुकताच आला होता. तो जौनपूरला राहू लागल्याला थोडीच वर्षे लोटली होती. वयाच्या बावीस वर्षापर्यंत त्याने बगदादच्या मदरसे निजामियामध्ये इब्ने सीना, अल फाराबी, आणि इराणचा फखरुद्दीन राजी, स्पेनचा इब्ने रुश्त व इब्नुल अरबी या दार्शनिकांचे विस्तृत अध्ययन केले होते. इब्ने खल्दून याला तो आपला गुरू मानीत होता आणि अरब राष्ट्रांचा इतिहास लिहिण्यास प्रारंभ करण्याचा विचार करीत होता. इब्ने खल्दूनच्या विचारसरणीशी संबंध असणाऱ्या काही विचारवंतांना भेटण्याच्या उद्देशाने तो उत्तर आफ्रिकेत जाणार होता. परंतु कैरोहून त्याला आपल्या वडिलांच्या मृत्यूची बातमी कळल्यामुळे तो बगदादला परत आला आणि तेथून इराणला गेला. नैशापुरात त्याला एका मित्राकडून असे समजले की तलवार चालविणाऱ्याप्रमाणेच लेखणी चालविणारे विद्वानही भारताकडे चालले आहेत. तेव्हा कमालाने आपले आवडते ग्रंथ आपल्याबरोबर घेतले आणि मध्य आशिया, काश्मीर व लाहोर या मार्गाने तो तुगलकाबादला येऊन पोहोचला.

यावेळी जगात मोठमोठ्या उलाढाली चालू होत्या. अर्थात कमालाला हे माहीत होते की जगाच्या इतिहासात बिचाऱ्या मानवावर कसल्या ना कसल्या संकटाचे डोंगर कोसळले नाहीत असे एकही युग होऊन गेलेले नाही. त्यापूर्वीच्या शतकांमध्ये तार्तर लोकांच्या आक्रमणांमुळे देशच्या देश वैराण झाले होते. अरबस्तान, इराण, स्पेन

व उत्तर आफ्रिका येथील मुस्लिम विद्वानांनी एकमेकांच्या सहकार्याने मोठ्या उत्साहाने ज्ञानाची जी दीपमालिका गेली सहाशे वर्षे तेवत ठेवली होती ती गोबीच्या वाळवंटातून उठणाऱ्या पिवळ्या वावटळींनी विझवून टाकली होती. तरीपण ही जी अराजकता, युद्ध, रक्तपात वगैरेची धूळ उसळली होती तिच्या मागे ज्ञानाचे दीप मिणमिणत होते. सूफी संतांच्या मठांत आणि विद्वानांच्या विद्यापीठांत ग्रंथ लिहिले जात होते, शिक्षणाची देवाणघेवाण चालू होती. मानवतेचा दीप कधी विझला नाही.

हे कंबलधारी फकीरही (सूफी) आता या नव्या देशाकडे येऊ लागले होते. या कलंदरांनी व फकिरांनी बंगाल, बिहार, अवध, राजस्थान, दक्खन, गुजरात, सिंध व पंजाब या प्रदेशांत नवीन विहार स्थापन केले. शर्की राज्य हे भारतातील सभ्यता व संस्कृती यांचे भव्य केंद्र झाले होते. जौनपूर हे भारतातील शीराज आहे असे म्हटले जात होते.

अबुल मंसूर कमालुद्दीन यानेही दिल्लीत काही दिवस राहिल्यानंतर जौनपूरला आपला मुक्काम हालविला.

त्याच्या समोर एक अगदी नवे व विचित्र जग पसरलेले होते. हिंद हा अत्यंत मनोहर देश होता.

तरीपण किती झाले तरी ती त्याची मातृभूमी नव्हती.

आपल्या मातृभूमीपासून आपण फार दूर आहोत, या कल्पनेने तो फार उदास झाला. त्याने भग्नावशेषातील एका खांबावर डोके टेकवून डोळे मिटले. "मी इथून परत का जात नाही?" त्याने मनाशी निश्चय केला की येथून जौनपूरला जावयाचे आणि सुल्तानाची क्षमा मागून दमास्कसला परत जावयाचे. दमास्कस! हे नावही त्याला अकस्मात विचित्र भासले. आपण दमास्कसला जाऊन काय करणार? नैशापुरात आता आपले काय ठेवले आहे? बगदादशी आता आपला काय संबंध?...हा विचार मनात येताच त्याला खूप दुःखही झाले.

आणि कसल्या विचित्र लोकांशी आपली गाठ पडली आहे! त्याने डोळे किलकिले करून समोरच्या शेतकऱ्याकडे पाहिले. तो आपल्या डोक्याला पंचा गुंडाळून मोठमोठ्याने एक विरहगीत गात झपाट्याने घराकडे चालला होता.

त्याच्या पार्श्वभूमीवर सारी हिब्रू संस्कृती होती, ग्रीक होते, रोम, इराण व स्पेन होते. त्याचा या जगाशी काही संबंध नव्हता. त्याने असे ऐकले होते की येथील योगी अंतराळात उडतात, येथील कामरूपच्या चेटकिणी माणसाचे बकऱ्यात रूपांतर करतात आणि बंगाल व बिहार येथील तांत्रिक मंदिरांमध्ये रोमांचकारक जादूटोणे चालू असतात

कमाल भग्नावशेषाच्या पायऱ्यांवर बसून निमूटपणे समोर पाहात राहिला. काही दिवसांपूर्वी अयोध्येमध्ये चंपाने त्याला गाऊन दाखविलेली सारी गीते त्याला आठवली.

या परक्या देशात नवखा असलेला तो पुरुष अपरिचित दगडांवर बसून रात्रीच्या सावलीकडे पाहात राहिला.

* * *

मंद प्रकाश चोहोकडे पसरला.

पौर्णिमेचा चंद्र भग्नावशेषाच्या फुटक्या छतातून खाली डोकावत होता आणि त्याच्या किरणांनी लाल दगडाच्या फुटलेल्या फरशीवर विचित्र कोन तयार केले होते. फरशीवर विविध प्रकारची पुसट नक्षी दिसत होती; शेकडो वर्षांच्या काळाने ती नक्षी अगदीच अस्पष्ट करून टाकली होती. त्रिशूळ व कल्पवृक्ष, धरतीचे प्रतीक असलेले कमळ, सृष्टीचे चक्र, कमळाचे सिंहासन, आणि अग्निस्तंभ—या अद्भुत प्रतीकांचा काय अर्थ त्या लोकांच्या मनांत असेल कोण जाणे! अर्थ म्हणजे तरी काय? कमाल चकित होऊन त्या आकृतींकडे पाहात विचार करू लागला. बाहेर मोहाच्या बागेवर भयंकर, जिवाचा थरकाप उडविणारी निःस्तब्धता घिरट्या घालीत होती.

आणि मग या निःस्तब्धतेतून मोठे विचित्र व विलक्षण आवाज येऊ लागले. असा भास होऊ लागला की, जणू त्या काळोख्या, वैराण गल्लीतून प्रचंड रथ चालले आहेत आणि त्या रथांवर, सुवर्णजडित छत्रांखाली, कानांत सोन्याची कुंडले घातलेले व शाली पांघरून बसलेले अपरिचित मानव त्याच्याकडे डोकावून पाहात आहेत. अंधारामध्ये त्यांचे डोळे ज्वालेप्रमाणे चमकत होते. ते भयानक पद्धतीने हासत होते. जणू ते त्याला खिजविण्यासाठी म्हणत होते, "हे पाहा, जसे आम्ही समाप्त झालो तसं तुमचंही एके दिवशी निर्मूलन करण्यात येईल." त्याच्यासमोर भग्न दरवाजात नृपचंद्र चंद्रगुप्त उभा होता—भारताचा सम्राट! हा येथे कुठून आला? हा तर येशुख्रिस्ताच्या जन्माच्या तीनशे वर्षे आधीच मरून गेला होता. परंतु हा येथे येऊन उभ्या उभ्या हासत होता. त्याच्या मागून आणखी एकाने डोके वर काढले. तो अत्यंत हलक्या आवाजात त्याला म्हणाला, "हे पाहा, माझं नाव अशोक आहे. प्रियदर्शी अशोक! मी संपूर्ण भारतवर्षाचा सम्राट होतो आणि जेव्हा मी निधन पावलो तेव्हा फक्त दीड आवळ्याचा मालक होतो." त्याने मूठ उघडून हातातील अर्धा आवळा कमालासमोर टाकला.

त्यानंतर त्या प्राचीन दिवंगत आत्म्यांची तेथे गर्दी उसळली. ते रथांतून खाली उतरून सगळीकडे पसरले.

"मी भरतमुनी आहे. मी नृत्याचे व नाटकाचे सिद्धांत बसविले होते."

"मी आहे तक्षशिलेचा विष्णुगुप्त. मी अर्थशास्त्र लिहिले होते."

"मी राजा भोज आहे."

"मी मात्र नुसता गंगू तेली आहे."

"काळोखाने भरलेल्या आकाशात ढग गर्जत आहेत. मी कालिदास आहे."

"मी कनोजचा राजशेखर आहे."

"मला भवभूती म्हणतात. मी 'मालतीमाधव' लिहिलं होतं."

"मी भर्तृहरी! मी सांगितलं होतं ना की जग ही केवळ एक रंगभूमी आहे आणि आपण सगळे नट आहोत? तू नट आहेस, मी नट आहे, आपण सगळे नट आहोत."

मातीची गाडी हाकत शूद्रक अंगणातून बाहेर गेला.

यानंतर जोराने तलवारींचा खणखणाट दुमदुमला. त्यांच्या तेजाने त्या पुसट अंधारात उजेड पसरला. सपासप मुंडकी उडविली जाऊन ती सर्वत्र पडू लागली.

"आम्ही चंदेले राजपूत आहोत! आम्ही बघेले आहोत! आम्ही शूरवीर परमार आहोत! आम्ही राठोड आहोत! आम्ही चव्हाण आहोत! आम्ही आल्हा आहोत! आम्ही ऊदल आहोत!"

अबुल मंसूर कमालुद्दीन गडबडीने उठून बसला. क्षितिजावर पहाटेची लाली पसरली होती. बाहेर मोहाच्या बागेत काही शेतकरी आल्हा-ऊदलाचा पोवाडा गात, खांद्यांवर औत घेऊन शेतांकडे चालले होते.

त्याने घाबरून चोहोंकडे पाहिले. आपण कोठे आहोत, हेच त्याला समजेना.

ते बहराइच होते आणि तो मूर्तिपूजकांच्या एका भग्नावशेषात झोपला होता. त्याचा श्यामकर्ण घोडा बाहेर एका खांबाला बांधलेला होता. तो खिंकाळत होता. ढग भरून आले होते. मोठा छान वारा वाहात होता.

'लाहौल विला कूवत'[1] असे म्हणून तो उठून उभा राहिला आणि सकाळचा नमाज पढण्याच्या हेतूने हळूहळू नदीकडे निघाला.



---

१. हा संपूर्ण मंत्र असा आहे : 'लाहौल वला कूवता इल्ला बिल्ला हे' (ईश्वराखेरीज इतर कोणामध्ये सद्गुण व सामर्थ्य नाही.) भूत पिशाचांना पळवून लावण्यासाठी हा मंत्र उच्चारला जातो.

दिवसभर पंडितांबरोबर ताम्रपटांसंबंधी डोकेफोड केल्यानंतर कमाल मठाच्या बाहेर गवतावर बसून विचार करीत होता की उद्या सकाळी भल्या पहाटे अयोध्येला परत जाण्यासाठी निघावे. अगदी याच वेळी पावसाचा एक थेंब त्याच्या चेहऱ्यावर टपकला. कमालाने एका छपराखाली जाऊन कमरेचा शेला सोडला व तो आडवा झाला. इतक्यात त्याच्या लक्षात आले की, अरे, श्रावणाचा महिना येऊन ठेपला. काय ही ऋतूंची जादू! प्रत्येक महिन्याच्या नावाबरोबर त्याचे स्वतःचे असे एक वातावरण होते. त्याची स्वतःची दृश्ये, त्याचे रंग, त्याचे राग होते.

ही त्याची मातृभूमी नव्हती. परंतु निदान या ऋतूंच्या जादूगिरीतून तरी तो आपली सुटका करून घेऊ शकत नव्हता.

इतक्यात चिमटा वाजल्याचा आवाज त्याच्या कानांवर आला. एक साधू पावसापासून स्वतःला बचावण्यासाठी त्या खोपटात आला होता आणि बसल्या बसल्या काहीतरी खुडबुड करू लागला होता. कमाल उठून बसला आणि कुतूहलाने त्याच्याकडे पाहू लागला.

हा बहुधा वातावरणाचा परिणाम असावा. "जय रामजीकी!" तो हलक्या आवाजात म्हणाला.

"जय रामजीकी!" साधूने उत्तर दिले. "काय शिपाईदादा, कुठून आलात?"

"साधूबाबा, तुम्ही इथलेच राहाणारे काय?" कमालाने विचारले.

"छे:! आम्ही जौनपूरचे राहाणारे आहोत."

"अरे!" कमाल उत्स्फूर्तपणे खुषीत येऊन उद्गारला, "म्हणजे तुम्ही आमचे गाववालेच आहात की!"

दुसऱ्याच क्षणी त्याला अज्ञात हर्षाच्या आपल्या या भावनेचे मोठे आश्चर्य वाटले.— "माझं गाव? माझी मातृभूमी?"

परंतु जौनपूर हे काही त्याचे गाव नव्हते. तो तर बगदादचा रहिवासी होता. त्याला गोंधळल्यासारखे झाले.

"निर्गुण राम! निर्गुण राम! जपो रे भाई!" साधू डोळे मिटून एकाच स्वरात जप केल्याप्रमाणे मोठ्याने पुटपुटत होता. थोड्या वेळानंतर तो स्वतःच कमालाला उद्देशून म्हणाला, "आज काही कलंदर (अवलिया, फकीर) बाले मियाँच्या मजारासाठी पताका घेऊन रापडीहून इकडे आले आहेत."

"अच्छा!"

"ते सांगत होते की आमचा सुलतान आणि दिल्लीचा बादशाह यांच्यात पुनः युद्ध सुरू झालंय. या खेपेला आमचा सुलतान सहीसलामत सुटेलसं दिसत नाही. सामना मोठा जोरदार आहे. निर्गुण राम! निर्गुण राम!"

कमाल दचकून उठून उभा राहिला. घाईघाईने त्याने आपला शेला कमरेला बांधला; आणि बाहेर येऊन तो धर्मशाळेकडे रवाना झाला.

धर्मशाळेच्या ओसरीत उदयसिंह राठोड त्याची वाट पाहात होता.

"तू...तू इथं? इथं कसा आलास?" कमालाने आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे पाहात विचारले, "तू तर, दोस्त, ग्वाल्हेरला होतास ना?"

"मी ग्वाल्हेरहूनच येतो आहे. माझ्याबरोबर चल. आलमपनाहांनी तुला शोधून आणण्यासाठी मला पाठवलंय."

"मला शोधायसाठी तू इतका दूर आलास?"

"आलमपनाह देखील सध्या इथंच बहराइचला आहेत." उदयसिंह म्हणाला. "तू इथं ज्ञान-ध्यान करण्यात मग्न आहेस आणि तिकडे इकडचं जग तिकडे झालंय. सुलतान बहलोल लोदीनं तुझ्या सुलतानावर रापडीमध्ये हल्ला केला. चल ये, इथं बैस. मी तुला सारी हकीगत सांगतो." आणि तो आरामात खाटेवर बसून सांगू लागला, "सुल्तान हुसैन यांच्यावर हल्ला झाला तेव्हा ते यमुना नदी ओलांडून आमच्या राजाकडे मदत मागण्यासाठी ग्वाल्हेरला आले. आमच्या राजेसाहेबांनी त्यांना कुमक दिली' मी त्यांचं सैन्य घेऊन कालपीच्या बाजूनं पुढं घुसलो. मोठं तुंबळ युद्ध झालं, भैया!'. उदयसिंह खास लष्करी ढंगाने त्या युद्धाचे वर्णन करू लागला. नंतर खाली वाकून ओसरीच्या जमिनीवर गवताच्या काडीने नकाशा काढून तो कमालाला समजावून सांगण्यात तल्लीन झाला. "हे पाहा, या बाजूला सुल्तान बहलोलाचं सैन्य आहे... इकडे आम्ही आहोत...मध्ये यमुनामैया आहे. आता आम्हांलाही नदी ओलांडता येत नाही आणि त्यांनाही इकडे येता येत नाही. वेळ निघून चाल्लाय आणि मग एके दिवशी काय झालं, की त्रिलोकचंदानं सुल्तान बहलोलाला नदीच्या पैलतीरावर आणून पोहोचवलं." तो थोडा वेळ थांबून म्हणाला, "त्रिलोकचंद माहीत आहे तुला?"

"अंऽहं!"

"बक्सरचा सत्ताधीश आहे. तू कधी बक्सरला गेला आहेस?"

"नाही!" कमाल वैतागून म्हणाला, "ते जाऊ दे. काय घडलं ते सांग. पुढं काय झालं?"

"होणार काय? दिल्लीच्या फौजा आमची पाठ सोडीनात. आम्ही जौनपूरला परत आलो. तिथंही दिल्लीवाल्यांनी आमचा पाठलाग करून आम्हांला जेरीस आणलं.

आम्ही जौनपूरला त्याच्या नशिबाच्या हवाली करून बहराइचला आलो. तुझं जौनपूर आता वैराण झालंय. तिथं दिवसाढवळ्या घुबडं ओरडू लागली आहेत. चल माझ्या बरोबर!" असे म्हणून तो उठून उभा राहिला. "आलमपनाह सांगत होते की तू कित्येक महिन्यांपासून इथं आहेस. सकाळपासून तुला शोधत फिरतो आहे. मठाच्या पंडितांकडून तुझा ठावठिकाणा समजला."

कमालाने कमरेला तलवार लटकावली आणि तो उदयसिंहाबरोबर लष्कराकडे निघाला. लष्कराचा तळ राप्ती नदीच्या काठी जेतवनामध्ये होता.

* * *

बहराइचहून ते लोक कनोजला गेले. तेथेही त्यांना बहलोल लोदीकडून पराभव खावा लागला. अखेर दमून भागून सुलतान हुसैनने बिहारात आश्रय घेतला.

जौनपूरच्या गादीवर आता दिल्लीचा एक शाहाजादा (राजपुत्र) बसला होता. शर्की सत्ता संपुष्टात आली. भारताचा शीराझ उजाड झाला.

काजी शहाबुद्दीन जौनपुरीचा उत्तराधिकारी, इतिहासज्ञ व संशोधक अबुल मंसूर कमालुद्दीन हा आता राजकीय डावपेचांतही निपुण झाला. तो अहोरात्र सुल्तानाच्या डोक्याला डोके लावून दिल्लीच्या सुलतानाचा पराभव कसा करावयाचा यासंबंधी डावपेच लढविण्यात मग्न असे.

आता सुलतान बहलोल निधन पावला होता आणि त्याचा देखणा, तरणाबांड मुलगा शिकंदर लोदी हिंदचा बादशाह झाला होता. त्याच्या हिंदू आईचे नाव हेमावती असे होते आणि तो स्वतः आपल्या बापापेक्षाही अधिक सामर्थ्यशाली बादशाह होता.

बिहारच्या या निर्वासितांनी आपली सारी शक्ती पणास लावून पुनः एकदा फासा टाकला. परंतु हुसैन शर्कीला पुनः पराभूत व्हावे लागले आणि तो संगीतकार बादशाह पुनः एकदा बिहारला परत फिरला.

आता कमालाचे मन विरक्त झाले. त्याने किती रक्तपात पाहिला होता, किती माणसांची कत्तल केली होती, किती निराधार बायकांना रडताना पाहिले होते! सुलतान हुसैनाच्या दरबारातील अमीरउमरावांना सुल्तान शिकंदराच्या समोर जाताना त्याने पाहिले होते. त्यांची पागोटी त्यांच्या गळ्यात दोऱ्यांप्रमाणे बांधलेली असत आणि त्यांना कैद्यांप्रमाणे अनवाणीच विजेत्यासमोर हजर करण्यात येत असे. हे लोक विद्वान, कवी, प्रतिभासंपन्न लेखक होते आणि त्यांचा विजेताही विद्याप्रेमी व कवी होता. परंतु पुस्तकांना काही अर्थ नव्हता. ज्ञान व्यर्थ होते, तत्त्वज्ञान निरर्थक होते.

कारण, हे सारे असूनही माणसाचे रक्त वाहात होते. इतिहासाबद्दल त्याला जेवढी

गोडी वाटत होती तेवढीच किळस त्याला आता वाटू लागली. सुलतानांच्या वंशावळ्या, त्यांची युगे व कालखंड, त्यांच्या राज्यांच्या घटना या साऱ्या गोष्टींचा आपल्याला विसर पडावा असे त्याला वाटत होते.

बिचारा बेघर सुलतान हुसैन बिहारहून बंगालकडे गेला. गौड देशाचा सुल्तान हुसैन शाह याने जौनपूरच्या पराभूत बादशाहाला आपल्या येथे आश्रय दिला.

"आता माझा आत्मा कोणत्या वस्तूच्या शोधात आहे?"—गौडाच्या शाही उद्यानात निरुद्देश इकडेतिकडे भटकताना कमाल स्वतःला विचारी. त्याचे सारे अस्तित्व एका भयानक शून्यात विचरण करीत होते. ज्या ठिकाणी केवळ सखोल स्तब्धता भरलेली असते अशा शून्यात तो वावरत होता.

या निःस्तब्धतेत केवळ एकच विचार वारंवार घुमत असे. "जोपर्यंत मी या चक्रात अडकून राहीन तोपर्यंत मला इतरांना ठार मारावं लागेल आणि दुसरे लोकही मला मारून टाकण्यासाठी टपलेले राहातील. माणूस हा खरोखरी माणूस नाहीच. तो रक्तपिपासू प्राणी आहे. मला माणूस कुठं भेटेल?"

नाना प्रकारच्या आवाजांनी त्या निःस्तब्धतेत असंख्य भोवरे निर्माण केले. "मी या समोरच्या माणसाला ठार मारणार कारण त्यानं डोक्यावर शेंडी ठेवलीय आणि तो गाईची पूजा करतो. आणि मी त्याला आधी ठार मारले नाही तर तो माझा निकाल लावून टाकील कारण माझ्या डोक्यावर शेंडी नाही आणि मी गाय खातो.

"सुंदर शिवपुरी (बनारस) मी उध्वस्त करून टाकली पाहिजे कारण तिथल्या मंदिरांतून लाखो मूर्ती सजवून ठेवलेल्या आहेत. पण त्या मूर्तींनी माझं काय घोडं मारलंय?"

ऋतू बदलत होते. तो मनाच्या वैराणपणाला घाबरून नाचरंगाच्या मैफलींत सामील होऊ लागला. परंतु सारंगीच्या सुरांत त्याला मृत्यूचे आचके ऐकू येऊ लागले. त्याने लखनवतीच्या कलावंतिणींचे नाच पाहिले; परंतु सुंदर नर्तकींऐवजी त्याला मेलेल्या बायका दात विचकत असलेल्या दिसल्या.

नाना प्रकारचे आवाज, विचित्र व विलक्षण गीतांचे शब्द, मृत भाषांची वाक्ये अष्टौप्रहर त्याच्या डोक्यात धुमाकूळ घालीत. मेंदूतील या गोंधळाने तो वैतागून गेला. निःस्तब्धता इतकी कोलाहलपूर्ण असू शकते, याची त्याला कल्पना नव्हती.

एके दिवशी कोणीतरी हळूच त्याच्या कानात सांगितले, "हीरा जनम अमोल था, कौड़ी बदले जाय।...हीरा जनम अमोल था...हीरा जनम अमोल था..." (हा मानवजन्म म्हणजे अनमोल हिरा होता. तो तू कवडीच्या मोबदल्यात घालवितो आहेस.) तो त्रासून दुसऱ्या एखाद्या नर्तकीकडे जाई आणि तिला म्हणे, "गुणकली छेड.

मधु-माधवी ऐकव. ललत राग गा." तिने तंबोऱ्याला हात घातला की तो तेथूनही पळून जाई. गायिकांच्या गीतांच्या ऐवजी दुसरेच कोणते तरी शब्द त्याचा पाठलाग करू लागत. "साँस नक्कारा कूचका...साँस नक्कारा कूचका, बाजत है दिन रैन...दिन रैन... दिन रैन!" (श्वासोच्छ्वास हा येथून कूच करण्याचा नगारा असून तो अहोरात्र वाजत असतो.) अखेर त्याने लखनवती, गौड व सोनारगाव या शहरांतील कोलाहलापासून दूर असलेल्या खेड्याकडे प्रस्थान केले. तेथे फक्त गडद रंगांचे राज्य होते, तळ्यांमध्ये कमळाची लाल फुले चमकत होती आणि औदुंबराच्या व बकुळीच्या सावलीत वैष्णव पुजारी व पुजारिणी राधा व कृष्ण यांच्या प्रेमाची गाणी गात असत. निर्मनुष्य प्रदेशात त्याला वंगाधिपती व गौडेश्वर सम्राटांचे ओसाड वाडे दिसले. त्यांवर गवत उगवले होते. पाल व सेन सम्राटांच्या प्रासादांच्या भग्नावशेषांच्या सावलीत एक जुनाट कबरस्तान होते. त्याच्या मोडक्यातोडक्या तटाच्या सावलीत एक म्हातारा खोकून खोकून धाप लागल्याने बेजार होऊन बसला होता. त्याच्या जवळच्या शेतात नांगरणी चालू होती. समोर महानंदा नदी वळणे घेत वाहात होती. त्याच्या डोक्यातील कोलाहल अकस्मात काहीसा शांत झाला. अयोध्येमध्ये कोणाकडून तरी ऐकलेल्या एका संतवचनाच्या अर्थाचा उलगडा ताऱ्याच्या प्रकाशाप्रमाणे त्याला होऊ लागला. कोणी तरी त्याला म्हटले होते,

**आज काल के बीच में जंगल होगा बास।**
**औरे औरे हल चलेंगे, ढोर चरेंगे घास।**

[आज आणि उद्या यांच्या दरम्यानच्या काळात लोकवस्त्यांच्या जागी अरण्ये निर्माण होतील, जागोजागी नांगर फिरतील आणि गुरे चरू लागतील.]

**ढोर चरेंगे घास...ढोर चरेंगे...**

अखेर जेव्हा ही बेचैनी, ही अस्वस्थता अतोनात वाढली तेव्हा बंगालमधून पळून जाण्याचे त्याने ठरविले. सुल्तान हुसैन शर्की याला गौड देशात अशा प्रकारे एकटा सोडून जाण्याच्या कल्पनेने त्याला स्वतःचीच लाज वाटू लागली.

"परंतु साऱ्या भावना क्षणिक असतात." तो आपल्या मनाशी म्हणाला आणि एके दिवशी कोणालाही न सांगता तो राजवाड्यातून निघून गेला. गंगेच्या घाटावर जाऊन तो एका जहाजात बसला. ते जहाज कोणीकडे जाणार आहे याची त्याला काहीच कल्पना नव्हती.

नदीवर प्रकाश झळकला. नांगर उचलला गेला. नावाडी आनंदाने गात होते. कमाल एका कोपऱ्यात बसून राहिला. ती प्रचंड नौका प्रयागला चालली होती.

एकामागून एक दिवस लोटले. नाव गंगेच्या पृष्ठभागावरून पुढे पुढे जात राहिली. प्रवाशांनी भरलेल्या त्या नावेत सतत हालचाल चालू असे. भागलपूरजवळ एका गावातील वऱ्हाडी लोक नव्या नवरीची लाल डोली घेऊन नौकेत चढले. नवऱ्या मुलाने हळदीने रंगविलेले पिवळे कपडे अंगात घातले होते. नवरीने डोक्यावरील पदराने आपला चेहरा झाकून घेतला होता आणि ती मुसमुसून रडत होती. वऱ्हाडी लोक आरडाओरडा करीत होते.

कमाल नावेच्या भिंतीला टेकून बसल्या बसल्या शून्य नजरेने हे सारे पाहात होता.

"हे पाहा चंपावती! तू माझ्याशी लग्न कर."

"इश्श! काय बोलतोस हे? मला तर तुम्हां मौलवींच्या दाढीचीच भीती वाटते जौनपूरचा काजी बनून तूही अशीच लांब दाढी वाढवशील."

"अजूनही वेळ गेलेली नाही, चंपाराणी! लक्षात ठेव, एखाद्या दिवशी कुठल्या तरी तुळतुळीत चंपी केलेल्या भटाच्या गळ्यात तुला बांधण्यात येईल. तो जन्मभर तुझ्याकडून सेवा करून घेईल आणि तो मेल्यानंतर तुलाही त्याच्याबरोबर चितेत ढकलून देण्यात येईल. आपल्या भयंकर भावी जीवनासंबंधी तू कधी विचार तरी केला आहेस काय?"

"मी तर तुझ्याबरोबरही मरायला तयार आहे. तू मरून तर पाहा."

हे ऐकून तो थक्क झाला. "ते कसं काय? माझं तुझ्याशी लग्न कुठं झालंय? म्हणजे असं की...मी...तू...मला असं म्हणायचं आहे की...!"

"म्हणून काय झालं? तुझा माझा जन्मोजन्मीचा संबंध आहे."

"जन्मोजन्मीचा? वाटेल ते काय बरळतेस?" कमालाने तिला अडवून म्हटले, "तू पुनः चेटूक करायला लागलीस!"

"यात चेटूक कसलं?" चंपाने आश्चर्यचकित होऊन म्हटले, "मी तुझी निवड केलीय आणि तुझ्यासमोर लीन आहे."

"हे काय नास्तिकासारखं बडबडतेस? मी काय देव आहे?"

"आहेसच मुळी. मनच परमेश्वराला जन्म देत असतं." आणि ती खदखदा हसत गडप झाली.

पाटण्याच्या घाटावर पुष्कळ उतारू उतरले आणि पुष्कळच नवे लोक नौकेत आले. नवीन प्रवाशांमध्ये काही श्रीमंत तरुण होते. साधूंचा एक गट होता. नारिंगी रंगाची वस्त्रे परिधान केलेला एक भिक्षू होता. हा भिक्षू सर्वांपासून अगदी दूर राहात असे.

थोड्या वेळाने त्या साधूंपैकी एक जण कमालाजवळून पुढे गेला. कमालाला वाटले, हा साधू आपल्याला ओळखत असावा.

"तुम्ही कुणीकडे चालला आहात?" कमालाने विचारले.

"काशीला."

"तिथं काय आहे?"

"तिथं काय नाही? ती शिवपुरी आहे. तिथं माझे गुरू राहातात. माझे शेख! तू आपल्या आयुष्याची इतकी वर्षे वाया घालविलीस आणि त्यांची ओळखही करून घेतली नाहीस, ही किती खेदाची गोष्ट आहे." तो थोडा वेळ थांबला. नंतर त्याने विचारले. "तू जौनपूरचा कमालुद्दीन ना?"

कमाल थक्क होऊन त्याच्याकडे पाहातच राहिला.

"मी सुलतान शिकंदराचा सेनापती होतो. मी चुनारच्या युद्धात तुझ्याशी लढलो होतो. किंबहुना तू आपल्या तलवारीनं मला जखमीही केलं होतंस. हे पाहा!" असे म्हणून त्याने आपला उजवा हात पुढे केला. त्या हाताची बोटे तुटलेली होती. तो आपली एकतारी डाव्या हाताने वाजवीत होता. "तुला आणखी सांगू? जेव्हा तू गौडाच्या दरबारात ऐषआराम करीत होतास तेव्हा ती जंगलामध्ये तुझी वाट पाहात होती आणि विलाप करीत फिरत होती. परंतु तिचा संदेश तुझ्यापर्यंत नेऊन पोहोचविणारा एखादा राजहंस तिला भेटला नाही."

कमालाचे अंतःकरण धडधडू लागले. या बैराग्याला अंतर्ज्ञानाची सिद्धी प्राप्त झाली आहे की काय?

"मी माझी फौज घेऊन अयोध्येच्या बाजूनं चाललो होतो. रापडीमध्ये जे युद्ध झालं त्यात तिचा भाऊ मारला गेला. ती जंगलामध्ये रडत हिंडत होती. एखादा शिपाई दिसला की तिला वाटे बहुधा तूच आला असावास. कारण तू तिला अवश्य परत येण्याचं वचन दिलं होतंस. माझा लष्करी पोशाख पाहून ती माझ्याकडे आली. मी तिला तुझ्यासंबंधी काहीच सांगू शकलो नाही. त्यानंतर ती कुठं निघून गेली, कोण जाणे. जग फार मोठं आहे..." तो बैरागी सांगत होता, "तू तिला शोधून काढू शकणार नाहीस. तिलाही तुझा ठावठिकाणा समजणार नाही. जीवनामध्ये दोन माणसं फक्त एकदाच एकमेकांना भेटत असतात. त्यांचा वियोग झाला तर पुनः त्यांची भेट होणं असंभव असतं. मीलन आणि वियोग यांचा अर्थ तुला माहीत आहे?" इतके बोलून तो बैरागी आपली एकतारी घेऊन आपल्या सहकाऱ्यांकडे निघून गेला.

गंगा वाहात राहिली. चांदीच्या विशाल चादरीवर उतारूंनी भरलेल्या नावा चालत राहिल्या—शाही नौका, व्यापाऱ्यांची गलबते, कोळ्यांच्या होड्या! संध्याकाळी मावळत्या सूर्यासमोर त्यांची शिडे वाऱ्यावर अशी फडफडत, जणू असंख्य राजहंस मानससरोवराकडे जाण्यासाठी आपले पंख हालवीत उड्डाणाची तयारी करीत आहेत

असे वाटे. नौकांमधून गाण्याचे सूर उमटले. बैराग्यांची नामस्मरणे, फकिरांचे जप, वैष्णव पुजाऱ्यांची भजने, व्यापाऱ्यांची गलबते देशातील बाजारपेठांकडे चालली होती. दूरदूरच्या देशांतील लोक या नौकांमध्ये होते—अरबस्तानचे व चीनचे विद्वान, तिबेटचे व काश्मीरचे भिक्षू, अरबस्तानचे पर्यटक, इराणचे चित्रकार, जावाचे नर्तक. देशात शांतता स्थापन झालेली होती. दिल्लीला सुलतान शिकंदर राज्य करीत होता. जीवनामध्ये उत्साह ओतप्रोत भरून राहिला होता.

"ज्या लोकांना मनःशांती लाभलेली आहे ते मोठे भाग्यवान आहेत. भाई, मला शांतता हवी." कमाल स्वतःशी पुटपुटला.

यावर भिक्षूने मान वर करून पाहिले. आज वैशाखी पौर्णिमा होती. दोन हजार वर्षांपूर्वी, आजच्या रात्री, याच गंगा नदीच्या पैलतीरावरील तराईच्या एका गावात शाक्यमुनींचा जन्म झाला होता. आजच्या वैशाख पौर्णिमेच्या दिवशीच त्यांना बुद्धत्व प्राप्त झाले होते. पौर्णिमेचा चंद्र नदीच्या लाटांवर इतस्ततः तरंगत होता....त्याचे प्रखर व थंड किरण कमाल व भिक्षू यांच्या चेहऱ्यांवर पडले होते.

"मला माझ्या विचारांपासून मुक्ती मिळवून द्या." कमाल म्हणाला.

भिक्षू आपल्या रहस्यपूर्ण नेत्रांनी त्याच्याकडे पाहात राहिला.

"विचार! विचार स्वतःला जाणू शकत नाही. विचार स्वतःमधून बाहेर पडू शकत नाही. सृष्टीच्या बाहेर कोणताही ईश्वर नाही आणि ईश्वराबाहेर कोणतीही सृष्टी नाही. सत्य आणि असत्य यांत काही अंतर नाही. परंतु या सर्वांवर परम सत्य असे शून्य आहे." तो गंभीर स्वरात म्हणाला.

"मला या शून्याचं, या निःस्तब्धतेचं फार भय वाटतंय." कमालाने सांगितले.

"शून्य...निःस्तब्धता...शून्यता—ते अंतिम सत्य आहे; तीच शून्याची परिकल्पना आहे.

"या शून्यात मी एकटा कुठं जाऊ? तुम्ही देखील माझी सोबत करू शकणार नाही." कमालाने त्या महायानी भिक्षूकडे साशंक नजरेने पाहिले.

जहाज एका गावाजवळ थांबले. कमाल घाटावर उतरून चोहोंकडे पाहू लागला. कोठे जावे हे त्याला कळेना. इतक्यात त्याला त्याच जहाजातून उतरलेला वैष्णव पुजाऱ्यांचा एक समुदाय दिसला. तो त्यांच्या मागोमाग चालू लागला.

कित्येक दिवसपर्यंत तो असाच इकडेतिकडे भटकत राहिला.

अशा प्रकारे गावोगाव भटकत तो एका हिरन्यागार जंगलात जाऊन पोहोचला. त्याला त्या ठिकाणाचे नाव माहीत नव्हते. जवळच विणकरांची वस्ती होती. चंदनाने सुगंधित झालेला वारा सर्वत्र भिरभिरत होता. श्रावणाचा महिना लौकरच सुरू होणार होता.

गळ्यात तुळशीच्या माळा घातलेल्या वैष्णव जोगिणी फणसाच्या झाडाखाली बसून चिपळ्या वाजवीत होत्या. गुलाबी डोळ्यांचे पोपट फांद्यांवर बसले होते. हातांत कमंडलू घेतलेले गोसावी शंख व तुताऱ्या फुंकीत तीर्थयात्रेला चालले होते. झुडपांमध्ये जंगली तितर ओरडत होते.

तळ्याच्या काठी फुललेल्या रसवेलीचा सुगंध पसरला होता. मोहाच्या बनातून गाण्याचे मधुर स्वर येत होते. कमाल तलावाच्या पायऱ्यांवर बसून जंगलाचे व श्रावणाचे हे स्वर ऐकत होता.

आपण निःस्तब्धतेत बसलो आहोत याची जाणीव त्याला आता झाली. या निःस्तब्धतेच्या वेगवेगळ्या पडछाया होत्या. तो आश्चर्यचकित झाला होता. ही शून्यता म्हणजे एक परम सत्य होते. भिक्षूचे म्हणणे त्याला आता कळले.

नंतर त्याने लक्षपूर्वक ऐकले. मोहाच्या झाडांच्या बनात वैष्णव पुजारिणी जी गीते गात होत्या त्यांचे शब्द आता त्याला स्पष्ट ऐकू येत होते. ही तर बर्दवानच्या जयदेव गोस्वामीची गीते होती.

पुजारिणी गात होत्या : "मलयाच्या गरम वनांवरून वाहात येणारा वारा सुगंध आणीत आहे. तेथे वेलदोड्याच्या झाडांकडून चोरलेला सुगंध पसरला आहे; तेथे मधमाशा गुंजारव करीत आहेत.

"जेथे तो नृत्य करीत आहे त्या कुंजांतून हा पूर्वेचा वारा येत आहे. हा वसंताचा महिना आहे आणि या महिन्यात एकान्त फार ताप देतो.

"केतकीच्या कळ्या आणि पिवळी फुले कामदेवाच्या बाणांप्रमाणे चमकत आहेत. पाटलीच्या कळ्यांवर भ्रमर झोपले आहेत. माधवी आणि रेशमी मोगरा वाऱ्यावर डोलत आहेत. आणि यावेळी तो कुंजांमध्ये नृत्य करीत आहे. हा वसंताचा महिना आहे आणि या महिन्यात एकाकीपणा फार सतावतो.

"गरम ओठांनी, मिटलेल्या डोळ्यांना स्पर्श करावा तसे सूर्याचे किरण कैऱ्यांना स्पर्श करीत आहेत आणि तो शांत यमुनातटावर नृत्य करीत आहे. फुलांच्या ऋतूत तो मात्र एकाकी नाही.

"तो गोपींबरोबर नृत्य करीत आपला वेळ असाच वाया घालवील आणि इकडे राधा त्याची प्रतीक्षा करीत आहे."

पुजाऱ्यांनी गीताचे दुसरे कडवे गाण्यास सुरुवात केली :

"दूर जाणाऱ्या मुशाफिराला कोकिळेचा आवाज ऐकून आपल्या देशातील नदी-काठच्या आंबरायांवर गुंजारव करणाऱ्या भ्रमरांची आठवण यावी तसे त्याला अचानक राधेचे स्मरण झाले.

"आणि राधेने पाहिले—सोनेरी वस्त्रे धारण करून, केसांमध्ये रानफुले सजवून, आपल्या लाल ओठांच्या रंगाच्या वज्ररत्नाने विभूषित असलेला तो, गोपींबरोबर नृत्य करीत आहे."

कमाल तळ्याच्या पायऱ्यांवर बसून ऐकत राहिला.

पुजारिणी गाऊ लागल्या :

"कोकिळेच्या स्वराने पथिकाला व्यथा होते—
प्राप्त न झालेल्या आनंदाची व्यथा,
न घडलेल्या प्रवासांची व्यथा,
निष्फळ परिभ्रमाची व्यथा.
आणि आनंद असूनही
आनंदात व्यथा लपलेली आहे; कारण व्यथा अनंत आहे."

कमाल उठून उभा राहिला. पुजारिणींचा आवाज, जयदेवाचे शब्द हळूहळू दूर गेले. आणि जयदेवाने म्हटले होते, "मी प्रतीक्षा करीत आहे. ज्याने उशिरा प्रेम करण्यास प्रारंभ केला असेल तोही प्रेम करीत असतोच."

मैना आणि चिमण्या यांच्या संगीतामध्ये बुडून तो अरण्यातील दाट सावलीच्या रस्त्यांवरून इकडे-तिकडे भटकत राहिला. इतक्यात त्याला दाट झाडीत गंगेचे पाणी चमकत असलेले दिसले.

आपण फिरत फिरत बनारसला येऊन पोचलो आहोत, याची त्याला कल्पना नव्हती. समोरच्या काठावर शिवपुरी होती. तेथील मंदिरांचे कळस उन्हात चकाकत होते. शेकडो घंटा एकाच वेळी वाजत होत्या. वातावरणात अगरबत्तीचा सुगंध दरवळत होता. काशी—अनादी व अनंत काळाची नगरी!

तो झाडांच्या सावल्यांतून दिवसभर निरुद्देश फिरत राहिला. आता त्याच्या पायांत शक्ती नव्हती. तो भयंकर थकला होता. जेथे अरण्य संपत होते तेथे विणकरांची वस्ती होती. तो मरगळलेल्या पावलांनी एका झोपडीकडे वळला.

त्याला मान खाली घालून चालताना एका गवळ्याने पाहिले. तो म्हणाला, "भैया, तू फार दुरून आला असावास असं दिसतंय. तुझ्या पावलांना माती किती लागलीय!"

"होय!" तो उत्तरला, "मी खूप लांबून आलोय."

"चल ये. थोडा वेळ विश्रांती घे. सातूचं पीठ खा." असे म्हणून तो गवळी त्याला एक झोपडीत घेऊन गेला. "तुझ्या कपड्यांवरून तर तू मोठा श्रीमंत असावास असं वाटतंय. असा कशासाठी भटकतो आहेस? तू सुल्तानाचा माणूस आहेस काय?"

"मी कुठल्याही सुल्तानाचा माणूस नाही."

तो वहाणा काढून झोपडीत बसला आणि आजूबाजूला पाहू लागला.

"सखी चंपावती," तो मनाशी म्हणाला, "तुझी अट पूर्ण झाली. तू म्हणाली होतीस की, 'तू आपली तल्वार फेकून देशील तर मी तुला माझ्याबरोबर काशीला घेऊन जाईन.' मी माझी तलवार नदीला अर्पण केली आणि आता मी काशीत आलो आहे. पण तू कुठं आहेस?"

समोरून साधूंचा एक जमाव जात होता. बरेचसे संन्यासी कानांत कुंडले घालून, हातात त्रिशूळ घेऊन घाटाकडे चालले होते. विणकर, गवळी व गरीब लोकांचा एक समुदाय चिपळ्या वाजवीत, भजन गात त्यांच्याबरोबर चालला होता.

चंपा म्हणाली होती, 'या लोकांची टिंगल करू नकोस. हे फार चांगले लोक आहेत. एके दिवशी हेच तुला सोबत करतील.'—त्याला आठवले.

तो हळूच त्या झोपडीतून बाहेर पडला आणि त्या लोकांमध्ये जाऊन मिसळला.

ते लोक आपल्या गुरूकडे चालले होते.

## ९

कबीरसाहेब सकाळच्या वेळी मागावर बसून कापड विणीत, त्या कापडाचा गठ्ठा करून पाठीवर घेत आणि बनारसच्या गल्लीबोळातून फिरून त्याची विक्री करीत. संध्याकाळी त्यांच्या घरासमोरच्या बकुळीच्या झाडाखाली खूप लोक जमत. एकताऱ्या गुणगुणू लागत, चिपळ्या वाजू लागत आणि भजने गायिली जात.

काशीचे पंडे आणि दिल्लीचे मौल्वी यांना कबीरसाहेबांनी माजविलेले हे खूळ पसंत नव्हते. परंतु त्यांचे काही चालत नव्हते. ते करणार तरी काय? सारा देश एका नव्या रंगात रंगून गेला होता. गेल्या तीनशे वर्षांपासून या भक्तिमार्गावरून एक सुंदर तांडा चालला होता. बादशाह, छत्रपती, राजेमहाराजे, मंत्री, सेनापती वगैरेंच्या दुनियेतून बाहेर पडलेल्या कमालाला असे दिसून आले की या दुसऱ्या दुनियेत मजूर व न्हावी, चांभार, शेतकरी व गरीब कारागीर वावरत होते. हा लोकशाही, प्रजासत्ताक भारत होता. या भारतावर या गोधडीवाल्यांची, या सूफींची व संतांची सत्ता होती. इस्लामचा समतेचा सिद्धांत हिंदू भक्तांना प्रभावित करीत होता. शांतताप्रिय सूफी या देशात इस्लामचा प्रचार करीत होते. येथे तलवारीला स्थानच कोठे होते?

हजारो वर्षांपासून छळणूक होत आलेले अस्पृश्य या सूफींच्या पायाशी बसून रामाचे नाव घेत होते. हे अगदी वेगळेच जग होते. येथे हिंदू-मुसलमानांचा प्रश्नच नव्हता. येथे प्रेमाचे साम्राज्य होते. मानवाचा शोध घेत भटकणाऱ्या कमालाला असे आढळून आले की या जगात लांडग्यांखेरीज माणसेही राहतात. ज्या गवळ्याने त्याला आपल्या झोपडीत नेऊन सातूचे पीठ खाऊ घातले होते तो त्याचा प्राण घेऊ इच्छीत नव्हता कारण त्याला कोणाचे राज्य बळकाविण्याची अभिलाषा नव्हती. त्याला दोन वेळा बाजरीची भाकरी मिळते आणि त्याबद्दल तो परमेश्वराला धन्यवाद देतो. त्याला देशांच्या राजकारणाशी काय करावयाचे आहे? हा जो शेतकरी त्याच्या समोर मजेत बांधावर बसून आपल्या लहान मुलीला बोरे खाऊ घालीत आहे त्याला उद्या दिल्लीत कोण राज्य करणार याची काय चिंता? सुलतान हुसेनाची राजवट असली तरी तो असाच नांगर चालवील आणि शेतसारा देईल; आणि सुलतान शिकंदर बादशाह झाला तरी तो हेच करील. या तुर्कांच्या आधी जेव्हा पृथ्वीराज होता तेव्हाही याचे बापजादे असेच वैशाखाच्या कडक उन्हात थकून जात होते. श्रावणात गाणी गात होते आणि दुष्काळ पडला की निमूटपणे मरून जात होते.

संध्याकाळ होऊ लागली होती. लोक कीर्तनासाठी गोळा होऊ लागले होते. कमाल उठला आणि जनसमुदायात जाऊन मिसळला.

बगदाद व जौनपूरचा अबुल मंसूर कमालुद्दीन, इतिहासज्ञ, संशोधक, राजनीतिज्ञ, सैनिक होता. सूफी तत्त्वज्ञान व अध्यात्म यांच्याशी त्याचा कधीच संबंध आलेला नव्हता. परंतु शेवटी तो काशीच्या पंचगंगा घाटावर जाऊन पोहोचला होता.

* * *

परंतु गंभीरपणे विचार करणाऱ्या तात्त्विक बुद्धीसमोर अनेक मूलभूत प्रश्न अजून शिल्लक होते. कबीर सांगत होते, "सुनो भाई साधो, हरीवर प्रेम करा. तुमची दुःखं आपोआप नाहीशी होतील."...दुःख सत्य आहे, दुःखाचे मूल्य सत्य आहे...! जहाजातील त्या सिद्धपुरुषाने त्याला हेच समजावून सांगण्याचा प्रयत्न केला होता. परंतु हा हरी कोण? किनारा कोठे आहे? तेथे पोहोचल्यानंतर काय मिळेल? खरी श्रद्धा म्हणजे काय? आणि ईश्वराची अराधना? प्रेम आणि वैराग्य यांच्या द्वारे कशाची प्राप्ती होते? मोक्ष म्हणजे काय? परंतु ज्ञानाचे क्षेत्र इतके विशाल आहे! आपण कोणत्या विचारप्रणालीचे अध्ययन प्रथम सुरू करावे? कर्म, ज्ञान व प्रेम—तीन्ही मार्ग त्याच्या समोर खुले होते. यांपैकी कोणत्या मार्गावरून आपण प्रथम प्रवास सुरू करावा? मुस्लिम 'विद्यापीठां'तून इस्लामी तत्त्वज्ञानाच्या समस्यांवर मोठमोठे

वादविवाद चालू होते. सूफी व सिद्धपुरुष (दरवेश) आपापली वर्तुळे तयार करून बसले होते; आणि खुदाच्या प्रीतीखातर उसासे टाकीत होते. गंगेच्या काठावरील आंबरायांमध्ये लपलेल्या मुस्लिम मठांमध्ये इहलोकापासून ब्रह्मलोकापर्यंतच्या साऱ्या आध्यात्मिक अवस्थांतून गेलेल्या अथवा गुरूच्या ध्यानात तल्लीन झालेल्या अल्लाच्या भक्तांना त्याने पाहिले. 'निर्वाण' व 'फ़ना' (मुक्ती) यांच्या शोधात योगी व सूफी दोघेही 'समाधी'त व 'मराकबा'मध्ये स्वतःला हरवून बसलेले त्याला दिसले. सूफींनी त्याला सांगितले, "अंतिम सत्य प्रकाश आहे. प्रकाश म्हणजे नूर... ! जो नूर नाही त्याला अस्तित्व नाही." काही दरवेशांनी त्याला सांगितले की, "अंतिम सत्य 'खयाल' (ध्यान) आहे." अल्लाचे जलाल (तेज), जमाल (सौंदर्य) व कमाल (पूर्णत्व) यांच्या संकीर्तनाचे स्वर या कुंजांमध्ये घुमत असलेले त्याला ऐकू आले. कारण हा हिंदुस्थान होता. हा फरीदुद्दीन अत्तार व हज्वेरी, शेख जलालुद्दीन तबरेझी व बहाउद्दीन झकरिया, जलालुद्दीन सुर्खपोश व मुईनुद्दीन चिश्ती, आणि कुतुबुद्दीन बख्तियार काकी यांचा देश होता. आणि या महात्म्यांच्या देशातही ज्याला आपले ईप्सित मिळणार नाही असा कोणता अभागी असेल?

एके दिवशी रात्री मठाच्या तटाला टेकून तो कित्येक तास विचार करीत बसला. आत प्रकाश होता. पंडित श्लोक म्हणत होते. तो मुसलमान असल्यामुळे त्याला या मठात जाण्याची परवानगी नव्हती. त्याला ते श्लोक मोठे विचित्र वाटले. जौनपूरचे सगळे मुस्लिम विद्वान आणि काशीचे पंडित एकमेकांसमोर ओळीत बसून दात विचकत आहेत असा त्याला भास झाला. त्याचे म्हणणे कुणीच ऐकत नव्हते. तो मठाच्या भिंतीला टेकून बसून राहिला.

"साहेब व मेहेरबान! साहेब व मेहेरबान!"

त्याने वळून पाहिले. रात्रीच्या वातावरणात कोरडेपणा येऊ लागला होता. जवळच पायऱ्यांवर काही पहाडी लोक येऊन बसले होते आणि ते एकतारीवर गात होते.

"साहेब व मेहेरबान! साहेब व मेहेरबान! साहेब..."

त्याने आळोखेपिळोखे दिले आणि तो उठून उभा राहिला. "कमालुद्दीन," तो स्वतःला उद्देशून म्हणाला, "कबीराचा 'साहेब' (परमेश्वर) तुला परत बोलावतो आहे, असं दिसतंय. तो साहेब अत्यंत कनवाळू आहे. दोन्ही मार्ग तू पाहिलेस. परंतु अजून प्रेमाचा मार्ग राहिलाय. कदाचित त्या मार्गानं जाऊन तू त्याच्यापर्यंत पोहोचशील. होय. अजून प्रेमाचा मार्ग बाकी आहे."

तो पुनः घाटाकडे गेला आणि गंगा नदी ओलांडून कबीराच्या कुंजात परत जाऊन पोहोचला.

दिवस चालले होते.

चंपाची आठवण आता एका अद्‌भुत स्वरूपात त्याच्या मनात ठाण मांडून बसली होती. हजरत अमीर खुसरो यांनी हजरत निजामुद्दीन अवलिया यांच्या निधनाची बातमी ऐकून रचलेला हा दोहा त्याला आठवला :

गोरी सोवै सेज पै, मुँह पै डारे केस।
चल खुसरो घर आपने, रैन भई चहुँ देस॥

[प्रियतमा पलंगावर झोपली आहे. तिचे केस तिच्या चेहऱ्यावर पसरले आहेत. खुसरो, आता सगळीकडे रात्र पसरली आहे. तू आपल्या घरी चल.]

प्रेमाच्या कसोटीला उतरणे म्हणजे काय हे त्याला माहीत नव्हते. प्रेमाच्या कसोटीला उतरण्याचा मार्ग त्याला चंपानेच दाखविला होता. गंगेबरोबर यमुना वाहाते तसा तो कबिरांबरोबर राहात होता. गंगेबरोबर वाहाणाऱ्या सरस्वतीप्रमाणे चंपा त्याच्याबरोबर राहात होती—ती बाह्य चक्षूंना दिसत नव्हती.

परंतु कबिरांचा हा सहवासही थोड्या दिवसांचाच ठरला. काशीच्या पंडितांनी व मौल्वींनी सुलतान शिकंदर लोदीकडे तक्रार केली की हा पथभ्रष्ट विणकर सामान्य जनतेची दिशाभूल करीत आहे.

दिल्लीच्या सुल्तानाने कबीरसाहेबांना असे सांगून पाठविले की पंडित व मौलवी यांच्या धर्मांधतेपासून सुरक्षित राहाण्यासाठी तुम्ही काशी सोडून दूर कोठे तरी निघून जा.

## १०

कबीरसाहेब बनारसहून निर्वासित झाले. कमालाने पुनः एकदा भटकंतीसाठी कंबर कसली आणि गंगेच्या घाटावर जाऊन बंगालकडे जाणाऱ्या नावेत तो बसला. गंगेच्या दुसऱ्या टोकाला, येथून शेकडो मैल दूर गौड देश होता. काही वर्षांपूर्वी त्या गौड देशात आपल्या सुल्तानाला एकाकी सोडून तो पळून आला होता.

काही आठवड्यांनंतर नाव पाटण्याला पोहोचली. पाटण्याला त्याला कळले की सुलतान हुसेन शर्की गौड देशाहून भागलपूरला आले होते आणि तेथे काही वर्षांपूर्वी तशा निर्वासित अवस्थेत ते देवाघरी गेले.

सुल्तान हुसेन शर्की यांनी संगीत जगतात एक नवीन परंपरा निर्माण केली होती.

त्यांनी लढाया केल्या, ते जंगलांतून वणवण फिरले आणि अखेर एके दिवशी या जगातून निघून गेले.

परंतु 'हुसैनी पिया'चे राज्य नश्वर होते. ते सुरांमध्ये बुडून जिवंत राहिले.

सुरांच्या लाटांवर तरंगत कमालाने आता नवनवीन जगांची सहल सुरू केली—जे सर्वांत आधी उत्पन्न झाले होते, ज्याला सूफी संत 'नवाए सरमदी' आणि भक्त कबीर 'अनहद नाद' (अनाहत नाद) म्हणत असत ते परम सत्याचे संगीत!

संगीताचे हे सारे विश्व आता कमालाचे स्वतःचे विश्व होते—जयदेव, विद्यापती व चंडीदास यांची भजने, कोळ्यांची व शेतकऱ्यांची गाणी. या विश्वात आक्रमणे, आकस्मिक हल्ले, राजकीय चढउतार, हद्दपारी, मृत्यू इत्यादींचे भय नव्हते. संगीतातील अद्वैत हे परमेश्वराचे अद्वैत होते.

बंगालला पोहोचल्यानंतर गंगेच्या एका घाटावर तो उतरला. त्या घाटाचे नाव त्याला माहीत नव्हते. तेथे विड्याच्या पानांच्या वेली आणि भाताची खाचरे सर्वत्र पसरलेली होती. तळ्यांतून निळी कमळे उमललेली होती. वडाच्या झाडाखाली कोणा मुस्लिम गुरूचा मठ होता. कमाल तेथेच राहू लागला.

कमाल बाउल लोकांबरोबर गावोगाव हिंडू लागला. हे बाउल एकतारीवर भक्तिगीते गात फिरत असत. नदीच्या लाटांवरून नाव वल्हवीत तो पूर्वेला चितगावच्या टेकड्यांपर्यंत जाऊन पोहोचला. यात्रेकरूंबरोबर तो चितगावच्या सीताकुंड या तीर्थस्थानी गेला. तेथे डोंगरात वाघ फिरत असत. तेथेच महाराणी सीतेचे देऊळ होते. डोंगरामध्ये लाल दगडांच्या तलावाच्या काठी मंदिरे होती आणि वटवृक्षांखाली मुलींचे घोळके बसले होते.

आता तो एक नवीन भाषा शिकत होता. ही बंगाली भाषा होती. अवध आणि बिहार येथील बोलभाषांहून ती फारशी भिन्न नव्हती. ती संस्कृतला अधिक जवळची होती आणि देशातील इतर नवीन भाषांप्रमाणे खूप झपाट्याने विकसित होत होती.

बंगाली अत्यंत मधुर भाषा होती. तो आता तिला आपली भाषा समजू लागला. त्याच भाषेत तो बोले, विचार करी व लिखाण करीत असे. एके काळी जौनपूरच्या दरबारातील एक सरदार म्हणून आपण येथे आलो होतो, याचा विसर त्याला पडला नव्हता.

परंतु जग मात्र जौनपूरच्या अबुल मंसूर कमालुद्दीनाला पार विसरून गेले होते. ज्याच्या डोक्याचे केस कानशिलांवर पांढुरके होऊ लागले आहेत, जो चाफ्याच्या झाडाखाली बसून एका मुसलमान फकिराकडून कंचनमालेची कहाणी ऐकतो आहे, किंवा एकतारीवर कबिराचे एखादे भजन गात आहे, अथवा कागद-लेखणी घेऊन बंगाली भाषेत एखादे लोकगीत किंवा कथा लिहिण्यात मग्न आहे असा हा देखणा

तरुण कोण आहे याची कोणालाच माहिती नव्हती. तो बंगाली भाषा फारसी लिपीत लिहीत असे. आपण आणि आपल्यासारख्या शेकडो मुसलमान कवींनी फारसी लिपीत लिहिलेले साहित्य शेकडो वर्षांनंतर बंगालचे अमूल्य 'पुथी' साहित्य व लोकसाहित्य समजले जाईल याची त्याला मुळीच कल्पना नव्हती.

असाच फिरत-फिरत तो सोनारगाव येथे पोहोचला. तेथे त्याने लग्न केले. त्या तरुणीचे नाव सुजाता असे होते. ती जातीने शूद्र होती. एके दिवशी ती तळ्याच्या काठी घागर घेऊन आली असता तिचे लांबसडक काळेभोर केस व काळेभोर डोळे पाहून तो तिच्यावर भाळला. त्याचे वय व त्याची बौद्धिक प्रौढता लक्षात घेता तो लग्न करण्याच्या अवस्थेत नव्हता. परंतु आत्मा आणि हृदय यांच्या अनेक जगतांतून प्रवास केल्यानंतर त्याला असे आढळून आले होते की जीवनात जे काही श्रेयस्कर आहे ते म्हणजे शांती होय—जेथे प्रचंड वादळांना व वावटळींना मुळीच स्थान नसेल अशी शांतता. ही मनःशांती त्याला त्या साध्याभोळ्या अशिक्षित खेडवळ तरुणीशी लग्न करून लाभली. जणू तेच त्याचे मुक्कामाचे स्थान होते.

आता सुजाता ही त्याची पत्नी होती. शूद्र असण्यात काय दोष आहे, हेच कमालाला समजत नव्हते. त्याने सुजाताचे नाव आमिना बीबी असे ठेवले; आणि तो तिच्या-बरोबर एका सुंदर बांबूच्या झोपडीत राहू लागला.

उदरनिर्वाहासाठी तो शेती करी. शेतात त्याने भात पेरले होते. त्याच्या झोपडीच्या समोर एक लहानसे तळे होते. जेव्हा आकाशात इंद्रधनुष्य दिसू लागे आणि जुईच्या फुलांवर भुंगे गुणगुणू लागत तेव्हा तो आपल्या लहानशा झोपडीच्या ओसरीत आपल्या गीतकार मित्रांबरोबर बसून आनंदलहरी वाजवी. आमिना आपल्या लचकदार अंगावर गडद अस्मानी किंवा हिरव्या रंगाची साडी परिधान करून, कमरेवर घागर घेऊन तळ्याकडे जात असलेली दिसे.

काळ चालला होता. बंगालचे सुलतान नेहमी आपसात लढाया करीत असत. परंतु आता त्याच बंगालने काही काळापासून शांत, निश्चित जीवन घालविण्यास सुरुवात केली होती. गौड देशाच्या गादीवर सैयदुस्सादात अलाउद्दीन अबुल मुझफ्फर हुसैन शाह विराजमान झालेला होता. त्याच्या अमदानीत दुधा-तुपाच्या नद्या वाहात होत्या, लुटालूट व रक्तपात थांबले होते. बंगालच्या या थोर बादशाहाच्या राजवटीत विद्यापती ठाकुर आणि चैतन्य महाप्रभू, श्रीकृष्णप्रेमाची सुरेल गाणी गात होते. राज महालाच्या डोंगरांतून मोठमोठे दगड वाहून आणून नवनवीन सुंदर इमारती उभारल्या जात होत्या. दरबारामध्ये साहित्यिक वादविवाद व ज्ञानचर्चा यांचे सत्र सदैव चालू असे.

आणखी काही वर्षे लोटली. कमालाची मुले आता मोठी झाली होती. त्याने आपल्या

मुलांची नावे जमाल व जलाल अशी ठेवली होती. त्याच्या मुलीचे नाव सकीना बीबी असे होते. आपल्या मुलांकडे पाहून तो आनंदाने कालक्रमण करीत होता. त्याचे दोन्ही मुलगे स्थापत्यकलेत निष्णात होते आणि गौड व सोनारगाव येथील इमारतींच्या निर्मितीत गढून गेले होते. कमालाच्या पत्नीचे निधन झाले होते. त्याने आमिनाचे दफन आपल्या हातांनी त्याच तलावाच्या काठी केले होते. आता त्याचे केस पांढरे झाले होते. अजूनही तो दिवसभर ओसरीवर बसून 'मुर्शिदी गीते' लिहीत व गात असे. बंगालच्या सुल्तानांच्या आश्रयाने लोकसाहित्य, लोकसंगीत व नवी बंगाली भाषा ही झपाट्याने प्रगती करीत होती. कमालाचे मुलगे गौडाहून आपल्या गावी येत तेव्हा त्याला देशातील राजकारणासंबंधीच्या बातम्या सांगत. परंतु त्या बातम्या आता त्याला जणू कोणत्या तरी दुसऱ्याच ग्रहगोलावरील घटनांसंबंधी असल्यासारख्या वाटत.

अबुल मंसूर कमालुद्दीन बंगालचा रहिवासी होता, बंगाली होता. त्यामुळे तिकडे दूर पश्चिमेला दिल्लीत पुनः एकदा सत्तेचा खांदेपालट झाला, सुल्तान इब्राहीम लोदीचा पराभव होऊन जहीरुद्दीन बाबर विजयी झाला आणि पृथ्वीचे ओझे आपल्या शिंगावर उचलून धरणाऱ्या गायीने आपले शिंग बदलले वगैरे खळबळजनक बातम्या आपला थोरला मुलगा जमाल याच्या तोंडून ऐकल्यावरही त्याला मुळीच आश्चर्य वाटले नाही. त्याचा धाकटा मुलगा जलाल याने जेव्हा त्याला असे सांगितले की, "मोंगलांसाठी भवन निर्माण करण्याकरिता दिल्लीला जाणार आहे," तेव्हाही तो काही बोलला नाही. त्याने सारे जग पालथे घालून आपल्या अंतिम मुक्कामाचे स्थान शोधून काढले होते. आता त्याच्या मुलांसमोर नवे जग पसरले होते. तेही आपले ध्येय-स्थान स्वतःच शोधून काढतील.

परंतु आता शांततेचा काळ संपत आला होता. बंगालवर सैयद अलाउद्दीन हुसेन शाह याचा मुलगा नासिरुद्दीन शाह याचे राज्य होते. कालपर्यंत दिल्लीच्या गादीवर असलेले अफगाण लोक मोंगलांकडून पराभूत होऊन आज निर्वासित व शरणार्थी होऊन गौड व लखनवती यांच्या गल्लयाबोळातून वणवण फिरत होते—जसे एके काळी जौनपूरचे सत्ताधीश याच अफगाणांकडून मार खाऊन येथे आश्रय घेण्यासाठी आले होते तसे! कमालाला हे अफगाण जागोजागी भेटत. गौडाच्या बाजारपेठेत रस्त्याने जाणाऱ्या लोकांना थांबवून ते आपल्या लुटल्या गेलेल्या वैभवाच्या व शौर्याच्या हकीगती सांगत. गौडाच्या रस्त्यावर कमालाला एके दिवशी एक पोर्तुगीजही दिसला. तो मोठ्या ऐटीत एका बाजूने चालला होता. कमाल आपल्या हातातील काठीचा आधार घेऊन आश्चर्याने त्याला पाहात राहिला. यावेळी पोर्तुगीजांच्या जहाजांचा एक तांडा चितगावच्या बंदरात उभा होता आणि हे लोक गौडातही आपले अस्तित्व जाणवून देऊ लागले होते.

काळ झपाट्याने निघून चालला होता. गौडाची राजकीय परिस्थिती खालावू लागली.

आता तेथे नासिरुद्दीन याचा भाऊ गियासुद्दीन गादीवर होता.

एके दिवशी कमालाने असे ऐकले की बिहारच्या शेरखानाने गियासुद्दीनाकडून बंगालचे राज्य हिसकावून घेतले आहे. त्यानंतर असे समजले की दिल्लीचा सम्राट हुमायून व शेरखान यांच्यात मोठे घनघोर युद्ध झाले. हिरव्यागार टवटवीत बंगालमध्ये अशांतता वाढू लागली. शेरखान पुनः गर्जना करीत आला आणि दिल्लीच्या मोंगलांना दिल्लीकडे परत पिटाळून त्याने बंगालवर पुनः आपले आधिपत्य प्रस्थापित केले. हुमायून व शेरखान यांच्या सैन्यांमध्ये मोठे भयंकर युद्ध झाले. याच लढाईत गौडाच्या रस्त्यांतून लढतालढता जमाल मारला गेला. एके दिवशी रात्री शेरखानाच्या सैनिकांनी कमालाच्या गावालाही वेढा घातला. शिपाई लूटमार करीत कमालाच्या झोपडीपर्यंत येऊन पोहोचले. "बाहेर नीघ!" ते ओरडले, "तू सर्वांत जास्त उपद्रवी आहेस. तुझा काही भरवसा नाही. तुझी मुलं दिल्लीला जाऊन मोंगलांना मिळाली आहेत. तू देशद्रोही आहेस. अरे, तो गीत रचणारा अबुल मंसूर इथंच राहातो ना? अरे बुड्ढ्या, चल नीघ बाहेर!" कमाल थरथरत्या हातांत दिवा घेऊन बाहेर आला आणि आश्चर्याने सैनिकांकडे पाहू लागला. ते आरडाओरडा करीत त्याच्या अंगावर धावले. कमाल दृढनिश्चयाने दरवाजाची चौकट धरून त्यांच्यासमोर ठामपणे उभा राहिला. तो फारच म्हातारा झाला होता. त्याचे हात थरथर कापत होते. तरीपण तो भक्कमपणे उभा राहिला. त्याच्याजवळ स्वतःचे संरक्षण करण्यासाठी तलवारही नव्हती. त्याने कुणाचे काय घोडे मारले होते? अफगाण आणि मोंगल यांच्या भांडणात त्याला मुळीच रस नव्हता. आपल्याला येथे शांतपणे राहू दिले जावे, येवढीच त्याची इच्छा होती. तो त्याचा देश होता, त्याची मातृभूमी होती. तेथे त्याच्या मुलांचा जन्म झाला होता. तेथे त्याच्या पत्नीची कबर होती. तेथे त्याची हिरवीगार शेते होती. त्याने तेथील भाषेला आपल्या हृदयातील रक्त दिले होते. त्याने गीते रचली होती. "मी इथंच राहाणार! मला देशद्रोही म्हणण्याचा कोणालाही हक्क नाही. हे 'दारुलहर्ब' (युद्धनिकेतन) नसून 'दारुस्सलाम' (शांतिनिकेतन) आहे." त्या समयी अचानक त्याला समजले की दारुलहर्ब आणि दारुस्सलाम यांत काही अंतर नाही. फक्त दृष्टिकोणाचा फरक आहे. लढाया दोन धर्मांमध्ये होत नसतात तर दोन राजकीय शक्तींमध्ये होत असतात.

सहसरामचा शेरखान आणि दिल्लीचा हुमायून बादशाह दोघेही इस्लामची काव्ये वाचतात. परंतु एकाने येऊन दुसऱ्याचा निकाल लावला. दारुस्सलाममध्ये पापाचार चालत असेल तर त्याचेही दारुलहर्ब होऊ शकते.

शेरखानाच्या सैन्यातील निर्बुद्ध सैनिकांना हे सारे कसे कळणार? त्यांनी जोराने कमालाला धक्का मारून खाली पाडले आणि ते हुल्लड करीत पुढे गेले.

कमाल आपल्या घराच्या दरवाजात पालथा पडला. त्याच्या तोंडातून रक्ताचा पाट वाहू लागला. काही तासपर्यंत त्याच अवस्थेत कण्हत राहिल्यानंतर तो अगदी मृतवत झाला.

* * *

हिंदुस्थानावर आता मोंगल बादशाहांचे राज्य आहे. जुनी राज्यव्यवस्था बदलली आहे. गौड, लखनवती व पाटणा यांचे वैभव लयाला गेले आहे. तुर्कांची दिल्लीही आता समाप्त झाली आहे. दिल्ली आता मोंगलांची आहे. एके काळी ज्याला इंद्रप्रस्थ म्हणत असत व अलीकडे ज्याला दिल्ली म्हणतात त्या शहराचे नाव आता तुगलकाबाद झाले आहे. आज तेथे पराक्रमी तैमूरियांची भव्य राजधानी शाहजहानाबाद आहे.

परंतु तो शेतकरी अजून तसाच आहे. तो दिवसभर गुडघाभर पाण्यात उभा राहून भाताची लावणी करीत आहे. तो आपली बैलजोडी घेऊन मेघना नदीच्या काठाने जात आहे. तो भागीरथीच्या लाटांवरून आपली नाव वल्हवीत गीत गात एका गावाहून दुसऱ्या गावाला जात आहे. तो मुर्शिद (मुस्लिम गुरू) आणि भगत यांच्या पायांशी बसून भजने व सूफी भक्तिगीते गात आहे.

बंगालचा शेतकरी अबुल मंसूर कमालुद्दीन जिवंत आहे आणि तो जिवंत राहाणार आहे. तो आपल्या लहानशा होडीत बसून पद्मा नदीच्या खवळलेल्या लाटांशी सामना देत आहे. नौका पद्मा नदीच्या लाटांवर डोलत चालली आहे. पुढे दाट काळोख पसरला आहे. वादळे घोंगावत आहेत. अंधारात दडलेल्या लाटांमध्ये मगरी सुसरी आ वासून बसल्या आहेत, खूप सोसाट्याचा वारा सुटला आहे. परंतु पद्मा नदीच्या या म्हाताऱ्या, उपासमारीने खंगलेल्या नावाड्याची होडी अगदी सहजपणे वादळाला तोंड देत आहे. कारण वादळाचे क्रौर्य आणि मृत्यू यांच्याशी त्याची फार जुनी दोस्ती आहे.

अखेर जेव्हा वाऱ्याचा जोर खूप वाढला आणि नाव वारंवार झोकांडया खाऊ लागली तेव्हा सिरिलने कंदील उचलून भीतीने चोहोंकडे नजर फिरविली. "पीटर, आपण वादळात तर सापडलो नाही ना ?" त्याने घाबरून विचारले.

"नाही रे, हा तर नेहमीचाच वारा आहे. घाबरू नकोस." पीटरने उत्तर दिले, "पण जरा त्या काळ्या डुकराला सांग की आपलं ते भसाडं गाणं गाण्याऐवजी त्यानं सुकाणूकडे जास्त लक्ष द्यावं. नाहीतर या गतीनं आपण सकाळपर्यंतही घाटाला लागणार नाही."

"अरे झोपलास काय ? बुढ्ढा कुत्ता !" सिरिलने चटईच्या छपरावरून दुसऱ्या बाजूला वाकून पाहात म्हटले. नावाड्याने मान वर करून त्याच्याकडे पाहिले आणि तो थंडपणे सुकाणू चालवीत राहिला.

"हे अगदी नीच लोक आहेत. जोपर्यंत तुम्ही त्यांना हंटर लगावणार नाही तोपर्यंत ते हालचाल करणार नाहीत." पीटर म्हणाला. सिलने दुरूनच आपली चांदीची मूठ असलेली छडी म्हाताऱ्याच्या कमरेत खुपसली.

"काय रे, तुझं नाव काय?"

"अबुल मंसूर, साहेब!"

"हे पाहा अबुल मंसूर, तू जरा जोर लावून वल्ही मार, नाहीतर या हंटरानं तुला फोडून काढीन, समजलास?" सिल म्हणाला.

"जी साहेब!" असे म्हणून तो पुनः सुकाणूवर वाकला. नाव चालत होती. दोन्ही काठांवर अननसाची शेते आणि केळ्यांच्या बागा होत्या. दूरवर असलेल्या गावांतून दिवे लुकलुकत होते. सिलने होडीत डोकावून पाहिले. तेथे अबुल मंसूरचा मातीचा दिवा, चटई, नमाज पढण्याची सतरंजी आणि दोन काशाची भांडी होती. भिंतीवर नारळाची गुडगुडी टांगलेली होती. त्या म्हाताऱ्या, शुभ्र दाढीवाल्या नावाड्याची येवढीच काय ती मालमत्ता होती. पद्मा नदीच्या वादळी लाटांवर ती झोके खात होती. सिलला मोठे आश्चर्य वाटले. त्याने डोळे चोळून पुनः पाहिले. आपल्याला जे दिसत आहे ते खरोखरीच तसे आहे याविषयी त्याने स्वतःची खात्री करून घेतली. दैवाचा फासा अनपेक्षितपणे उलटासुलटा पडल्यामुळे केंब्रिजच्या वातावरणातून आपल्याला या विचित्र अद्‌भुत व सुंदर देशात, 'इंडिया' नावाच्या देशात आणि त्या देशातील 'बंगाल' नावाच्या प्रांतात यावे लागले आणि यावेळी आपण या नौकेत आहोत या वस्तुस्थितीविषयी त्याच्या मनात काही शंका उरली नाही.

कंदील उचलून त्याने पुनः एकदा चोहोकडे दृष्टी फिरविली. त्या प्रकाशाने नदीच्या लाटांवर एक रस्ता निर्माण केला. जवळून एक मोठे शंपान (होडके) पसार झाले. वेताऱ्या वनामागून आळसावलेला चंद्र हळूहळू वर येत होता.

## ११

सिल हार्वर्ड ॲश्ले केंब्रिजच्या क्वीन्स कॉलेजातून बी. ए. झाला त्यावेळी त्याचे वय फक्त वीस वर्षांचे होते. त्याचा बाप एक दरिद्री पाद्री होता आणि सिल मोठ्या मुष्किलीने आपल्या गावच्या जमीनदाराच्या मदतीने केंब्रिजमध्ये जाऊ शकला होता. पदवी मिळाल्यानंतर तो लंडनला येऊन मिडल टेंपलमध्ये वकिलीच्या अभ्यासासाठी

प्रविष्ट झाला होता. तेथून जवळच फ्लीट स्ट्रीट होता. तेथील कॉफीगृहात लेखक आणि पत्रकार जमून जगातल्या घटनांविषयी गप्पागोष्टी करीत असत. क्लिवदेखील अनेकदा आपल्या सहकाऱ्यांबरोबर त्या गप्पांमध्ये सामील होई. तेथे एके दिवशी पीटर जॅक्सनशी क्लिवची भेट झाली. हा पीटर हिंदुस्थानात व्यापार करीत होता आणि सध्या इंग्लंडला आला होता. तो जोरजोराने हिंदुस्थानची माहिती सांगू लागला. बंगालमध्ये निळीच्या व्यापारात आपल्याला किती हजार पौंडांचा नफा झाला, नेटिव्ह लोक किती मूर्ख असतात, त्यांचे राज्यकर्ते आणि अमीरउमराव किती संपन्न असतात, कलकत्ता हे किती मजेदार शहर आहे वगैरे गोष्टी सांगून तो म्हणाला, "तू इथं काय करतोस? हिंदुस्तानात चल. तू समजूतदार दिसतोस. जरा डोकं वापरशील तर चार दिवसांत तिथं तू सोन्याचे महाल उभे करशील...काय म्हणालास? तू कविता करू इच्छितोस? नाटकं लिहिणार आहेस? वकिलीचा व्यवसाय मोठा प्रतिष्ठित आहे? नॉन्सेन्स!" आणि त्यानंतर पीटर काही दिवसांनी त्याला शहरातील आपल्या चुलत्याकडे घेऊन गेला. त्याचा हा चुलता ईस्ट इंडिया कंपनीचा एक डायरेक्टर होता.

क्लिवला कलकत्त्यात नोकरी मिळाली. एके दिवशी तो टिलबरीहून एका 'इंडियामॅन' जहाजात बसला आणि डोंगरचे पांढरे खडक त्याच्या नजरेआड होऊ लागले तेव्हा आपण इंग्लंड सोडून चाललो असल्याचे त्याच्या लक्षात आले. ज्या इंग्लंडला, कॅंट भागात त्याचे गाव होते, जेथे कॅम नदी वाहात होती, जेथे गोल्डस्मिथ, कूपर, ग्रे आणि बर्क यांचा जन्म झाला होता, जेथे होगार्थ, गॅन्झबरो व रेनाल्ड्स यांनी चित्रे काढली होती, जेथे शांतता व संपूर्ण सौंदर्य नांदत होते, असा इंग्लंड देश सोडून तो चालला होता. बंगाल, कॅनडा व दक्षिण अमेरिका येथून येणाऱ्या संपत्तीने या देशाला संपन्न बनविले होते. मोठमोठ्या हवेल्या निर्माण होत होत्या. गरीब श्रीमंत झाले होते; आणि श्रीमंत हिऱ्या-मोत्यांमध्ये लोळत होते. सर्वत्र एकच जप चालू होता : धन! पैसा! संपत्ती! क्लिव हा साहित्याचा विद्यार्थी होता. त्याला संपत्तीचे काही आकर्षण नव्हते. परंतु तो सुद्धा या संपत्तीच्या ध्यासाने वेडावून भारताला चालला होता. तो दरिद्री विद्यार्थी बंगालला जाऊन श्रीमंत होणार होता. लंडनमध्ये त्याचाही एक महाल उभा राहील. किंवा कुणी सांगावे, एखाद्या असभ्य, रानटी हिंदी सरदाराशी लढता लढता तो मारला जाईल आणि मद्रास किंवा म्हैसूर येथे त्याची कबर बांधली जाईल व त्या कबरीवर त्याचे नावही नसेल.

त्याने एक दीर्घ उसासा सोडला व तो डेकवरून बाजूला झाला. समुद्र भयंकर खवळलेला होता. जगामध्ये यावेळी काय काय चालले होते आणि तो स्वतः वस्तुतः किती तुच्छ होता! त्या जहाजावर किती नाना प्रकारचे उतारू होते आणि कसल्या कसल्या अभिलाषा

व योजना उराशी बाळगून त्या काळोखातून एका अपरिचित मुक्कामाकडे ते चालले होते! या सगळ्यांचा शेवट काय होणार? कंपनीचे व्यापारी, मद्रासचा सरन्यायाधीश, उच्च घराण्यातील काही अविवाहित मुली—हिंदुस्थानात आपल्याला चांगले नवरे मिळतील या स्वाभाविक आशेने त्या चालल्या होत्या! जेवणाऱ्या टेबलावर जहाजाचा कप्तान, हैदर अलीच्या युद्धाच्या हकीगती सांगे. पाटणा आणि ढाका (डाक्का) येथील निळीचे व्यापारी अष्टौप्रहर आपल्या धंद्याच्या गोष्टीत निमग्न असत. सगळेजण सारखे 'मडीरा' (मद्य) पीत असत. केंब्रिजच्या क्वीन्स कॉलेजच्या शांत क्वाड्रँगलहून निघाल्या-नंतर जग म्हणजे वस्तुतः काय आहे हे क्लिव्हला आता पाहावयास मिळाले.

आता जहाज मादागास्करजवळून चालले होते. ही 'पूर्व' होती. काळ्या गुलामांची मातृभूमी. ही पूर्व क्लिव्हची प्रतीक्षा करीत होती. चीन, हिंदुस्थान, इराण, ईजिप्त, सगळे जण मोठमोठ्याने ओरडून त्याला बोलावीत होते. "अरे भाई क्लिव्ह, ये! आम्ही तुझ्या स्वागताची जय्यत तयारी केली आहे. बायबल, बंदूक व तलवार घेऊन ये आणि आमची कातडी सोलून काढ." कानपूर व ढाका येथील अनुभवी वस्तादांनी त्याला सांगितले, "जरा हुशारीनं वागलास तर हां हां म्हणता लक्षाधीश होशील."

"हा सिराजुद्दौला कोण होता?" क्लिव्हने पीटर जॅक्सनला विचारले.

"सिराजुद्दौला!" पीटर नाक मुरडून म्हणाला, "मी तुला त्याची सगळी माहिती तपशीलवारपणे सांगेन. मी कासिमबाजारला राहिलो आहे. महाभयंकर माणूस होता तो. जुलमी व धोकेबाज, खोटारडा. परंतु आमच्याशी एकनिष्ठ असणारे मित्रही तिथं आहेत. उदाहरणार्थ सध्याचा अवधचा नबाब."

पीटर जॅक्सनने क्लिव्हला फैजाबाद व लखनौ या शहरासंबंधीच्या ऐकीव हकीगती सांगण्यास सुरुवात केली. त्यानंतर म्हैसूर व अर्काट येथील सुलतान व नबाब यांची माहिती सांगितली. मुंबईला पोहोचेपर्यंत क्लिव्ह गेल्या दोनशे वर्षांतील घटना आणि हिंदुस्थानचा सारा इतिहास यांच्या बाबतीत अगदी पंडित झाला होता. हिंदूंची पाशवी वृत्ति—लाल जीभ असणाऱ्या एका मूर्तीची ते पूजा करतात, विधवांना आगीत जिवंत जाळतात, अनवाणी चालतात, गायी, वानरे व साप यांना देव मानतात! मुसलमानांचे अत्याचार—बायकांना पडद्यात ठेवून गुदमरवून टाकतात, पंधरा पंधरा बायका करतात, अत्यंत घमेंडखोर, तापट व अकडबाज! सारांश, पीटर जॅक्सनने त्याला जे काही सांगितले ते बरेच अस्वस्थ करून सोडणारे होते. तरीपण वस्तुस्थिती कशी झाकता येणार? एक गोष्ट निर्विवाद होती की, नेटिव्ह लोक नीच जातीचे होते. ती माणसे अवनतीच्या गर्तेत पडलेली असल्यामुळे त्यांचे मेंदूही पतित अवस्थेत होते. बंगालमध्ये एक रॉयल एशियाटिक सोसायटी स्थापन करण्यात आली आहे. ती, कोण

जाणे कुठल्या जमान्यातील, निरर्थक गोष्टी उकरून काढीत असते—संस्कृत, फलाणे आणि अमुकतमुक! जुन्या मृत भाषा. त्यात जादूटोण्याचे मंत्र लिहिलेले असतात म्हणे. ते सारे पाहून आमचे काही संशोधक असे म्हणू लागले आहेत की हिंदी लोकही एके काळी सुधारलेले होते. पीटर बोलावयाचा थांबला.

समोर मुंबईचा किनारा दिसू लागला होता.

हिंदुस्तान!

जहाजाने बंदरात नांगर टाकला. उतारू जहाजावरून किनाऱ्यावर आले. दीडशे वर्षांपूर्वीपर्यंत सुरतेच्या बंदरात मोंगल जकात अधिकारी युरोपीय लोकांच्या तोंडचे पाणी पळवीत असत. पण आता आपले राज्य होते. स्मिलचे सारे सहप्रवासी मजेत शीळ घालीत जहाजातून खाली उतरले. अनेक काळे आदमी त्यांच्याभोवती गोळा झाले आणि धावपळ करीत ते त्यांचे सामान उतरवू लागले. प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटची पालखी पीटरच्या स्वागतासाठी आली होती. स्मिल त्याच्याबरोबर पालखीत बसून मलबार हिलकडे गेला.

नुकतीच पावसाची एक सर येऊन गेली होती. इंग्रजांच्या बंगल्यांच्या कौलारू छपरांवर रंगीबेरंगी फुलांच्या वेली पसरल्या होत्या. पीटर व स्मिल ज्याचे पाहुणे होते तो गृहस्थ त्यांचे स्वागत करण्यासाठी फाटकापर्यंत आला. नंतर त्यांनी लाकडी खांब असलेल्या व्हरांड्यात बसून चहा घेतला. चहापानानंतर स्मिल आपल्या खोलीच्या खिडकीतून समुद्राचे दृश्य पाहू लागला. एका कोपऱ्यात हबशी गुलाम पोरगा त्याच्या बुटांना भरभर पॉलिश करीत होता. हा पोरगा इतर गुलामांबरोबर मादागास्करहून आयात करण्यात आलेला होता. तो खोलीत असेपर्यंत स्मिल अत्यंत अस्वस्थ होता.

एके दिवशी रात्री जेवणाच्या प्रसंगी स्मिलची दोन पारश्यांशी ओळख करून देण्यात आली. ते दोघेही जहाजे तयार करणाऱ्या कारखान्याचे मालक होते आणि फाडफाड इंग्रजी बोलत होते. स्मिल आश्चर्यचकित होऊन विचार करू लागला, "किती विविध प्रकारचे लोक या देशात आहेत!"

काही दिवसांनंतर तो पीटर जॅक्सनबरोबर फॅक्टरी पाहाण्यासाठी सुरतेला गेला. सुरत! मोंगलांचे बंदर. शंभर वर्षांपूर्वी याची लोकसंख्या लंडन व पॅरिस या शहरांच्या लोकसंख्येपेक्षाही अधिक होती. तेथून मुंबईला परत आल्यानंतर स्मिल मुंबईहून मद्रासला जाणाऱ्या जहाजाची प्रतीक्षा करीत राहिला. पीटर जॅक्सन सध्या मुंबईतच राहाणार होता. यापुढील प्रवास स्मिलला एकट्यानेच करावयाचा होता. एव्हाना तो भारताच्या वातावरणाशी बराच परिचित झाला होता.

जहाजाने नांगर उचलला आणि कोरोमंडलच्या किनाऱ्याने ते चालू लागले. पॉंडिचेरीत अनेक फ्रेंच लोक जहाजावर आले. ते दुसऱ्या जहाजाने फ्रान्सला चालले होते.

त्यामध्ये सोरबोनचा एक फ्रेंच विद्यार्थीही होता. सिलशी त्याची लगेच गट्टी जमली. तो आपल्या आईबापांना भेटण्यासाठी हिंदुस्थानात आला होता आणि आता परत चालला होता. वारंवार खांदे उडवीत बोलण्याची त्याला सवय होती. पॅरिसच्या गोष्टी, विद्यापीठाच्या व क्रांतीच्या गोष्टी तो सांगत होता. स्वातंत्र्य, समता व बंधुता झिंदाबाद!! फ्रान्स झिंदाबाद!!! लहान मुलांसारखा जोरजोरात घोषणा देत तो जहाजातून उतरून नावेत बसला आणि पाहाता पाहाता नजरेआड झाला. त्याचे नाव काय होते कोण जाणे! या क्रांतीच्या रणधुमाळीत त्याचे काय होईल हेही कोणाला सांगता येत नव्हते. सर्वत्र रक्तपात व युद्ध यांचे साम्राज्य होते—बंगालमध्ये, दक्षिण भारतात. युरोपात नेपोलियनने धुमाकूळ घातला होता. सारा युरोप पेटला होता. यानंतरही तो अनेकदा असाच पेटेल आणि त्या दंगलीत केंब्रिज व सोरबोन विद्यापीठांतील विद्यार्थी वावटळीतील पाचोळ्याप्रमाणे कुठल्याकुठे उडून जातील. असेच नेहमी होत राहाणार.

आणि तो, सिल हॉवर्ड ॲश्ले, बंगालच्या खाडीतून प्रवास करीत चालला आहे चोहोकडे मृत्यू आ वासून उभा आहे. समोर म्हैसुरी आहेत, मराठे आहेत. उत्तरेकडे लांबलचक दाढया असणारे आणि घेरेदार सुरवारी घालणारे अफगाण व शीख, तलवारी परजत आहेत. सर्वत्र माथेफिरूपणाचा व विनाशाचा नंगा नाच चालू आहे. दिल्लीत दुःख आहे, फैजाबादेत दुःख आहे, मुर्शिदाबादेत दुःख आहे. हे सारे सिलला माहीत नाही. त्याला हेही ठाऊक नाही की दिल्लीत दुसरा शाह आलम यावेळी चंदाबाईचा नाच पाहाण्यात तल्लीन आहे...आणि मग मद्रास दिसू लागले.

* * *

मद्रासमध्ये जहाज पाचसहा दिवस थांबले. सिलने अर्काटच्या नबाबाचा भव्य राजवाडा पाहिला. सेंट टॉमस रोडवरील इंग्रजांच्या दुकानांवरून नजर फिरविली. एके दिवशी तो फिरतफिरत युरेशियन लोकांची वस्ती असलेल्या भागात गेला.

तेथे त्याला एका घराच्या पायऱ्यांवर एक तरुण मुलगी दिसली. ती मिश्रवंशाची सुंदर तरुणी होती. त्याला पाहून तिने उदासवाणे स्मित केले आणि ती आत निघून गेली. एक काळीसावळी स्त्री कडेवर मूल घेऊन बाहेर आली आणि दारात बसून तांदूळडाळ निवडू लागली. सिलला पाहून तीनचार मुले बाहेर आली नंतर त्यांचा बापही आला. तो एक गरीब युरेशियन होता. सिल त्यांच्याकडे कुतूहलाने पाहू लागला. "आत या ना!" एक मुलगा म्हणाला. एक गोरा साहेब या बाजूला कसा काय फिरकला, याचे सर्वांना आश्चर्य वाटत होते. सिलची जमात इंग्लंडच्या वर्णभेदाच्या धोरणावर कट्टरपणे

विश्वास ठेवणारी होती. भारतात त्या लोकांनी काळे आणि गोरे यांच्यातील वर्णभेदाचा पाया घातला होता. मद्रासमध्ये ब्लॅक टाउन, युरेशियन टाउन आणि व्हाइट टाउन असे भाग पडलेले होते. स्लिल्ने केंब्रिजमध्ये असताना अठराव्या शतकातील उदारमतवादाचा खूप प्रचार केला होता. परंतु काळे व गोरे यांच्यातील भेदभाव त्याला कळू शकत होता. आता त्याला असे दिसले की भारतात राहाणारे गोरे काळ्यांच्या संसर्गाने आपल्या उच्च स्थानावरून खाली घसरले आहेत. तो तसाच फिरत पुढे गेला. इतक्यात त्याला ती मुलगी पुनः दिसली. ती आपल्या घराचे कुंपण ओलांडून पुढे चालली होती. तिने एकदा मागे वळून स्लिलकडे पाहिले व स्मित केले. ती युरेशियन तरुणी अत्यंत सुंदर होती. "जरा थांब!" तो भरभर पुढे जात तिला म्हणाला, "तू इथंच राहतेस?" त्याने तिला गाठून मूर्खासारखा प्रश्न केला.

"होय. तू आताच तर माझं घर पाहिलंस. तू कलकत्त्याहून येतो आहेस?"

"नाही. मी कलकत्याला चाललोय. लंडनहून निघालो होतो. इथं मुंबईहून आलो."

"खूप प्रवास करतोस."

"होय! अजून खूप प्रवास करायचा आहे. तू इथं कधीपासून राहाते आहेस?"

"नेहमीच!"

"नेहमीच? पण तू तर ख्रिस्ती आहेस."

"मग काय झालं? हिंदी लोक ख्रिस्ती असू शकत नाहीत की काय?" ती थोडा वेळ थांबून म्हणाली. "माझे आजोबा इंग्रज होते—अगदी तुझ्यासारखे. माझी आई हिंदुस्तानी आहे."

स्लिल गडबडला. पीटर जॅक्सनने त्याला जहाजावर असा उपदेश केला होता की, "युरेशियन लोकांशी मुळीच संबंध वाढवू नकोस. गेल्या शतकात आपल्या देशबांधवांनी इथं येऊन इतक्या काळ्या बायकांशी लग्ने केली आणि इतके संबंध जोडले की एक संपूर्ण जमातच काळी करून टाकली."

"तुझे वडील जिवंत आहेत? काम करतात ते?" स्लिल्ने विचारले.

"ते काय तिथं पायरीवर बसलेत. तू पाहिलं नाहीस? ते दारूचं दुकान चालवतात."

"ये, आपण इथं बसू." स्लिल्ने मोठे धाडस करून एका बाकाकडे बोट दाखवीत म्हटले.

ती तरुणी क्षणभर संकोचली आणि मग आपला काळा जाळीदार रुमाल आपल्या डोकीवरून सावरून घेत रस्त्याच्या कडेला असलेल्या बाकावर बसली. हा रस्ता चर्चकडे जात होता. स्लिल तिच्याशी बोलू लागला.

नंतर अचानक काय झाले कोण जाणे. आपण काय बोलत आहोत हे लक्षात येण्यापूर्वीच तो तिला म्हणाला, (हा बहुधा कडक उन्हाचा परिणाम असावा.) "तू...तू मला फार आवडतेस. चल माझ्याबरोबर कलकत्त्याला!"

"ते कसं शक्य आहे?" ती म्हणाली.

"का नाही?"

"तू उच्च वर्गीय इंग्रज आहेस. आणि...आणि आजच्यानंतर कदाचित तू माझ्याशी बोलायलाही तयार होणार नाहीस. तुझ्यासारखे कितीतरी इंग्रज मुसाफीर मद्रासला येत असतात." तिने उदासपणे झाडाचे एक पान खुडले.

आपण पहिल्याच भेटीत या मुलीच्या प्रेमात सापडलो असल्याचे क्लिव्हच्या लक्षात आले. तो अत्यंत भावनाप्रधान स्वरात म्हणाला, "हे पाहा,...हे पाहा!" परंतु तो पुनः गडबडला. अजून त्याने तिला तिचे नावही विचारले नव्हते.

"मला मारिया टेरेसा म्हणतात!"

"मारिया टेरेसा! मारिया टेरेसा!!"

त्या दिवशी रात्री गव्हर्नमेंट हाउसच्या बॉल-नृत्यात सहभागी होण्याऐवजी तो गुपचूप युरेशियन टाउनकडे गेला. त्यानंतर दुसऱ्या रात्री...तिसऱ्या रात्री...चौथ्या दिवशी सकाळी जहाजाने कलकत्त्यास प्रयाण केले.

प्रस्थानाची तयारी करीत असताना क्लिव्हच्या मनात विचार येत होता...केवढा मोठा मूर्खपणा आपण करून बसलो. तो त्या मुलीशी लग्न करू शकत नव्हता. अजूनपर्यंत त्याने मारियाजवळ लग्नाची गोष्टही काढली नव्हती. परंतु ती मूर्ख पोरगी अस्सल भारतीय स्त्रियांप्रमाणे बहुधा मनातल्या मनात त्याला आपला देव समजू लागली होती. तिचा निरोप घेण्यासाठी तो चर्चजवळच्या बागेत गेला तेव्हा कपड्यांचे एक गाठोडे हातात घेऊन ती त्याच्याबरोबर कलकत्त्याला जाण्यासाठी तयार होऊन बसली असल्याचे त्याला आढळून आले. त्याबरोबर तो पार गडबडून गेला.

आपले सारे कौशल्य, काव्यपूर्ण भाषाशैली आणि नाटकी अभिनयकला पणाला लावून त्याने मारिया टेरेसाला कसेबसे समजावले. त्याने तिला सांगितले, "आत्ता तुला बरोबर नेणं मला शक्य नाही; परंतु मी लौकरच तुला बोलावून घेईन." हे शब्द उच्चारत असताना आपण स्वतः अत्यंत नीच व क्षुद्र असल्याचे त्याच्या प्रत्ययास येत होते.

हे लहानसे भावनाप्रधान साहस करून क्लिव आपल्या उद्दिष्टाच्या दिशेने रवाना झाला...बंगालच्या खाडीतील निळ्याशार समुद्राचा अर्धाअधिक पल्ला गाठीपर्यंत त्याला त्या मुलीचा चवळजवळ विसर पडून गेला होता.

जहाज आता कलकत्त्याच्या जवळ जाऊन पोहोचले होते. डायमंड हार्बरमध्ये प्रविष्ट होऊन जहाजाने नांगर टाकला आणि उतारू डेकवर येऊन होड्यांची वाट पाहू लागले. समोर बंगालचा किनारा होता. उतारू जहाजातून उतरून होड्यांत बसले. उच्चपदस्थ अधिकाऱ्यांना घेऊन जाण्यासाठी त्यांच्या खासगी नौका आल्या होत्या. त्या साऱ्या गर्दीत सिरिल कोणालाच ओळखत नव्हता. तो घाईघाईने उडी मारून भाड्याच्या होडीत बसला. अनेक नावाड्यांनी वल्ही मारण्यास सुरुवात केली, आणि थोड्याच वेळात बंदराच्या कोलाहलातून बाहेर पडून होडी शांत मोकळ्या वातावरणात आली. तिच्या सभोवताली उतारूंनी भरलेल्या इतर नौका चालल्या होत्या. खाडीच्या दोन्ही किनाऱ्यांवर लहानमोठे वृक्ष उभे होते. दूरवर पसरलेल्या घनदाट अरण्यातून मधूनच वाघांची गर्जना किंवा कोल्ह्यांची कोल्हेकुई ऐकू येई. होडीत डासांचे गुणगुणणे सुरू झाले होते. कलकत्ता अजून दूर होते. सिरिलने थकव्यामुळे डोळे मिटून घेतले आणि मनश्चक्षूंसमोर कलकत्त्याचे चित्र साकार करण्याचा तो प्रयत्न करू लागला. कलकत्ता ! महालांचे शहर ! सोने आणि चांदी यांची वस्ती ! पूर्वेचे लंडन ! आता रात्र होऊ लागली होती. बंगालच्या जादूची आठवण करून देणारा चंद्र पाण्याच्या लाटांवर होडीबरोबर तरंगत चालला होता. नावाडी आपल्या भाषेत गात होते. त्यांचा आवाज सिरिलला अत्यंत मधुर वाटला.

यानंतर दृश्य बदलू लागले. होडी गार्डनरीचजवळ पोचली. घाटावर उतरून सिरिलही एका पालखीत जाऊन बसला. शहराच्या दाट वस्तीतून बाहेर पडून पालखीचे भोई बराकपूरच्या दिशेने चालू लागले.

बराकपूरमध्ये इंग्रजांची सुंदर 'कंट्री-हाउस' पद्धतीची बैठी घरे होती. डचांचे श्रीरामपूर आणि फ्रेंचांचे चंद्रनगर या शहरांपर्यंत या घरांची साखळी जाऊन पोहोचलेली होती. किल्ल्याच्या आसपास सरकारी इमारती होत्या. अलीपूरला बेल्वेडियर नावाचे भव्य गव्हर्नमेंट हाउस होते. तेथे काही वर्षांपूर्वी कॉर्नवालिस थाटात राहात असे.

सहा महिन्यांनंतर सिरिलने आपल्या वडिलांना पत्र लिहून कळविले की, "आता माझं चांगलं बस्तान बसले आहे. परमेश्वराची कृपा. माझा बंगाली गुमास्ता आशुतोष दे फाडफाड इंग्रजी बोलतो. आता मला बढती मिळणार आहे, आणि मी उपनगरात निळीचा व्यापार सुरू करणार आहे. मी एक मुसलमान मुन्शी नोकरीला ठेवलाय. तो मला फारशी व बंगाली शिकवतो. मी अत्यंत मजेत आहे."

अशीच काही वर्षे निघून गेली. आता सिरिल कलकत्त्याच्या उच्चवर्गीय लोकांमध्ये मिसळून गेला होता. त्याची पालखी वाहाणारे भोई नेहमी लाल गणवेष परिधान करून तयार असत, मालदार-चोपदार चांदीच्या मुठी असलेले सोटे हातात घेऊन त्याच्यापुढे चालत. रात्री मशालजी त्याच्या गाडीसमोर धावत असत, बबर्जी व

खिदमतगार त्याच्या स्वयंपाकघराची व डायनिंगरूमची काळजी घेत. हुक्काबरदार त्याचा हुक्का भरून तयार ठेवी. कचेरीत त्याचा कारकून युरेशियन होता. त्याचे नाव राल्फ जोसेफ असे होते. तो जवळ असला की सिलला फार अस्वस्थ वाटे. कचेरीचा व्यवस्थापक सरकार नावाचा एक बंगाली होता. त्याखेरीज अनेक शिपाई, पट्टेवाले, जासूद वगैरे होते. एकट्या सिल ॲश्लेच्या हाताखाली चाळीसपन्नास माणसे काम करीत होती. त्याखेरीज त्याचा माळी, गवत कापणारा, मोतद्दार, चाबूकस्वार, भिस्ती, दरवान, चौकीदार वगैरे असंख्य नोकरचाकर होते. त्याची स्वतंत्र नौका होती. तिचे नावाडी त्यचे नोकरच होते. सफेत रंगाच्या त्याच्या प्रचंड बंगल्यातील या साम्राज्याचा सिल ॲश्ले हा एकटाच निरंकुश सत्ताधीश होता. मनात आले तर तो या सर्वांना उलटे टांगून फटके मारू शकत असे. तसे त्याने अनेकदा केलेही होते. जो सिल काही वर्षापूर्वी केंब्रिजच्या गल्ल्यांतून विल्यम ब्लेकचे ग्रंथ खाकोटीला मारून काव्यरचनेचा अभ्यास करीत होता आणि एखाद्या गुत्त्यात बसून काही पेन्सचे बटाटे खात होता तोच आता राजेशाही जीवन व्यतीत करीत होता.

सकाळी सात वाजता द्वारपाल त्याच्या बंगल्यातील हॉलचा दरवाजा उघडी. बंगाली सरकार व पट्टेवाले कागदपत्रे घेऊन जमिनीपर्यंत लवून सलाम करीत त्याच्या बेडरूममध्ये प्रवेश करीत. न्हावी त्याची दाढी करी. डोक्यावर विग (कृत्रिम केसांचा टोप) चढवून अंगात जाकीट घालीत तो भोजनगृहात प्रवेश करी. तेथे तो चहा पिता-पिता हुक्क्याचे झुरके घेई. सरकारी व व्यापारी कामाच्या संदर्भात सकाळच्या प्रहरी जे लोक त्याला सलाम करण्यासाठी येत ते त्याच्या मेजापासून दूर अदबीने उभे राहात. त्यांच्याकडे न पाहता सिल हुकूम सोडीत असे. दहा वाजण्याच्या सुमारास हा सारा घोळका पालखीकडे जाई, आणि पालखी त्याच्या कचेरीकडे रवाना होई. चार वाजता परत आल्यानंतर सिल कलकत्त्याच्या प्रथेप्रमाणे सात-आठ वाजेपर्यंत झोप काढी. त्यानंतर कपडे बदलून व नटून-थटून प्रतिष्ठित स्त्रियांना भेटण्यासाठी तो बाहेर पडे. औपचारिक गाठीभेटीचा कार्यक्रम त्यावेळी होई. तेथून तो रेसकोर्सवर जाऊन हवा खाई किंवा एखाद्या मेजवानीला हजर राही. व्यापारात त्याला अतोनात फायदा होत होता. गव्हर्नर जनरल त्याच्यावर फार खूष होता. कायमधारा पद्धतीच्या अंमलबजावणीच्या संबंधात त्याला जिल्ह्याच्या एखाद्या शहरी किंवा लखनौ प्रेसिडेन्सीत, फार मोठ्या हुद्द्यावर पाठविण्यात येणार असल्याची वदंता पसरली होती. नृत्यगृहात त्याच्याबरोबर नृत्य करिताना श्रीमंतांच्या अविवाहित मुलींच्या मनात नेहमी असा विचार घोळू लागे की या श्रीमंत व देखण्या सिल ॲश्लेशी लग्न करण्याचे भाग्य आपल्यापैकी कुणाच्या बरे वाट्याला येणार आहे !

परंतु मिस पेमिला किंवा मिस स्नेहलता यांच्याशी लग्न करण्याऐवजी असामान्य

बुद्धिमत्ता व हुशारी अंगी बाळगणाऱ्या क्लिव्ह अ‍ॅश्लेने अगदीच फडतूस गोष्ट केली— अशा गोष्टी करण्याची भारतातील इंग्रज 'नबाबां'ची सार्वत्रिक प्रथाच होती.

म्हणजे असे की क्लिव्ह अ‍ॅश्लेनेही एका नेटिव्ह बाईला आपल्या घरात ठेवून घेतले.

इंग्रज 'नबाबां'ची इंग्लंडमध्ये खूप टर उडविली जाई. तेथील खानदानी जहागीरदार त्यांना आपल्या बरोबरीचे समजण्यास तयार नव्हते. काल-परवांपर्यंत हे लोक लंडन शहरात सामान्य व्यापारी किंवा साधे नोकर होते. परंतु हिंदुस्तानात या लोकांनी आपले एक वेगळेच कल्पनारम्य जग निर्माण केले होते. पाटणा, ढाका, कासिमबाजार, बालासोर व हुगळी येथील व्यापारी; मुर्शिदाबाद, लखनौ, बनारस, ग्वाल्हेर व दिल्ली येथील दरबारांत राजदूत म्हणून वावरणारे मुत्सद्दी; बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांतील जिल्ह्यांचे जिल्हाधिकारी; अवधप्रांतात लष्करी छावण्या टाकून राहिलेले लष्करी अधिकारी; हिंदी राज्यकर्त्यांच्या सैन्यांत रणगाजी म्हणून प्रसिद्ध असलेले लष्करी अ‍ॅडव्हेंचरर्स—हे सगळे आता क्लिव्हचे साथीदार होते. त्यांचा दृष्टिकोण क्लिव्हला चांगला समजत होता. प्लासीच्या युद्धानंतर लक्ष्मीने हिंदी लोकांकडे पाठ फिरवून फिरंग्यांशी घरोबा केला होता. इंग्रजांजवळ संपत्तीची रेलचेल झाली होती. सोरामीठ व नीळ यांचा व्यापार करणारे कोट्यधीश झाले होते. नबाबांसारखे जीवन घालविणे हा त्यांचा आदर्श होता. हिंदी नबाब, राजे व इंग्रजांपैकी उच्च वर्गाचे लोक यांनी आपसात जणू अलिखित करार करून एका अत्यधिक 'सुसंस्कृत' वातावरणाचा पाया घातला होता. बंगालची दिवाणी मिळाल्यानंतर तेथे इंग्रज सिव्हिलियन पुढे आला होता. हे लोक अगदी लहान वयात इंग्लंडहून इकडे येत आणि फार थोड्या अवधीत येथील सारी हिंदी व्यसने आत्मसात करून घेत. जिल्ह्याच्या कलेक्टराच्या जागी जाऊन पोचल्यानंतर ते आपला वेळ तेथील जमीनदारांच्या संगतीत घालवीत. प्लासीच्या युद्धानंतर कंपनीचा कारखानदार फक्त पैसा गोळा करून स्वदेशी परतण्याऐवजी 'नबाब' होण्याची स्वप्ने पाहू लागला होता. तो आपल्या जनानखान्यात दहा-दहा देशी बाया ठेवू लागला होता.

क्लिव्हही सुजातादेवीला आपल्या बंगल्यात दाखल करून घेऊन जणू रीतसर 'नबाब' बनला.

काळ्या, लांबसडक केसांची व मादक डोळ्यांची सुजाता ढाक्याजवळील एका खेड्यात राहणारी होती. ढाक्यावर आर्थिक विनाशाचे ढग पसरल्यामुळे सुजाताच्या बापावर उपासमारीची पाळी आली होती. सुजाताला सात बहिणी होत्या. त्यांपैकी तीन बालविधवा होत्या आणि चौघींची अजून लग्नेच झाली नव्हती. तिला श्यामचरण नावाचा एक भाऊ होता. त्याला कलकत्त्याच्या एका गोदामात नोकरी मिळाली तेव्हा त्याने आपल्या बहिणींना तेथे बोलावून घेतले. या गोदामाच्या मालकाचे नाव होते क्लिव्हसाहेब.

..सिलसाहेब अजून कोवळा तरुणच होता. तरीपण कलकत्त्यात त्याच्या कर्तबगारीचा खूप बोलबाला झालेला होता. एके दिवशी सुजाता पूजेसाठी कालीघाटाकडे चालली असताना ती सिलसाहेबाच्या नजरेला पडली. सिलसाहेब मोठा रंगेल असल्याबद्दल ख्याती होती. सुजाताचा भाई आपल्या दारिद्र्याला कंटाळून श्रीरामपूरला जाऊन ख्रिस्ती होण्याचा विचार करीत होता. इतक्यात सिलसाहेबाच्या सरकारने त्याला सांगितले, "साहेबाने तुला बोलावलंय." दुसऱ्याच दिवशी सुजाताला सिलसाहेबाच्या बंगल्यावर नेऊन पोचविण्यात आले. अशा प्रकारे एका कुटुंबाची उपासमारीतून सुटका झाली.

सिलसाहेबाने सुजाताशी लग्न केले नाही. परंतु सुजाता नाखूष नव्हती. ती रुबाबात त्या महालात राहात होती व नोकरांवर अधिकार गाजवीत होती. तिच्यासारख्या इतरही अनेक देशी बायका उच्चवर्गीय इंग्रजांच्या जनानखान्यात राहात होत्या. त्यांच्या मुलांना शिक्षणासाठी विलायतेला पाठविण्यात येई; आणि जोपर्यंत त्या मुलांचे बाप हयात असत तोपर्यंत तरी ते कुटुंब सुखात असे.

परंतु आपण मेल्यानंतर सुजाताच्या व आपल्या मुलांचे काय होईल याची सिलला चांगली कल्पना होती. त्यांना मद्रासच्या किंवा कलकत्त्याच्या अनाथालयात ठेवण्यात येईल. मोठेपणी त्यांना वरच्या नोकऱ्या मिळणार नाहीत. ती राल्फप्रमाणे कारकुनी करतील किंवा एखाद्या पल्टणीत भरती होऊन बँड वाजवीत मराठ्यांशी लढायला जातील. त्याच्या मुलीला एखाद्या इंग्रज नवाबजादीची आया व्हावे लागेल किंवा एखाद्या लष्करी अधिकाऱ्याची रखेली बनावे लागेल. युरेशियन लोकांचे जीवन म्हणजे केवढी भयंकर शोकांतिका आहे, याची त्याला आता कल्पना आली. ज्या सुंदर मारिया टेरेसाला तो मद्रासमध्ये नीचपणे सोडून आला होता तिची त्याला आठवण झाली. हे सारे विचार मनात येताच सिलचे सर्वांग शहारले. तर मग मी मिस सेंथियाशी लग्न केले पाहिजे काय? इतक्यात सुजाताची मधुर हाक त्याच्या कानी येई आणि तो गडबडून जाई. काही सुचेनासे झाले की तो पालखीत बसून रेसकोर्सकडे निघून जाई. त्याचे जीवन अत्यंत कार्यमग्न होते आणि अगदी धाईगर्दीत ते व्यतीत होत होते. सारा बंगाल व बिहार त्याच्या पायांवर लोळण घेत होता. धालेश्वरी, हरिमंगल, कर्णाफुली, मधुमती व शिब्सांसुरी या नद्यांच्या लाटांवर त्याच्या नौका निळीची वाहतूक करीत होत्या. ढाक्याच्या मुगलांच्या शानदार नावांचा तांडा आता त्याच्या हातात होता.

* * *

त्याने लांबूनच आपली चांदीची मूठ असलेली छडी म्हाताऱ्याच्या कमरेत टोचली आणि तो म्हणाला, "अबुल मोन्शूर! माझ्या या हंटरानं आपली कातडी सोलली जाऊ नये असं तुझं वाटत असेल तर जरा जोरानं वल्ही मार!"

म्हातारा जीव खाऊन वल्ही मारू लागला. स्लिनने निमूटपणे त्याच्याकडे पाहिले. तो मनात म्हणाला, किती चिवट लोक आहेत हे! नुकताच १७७० साली केवढा भयंकर दुष्काळ पडला होता या प्रांतात! शिवाय नद्यांवर इतकी वादळे उठतात, रोगराई पसरते, परंतु हे लोक तसेच निर्ढावल्यासारखे जगत असतात. कमाल आहे. त्याने घड्याळात पाहिले. रात्रीचे नऊ वाजले होते. त्याला आज रात्रीच गिरीशचंद्र राय यांच्या जमीनदारीच्या गावी पोहचावयाचे होते. कलकत्त्यात सत्ताधाऱ्यांमध्ये बरेच बदल घडून येत होते. एक-दोन दिवसांनी सर जॉन शोर जाणार होते; आणि त्यांच्या जागी नवा गव्हर्नर जनरल येणार होता. येथून परत गेल्यानंतर त्याला गव्हर्नमेंट हाउसवरही जावयाचे होते. "आज काय तारीख आहे?" त्याने पीटरला विचारले. पीटर घोरू लागला होता. स्लिनने कंदील वर करून विल्यम हिकीच्या 'बेंगॉल गॅझेट'वर नजर फिरविली. ते कालचे वर्तमानपत्र होते.

८ जून १७९८! स्लिन एकदम चमकला. त्याला भारतात आल्याला आज पूर्ण पाच वर्षे झाली होती. या पाच वर्षांत तो कुठल्या कुठे जाऊन पोहचला होता. निळीच्या व्यापाराची दिवसे-दिवस तुफान भरभराट होत होती. गुजरातेतील निळीचा व्यापार साफ बसला होता. त्याच्या ऐवजी कंपनीचे इंग्रज मळेवाले दिल्लीपासून बंगालपर्यंत पसरले होते. बंगालचा शेतकरी इंग्रज मळेवाल्यांकडून कर्ज घेऊन नीळ पिकवीत होता. त्याच्यावर नाना प्रकारचे अत्याचार केले जात होते.

दिवसभर निळीच्या शेतात मेहनत करणारा बंगालचा शेतकरी अबुल मन्सूर कमालुद्दीन यावेळी आपला नवा मालक स्लिन हावर्ड ॲश्ले याला नौकेत बसवून पैलतीराला चालला होता. पद्मा नदीच्या पाण्यावर चंद्र अवतरला होता. वातावरणात कोरडेपणा आला होता. केळ्यांच्या बागांतून कोल्हेकुई ऐकू येत होती.

रात्र फारच भयंकर होती!

## १२

नदीच्या काठावर येऊन राधेचरणांनी हातातील दिवा वर उचलून पाण्यावर प्रकाश पाडला. दूर क्षितिजावरून एक नाव मंदपणे तरंगत घाटाकडे येत होती. त्यांनी दिवा जमिनीवर ठेवला आणि उपरणे अंगाभोवती गुंडाळून ते तेथच उकिडवे बसले. जवळच चावडीमध्ये गावचे लोक जमले होते. बांबूच्या बनात राधेचरणांचे स्वतःचे लहानसे घर

होते. चोहोकडे एक भयानक स्तब्धता पसरली होती. फक्त राजा गिरीशचंद्र राय यांच्या महालातून येणाऱ्या वाद्यांचे अस्फुट सूर कानावर येत होते तेवढेच. तेथे पाटणा व लखनौ येथील कलावंतिणी आल्या होत्या म्हणे. राजेसाहेबांना लाटसाहेबांनी मानाची वस्त्रे देऊन गौरविले होते. त्या आनंदाप्रीत्यर्थ हा समारंभ चालला होता. त्यात सामील होण्यासाठी कलकत्त्याचे साहेबलोक येत होते. चावडीसमोर विचित्र स्तब्धता पसरली होती.

"काही तरी बोला ना, दादा!" प्रमोदाने चिलमीतील राख टोकरून काढीत उदास स्वरात राधेचरणांना म्हटले.

राधेचरण निमूटपणे घाटाकडे पाहात राहिले. बांबूच्या बनात सोसाट्याचा वारा वाहात होता.

अशा या रात्रीच्या वेळीच कुरळ्या केसांचे सत्य पीर सत्यनारायण[1] कपाळावर गंध लावून, हातात बासरी घेऊन भगवी वस्त्रे परिधान करून आपल्या कमरेला बांधलेल्या साखळ्या खुळुम खुळुम वाजवीत पद्मा नदीच्या काठाने जात असलेले दिसतात. "हे सत्यनारायण कधी मला भेटले तर मी त्यांना विचारीन...तर मी त्यांना काय विचारीन?"...राधेचरण उकिडवे बसून विचार करू लागले.

अनेक साखळ्यांच्या खणखणाटाने निस्तब्धतेचा भंग केला. राधेचरणांनी दचकून समोर पाहिले. तेथे सत्यपीर नव्हते, तर त्यांचे काही फकीर उभे होते. बांबूच्या बनातून बाहेर पडून ते राधेचरणांच्या घराकडे आले होते; आणि दारात उभे राहून भिक्षा मागत होते.

राधेचरणांनी अस्वस्थपणे त्यांच्याकडे पाहिले. सत्यनारायणाचे याचक त्यांच्या दारी उभे होते; परंतु त्यांना देण्यासाठी त्यांच्याजवळ काही नव्हते. शेकडो वर्षांपासून हे फकीर असेच गात-वाजवीत येत होते. गावातील हिंदू स्त्रिया त्यांच्या झोळीत तांदूळ व पीठ घालीत व त्यांच्याकडून आशीर्वाद घेत. गतवर्षी सुजाता भिक्षा घालण्यासाठी आली असता हे फकीर म्हणाले होते, "ही राजसबाळी पद्मिनी मोठी भाग्यवान आहे."

त्यांचा आवाज ऐकून सुजाताची आई बाहेर आली. तिची गाडगी-मडकी रिकामी होती. फकिरांना देण्यासाठी तिच्याजवळ काही नव्हते. हे सत्यपीर, माणिकपीर, लक्ष्मी, चंडी—या सर्व देव-देवतांचा तिला भयंकर राग आला. हे सारे फसवणूक करणारे आहेत—सगळे देव-देवता! तिने साडीच्या पदराने डोळे पुसण्याचा प्रयत्न केला आणि ती निमूटपणे त्या फकिरांकडे पाहात राहिली. अखेर त्यांच्यापैकी एकाने विचारले, "सुजाता कुठं आहे?..."

---

१. एक सूफी देव. मुसलमान त्याला 'सत्यपीर' म्हणत व हिंदूंनी त्याला 'सत्यनारायण' बनविले.

"कलकत्त्याला!" राधेचरणांच्या पत्नीने सांगितले, "तिचं...तिचं लग्न झालं." ती हलक्या स्वरात म्हणाली. सुजाताला पडद्यातून बाहेर पडावे लागले आणि आता ती एका फिरंग्याच्या महालात राहाते आहे, हे तिने सांगितले नाही.

"आमचे जावईबापू काय करतात?"

"ते कलकत्त्याला नोकरी करतात."

"अच्छा!" फकिरांनी समाधान व्यक्त केले आणि आशीर्वाद देऊन ते परत फिरले. आता त्यांना प्रत्येक घरी हेच ऐकावे लागणार होते की, "आमच्याकडे द्यायला काही नाही." त्यांना या दुष्काळाची सवय झाली होती. ईस्ट इंडिया कंपनीच्या भयंकर शोषणामुळे १७७० साली बंगालमध्ये जो भयानक दुष्काळ पडला होता त्याला आता जवळजवळ तीस वर्षे होऊन गेली होती. त्यावेळी फिरंग्यांची राजधानी असलेल्या कलकत्त्याचे रस्ते उपासमारीने मरणाऱ्या लोकांच्या प्रेतांनी भरून गेले होते म्हणे. परंतु आता कलकत्त्याचे रस्ते खूप दूरवर पसरले होते. आता गावोगावी माणसे उपासमारीने मरत होती.

"थांबा!" सुजाताची आई म्हणाली, "मी प्रफुल्लाला बाजारात पाठवलंय. तो काहीतरी घेऊन येईल."

परंतु फकीर आशीर्वादांचा वर्षाव करीत उदासपणे पुढे निघून गेले. सुजाताची आई आपल्या मुलाची वाट पाहात उभी राहिली.

इकडे प्रफुल्ल बाजारातून घरी येण्याऐवजी समोरच्या चावडीत जाऊन बसला होता. त्याच्या बरोबरचे सारे मित्र खिन्नपणे बसले होते. गेले तीन दिवस तो तेलाचा शोध घेत वणवण फिरत होता. तेलाला सोन्याचा भाव आला होता. मीठ दृष्टीला पडत नव्हते. तांदूळ दुर्मिळ झाला होता. सुपारी व तंबाखू, तांदूळ व मीठ यांसारख्या प्रत्येक दैनंदिन गरजेच्या वस्तूंच्या व्यापारावर कंपनीबहादुराच्या फिरंग्यांनी कब्जा केलेला होता. नद्यांतून त्यांच्या नौका मालाने भरभरून वाहतूक करीत होत्या. परंतु बाजारात वस्तूंच्या किमती आभाळाला जाऊन भिडल्या होत्या. चावडीत सात-आठ माणसे येऊन बसली. खालच्या आवाजात गप्पा-गोष्टी सुरू झाल्या.

"महमूद दादा, तुम्ही ढाक्याहून आलात ना?" प्रमोद बसूने विचारले.

"होय! मी, नजीर, सगळे जण! आता तिथं खायला मिळत नाही. सगळे माग बंद पडले आहेत. आता आम्हीही नांगर धरणार. तुमचे राजेसाहेब आम्हांला शेती करायला जमीन देतील?" महमूद उल हकने विचारले, आणि आपले हात पसरून दाखविले. त्या हाताची बोटे तोडून टाकण्यात आली होती.

"कोण जाणे!" प्रमोदने अस्वस्थपणे उत्तर दिले. या सर्व गोष्टींच्या विचारांनी

त्याचे डोके भणमणून गेले होते. लोकांचे लोंढेच्या लोंढे खेड्यांकडे येत होते. ग्रामीण भागातील शेतीवरील लोकसंख्येचे ओझे प्रमाणाबाहेर वाढले होते. जगातील सर्वात मोठा उद्योगप्रधान देश म्हणून प्रख्यात असलेल्या हिंदुस्तानाला आता केवळ शेतीप्रधान देश बनवून टाकण्यात आले होते. तेथे उत्पादन कमी होते, शेतसारा जास्त होता आणि दरसाल दुष्काळ पडत होता.

"या डोळ्यांनी काय काय बदल पाहिले आहेत !..." राधेचरण चावडीत जमलेल्या लोकांकडे पाहात मनाशी म्हणाले. कॉर्नवालिसच्या कायद्याने तर अगदी कंबरडेच मोडून टाकले होते. तीन-चार तरुण त्यांच्याजवळ येऊन बसले.

"दादा, तुमच्या नबाबांच्या अमदानीतही असंच होत होतं?" आशुतोषाने विचारले.

"काय?" राधेचरणांनी विमनस्कपणे विचारले.

"हेच सारं...महागाई, दुष्काळ, दंगे-धोपे?"

लांब, शुभ्र दाढ्या असलेले दोन म्हातारे हिंदू हुक्क्यातील राख टोकरत अंधुक डोळ्यांनी त्या तरुणांकडे पाहू लागले. या दोघांनी बक्सरच्या लढाईत भाग घेतला होता. जुन्या काळच्या या म्हाताऱ्या-कोताऱ्यांनी सारे गाव भरून गेलेले होते. हे लोक मोंगलांच्या व नबाबांच्या राजवटीचे गुणगान करीत व उसासे टाकीत.

"आता असा काळ येणार आहे की ज्यावेळी आमच्या बायकांना पडद्यांतून बाहेर पडावं लागेल, आमची मुलंबाळं उपासमारीनं रस्त्यात मरून पडतील, आमच्या बादशाहाचा राजमुकुट धुळीला मिळेल. महाभारतात असं लिहिलंय की..." म्हातारा धनगोपाल मजूमदार सांगू लागला.

"महाभारत गेलं खड्ड्यात! दादा." प्रफुल्लने चिडून त्याला मध्येच अडविले. या म्हाताऱड्यांमध्ये हा एक फार मोठा दुर्गुण होता. उठल्यासुटल्या सिराजउद्दौल्याच्या आठवणी काढून रडत बसत. "आता मागल्या जमान्यातल्या गोष्टी कशाला उकरून काढता?" तो म्हणाला. "कलकत्त्याला चला. तिथं श्यामदा गेलाय." श्याम हा राधेचरणांचा मुलगा. तो खिलसाहेबाच्या गुदामात नोकरी करीत होता. "आता लाटसाहेबाची चाकरी करा. सिराजचा काळ आता उरला नाही, आजोबा!"

राधेचरण आश्चर्यचकित होऊन ऐकत राहिले. हा पोरगा प्रफुल्ल अगदी मारवाड्यां-सारखे बोलत होता. ही मनोवृत्ती त्याच्यात कुठून आली? त्यांना मारवाड्यांविषयी तिटकारा होता. राधेचरण हे मोंगलांच्या अमदानीत राज्यकारभार चालवून उरलेला वेळ पूजाअर्चा करण्यात घालविणाऱ्या, फारसी शिकणाऱ्या जुन्या खानदानी वर्गातील होते. परंतु आता कलकत्त्याला मारवाड्यांचा एक नवा मध्यम वर्ग निर्माण झाला होता. हा वर्ग कंपनीबरोबर व्यापार करून आणि स्थानिक अधिकारी व कंपनी यांच्या

कटांत सामील होऊन पैसा कमावीत होता. हा बंगालच्या बनियांचा नवा वर्ग होता. जहागीरदार व शेतकरी यांच्यामधील हा नवा भांडवलदार वर्ग इंग्रजांचा मित्र व उजवा हात होता.

"लाटसाहेबाची चाकरी ?" धनगोपाल खाकरा टाकून जोरात बोलू लागला. त्याची दाढी दिव्याच्या प्रकाशात हास्यास्पद दिसत होती. "लाटसाहेब ?" तो म्हणाला, "त्याच्याशी आम्हांला काय करायचंय ? आमचा बादशाह अजून दिल्लीत हयात आहे. तो तुझ्या लाट साहेबाला चांगला वठणीवर आणील."

"तुमच्या बादशाहाचे डोळे काढले आहेत, गोपालदादा!" प्रफुल्ल खदखदा हसत म्हणाला, "तुमच्या बादशाहानं आधी आपली दिवाणी क्लाइव्हला का दिली ? आता तो फिरंग्याला वठणीवर आणणार ?" प्रफुल्ल कडवटपणे हसला. दोन्ही म्हातारे गुडघ्यांत डोके घालून गप्प बसले. राधेचरणांनी अस्वस्थपणे प्रफुल्लकडे पाहिले—या पोरांना काही समजावून सांगण्यात अर्थ नव्हता. बादशाहाने दिवाणी स्वेच्छेने दिली नव्हती, क्लाइव्हने ती जबरदस्तीने मिळविली होती, हेही सांगणे निरर्थक होते. उपासमारीने तडफडणाऱ्या या देशात जन्माला आलेल्या या तरुणांचा एकेकाळी हाच बंगाल देशातील सर्वात अधिक सुपीक प्रांत होता, या गोष्टीवर कसा विश्वास बसणार! हाच बंगाल भारताचे नंदनवन समजला जात होता. त्यावेळी या देशात परकीय इंग्रजांचा जमीनदारीचा कायदा लागू झालेला नव्हता. त्या काळी या देशात तयार होणाऱ्या मालावर निर्यातकर लादण्यात आलेला नव्हता. हे सारे राधेचरणांच्या डोळ्यांदेखत घडले होते. काही दिवसांपूर्वी कायम धारा पद्धतीच्या अंमलबजावणीसाठी ढाक्याचा इंग्रज कलेक्टर दौरा करीत येथे आला होता तेव्हा त्याने राधेचरणांना आपल्या समोर बोलावून असे सांगितले होते की, "आम्ही हे सारं तुमच्या फायद्यासाठी करतो आहोत. मुसलमान नबाबांनी आपल्या अंदाधुंदीमुळं तुमचा सत्यानाश करून टाकलाय."

"तुम्ही साफ खोटं बोलताय, साहेब! आमच्या नबाबांच्या राज्यात मुळीच अंदाधुंदी नव्हती. माझे पूर्वज शेकडो वर्षांपासून मुर्शिदाबादेत राज्यकारभार चालवीत आले होते. मी आज बुढी गंगेच्या काठी या झोपडीत राहतोय, याचा अर्थ असा नव्हे की माझ्या भरभराटीच्या दिवसांबरोबर माझं डोकंही कामातून गेलंय. मला पूर्ण माहीत आहे की तुम्ही खोटं बोलता आहात. तुम्ही—" इतके बोलून राधेचरण रागाने थरथरा कापू लागले. त्याबरोबर कलेक्टराच्या चपराशांनी त्यांना धक्के मारून बाहेर काढले. त्या दिवशी त्या खोलीत एक इंग्रज मिशनरीही हजर होता. तो आपल्या प्रवासाचे वर्णन लिहीत होता. हा संवाद ऐकल्यानंतर त्याने अत्यंत 'प्रामाणिकपणे' असे लिहून ठेवले की, "बंगालच्या हिंदूला मुसलमान नबाबांचा तिटकारा वाटतो. मुसलमान हिंदूंचा नाश

करण्यास टपून बसले आहेत. या देशात मुळीच ऐक्यभावना नाही. खरे म्हणजे, याला एक देशही म्हणता येणार नाही.''

राधेचरण नदीच्या काठी गवतावर बसून राहिले. नाव आता त्यांच्या समोरून चालली होती. तिच्यात एक धिप्पाड इंग्रज बसलेला होता. त्याच्या केसांच्या टोपाची पावडर आणि तलवारीची मूठ चांदण्यात चमकत होती. मोन्शूरदादा धापा टाकीत नाव वल्हवीत होते.

राधेचरणांनी डोळे मिटून घेतले. नबाब अलीवर्दीखानाने मरताना तरुण सिराजला जवळ बोलावून सांगितले होते, "फिरंग्यांनी शहेनशाहांचा देश आणि त्यांच्या प्रजेची धनदौलत आपसात वाटून घ्यायला सुरुवात केलीय. त्यांचं सामर्थ्य फार प्रचंड आहे. त्यांना किल्ले आणि फौजा मिळू देऊ नकोस. नाहीतर सारा देश त्यांच्या ताब्यात जाईल.'' त्यावेळी चोवीस वर्षांचा सिराज मुर्शिदाबादेत होता. त्याचा अपमान करण्यासाठी फिरंग्यांनी त्याला कासिमबाजारच्या व्यापारी वखारींमध्ये प्रवेश करण्यास बंदी केली होती. त्याने आपल्या राज्यातील त्या व्यापाऱ्यांना कर माफ केला होता. परंतु खुद्द नबाबाच्या राज्यातून जो माल येई त्याच्यावर इंग्रज जबरदस्त कर घेत होते. कलकत्त्याच्या पाडावानंतरही सिराजने इंग्रजांच्या अभिवचनांवर विश्वास ठेवून त्यांना क्षमा केली होती. राधेचरणांचे वडील या सर्व युद्धांमध्ये सिराजच्या बरोबर राहिले होते. इंग्रजांनी हुगळीत लुटालूट केली तेव्हा सिराजने त्यांना लिहिले, "तुम्ही माझ्या प्रजेवर काय हा अत्याचार चालविला आहे! तुम्ही स्वतःला ख्रिस्ती म्हणविता. अजूनही तुम्ही केवळ व्यापारी म्हणून राहाण्यात समाधान मानणार असाल तर मी मागील साऱ्या सवलती तुम्हांला देईन. कारण युद्धामुळे फक्त नाशच होईल. तुम्ही माझ्याशी शांततेचे तह करता आणि तरीही हल्ले चालू ठेवता.'' सिराजने पुढे लिहिले, "मराठ्यांचा पवित्र बायबलशी काही संबंध नाही; तरीही ते आपल्या वचनांना चिकटून आहेत. आणि तुम्ही मात्र परमेश्वर व येशू ख्रिस्त यांच्या शपथा घेऊनही आपले वायदे मोडता.''

यावर अॅडमिरल वॅटसनने उत्तर दिले होते. "तुमच्या देशात मी अशी आग पेटवून देईन की गंगेचे सारे पाणीही ती विझवू शकणार नाही. मी अशी आग भडकवून देईन...'' इतक्यात मशालींच्या झगझगीत प्रकाशाने बुढी गंगेच्या लाटा चकाकू लागल्या....साहेबाची नौका घाटाला लागली होती. राजा गिरीशचंद्र राय व त्यांची मित्रमंडळी स्वागतासाठी घाटावर हजर होती. राधेचरणांनी दचकून मान वर केली. त्या प्रकाशाने त्यांचे डोळे दिपले. ते अंगाभोवती उपरणे गुंडाळून सावकाश उठले आणि अंधारातून घराकडे निघाले.

## १३

पंचवीस वर्षे लोटली.

ढाक्याचे कारखाने ओस पडले होते! सबंध देशातील लोखंडाच्या भट्ट्या कधीच थंड झाल्या होत्या. हिंदी विणकरांच्या हाडांचे सापळे भारतातील माळरानांवरील उन्हांत चमकत होते. जे मुर्शिदाबाद शहर कधीकाळी क्लाइव्हला लंडनपेक्षाही मोठे व रुबाबदार वाटले होते ते आता वैराण झाले होते. कलकत्त्याची लोकवस्ती खूप वाढली होती. याच कलकत्त्याच्या अलीपूर रोडवर सिल हावर्ड अॅश्ले याच्या टोलेजंग इमारती उभ्या होत्या. सिल हावर्ड अॅश्ले आता पन्नास वर्षांचा झाला होता. बारा गावचे पाणी पिऊन तो इरसाल कावेबाज बनला होता. तो जॉन कंपनीचा महत्त्वपूर्ण आधारस्तंभ व अवधच्या बादशाहाचा लंगोटीयार मित्र होता. यावेळी आपल्या शिकारी कुत्र्यांशी 'हॅलो हॅलो' करून रोजच्या प्रथेप्रमाणे उघड्या पालखीतून हवा खाण्यासाठी जाण्याच्या विचारात होता. त्याच्या डॉक्टरांनी त्याला प्रकृतीची काळजी घेण्यास बजावले होते. त्याने श्रम कमी करावेत, मन शांत ठेवावे, कमी खावे व मद्यपान त्याहीपेक्षा कमी करावे, रोज नियमाने मोकळ्या हवेत फिरून यावे, नाहीतर त्याची धडगत नाही, असे त्यांनी सांगितले होते. डॉक्टराच्या या उपदेशाचे त्याला हसू आले; आणि आपण खरोखरीच निकृष्ट प्रतीचे आहोत, याविषयी त्याची खात्री पटली. निकृष्ट, यशस्वी, श्रीमंत, सामान्य दर्जाचा असा माणूस जेव्हा वयाची पन्नाशी गाठतो तेव्हा त्याचे वैद्य-डॉक्टर त्याच्या मागे-पुढे धावू लागतात.

इतक्यात काही नोकर आपल्याकडे येत असल्याचे त्याला दिसले. त्याबरोबर आपल्या चेहऱ्यावर 'बड्या साहेबा' चे गांभीर्य आणून तो पालखीत जाऊन बसला. टपाल घेऊन आलेले ते जासूद गव्हर्नमेंट हाउसमधून आले होते. आपल्या कारकुनाच्या द्वारे त्याला काही कागदपत्रे लखनौच्या रेसिडेंटकडे पाठवावयाची होती. बंगालची परिस्थिती काही ठीक नव्हती. अनेक जिल्ह्यांतील मुसलमान शेतकऱ्यांनी अवधच्या काही बंडखोर मौलवींच्या नेतृत्वाखाली डोके वर काढले होते आणि ते धुमाकूळ घालू लागले होते. अवधच्या बादशाहापर्यंत ही कागदपत्रे जाऊन पोचणे आवश्यक होते. दंगेखोरांचे पारिपत्य करण्यासाठी त्याला नदिया जिल्ह्यातही जावयाचे होते. नदिया...गव्हर्नमेंट हाउसमधून आलेल्या त्या सरकारी पत्रात हे नाव वाचल्यानंतर त्याच्या अनेक आठवणी जाग्या झाल्या. नावे आणि शब्द यांची हीच तर मोठी कटकट असते. प्रत्येक गोष्टीचा दुसऱ्या कोणत्यातरी गोष्टीशी संबंध असतो. सारे जग, सारे

विश्व त्याला काही ना काही कथा सुनावल्यासारखे सोडायला तयार नव्हते. त्याने आपली कथा कोणाला सांगावयाची ?

पत्रावर सही करून जासुदांना रवाना केल्यावर तो पुनः फिरायला जाण्यास तयार झाला. आकाशात ढग गोळा झाले होते. समोर रस्त्यातून काही काळे, कृश, मरतुकडे लोक एक तिरडी घेऊन 'हरि बोल! हरि बोल!'चा अंगावर शहारे आणणारा गजर करीत भरभर पावले उचलीत स्मशानाकडे चालले होते. सिरिल क्षणभर थरारला. त्याने प्रेतयात्रेतील एका माणसाला हलकेच विचारले,

"कुणाची शवयात्रा आहे ही ?"

"ढाक्याच्या राधेचरण बाबूंची !"

सिरिल दचकला. राधेचरण हे तर सुजाताच्या बापाचे नाव होते.

सुजाता कोण होती ?

जगात हजारो राधेचरण असतील...शिवाय त्याने सुजाताच्या बापाला कधी पाहिलेही नव्हते. तो कधी-कधी आपल्या मुलाला भेटण्यासाठी आपल्या गावाहून कलकत्त्याला येत असे, आणि भलताच चक्रम व रागीट म्हातारा होता, असे त्याने ऐकले होते.

आपल्या डोकीवरील टोपी काढून सिरिल रस्त्याच्या कडेला एका बाजूस उभा राहिला. प्रेतयात्रेबरोबर असणाऱ्या लोकांना ते दृश्य पाहून आश्चर्य वाटले...जिवंत बंगाल्यांना बुटाच्या लाथा हाणणारा हा इंग्रज अधिकारी एका मेलेल्या बंगाल्याचा असा सन्मान का बरे करीत असेल ?

बिचारे राधेचरण बाबू ! काही क्षणांसाठी जिवंत होऊन त्यांनी हा आपला सन्मान पाहावयास हवा होता.

शवयात्रा पुढे गेली. 'हरि बोल! हरि बोल!'चा आवाज मंद होत वातावरणात विलीन झाला. भोयांनी अदबीने विचारले, "साहेब, कुणीकडे जायचं ?"

सिरिल पुनः पालखीत जाऊन बसला आणि म्हणाला, "कुठंही चला."

त्याने जीवनातील चढउतार पाहिले होते. मृत्यूचा नंगा नाचही पाहिला होता. जगातील प्रत्येक परिस्थितीचे प्रत्येक पैलूतून निरीक्षण केले होते. माणसे कशी जगतात, कशी मरतात, हे सारे गौडबंगाल काय आहे ? एका नेटिव्ह कवीने म्हटले होते,

> गहरी नदिया, अगम जल, जोर बहुत है धार ।
> खेवट से पहले मिलो, जो उतरा चाहो पार ॥

नदी खोल आहे, पाणी अथांग आहे, प्रवाहाला भयंकर ओढ आहे. तुला पैलतीराला जायचे असेल तर आधी नावाड्याला भेट.)

नावाडी कोठे होता ? आणि त्याला भेटायला सवड कोणाला होती ? परंतु आत्म्याला संत्रस्त करून सोडणारी ही रुखरुख कित्येक वर्षांपासून त्याच्या जिवाला लागून राहिलेली होती. कोणत्याही काळात, कोणत्याही परिस्थितीत ती त्याची पाठ सोडीत नव्हती. जीवनाकडून त्याच्या ज्या काही आशा-आकांक्षा होत्या त्या साऱ्या पूर्ण करून जीवनाने त्याच्यावर अपेक्षातीत मेहेरबानी केली होती. पण त्याने स्वतः जीवनाला काय दिले होते ? त्याने अस्वस्थपणे चोहोकडे पाहिले. हे सुंदर शहर, त्याची संपत्ती, त्याची लोकवस्ती सारे त्याच्या चरणांवर लोळण घेत होते. त्याला आपल्या भोवती माणसे उभी असून ती आपल्याला चिडवीत असल्याचा भास झाला. चौकात गेल्यानंतर भोयांनी खांदा बदलण्यासाठी पालखी जमिनीवर ठेवली. समोरच एक पोर्तुगीज गुत्ता होता. हुगळीचे ब्रिटिश व इटालियन नावाडी दरवाजावर धुडगूस घालीत होते. आतील बाजूस कोणीतरी जोरजोरात हार्प वाजवीत होते. एक बाई डोक्यावरून जाळीचा रुमाल पदरासारखा घेऊन तीक्ष्ण नजरेने त्याच्याकडे पाहात गुत्त्याच्या दरवाजात जाऊन पोहोचली.

"थांबा ! इथंच थांबा !" क्लिव जोराने ओरडून भोयांना म्हणाला. त्यांनी पालखी पुनः जमिनीवर ठेवली. क्लिव उडी मारून धावतच त्या बाईच्या पाठोपाठ गेला. कलकत्त्यातील या गलिच्छ युरोपियन गुत्त्यात शिरताना लोकांनी आपल्याला पाहिले तर ते काय म्हणतील, याचाही त्याला विसर पडला.

गल्ल्यावर पिवळसर रंगाचा व निस्तेज डोळ्यांचा एक युरोपियन बसला होता. क्लिवला पाहताच तो गडबडला. तो चटकन उभा राहिला. भीतीमुळे जणू त्याची दातखिळीच बसली. "सर...सर... !" त्याच्या तोंडून याखेरीज दुसरा शब्दच बाहेर पडेना.

क्लिव निमूटपणे त्याच्याकडे पाहात राहिला. साऱ्या जगातील गुत्त्यांच्या गल्ल्यांवर बसणारे हे मालक किती रहस्यमय दिसतात ! त्या सर्वांची एक वेगळीच मूक जातजमात असते. उडाणटप्पू, चोर, खिसेकापू, मवाली आणि वेश्या यांचे हे एक वेगळेच उदास जग असते.

इतक्यात ती मघाची बाई जोरजोराने बोलत, भराभर पावले टाकीत, एका लाकडी जिन्यावरून खाली उतरली. एव्हाना दोन इंग्रज नावाडी आरडाओरडा करीत आत आले होते. त्यांच्याबरोबर दोन अत्यंत सुंदर युरेशियन पोरी होत्या. त्यांच्यापैकी एक पोरगी जोरजोरात हसत होती.

त्या मुलीच्या चेहऱ्यावर क्लिवला स्वतःचे डोळे दिसले. तो गडबडून उठला. "कुठं चाललात, क्लिवसाहेब ?" ज्या बाईच्या मागून तो आत गेला होता तिने अचानक पुढे होऊन दारातच त्याला अडवीत विचारले. तिच्या कानातील झुमके हलत होते आणि ती अगदीच वाह्यात दिसत होती. दरवाजाच्या चौकटीला टेकून ती थंडपणे क्लिवकडे

निरखून पाहू लागली. "स्लिमसाहेब, आपल्या मुलीला भेटून जा. तुम्ही मला कलकत्याला बोलावलं होतं ना? मी गेली पंचवीस वर्षे तुमची वाट पाहाते आहे. ती पोर चार वर्षांची असताना तिला घेऊन मी मद्रासहून इथं आले. परंतु तुमच्या चौकीदारांनी मला आजपर्यंत तुमच्या बंगल्यात शिरू दिलं नाही. मी काय करणार? तुम्ही तर माझ्या एकाही पत्राला उत्तर दिलं नाही. आम्हा लोकांचं जीवन कसं असतं ते तुम्हांला पाहायचं होतं ना? पाहून घ्या. ते असं असतं!

"स्लिमसाहेब, तुम्ही तर बंगाल सरकारचे फार मोठे अधिकारी आहात. माझ्यासाठी थोडीफार आर्थिक तरतूद तुम्ही करून द्या. नेटिव्ह बायकांवर तुम्ही फार-फार मेहेरबानी केलीय, असं ऐकते. मी तर काही अंशी तुमच्या स्वतःच्याच जमातीतली आहे."

स्लिमच्या अंगाला दरदरून घाम सुटला. त्याला वाटले, आपल्याला आता हृदयविकाराचा झटका येणार आणि आपण इथल्या इथे मरून पडणार. याच वेळी समोरून एक घोडागाडी पसार झाली. तिच्यात 'कलकत्ता क्रॉनिकल'चे काही पत्रकार बसले होते. त्यांना पाहताच त्याचे उरलेसुरले अवसानही गळून गेले. त्याचा चेहरा पांढराफटक पसरलेला पाहून त्याचा चोपदार धावत त्याच्याजवळ येऊन म्हणाला, "साहेब, आपल्याला बरं वाटत नाही. चला!" स्लिम पुनः पालखीत जाऊन बसला.

मारिया टेरेसा कमरेवर हात ठेवून दरवाजातून त्याला पाहात राहिली. आणि नंतर आत निघून गेली.

"हुजूर, घरी जायचं?" भोयांनी विचारले.

घर? त्याचे घर कोठे होते? "अंऽई! बागेतल्या बंगल्यात चला." त्याने रागाने सांगितले. बागेत गेल्यावर पुढे काय करावयाचे, हे ठरविता येईल.

पालखी चालू लागली.

"जल्दी!...और जल्दी!" त्याने भोयांना धमकावले. जीवनाचा सारा पट त्याच्या नजरेसमोरून धावू लागला. जीवन जणू चोहोबाजूंनी झिरझिरीत कागद लावलेल्या फिरत्या आकाशदिव्यासारखे होते. त्या दिव्यात तो स्वतः बंदिस्त झालेला होता. सभोवतालच्या कागदांवर रंगीबेरंगी चित्रे होती. त्या चित्रांचे त्याला भय वाटत होते. गव्हर्नमेंट हाउसमधील सहकारी, फोर्ट विल्यम कॉलेजातील शिक्षक व शैलीकार गद्य लेखक, एशियाटिक सोसायटीचे संशोधक, अवधचे उर्दू कवी व कलाकार, इतकेच काय पण लखनौची चंपाबाई—हे सगळे मिळूनही त्याच्या आत्म्याची व्यथा दूर करू शकत नव्हते.

त्याच्या आत्म्याची व्यथा-वेदना काय होती? स्त्रिया? मुळीच नाही? स्त्रियांच्या प्रभावाने त्याला कधीच अस्वस्थ केले नव्हते. यशस्वी, समाधानी पुरुषांच्या जीवनात एक खास कप्पा असतो. तो कोमलांगी स्त्रियांसाठी राखून ठेवलेला असतो. त्यांचे

प्रेम, त्यांची अपयशे, रोमान्स, गृहस्थ-जीवनातील हर्ष-विषाद—या साऱ्या गोष्टी 'स्त्रिया' अशी पाटी लावलेल्या कप्प्यात भरलेल्या असतात. सिल ॲश्लेने जगाकडे प्रथम कवीच्या दृष्टिकोणातून पाहिले होते. आता तो कवीच्या ऐवजी एक यशस्वी गृहस्थ झाला होता. त्याच्या आत्म्याची व्यथा व वेदना ही होती की तो कोणावर प्रेम करू शकला नव्हता. ज्या देशाने आपले सर्वस्व त्याच्या चरणांवर वाहिले होते, ज्या स्त्रियांनी वेगवेगळ्या काळी त्याच्यावर प्रेम केले होते त्यांना तो आपले प्रेम देऊ शकला नव्हता. सिल ॲश्लेने जगाकडून सर्व काही घेतले, परंतु त्याच्या बदल्यात त्याने जगाला मात्र काहीच दिले नव्हते. ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट होती. त्याच्या काळी धर्माचा जोर असता तर तो कदाचित परमेश्वराला शरण गेला असता. परंतु जग तर बुद्धिवाद, विज्ञान व भौतिकता यांच्याकडे चालले होते. बँक ऑफ इंग्लंड ही चर्च ऑफ इंग्लंडपेक्षा अधिक महत्त्वाची संस्था होती. आणखी पैसा, आणखी व्यापार, शासन, सत्ता, अधिक बढती व अधिकार—हा होता जीवनाचा अर्थ...आपल्या गार्डनहाउस-मध्ये जाऊन त्याने त्या आठवड्याचे टपाल पाहिले. थोडा वेळ झोप काढली. नंतर हुक्क्याचे झुरके घेऊन तो पुनः कचेरीत जाण्यास तयार झाला. अंतःकरण भकास झाले होते; परंतु कर्तव्य, न्याय, कायदा वगैरे गोष्टींकडे लक्ष देणेही तितकेच आवश्यक होते. त्याने नेहमीप्रमाणे वैयक्तिक दुःखाला गुंडाळून टाकले. कर्तव्य त्याला बजावून सांगत होते की, "नदिया जिल्ह्यात जाऊन, बंडखोर शेतकऱ्यांचे पारिपत्य कर." आणि इकडे अंतःकरणाचा भकासपणा सांगत होता, "लखनौला चल. तिथल्या दरबारी विलासात सारी दुःखं बुडून जातील."

कोट घालून तो पुनः पालखीत बसला; आणि चौरंगीकडे निघाला. तेथेच त्याची कचेरी होती.

## १४

तरुण बंगाली कारकुनाने मान वर करून त्याच्याकडे पाहिले. आतापर्यंत तो समोरच्या फाइलींमध्ये डोके खुपसून बसला होता. त्याचे कुरळे केस त्याच्या कपाळावर आले होते. टेबलावर सगळीकडे मळकट कागदांचा ढीग पसरलेला होता. बाहेर व्हरांड्यात उडिया पोऱ्या डुलक्या घेत-घेत पंख्याची दोरी ओढीत होता. सिल येत असलेला पाहून तो गडबडीने ताठ झाला आणि जोरजोरात पंखा हलवू लागला.

"गुड आफ्टरनून, सर!" त्या तरुणाने खुर्चीवरून उठत हलक्या स्वरात अभिवादन केले.

"गुड आफ्टरनून! नाव काय तुझं?"

"गौतम नीलांबर दत्त, सर!"

"मी तर तुला यापूर्वी कधी पाहिलं नव्हतं."

"कालच प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटच्या कचेरीतून माझी इथं बदली झालीय."

"कधीपासून नोकरी करतो आहेस? वय तर तुझं फारच लहान दिसतंय." सिल्ने कुतूहलाने विचारले. नेटिव्ह लोकांशी सलगीने वागण्याची त्याची ही पद्धत एकेकाळी कॉर्नवालिसला मुळीच आवडत नसे. कारण जॉन कंपनीच्या हातात राजकीय सत्ता आल्यापासून कॉर्नवालिसने सारे धोरण बदलून टाकले होते. आता इंग्रज शासक होते आणि हिंदी लोक शासित. त्यांनी कोणत्याही परिस्थितीत नेटिव्ह लोकांना बरोबरीच्या नात्याने वागविणे योग्य नव्हते. हेस्टिंग्ज बहादुराचा काळ आता राहिला नव्हता. परंतु सिल हा 'ओल्ड स्कूल'चा 'नबाब' होता. तो कलावंतिणींच्या नाचगाण्यांना हजर राही. अवध रेसिडेन्सीत राहिल्यामुळे त्याच्यावरील भारतीयत्वाचा रंग जास्तच गडद झाला होता. त्याला कॉर्नवालिसची आठवण झाली.—गुड ओल्ड कॉर्नवालिस! बिचारा गाझीपूरला गेला आणि पटकीला बळी पडला. एव्हाना त्याची हाडे देखील थडग्यात सडून त्यांची माती झाली असेल. मृत्यूच्या कल्पनेने सिलच्या जिवाचा थरकाप उडाला. त्याने एक क्षणभर डोळे मिटून घेतले आणि नंतर त्या बंगाली कारकुनाकडे पाहात त्याला विचारले, "तुझं शिक्षण कुठं झालं?"

"बनारसच्या संस्कृत कॉलेजात आणि इथं"—त्याने उत्तर दिले "कलकत्ता कॉलेजातून मी एफ. ए. झालोय. आता बी. ए. करण्याची इच्छा आहे"

"मोठी आनंदाची गोष्ट आहे." सिल मनापासून खूष होऊन म्हणाला. "ऑफिसच्या वेळाव्यतिरिक्तही मला भेटत जा." आणि तो आपल्या खोलीत निघून गेला.

* * *

काही दिवसांनंतर सिल्साहेबाने नीलांबर दत्ताला आपल्या खोलीत बोलावून घेतले. सिलसाहेब विचार-विनिमय करण्याच्या गोलमेजाभोवती बसलो होतो. चार गोरे साहेबही तेथे होते.

"तुला प्रवास करायला आवडतं?" सिलने विचारले.

"जी हाँ!"

"अवधच्या नबाबाच्या राज्यात कधी गेला आहेस?"

"मी बनारसच्या पुढं कुठंच गेलेलो नाही."

"काही महत्त्वाची कागदपत्रं लखनौच्या रेसिडेन्सीत घेऊन जायची आहेत. तुझ्याबरोबर सशस्त्र शिपायांची एक तुकडी राहील. मला स्वतःला जिल्ह्यांचा दौरा करायचा असल्यामुळं मी स्वतः जाऊ शकत नाही. घरी जाऊन सामानाची बांधाबांध कर. अखिलेशबाबूंना म्हणावं, जहाजात माझ्यासाठीं केबिनची व्यवस्था करा." सिलसाहेबाने फर्मावले.

"येस सर, थँक यू सर!" असे म्हणून तो परतपावली आपल्या जागेवर येऊन बसला. इतर साहेब निमूटपणे सिलकडे पाहात राहिले. ओल्ड सिल म्हणजे विचित्र माणूस आहे. नेटिव्ह लोकांशी अत्यंत कठोरपणाने वागतो आणि स्नेहही दाखवितो. आता हा नक्कीच या बंगाली पोऱ्याशी बंगाली कवितेवर चर्चा करणार!

* * *

कलकत्याहून बनारसला जाणाऱ्या जहाजाने अजून नांगर उचलला नव्हता. पावसाळा सुरू झाला होता आणि मुंगेर (मोंघीर) व पाटणा या शहरांपर्यंत गंगेने विशाल रूप धारण केले होते. गौतम नीलांबर प्रवासाची तयारी करून पाऊस थांबण्याची वाट पाहात होता. माणिकतल्लयात त्याचे लहानसे घर होते आणि तेथे तो एकटाच राहात असे. त्याचे आई-बाप, भाऊ-बहिणी सगळी शेती करीत होती. संध्याकाळ झाली होती. अंगणाच्या कोपऱ्यात रातकिडे किरकिरू लागले होते. रस्त्यांमध्ये पावसाचे पाणी साचले होते. वारा पडला होता. तो आपल्या घराच्या व्हरांड्यात चटई अंथरून, दिवा लावून एक जाडजड इंग्रजी ग्रंथ वाचण्यात तल्लीन झाला होता. तो अधूनमधून डिक्शनरीत शब्द पाहात होता. इतक्यात पावलांची चाहूल कानी पडली आणि शुभ्र साडी नेसलेली सुमारे चाळीस वर्षांची एक स्त्री त्याच्यासमोर येऊन उभी राहिली. तो झटकन उठला आणि नमस्कार करून म्हणाला, "काय आहे, माताजी? कोण हवंय तुम्हांला?"

"तुलाच भेटायचं होतं मला. तू सिलसाहेबांचा कारकून ना?"

"होय!"

"मी...मी सिलसाहेबांची पत्नी आहे."

"अस्सं!" त्याला आठवले. कचेरीत त्याने कोणाकडून तरी ऐकले होते की सिलसाहेबांच्या जनानखान्यात एक हिंदू स्त्री अनेक वर्षांपासून होती. तिला त्यांनी नुकतंच काढून टाकलंय."

"साहेबांचा तुझ्यावर फार विश्वास आहे. माझं एक काम करशील? तू लखनौला चालला आहेस ना?"

"होय, माताजी!"

"चंपाबाईचं नाव ऐकलं आहेस?"

"चंपाबाई!...ती कोण आहे?"

"लखनौची महशूर कलावंतीण आहे ती....साहेब जेव्हाजेव्हा लखनौला जातात तेव्हा तिच्यावर ते हजारो रुपये खर्च करतात. मला आता ते विचारीतही नाहीत. माझं असं जगात कुणीच उरलेलं नाही. म्हातारा बाप होता. तोही मरून गेला. भाऊ आपल्या धंद्यात गढून गेलाय. भावजय उठल्याबसल्या घालूनपाडून बोलते. म्हणते कशी, 'जा तू आपल्या फिरंग्याकडे!'" तिचे डोळे पाण्याने डबडबले. "मला एक मुलगी आहे. पण ती दहा वर्षांची होताच साहेबांनी तिला आपल्या बहिणीकडे लंडनला पाठवून दिलं. ती विलायतेहून परत आलीय, पण मला ती ओळखतसुद्धा नाही. आपली आई एक काळी स्त्री आहे, हे लोकांना सांगायलाही तिला लाज वाटते."

यावर आपण काय बोलावे ते गौतम नीलांबराला समजेना. साहेबाला एक मुलगीही आहे, हे त्याला माहीत नव्हते. "तुमच्या मुलीचं नाव काय?"

"मार्गारेट इझाबेला. पण मी तिला बेला म्हणत असे."

"तुम्ही खिस्ती झाला आहात?"

"नाही. परंतु बेला खिस्ती आहे आणि ती माझ्या धर्माचा अत्यंत तिटकारा करते. तू चंपाला सांग, म्हणावं, साहेबांचा नाद सोडून दे. लखनौहून आल्यानंतर तू मला भेटशील ना? तू चंपाला काय सांगितलंस ते मला येऊन सांगशील ना?"

"मी तुम्हांला अवश्य भेटेन, माताजी!" गौतम नीलांबर म्हणाला. नंतर तो तिला पोहोचविण्यासाठी दारापर्यंत गेला. "तुमची पालखी कुठं आहे?"

"मी पायीच आले होते. माझी काळजी तू करू नकोस." गल्लीतील अंधारात तिची पांढरी साडी थोडा वेळ चमकत राहिली. नंतर वळणावर वळून ती दिसेनाशी झाली.

## १५

लखनौच्या रूमी दरवाजावरील सकाळची नौबत लौकरच सुरू होणार होती. चौकाचौकांतून व बाजार पेठेतून हालचाल सुरू झाली होती. अमीर उमरावांच्या वाड्यांभोवतालच्या बागांची साफसफाई चालू झाली होती. मोलकरणी आपसात गप्पागोष्टी करण्यात रंगून गेल्या होत्या. रस्त्याच्या कडेला भांग, गांजा, तंबाखू, पानपट्टी वगैरेची दुकाने चालविणाऱ्या बायांनी आपापल्या दुकानांची मांडणी चालविली होती. मैदानात

लष्कराच्या पलटणींची कवायत चालली होती. तेलंगी, मद्रासी, हबशी, राजपूत शिपाई शाही महालांसमोर खडा पहारा देत होते. रमण्याच्या बनात पक्षी चिवचिवाट करीत होते. गोमती नदीच्या काठी नावा बांधलेल्या होत्या. अजून नावा सोडायला अवकाश होता. श्रावणाचे तपकिरी ढग आणि सभोवतालची हिरवी वनश्री यामुळे गोमतीही हिरवा शालू नेसल्यासारखी दिसत होती. हयात बख्श, टेढी कोठी, सिंघाडेवाली कोठी, खुर्शीद मंजिल या सर्व महालांवर ढग भरून आले होते. बागांमध्ये टपटप आवाज करीत पाण्याचे थेंब खाली पडत होते. वृक्षराजींमध्ये हिंदोळे टांगण्यात आले होते. लखनौ शहर श्रावणाच्या स्वागतासाठी तयार झाले होते.

थोड्या वेळानंतर दुपारची नौबत वाजली. खाणावळी चालविणाऱ्या बाया कामात गढून गेल्या. लोक आपापल्या कारखान्यांतून दुपारच्या जेवणासाठी बाहेर पडले. दिवाणखान्यात जेवणाच्या चादरी अंथरण्यात आल्या. बेगमांनी वाळ्याच्या पडद्यांआड सारीपटाचे डाव मांडले. दासी व मोलकरणी पानदाने उघडून बसल्या. मुली आपल्या साड्या रंगविण्यात गढून गेल्या. चुलींवर कढया चढविण्यात आल्या.

तिसऱ्या प्रहराची नौबत झडली. दिवस कलू लागला. रमण्यामध्ये हरणे बागडू लागली. चिरैया तलावावर ढग उतरले. मोती महालावर पावसाची एक लहानशी सर बरसून गेली.

आणि मग चौथा प्रहर आला. सूर्य अस्ताला निघाला. वातावरणात सुगंध दरवळू लागले. अवधची संध्याकाळ आपला थाटमाट करू लागली. नाना प्रकारच्या सुगंधानी सारे शहर भरून गेले. पाणी शिंपडल्यामुळे सुटलेला मातीचा सुगंध, गंध्यांच्या दुकानांतून बाहेर पडणारा सुवास, कनोजच्या मोगऱ्यांचा व जौनपूरच्या गुलाबांचा सुवास, मंदिरांतून उठणारा धुपाचा दरवळ, बादशाहाच्या महालातून वाहाणाऱ्या अत्तरांच्या नद्यांचा सुगंध. गल्लीबोळांतील खिडक्या व दरवाजे उघडू लागले. गल्लीबोळांतून संगीताचे सूर घुमू लागले. रूपवती माळणी, जहांबाज तांबोळिणी, हजरजबाबी कोळणी, श्रावणगीते व लावण्या गात फिरत होत्या. गल्लीतील मुले दांडपट्टा व गोट्या खेळत होती. नदीच्या काठी बसलेले गोसावी तुताऱ्या फुंकत होते. हलवाई पुऱ्या तळत होते. मुली पक्वान्ने तयार करीत होत्या. प्रत्येक जण आपापल्या कामात मग्न होता.

लोकहो, मजा करा, कारण जग नश्वर आहे. तुमच्या नशिबात किती दिवस चैन करण्याचे लिहिले आहे, हे कुणी सांगावे ? आपल्यासारखेच इतरही काही आपल्या-बरोबर आहेत, ही गनीमत समजा. उद्या काय होईल कोण जाणे ! "कूच नक्कारा साँसका बाजत है दिन रैन !" शेवटी फक्त परमेश्वरच उरणार आहे. तो दूर कोठेतरी बसून आपल्या लीलेचा खेळ दाखवीत आहे. तो कोणत्याही क्षणी आपले बोट वर करून म्हणू शकतो की, "बस्स, आता खेळ खलास !"

हे असहाय मानवांनो! तुम्ही सारे एका कोळ्याच्या अदृश्य जाळ्यात गुरफटले आहात. त्या कोळ्याला तुम्ही ओळखत नाही, कारण तुम्ही ज्यात अडकले आहात ते जाळे अदृश्य आहे. बिचाऱ्या मानवांनो!...

ही जी माणसे रस्त्यांतून चालली आहेत त्यांनी जगण्याची पद्धत शिकून घेतली आहे. हे फार महत्त्वाचे लोक आहेत कारण ते एका मोठ्या संस्कृतीचे प्रतिनिधी आहेत. अठराव्या शतकातील फ्रान्सप्रमाणे त्यांनी जीवनकलेला परमोच्च शिखरावर नेऊन पोहोचविले आहे. ही नावे, ही रूपे फार महत्त्वाची आहेत. शुजाउद्दौला, बहू बेगम बेनी बहादुर, टिकैत राय आणि अवधचे हे सारे रहिवासी—हे स्वतः कधी दुःखी होत नाहीत व इतरांनाही दुःखी करीत नाहीत. हजारो वर्षांपासून घाघरा आणि गोमती नद्यांच्या काठी एका विशिष्ट पद्धतीने राहात आले आहेत. श्रीरामचंद्राच्या काळीही हे लोक होते आणि शुजाउद्दौलाच्या काळातही हेच लोक नांदत होते. हे शेतकरी आणि बैरागी. नदीच्या काठी तो पाहा एक नंगा बैरागी धुनी पेटवून बसला आहे. तो आपल्या सहकाऱ्यांसह शुजाउद्दौलाच्या सैन्यात सामील होऊन बक्सरला इंग्रजांशी लढला होता. हे शांतताप्रिय शेतकरी आपल्या प्रदेशाचे रक्षण करण्यासाठी नबाबाचे सैनिक म्हणून मराठ्यांशी लढले होते. नेहमी आनंदी असणारे हे गुराखी व गवळी अजीमाबादपर्यंत जाऊन इंग्रजांशी दोन हात करून आले होते.

शुजाउद्दौल्याच्या प्रचंड सैन्याला घाबरून इंग्रजांनी पस्तीस हजाराहून जास्त सैन्य न ठेवण्याचे कबूल केले होते. परंतु नेहमीच्या पद्धतीप्रमाणे त्यांनी आपले वचन मोडले होते. फैजाबादचा शुजाउद्दौला निधन पावला तेव्हा मरताना त्याच्या मनाला ही गोष्ट डाचत होती की आपण इंग्रजांना या देशाबाहेर हाकलू शकलो नाही. शुजाउद्दौला हा महादजी शिंद्यांचा पगडीभाई झाला होता. आता ही नावे म्हणजे सकाळ होता होता संपणाऱ्या कहाणीसारखी झाली आहेत. म्हणूनच बहुधा त्यांनी कथाकथनाची कला इतकी विकसित केली होती. कथा सांगता सांगता आपण स्वतःच कथारूप बनून जावे, अशीच जणू त्यांची इच्छा होती.

लखनौ पऱ्यांच्या नगराप्रमाणे झळकत आहे. या ओळखीच्या गल्ल्या, रस्ते, आळ्या, मोहल्ले, पेठा, बागा, चौक—सगळीकडे रोषणाई, गजबज, उल्हास आहे. हा मच्छीभवन किल्ला आहे, ही मझालखानाची धर्मशाळा आहे, आसिफउद्दौल्याचा जानी दोस्त राजा झाऊलाल याचा हा पूल आहे.

जरा थांबा! होय, हिंदू दुकानदार ज्याचे नाव घेऊन आपली दुकाने उघडतात तोच हा आसफउद्दौला. 'जिसको न दे मौला, उसको दे आसिफउद्दौला' (ज्याला देवही देणार नाही, त्याला आसिफउद्दौला देईल.) अशी म्हणच त्याच्या नावावरून पडली आहे.

हे शहर अयोध्या व बनारसच्या प्राचीन संगीताचे रक्षण करणारे आहे. येथील भैरवी देशभर प्रसिद्ध आहे. व्रजभूमीचे रासधारी रामलीला करून दाखवितात. ब्राह्मण नर्तक घुंगरूंच्या आवाजावर नाचत आहेत आणि त्याच वेळी सभोवताली सर्वत्र मृत्यूचे घुंगरू वाजत आहेत. गेल्या सत्तर ऐंशी वर्षांपासून हे नाटक फैजाबाद व लखनौ यांच्या रंगभूमीवर खेळले जात आहे. या पात्रांचे महत्त्व बाहेरच्या लोकांना कळणार नाही. अवधच्या सर्व रहिवाशांनी मिळून या जगाची निर्मिती केली आहे. त्यामध्ये गरीब श्रीमंत, स्त्रीपुरुष सर्वजण आहेत. ठाकुर इमामबक्ष, लाला हुसैनबक्ष, मिर्झा मेंदू, नबाब कम्मन, इमामन महरी, मिर्झा जंगली, सुखक्चन लौंडी व नबाब वसंती बेगम यांसारखी त्यांची नावे आहेत. बत्तासे व कवड्या यांवर नाचणारे कथ्थक, काश्मिरी खुषमस्करे, जलतरंगवादक, वीणावादक, वाजपेयी ब्राह्मण, तबलजी, कवी, शोककाव्यगायक, गोष्टी सांगणारे, कायस्थ, सैनिक, फाकडे, चंडूचरस पिणारे, भगत, नकलाकार, बहुरूपी, विद्वान, कलावंत सर्वांचा त्यात समावेश आहे. येथे वीररस आणि शृंगाररस जोडीने वाहातात. हे खरे शृंगारिक सामाजिक जीवन आहे.

लखनौहून सत्तर मैल दूर बंगला फैजाबाद आहे. फैजाबाद म्हणजे रामाची नगरी अयोध्या. शुजाउद्दौलाने ही नगरी दिल्लीच्या तोडीची बनविली होती. तेथे गुलाबवाडी आहे, घागरा नदीवरील घाट आहेत आणि बड्या मोंगलांच्या काळातील मशिदी आहेत. दिल्लीत आता बिचारे छोटेछोटे मोंगल उरले आहेत. ते हास्यास्पद छोटेछोटे मोंगल वणवण भटकत आहेत. त्यांना आरामात डोके टेकायला जागा मिळत नाही.

येथे हिंदूमुसलमानांत काही भेद आहे असे कोणालाच वाटत नाही कारण गढीचा ठाकूर आणि महालातील नबाब हे दोघेही सरंजामशाहीच्या दृढ नात्याने एकमेकांशी बांधले गेले आहेत. आणि हिंदू व मुसलमान शेतकरी असलेली त्यांची प्रजा त्यांच्या शिपायांकडून एकाच प्रकारच्या लाठीचे तडाखे खात आहे.

धार्मिक वेगळेपणा ही प्रजेची शुद्ध खाजगी बाब समजली जाते. मोहरममध्ये दंगे होत नाहीत किंवा मशिदींसमोर वाद्येही वाजविली जात नाहीत. हिंदू ताबूत बनवितात आणि मुसलमान दिवाळी साजरी करतात. कसा विपरीत काळ आहे पाहा. नबाब बहूबेगम दरसाल होळी साजरी करण्यासाठी फैजाबादहून आपल्या मुलाकडे लखनौला येते. सबंध राज्यात असंख्य हिंदू राजांनी मशिदी व इमामवाडे बांधले आहेत. स्लिल ॲश्लेचा मित्र बिशप हेबर आणि त्याचे सहकारी आजकाल या देशात सर्वत्र हिंडून आपली प्रवासवर्णने लिहीत आहेत. ते लिहितात, "या देशातील हिंदूमुसलमान एकमेकांच्या जिवावर उठले आहेत. अशा परिस्थितीत वेस्टमिनिस्टरमधील आमच्या सरकारने या जंगली जमातींना त्यांच्या अज्ञानातून व जातीयवादातून मुक्त करण्यासाठी लौकरात

लौकर जास्तीत जास्त बायबले व त्याचबरोबर बंदुका पाठविल्या पाहिजेत."

आपल्यासाठी बंदुकांनी भरलेली जहाजे कलकत्याला पोहोचत आहेत याची बिचाऱ्या लखनौच्या लोकांना काहीच कल्पना नाही. आगा मीर हे शाहे जमनचे पंतप्रधान आहेत. शहरात संपूर्ण शांतता आहे. ही अबुल मुजफ्फर मोअजुद्दीन शाहे जमन गाजीउद्दीन हैदर यांची राजधानी आहे.

बाजारपेठेत खांद्याला खांदा घासला जात आहे. मालाची विक्री करणारे आपल्या काव्यपूर्ण शैलीत आपल्या मालाची जाहिरात करीत आहेत. दुकानांतून साऱ्या जगातला माल भरलेला आहे. सआदत अली खानाच्या काळी बांधण्यात आलेल्या इमारतींमध्ये हास्याचे आवाज दुमदुमत आहेत. येवढे सौंदर्य व उमदेपणा किती काळ टिकणार?

सौंदर्य नश्वर आहे. शाक्यमुनी सिद्धार्थ गौतमांनी एकदा वाराणसीच्या मृगदाव-(सारनाथ)मध्ये सांगितले होते. "सर्व काही नश्वर आहे. नश्वरतेपासून अलिप्त राहा. दुःखापासून स्वतःला वाचवा. छायेच्या कचाट्यात सापडू नका." रामचंद्रांची अयोध्या, प्रसेनजिताची श्रावस्ती, चंद्रगुप्ताचे पाटलीपुत्र, हुसैन शर्कीचे जौनपूर आणि अलाउद्दीन हुसैनचे गौड या शहरांमध्येही जीवनाचे सौंदर्य पराकाष्ठेला जाऊन पोहोचले होते हे विसरू नका आणि त्याचबरोबर प्रत्येक सौंदर्यात मृत्यू दडलेला असतो याचाही विसर पडू देऊ नका.

रस्त्यावरून एक मेणा चालला आहे. चंचल दासी त्याचा गोंडा हातात धरून त्याच्याबरोबर धावत आहे. भोयांचे गणवेष लाल रंगाचे आहेत आणि त्यांच्या लाल पगड्यांवर मासळीची सोनेरी चिन्हे आहेत. रस्त्याने जाणाऱ्यांच्या नजरा या मेण्यावर खिळल्या आहेत. हा त्या काळच्या सर्वांत सुंदर स्त्रीचा, चंपाबाईचा मेणा आहे. काळ ही मोठी विचित्र गोष्ट आहे. काळ, सौंदर्य व मृत्यू!

बागत जत्रा भरली आहे. इंग्रज रेसिडेंट बादशहाबरोबर न्याहारी करता करता समोर चाललेली हत्तींची साठमारी पाहात आहे. दरबारात प्रकाश कथ्थक नृत्य करीत आहे. आंब्याच्या बनात मल्हार आळवला जात आहे. या कोलाहलातून बाहेर पडणाऱ्यांच्या चिता स्मशानात धडधडत आहेत. बाजारात गोष्टी सांगणाऱ्यांनी आपली मैफिल जमविली आहे. विद्वान व विचारवंत यांच्या सभांतून वादविवाद चालले आहेत. मांगिष्ट लोक भांग घोटण्यात तल्लीन आहेत. सुरसिंगार, झांजा व पखवाज यांच्या कोलाहलात दुसरा कसलाच आवाज कानात शिरत नाही. कबरस्तानात कबरी खोदण्याचे काम चालू आहे.

नश्वर! नश्वर! सारे काही नश्वर आहे!

काळ नश्वरतेत बांधला गेला आहे.

काळाचे वेगळे भाग पाडण्यात आले आहेत. त्या भागांत त्याला बद्ध करण्यात आले आहे.

परंतु क्षणोक्षणी, पळापळाला तो ही बंधने तोडून गुपचूप पुढे निघून जात आहे.

आता रूमी दरवाजावर सूर्यास्ताचा नगारा वाजेल.

चार प्रहरांचा दिवस संपला आहे. चार प्रहरांची रात्रही अशीच निघून जाईल. प्रत्येक आठव्या घडीला तासाचे टोल वाजतात. माणसांची मिरवणूक आपापल्या कबरेत जात आहे.

काळ हा मृत्यू आहे.

## १६

आसिफउद्दौल्याच्या काळात उभारल्या गेलेल्या रूमी दरवाजावरील नगाऱ्याचा आवाज गौतम नीलांबराच्या कानांवर आला. त्यावेळी त्याची घोडागाडी शहराच्या नाक्यावर येऊन दाखल झाली होती. नाक्यावरील पहारेकऱ्याला त्याने आपला प्रवासपरवाना दाखविला. अवधच्या बादशाहाच्या शिपायाने विचारले, "कुठं जायचं आहे साहेब?"

"रेसिडेन्सीत!"

शिपायाने एक क्षणभर त्याच्याकडे निरखून पाहिले. "फिरंगी सरकारशी आपला संबंध दिसतो."

"होय!" तो काहीसा खजील होऊन उत्तरला.

"होय, बाबा!" दुसरा शिपाई म्हणाला, "खुदा या ना त्या रूपानं प्रत्येकाच्या पोटापाण्याची व्यवस्था करीत असतो. फिरंगी तर फिरंगी!"

यावर पहिल्या शिपायाने एक प्रसंगोचित शेर ऐकवला आणि गौतम नीलांबराकडे प्रशंसेच्या अपेक्षेने पाहिले. गौतम नीलांबर लहानपणी फारसी शिकला होता खरा परंतु या लोकांची अस्सल उर्दू काही त्याच्या डोक्यात शिरली नाही. मात्र देशात अजूनही जेथे नेटिव्ह बादशहांची सत्ता चालते अशी ठिकाणे आहेत, हे त्याला प्रथमच पाहावयास मिळाले. त्या कल्पनेने त्याला क्षणभर एक विचित्र आनंद झाला. त्याची घोडागाडी पुढे निघाली.

आता तो उपनगरांतून चालला होता. रस्त्याच्या कडेला काही गवळी, गरम राखेत गाकर भाजत होते. एका पिंपळाच्या वृक्षाखाली लाकडाचा एक ओंडका जळत होता. एक म्हातारा बैरागी धुनी पेटवून बसला होता. त्याच्या मागे भवानीचे देऊळ होते. त्या परदेशात आपली कालीमाता पाहून गौतमाला जणू नवे सामर्थ्य प्राप्त झाले.

रेसिडेन्सीत गेल्यावर त्याला असे समजले की साहेब, नबाब कमाल रजा बहादुर यांच्याकडे मेजवानीला गेले आहेत. त्याच्या आगमनाची सूचना अवध सरकारच्या माहिती विभागाला देण्यात आली. दुसरा जासूद गोलागंजमध्ये नबाब कमाल रजा बहादुर याच्या वाड्याकडे गेला.

नबाब अबुल मंसूर कमालुद्दीन अली रजा बहादुर नुसरतगंज हे जेवणखाण आटोपून रेसिडेंटाबरोबर सोंगट्यांचा डाव मांडून बसले होते. ते शहरातील एका मोठ्या खानदानी घराण्यातील गृहस्थ होते. कल्याणपूर व संदीला येथे त्यांची बरीच मोठी जमीनदारी होती. ते मोठे देखणे होते; आणि त्यांचा आवाजही गोड होता. शहरातील कलावंतिणी त्यांच्यावर फिदा होत्या. सोळाव्या वर्षीच त्यांचे लग्न करून देण्यात आले होते. आतापर्यंत असंख्य दासींशी मुत्ता म्हणजे मुदतबंदीची (हंगामी स्वरूपाची) लग्ने त्यांनी केली होती. आजकाल चंपाजान बाईवर ते जीव टाकीत होते. परंतु आता कलकत्त्याच्या खिजसाहेबाप्रमाणेच हा रेसिडेंटही या प्रेमप्रकरणात त्यांचा प्रतिस्पर्धी होऊ पाहात असल्याचे आढळून येत होते. या विचारात गढून गेलेले असतानाच ते सोंगट्यांची चाल कशी करावी याचाही विचार करीत होते. इतक्यात चोपदाराने येऊन सांगितले की, "कलकत्त्याच्या सरकारकडून एक बंगाली बाबू कागदपत्रं घेऊन आले आहेत. बेलीगार्डमध्ये ते भेटीसाठी थांबले आहेत."

रंगाचा भंग झाला. इतक्यात चंपा येणार होती. रेसिडेंटाला भयंकर राग आला. लॉर्ड ॲमहर्स्ट कलकत्त्याला गव्हर्नर जनरल म्हणून आल्यापासून त्याने आपल्या शिस्तीने व कार्यतत्परतेने रेसिडेंटाच्या नाकी नऊ आणले होते. दर दोनतीन दिवसांनी कलकत्त्याहून निरोप घेऊन कोणी ना कोणी येत असे. चंपाबाईच्या नाचात मन अडकले होते. परंतु कर्तव्यपरायणतेच्या भावनेने चंपाच्या आकर्षक रूपरंगाला दूर सारले. रेसिडेंटसाहेब लगेच बेलीगार्डला परतले.

"इथं चंपाबाई कुठं राहाते?" दुसऱ्या दिवशी गौतम नीलांबराने रेसिडेन्सीतील एका कारकुनाला विचारले. मुंशी हरिशंकर ओठातल्या ओठात हसले. छान! हे बंगाली बाबूही भलतेच रंगेल दिसतात. आम्हांला वाटले होते की हे नुसतेच खर्डेघाशी करीत असतील!

"तुम्ही चंपाबाईच्या कोठीवर जाऊ इच्छिता वाटतं?"

"होय!" नीलांबराने गडबडून उत्तर दिले. त्याचा चेहरा लाजेने लाल झाला. त्याची ती त्रेधातिरपिट पाहून मुंशी हरिशंकरांना मोठे आश्चर्य वाटले. कारण त्यांच्या त्या समाजव्यवस्थेत वेश्या व कलावंतिणी यांना फार महत्त्वाचे स्थान होते. ते अत्यंत प्रतिष्ठितपणाचेही समजले जाई. त्यांच्याअभावी सुसंस्कृत समाज अपूर्ण समजला जाई.

मुंशी हरिशंकरांनी नोकराकडून चंपाबाईला निरोप पाठविला की, "सिल्साहेबांचे कारकून तुम्हांला भेटू इच्छितात." चंपाबाईने कळविले, "अवश्य येऊ द्या."

संध्याकाळी मोगरा व वाळा यांचा सुवास हवेत दरवळला, जमिनीवर केवड्याचे व गुलाबाचे पाणी शिंपडण्यात आले, चौकात दिव्यांचा झगझगाट झाला. अशा वेळी गौतम नीलांबर दत्ताची उघडी पालखी चंपाजानच्या हिरव्या रंगाच्या तिमजली हवेलीसमोर जाऊन थांबली. फाटकावर गणवेषधारी चोपदार उभे होते. गौतम संकोचाने पालखीतून उतरला आणि अंगावरील शाल सावरीत जिन्याने वर गेला.

दिवाणखान्यात पुष्कळच लोक होते. जमिनीवरील सतरंजीवर पांढरी शुभ्र चादर अंथरलेली होती. शुभ्र छताला हंड्याझुंबरे लटकत होती. कोनाड्यांमध्ये काचेच्या विविध आकारप्रकारांच्या भांड्यांतून मेणबत्त्या तेवत होत्या. चौकाच्या बाजूला असणाऱ्या दालनावर गुलाबाचा वेल चढला होता. चोहोकडे पुरुषभर उंचीचे मोठमोठे आरसे लावलेले होते. त्या आरशांमध्ये गौतमाला अगदी विचित्र व अपरिचित चेहरे दिसत होते. असली माणसे त्याने यापूर्वी कधी पाहिली नव्हती. कोण होते हे लोक? कोठून आले होते? कोठे जाणार होते? येथे या सुगंधित दिवाणखान्यात ते किती वेळ बसून राहणार होते? त्यांच्या अंगात तलम मलमलीचे चुणीदार अंगरखे, गर्भरेशमी व ताफत्याच्या कापडाचे कळीदार पायजमे, डोक्याला घडीच्या व टोकदार टोप्या व मंदील होते. अंगावर भारी किमतीच्या शाली पांघरून ते आरामात लोडाला टेकून बसले होते. मोठ्या शिस्तीत व अदबशीरपणे बसून ते लोक अत्यंत औपचारिकपणे हलक्या आवाजात एकमेकांशी बोलत होते. एका कोपऱ्यात राजा शिवकुमार 'वफा' यांच्या कोणत्यातरी कवितेवर चर्चा चालली होती. दुसरीकडे काही मंडळी संगीतातील कोणत्यातरी मुद्द्यासंबंधी एकमेकांचे विचार समजावून घेत होती. नीलांबर दत्त क्षणभर संकोचाने दरवाजात उभा राहून ते दृश्य पाहू लागला. त्याने आपल्या जवळचा सर्वांत उंची अंगरखा घातला होता आणि त्याच्या डोक्यावर मंदील होता. परंतु त्याच्या एकूण रंगरूपावरूनच तो परदेशी असल्याचे स्पष्ट दिसत होते. प्रमुख स्थानी बसलेल्या नबाब कम्मन यांनी त्याला आपल्याजवळ बोलावून लोडाजवळ जागा करून दिली आणि ते त्याच्याशी इकडच्यातिकडच्या गप्पा मारू लागले.

"कलकत्त्याला जावं असं आम्हांलाही फार वाटतं. पण काय सांगावं, तो प्रवास मोठा जोखमीचा आहे." ते म्हणाले. ते सोनेरीरुपेरी रंगाची गुडगुडी ओढत होते. त्यांच्या सुंदर चेहऱ्यावर हंडीतील दिव्याचा प्रकाश लपंडाव खेळत होता. "बंगालमधील जमीनदारांची शान काय वर्णावी! मोठे रुबाबदार रईस-अमीर त्या देशात आहेत. आपली जमीनदारी बंगालमध्ये कुठं आहे?" नबाब कम्मन यांनी पानाचे तबक पुढे करीत गौतमाला विचारले.

"माझी जमीनदारी नाही. मी नोकरी करतो."

"नोकरी ?"

नीलांबराला पुनः एकदा शरमल्यासारखे झाले. नावेयावरही त्याला याच प्रश्नाला तोंड द्यावे लागले होते.

"मी कंपनी सरकारचा नोकर आहे."

"छान!" नबाब कमाल रजा यांनी विषयाला कलाटणी दिली.

"म्हणजे मग आपण इंग्रजीही शिकला असाल." आणखी कोणीतरी विचारले.

"होय थोडीफार शिकलोय."

"अस्सं! किती? पत्रं वाचता येतात?"

नीलांबराने किंचित स्मित करीत उत्तर दिले, "हो, येतात ना!" आता त्याला बरा स्वस्थता वाटू लागली. मोठे भोळेभाबडे व सरळ स्वभावाचे लोक होते ते. त्यांना काय घाबरायचे? आपण ज्या जगात वावरत आहोत, त्याच जगात इतके विचित्र लोक वावरत असल्याचे पाहून त्याला आश्चर्य वाटले.

येवढ्यात वाद्ये लावण्यात आली. सतराअठरा वर्षांची एक नखशिखांत सुंदर मुलगी संथगतीने मोठ्या रुबाबात येऊन मधोमध बसली. तिचा रंग सोनचाफ्यासारखा होता. तिच्या नाकात हिऱ्याची चमकी होती. तिने तपकिरी रंगाची रेशमी खेल सलवार घातली होती. सारे शरीर दागिन्यांनी जणू मढविले होते. तिने मोठ्या मोहक ढंगात खाली वाकून नीलांबर दत्ताला सलाम केला आणि शहाना रागात आसिफउद्दौलाची एक गझल गाण्यास सुरुवात केली :

"बुतोंकी गलीमें शबोरोज़ 'आसिफ़'
तमाशा खुदाईका हम देखते हैं!"

[प्रेयसींच्या गल्लीत आम्ही दररोज परमेश्वराची लीला पाहात असतो.]

श्रोते तन्मय होऊन तिचे गाणे ऐकत होते. गौतम तिचे रूप न्याहाळण्यात तल्लीन झाला.

कलकत्याला इंग्रजी शिकलेला बंगाली कारकून लखनौच्या जादूत अडकला. दिवस जात होते. पावसामुळे कलकत्याचे मार्ग बंद होते. जन्माष्टमीचा सण आला. नबाबाच्या रासक्रीडा मंडळींनी कृष्णलीलेचे खेळ करून दाखविले. त्यांत चंपा राधा झाली होती. हिज मॅजेस्टी शाहे जमन गाजीउद्दीन हैदर यांच्या दरबारात स्वरविलासाचे चमत्कार करून दाखविणाऱ्या चंपाला गौतमाने पाहिले होते. बज्रा व बागा यांमध्येही ती त्याला दिसली होती. गोमती नदीत नौकाविहार करणारी चंपाही त्याने पाहिली. सगळीकडे चंपाच चंपा होती.

सुजाता देवीकडून चंपासाठी तो जो निरोप घेऊन आला होता त्याचा त्याला कधीच विसर पडला होता.

गौतम नीलांबर बहुतेक रात्री जागरण करून घालवीत होता. दिवस कामाच्या धावपळीत निघून जाई. रात्र मात्र संपता संपत नसे.

रात्र! रात्र ही चंपाची राजधानी होती. तिच्यापुढे गौतम नीलांबर दत्ताचे काही चालत नसे. त्याच्या जगात व जीवनात वेश्या ही कल्पनाच घृणास्पद होती. त्याच्या मनात विचार येई, स्त्री ही देवता आहे. तिने वेश्या होता कामा नये. हा मोठा अन्याय आहे. मग त्याच्या लक्षात येई, असे म्हणतात की स्त्री ही केवळ दुःख सहन करण्यासाठीच निर्माण करण्यात आली आहे. बालविधवा, अनाथ बालिका या गायीसारख्या मूक असतात. त्या सती जातात कारण त्यातच त्यांचा मोठेपणा असतो. पण या चंपाकडे बघा! ती स्वतः जळून मरण्याऐवजी इतरांना जाळून मारते आहे!

'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति।' मनूमहाराजांनी लिहून ठेवले आहे. स्त्री स्वतंत्र नाही, हे अगदी खरे आहे. रामायणाच्या सहाव्या कांडात तर असेही नमूद करण्यात आले आहे की संकटकाळी, विवाहाच्या वेळी आणि पूजेसाठी स्त्री घराबाहेर पडली तर काही हरकत नाही. स्त्रीने वेदपठण केल्यास मोठा अनर्थ माजण्याची शक्यता असते असेही शास्त्रांनी लिहून ठेवले आहे.

सरंजामदारी समाजव्यवस्थेत स्त्री जेव्हा बाजारात येऊन बसते तेव्हाच तिला स्वातंत्र्य प्राप्त होते. चंपाबाई याच समाजव्यवस्थेत लहानाची मोठी झाली होती. गौतमाला तिची ही स्थिती कळणे शक्य नव्हते कारण बंगालमध्ये नुकत्याच उदयास आलेल्या नव्या मध्यमवर्गाशी तो संबद्ध होता. हा मध्यमवर्ग सरंजामदारी समाजपद्धतीतून बाहेर पडून आपली नवी मूल्ये प्रस्थापित करू पाहात होता आणि मध्यमवर्ग हा नेहमीच नैतिकतेचा कट्टर पाठीराखा असतो.

"कंपनी बहादुरांचा जय असो!" त्याच्या कानावर एक मधुर आवाज रुणझुणला. त्याने वळून पाहिले. तो चंपाचा आवाज होता. ती दुसऱ्या नावेत बसली होती. नीलांबर गोंधळून आपल्याकडे बघत असल्याचे पाहून ती खळखळून हसली.

लखनौच्या लोकांच्या सहवासात तो थोडा अधिक राहिला असता तर त्याने तिला प्रत्युत्तर म्हणून म्हटले असते, "हुजूर, आपला टोमणा आम्हांला कळला बरं!" परंतु तो पार गडबडला. समोरून आगा व मीर यांच्या नौका येत होत्या. आणखी काही सजलेल्या नक्षीदार नौकांतून अमीर-उमराव, काही मंत्री, शहरातील प्रतिष्ठित मंडळी व वेश्या रमण्याकडे चालल्या होत्या. इतक्यात चंपाची नाव जवळ आली.

"आमच्या नावेत या ना!" ती म्हणाली.

"म्हणजे यांनाही आपल्याबरोबर घेऊन बुडायला बरं!" हरिशंकरने टोमणा मारला. त्यानंतर थट्टामस्करी, शाब्दिक कोट्या वगैरे करीत ती सारी मंडळी घाटावर जाऊन पोहोचली. बारादरी (बारा दरवाजे असलेल्या) बंगल्याकडे जात असता गौतमाने मनाशी असा निश्चय केला की सुजातादेवीने आपल्यावर जी जबाबदारी सोपविली आहे ती पार पाडून निदान आपल्या मनावरचे ओझे तरी उतरून टाकावयाचेच. अखेर जेव्हा चंपा आपली सलवार सांभाळून पायऱ्या चढू लागली तेव्हा गौतमाने तिला विचारले, "तुम्ही सिलसाहेबांना ओळखता?"

ती गप्प राहिली.

"चंपाबाई, मी तुम्हांला जो प्रश्न विचारलाय त्याचं उत्तर द्या."

"होय ओळखते. मग तुमचं काय म्हणणं?"

"त्यांची बायको आहे कलकत्त्यात." तो म्हणाला. आपल्या या वाक्याने चंपा पांढरी फटफटीत पडेल अशी त्याची अपेक्षा होती. ग्लानी व पश्चात्ताप यांमुळे त्याच्या कपाळावर घामाचे थेंब चमकू लागले. परंतु ती मात्र थंडपणे म्हणाली, "असेल! मग? माझ्याकडे जितके लोक येतात त्या सर्वांनाच दोन-दोन चार-चार बायका असतात."

"त्यांना एक मुलगीही आहे." आपला मुद्दा या महत्त्वपूर्ण विधानाने तिच्या गळी नक्की उतरेल अशा समजुतीने तो म्हणाला.

"सर्वांनाच मुलीही असतात आणि नातवंडेही असतात. तुम्ही तुमच्या मुद्द्यावर या. तुम्हांला काय म्हणायचं आहे?"

"तुम्ही सिलसाहेबांबरोबरचा आपला संबंध तोडून टाका. म्हणजे असं की सिलसाहेब या खेपेला इथं आले की त्यांना तुम्ही भेटू नका. ते रेसिडेंटच्या जागेवर इथं येणार आहेत."

चंपा चमकली. एक क्षणभर ती उत्सुकतेने त्याच्याकडे पाहात राहिली. "मोठे चक्रमच दिसता आहात तुम्ही! महाशय, असं स्पष्ट का सांगत नाही की आता तुमचं मन माझ्यावर जडलंय?"

नीलांबराला जणू चक्कर आली. ही म्हणजे फाजीलपणाची अगदी कमालच झाली! तेथून उलट पावली आपण चालू लागावे, असा विचार त्याच्या मनात येऊन गेला. परंतु आता साठमारी सुरू होणार होती. प्रचंड जमाव जमला होता. बादशाह सलामत आणि दरबारचे लोक आपापल्या खुर्च्यांवर बसत होते. बँड वाजू लागला होता. गौतम नीलांबर एका बाजूला जाऊन गप्प उभा राहिला.

परत येताना त्याला नवाब कम्मन व रेसिडेंट यांच्या मागोमाग घाटापर्यंत जावे लागले. नावेत पुनः चंपाची गाठ पडली. त्या नावेत दुसरे कोणी नव्हते. ती त्याच्याकडे अत्यंत

प्रेमाने पाहात म्हणाली, "हे पाहा! आम्ही सिलसाहेबांना हजार वेळा सोडून देऊ. पण तुम्ही मात्र मला सोडून जाऊ नका, तुम्ही मला फार फार आवडता!"

तो गप्प राहिला.

थोड्या वेळाने चंपाच हलक्या आवाजात त्याला म्हणाली, "घमेंडखोर गृहस्था, मी आजवर कुणालाही असं म्हटलेलं नाही. तू फार घमेंड करू नकोस. हा काळ हां हां म्हणता निघून जाईल." नौका घाटाला लागली.

चंपा कपाळाला आठ्या घालून त्याच्याकडे पाहात होती. ती हसून लडिवाळपणे म्हणाली, "खुळ्या माणसा, तुला कसं बोलावं तेही कळत नाही, आणि तू माझ्यावर फिदा झाला आहेस! निसर्गाची अजब लीला आहे." नीलांबर निमूटपणे नावेतून खाली उतरला. चंपाने आपल्या पालखीकडे जात त्याला विचारले, "माझ्या घरी येशील ना?"

"नाही!" नीलांबराने तुटकपणे उत्तर दिले आणि तो घाईघाईने आपल्या पालखीत जाऊन बसला.

त्यानंतर तीन दिवस त्याला झोप आली नाही. या अवधीत त्याच्याकडे चंपाचे असंख्य निरोप आले. त्या स्त्रीने अचानक काय पण नाटक चालविले होते! परंतु स्त्रीचे चरित्र आजपर्यंत कुणाला कळले आहे? मोठमोठे श्रीमंत आणि शूरवीर जिच्या पायाशी लोळण घेत होते त्या पोरीला माझ्यात असे काय आढळले? मुंशी हरिशंकर फाइलीतून डोके वर काढून त्याला म्हणाले,

"पण तुम्ही तिच्याकडे जाऊन का येत नाही? हरकत काय आहे?"

चंपाबाईच्या घरी जाण्यात काय हरकत आहे हे त्या अवघ्या बनियाला समजावून सांगणे नीलांबर दत्ताला शक्य झाले नाही.

"परमेश्वरानं स्त्री ही आम्हां पुरुषांचं मन रमविण्यासाठीच तर निर्माण केलीय." हरिशंकर पुनः म्हणाले. नीलांबर त्यांच्याकडे आश्चर्याने पाहात म्हणाला, "स्त्री ही फार पवित्र वस्तू आहे. तिला तुम्ही मन रमविण्याचं साधन समजता?"

* * *

आश्विन सुरू झाला होता. कलकत्त्याला जाणारी जहाजे अलाहाबादेत तयार होती. कागदपत्रे घेऊन तो परत जाण्यास निघाला.

त्याची घोडागाडी नावघाटाच्या दिशेने चालू लागली. इतक्यात त्याने गाडीवानाला विचारले, "हा रस्ता कुठं जातो?"

"बजाराकडे, खुदावंद!"

"तिकडेच वळव गाडी!"

"जसा हुकूम, खुदावंत!"

गाडी चंपाच्या महालासमोर जाऊन उभी राहिली. तो धीरे धीरे पावले टाकीत वर गेला. चंपा रस्त्याच्या बाजूला असणाऱ्या दालनात बसली होती. नीलांबराचा आवाज ऐकताच तिचा चेहरा पडला.

"आलास?"

"नाही, मी चालली."

"घटकाभर थांब. तुझ्यासाठी सरबत मागवते." तो का कूं करू लागला. तेव्हा ती म्हणाली, "ब्राह्मणाच्या दुकानातून फराळाचं मागवून देऊ?"

"मला कशाचीही गरज नाही."

"ते मला माहीत आहे."

"मी...मी फक्त तुला 'खुदा हाफिज' करायला (तुझा निरोप घ्यायला) आलो होतो."

"खुदा हाफिज!"

तो दारात थबकला.

"आमच्या शहराची अशी प्रथा आहे की शुभचिंतन करताना म्हणायचं, 'हुसैनच्या दुःखाखेरीज खुदा तुला दुसरं कसलंही दुःख न देवो.' पण तुझं अभीष्टचिंतन करताना मी हे वाक्य उच्चारू शकत नाही कारण हुसैनचं दुःख तुला माहीत नाही. खरं म्हणजे, दुःख कशाला म्हणतात तेच तुला माहीत नाही."

"हे पाहा चंपा," नीलांबर हळू आवाजात म्हणाला, "तुझं जीवन इतकं विविधरंगी आहे की तू मला फार लवकर विसरून जाशील. माझा-तुझा काय संबंध?"

"ऐक!" त्याने चंपाला समजावून सांगण्याचा प्रयत्न करीत पुनः म्हटले, "तुझ्या-भोवती जमणाऱ्या लोकांपेक्षा मी वेगळा आहे, म्हणूनच मी तुला आवडतो. नेहमीपेक्षा वेगळी चीज प्रत्येकालाच आकर्षक वाटते. अच्छा. मी निघतो आता."

"वल्लाह! काय हा नखरा! असं वाटतं, जणू राजा झाऊलालांच्या गादीवर आता तूच बसणार आहेस." चंपाने हसण्याचा प्रयत्न केला.

काळोख झपाट्याने वरसू लागला. शहरात सगळीकडे खांबांवरील बत्त्या लावण्यात आल्या. दिवे लागले. हंड्या-झुंबरे झळकू लागली. खाली रस्त्यातून एक वरात चालली होती. एका गाडीवरील मंचावर नाच चालला होता. एका गाडीवर नवऱ्यामुलाला वधूपक्षाकडून देण्यात आलेल्या भेटवस्तू सजवून ठेवण्यात आल्या होत्या. त्यांच्याभोवती वरपक्षाकडील तरुण मुले धांगडधिंगा घालीत होती. दुसऱ्या एका गाडीवर बहुरूपी व कोल्हाटी खेळ करून दाखवीत होते. चौघडा वाजत होता. मशालींचा प्रकाश गाडीच्या

खिडक्यांपर्यंत येऊन पोहोचला होता. त्या प्रकाशात चंपाचा वेलबुट्टीदार दुपट्टा चकाकू लागला. डोंबारणी विवाहगीते गात होत्या. चंपा खिडकीत येऊन वरात पाहू लागली. "कुणा भाग्यवतीची वरात आहे, कोण जाणे!" ती म्हणाली. नीलांबराने वळून तिच्याकडे पाहिले. ती म्हणत होती, "तिच्या भांगात सिंधूर असेल, पावलांना मेंदी लावलेली असेल, नाकात सौभाग्यसूचक नथ असेल!" तिने हलकेच आपल्या भांगावरून हात फिरविला. त्या ठिकाणी कलाबतूचे बारीक चूर्ण भरलेले होते परंतु सिंधूर नव्हता. "आता पुनः हिचं नाटक सुरू झालं!" गौतम नीलांबर अस्वस्थ होऊन मनाशी म्हणाला.

"पुरुष किती निर्दय असतात!" चंपा म्हणाली.

"स्त्रिया आणि पुरुष नेहमीच एकमेकांवर हा आरोप करीत आली आहेत. त्यात काही अर्थ नाही."

"सकाळ होईपर्यंत तू लखनौपासून खूप दूर गेलेला असशील नाही?"

"होय!"

नीलांबर खिडकीतून खाली पाहू लागला. जणू सारे शहर कुठल्यातरी जत्रेसाठी चालले होते. रस्त्यात उडाणटप्पू लोक मिशांवर ताव देत भटकत होते. जनानखान्यावरील सशस्त्र पहारेकरिणी, हबशिणी, गोंधळिणी, चुना विकणाऱ्या बाया, छुमछुम करीत टोळ्याटोळ्यांनी चालल्या होत्या. फाकडे आपल्या तलवारी परजत होते. अफू, चरस, भांग वगैरे व्यसनांचा षोक करणारे आपापल्या अड्यात गोळा झाले होते. दुनिया किती विविधरंगी होती! या दुनियेलाच भर्तृहरीने रंगभूमी म्हटले होते.

या रंगभूमीवर हेही एक निरर्थक नाटक येथे चालू होते. अंधार पसरू लागला. त्याची घोडागाडी खाली वाट पाहात होती.

...पळ बाबा, लौकर पळ काढ येथून! कलकत्त्याला जायची निष्कारण खोटी होते आहे. कलकत्त्याला चालू लाग. तुला इथं स्थान नाही. तुझे पाय लटपटत असल्याचं मला दिसतंय...

आणि तो घाईघाईने कागदपत्रांचे आपले दप्तर काखोटीला मारून खाली उतरला. त्याने एकदाही मागे वळून पाहिले नाही. गाडीत जाऊन बसल्यावर त्याने सुटकेचा निःश्वास सोडला.

गर्दीतून वाट काढीत त्याची गाडी आगा मीर यांच्या देवडीपर्यंत जाऊन पोहोचली. तरुण कोचवान "दूर व्हा मेहेरबान! जरा सांभाळून, सरकार!" अशा आरोळ्या देत शहराच्या बाहेर पडला. ते नाक्यावर जाऊन पोहोचले. जांभळाच्या झाडाखाली काही वैरागी बसले होते. अंबाभवानीच्या मंदिरात धूप जळत होता. नीलांबर गाडीतून खाली

उतरून दोन पावले पुढे गेला. त्याने ध्यानपूर्वक मूर्तीकडे पाहिले. कालीच्या रूपात तो तिला ओळखत होता. कालीमातेने आपल्या योगमायेच्या रूपात त्याला दर्शन दिले होते. त्याने तो धन्य झाला होता. "माते, मी तुझी हीही लीला पाहिली. आता परत चाललोय. आपल्या सामर्थ्यानं असंच माझं रक्षण करीत राहा." तो मनाशी पुटपुटला.

पहिल्या दिवशी ज्या गोसाव्याचे त्याच्याशी संभाषण झाले होते त्याने विचारले. "फार लौकर परतलास?"

"मृगजळाच्या काठी उशीर लावण्यात शहाणपणा नाही. तुमचं हे शहर मृगजळाचं शहर आहे." नीलांबराने लखनौमधील दिव्याकडे बोट दाखवीत म्हटले. दूरच्या मच्छीभवनात चौथ्या प्रहराचे तास वाजले.

बैराग्याने त्याच्याकडे टक लावून पाहिले. "मृगजळाची वस्तुस्थिती इतक्या सहजासहजी गळी उतरत नाही, बेटा!"

"बाबा!" नीलांबर क्षणभर थांबून म्हणाला, "योगमायेनं आपल्या दाही हातांनी मला स्वतःकडे ओढण्याचा प्रयत्न केला. पण पाहा, मी सहीसलामत परत चाललोय."

"आपल्यापैकी कुणीच सहीसलामत नाही. आपण सगळे कुंभाराची खेळणी आहोत. क्षणोक्षणी फुटत असतो. आपल्या दृढतेचा अभिमान बाळगू नकोस."

इतके बोलून त्या बैराग्याने जमिनीवरील थोडी माती हातात घेऊन ती हुंगली आणि तो म्हणाला,

"पाहा, या मातीत केवढा सुगंध भरला आहे. घेऊन जा ही माती. कटकमध्ये योगमायेचं मंदिर आहे. तिथं जाऊन ही माती वाहा."

नीलांबर हात पुढे करून ती माती घेण्यास कां कूं करू लागला.

"घे, घे! ही लखनौची माती आहे. आपल्याबरोबर घेऊन जा ही. कारण या शहरात अशी जादू आहे की येथून गेल्यानंतर याची सारखी आठवण येत राहाते."

गोसावी अत्यंत शुद्ध, सुसंस्कृत भाषेत बोलत होता.

"बाबा, तुम्ही बैरागी का झालात?" नीलांबराने विचारले.

"तू...तू मला ओळखतोस?" बैराग्याने घाबरून विचारले.

"छेः छेः! मी कुणालाच ओळखत नाही."

"खरं आहे. ओळखणं फार अवघड आहे आणि...आणि ओळखणाऱ्याला कोण ओळखणार?" बैरागी म्हणाला,

नीलांबराने उपनिषदात हे वाक्य वाचले होते. बैरागी चांगला सुशिक्षित वाटत होता.

"बाबाजी, आपण कोण आहात ते सांगाल काय?"

"का बरं? फिरंग्यांचा हेर आहेस वाटतं तू?"

"मी...मी कुणासाठीच हेरगिरी करीत नाही." त्याने दुःखी स्वरात म्हटले.

"खरं सांगतोस?" बैराग्याने त्याच्या डोळ्यांशी डोळे भिडवीत विचारले.

"होय. अगदी खरं!"

"तर मग ऐक! मी राजा बेनीबहादुरांचा मुलगा आहे. राजा बेनीबहादुरांचं नाव ऐकलं आहेस? ते मिर्जा जलालुद्दीन हैदर नबाब शुजाउद्दौला यांचे नायब, मुखत्यार होते. नायबुर-सल्तनत! ते जनाबे आली आणि आलीजाह (नबाब व बादशाह) यांच्या वतीने तुमच्या साहेबांच्या सैन्याशी प्राण पणाला लावून लढले होते. गंगेच्या एका तीरावर माझे शूरवीर पिताजी, बनारसचे राजे बलवंतसिंह गुसाई हिम्मतबहादुर आणि रोहिले होते, तर दुसऱ्या तीरावर फिरंग्यांचे लष्कर होते. परंतु फिरंग्यांनी माझ्या वडिलांच्या सैन्यावर अकस्मात हल्ला केला. आमच्या सैन्याची दाणादाण उडाली. माझे वडील घोड्यावर मांड ठोकून जोरजोराने ओरडून लोकांना म्हणत होते, "अरे नामर्दांनो! कुठं चाललात पळून?" नबाबसाहेब धिःक्काराच्या स्वरात कंठशोष करीत होते, "अरे, तुम्ही स्वतःला मोंगल म्हणवता अन् असे रणमैदानातून पळ काढता!" परंतु आमची फौज दुर्गावती नदी ओलांडून पळून गेली. हजारो सैनिक नदीत बुडून मेले. हिंदुस्तानावर प्रलय ओढवला." तो जरा विश्रांती घेण्यासाठी थांबला आणि नंतर हलक्या आवाजात म्हणाला, "त्याच वेळी तुमच्या फिरंगी सरकारने ओळखले की हिंदी लोकांतील ऐक्य संपुष्टात येत आहे. बादशाह आणि नबाब यांच्यातच मुळी फूट पडली. हे सगळेजण एकमेकांविरुद्ध चहाड्या करतात, असे फिरंग्यांच्या अनुभवाला आले...एकमेकांविरुद्ध तक्रारीचे अर्ज भरून ते दिल्लीच्या बादशाहाकडे रवाना करतात तर दुसरीकडे कलकत्त्याच्या सरकारशी वाटाघाटी करण्यास तयार असतात. काय विचित्र देश आहे हा! यांचा एकमेकांवरील विश्वास उडाला आहे....माझे वडील नबाबाचे सर्वात अधिक स्वामिभक्त नोकर होते. परंतु शत्रूंनी त्यांचे कान फुंकल्यामुळे नबाबसाहेबांनी त्यांनाच नमकहराम ठरविलं आणि त्यांना शिक्षा देण्याचा विचार ते करू लागले."

"असं?" नीलांबराच्या तोंडून उद्‌गार निघाला.

"नबाबांनी मुंडियाबनच्या छावणीत माझ्या वडिलांच्या तंबूतच थोडा वेळ विश्रांती घेतली आणि जेवणखाण आटोपल्यावर ते माझ्या वडिलांना म्हणाले, "राजे, तुम्हीही आमच्याबरोबर शिकारीला चला." माझे वडील म्हणाले, "हुजूर, आपल्यामुळं या सेवकाला पुष्कळ शिकारी पाहायला मिळाल्या आहेत." यावर ते म्हणाले, "आजची शिकार अभूतपूर्व आहे. असली शिकार तुम्ही कधीच पाहिली नसेल. आलेली संधी दवडू नका." ते आपल्या खास गाडीतून माझ्या बाबांना आपल्या लष्कराकडे घेऊन गेले. आपल्याला कैद करण्याचा हा सारा डाव आहे, हे बाबांच्या लक्षात आलं. पण

करतात काय ? नबाबसाहेबांच्या हुकुमावरून माझ्या बाबांच्या दोन्ही डोळ्यांत निळीच्या सळ्या खुपसण्यात आल्या. त्यांची जहागीर जप्त करण्यात आली. तेराशे घोडे, अठरा हत्ती आणि एक संपूर्ण तोफखाना यांच्या व्यतिरिक्त फार मोठ्या जहागिरीचे ते मालक होते. मी फक्त या मृगाजिनाचा मालक आहे."

बैरागी स्तब्ध राहिला.

नीलांबर मूर्तिवत बसून ती हकीगत ऐकत होता. बैराग्याने आगीत एक भले मोठे लाकूड टाकले आणि उकिडवा बसून तो सांगू लागला, "मृगजळाची वस्तुस्थिती मी ओळखली आहे. तुला तिची काय कल्पना असणार ? तू त्याच चक्रात अडकला आहेस आणि असाच अडकून राहणार. राजवटीची निर्मिती नि विनाश, कंपनीची खुषी आणि नाराजगी, बादशाहाच्या क्रोधाची आग—यापैकी मला कशाचीच पर्वा नाही. माझ्या बाबांना आंधळे करण्यात आलं होतं. मला माझ्या परमेश्वराखेरीज कोण आंधळा करणार ? जा, आता तुला उशीर होतोय. योगमायेच्या मंदिरात जाऊन पाहा. तिथं चारी बाजूंना ओवऱ्या आणि असंख्य दरवाजे आहेत. एका दरवाजानंतर दुसरा दरवाजा उघडतो, त्यानंतर तिसरा. असेच चक्रव्यूह आणि भूलभुलैया सगळीकडे बनविण्यात आले आहेत. त्यांतून माणूस बाहेर पडू शकत नाही. तुला वाटतं की आपण या चक्रव्यूहातून बाहेर पडलो आहोत. पण तो तुझा गैरसमज आहे. जा !"

नीलांबर उठला. त्याने खाली वाकून बैराग्याच्या पायाजवळची चिमूटभर माती घेतली आणि जड पावलांनी तो आपल्या घोडागाडीत जाऊन बसला. कोचवानाने गाडी सीतापूरला जाणाऱ्या रस्त्याला वळविली.

पुलाजवळ जाताच गाडी अचानक थांबली. कोचवान खाली उतरला. समोर एक इंग्रज शिपाई घोड्यावरून खाली उतरून एका वाटसरूला चाबकाने बडवीत होता आणि इंग्रजीत शिव्या देत होता.

ही मंडियावन छावणी होती. सगळीकडे इंग्रजांचे बंगले होते. शिवाय लष्कराचा भट्यारखाना, चर्च आणि इस्पितळही तेथे होते.

गोरा शिपाई वाटसरूला बदडून काढून परत घोड्यावर बसला आणि अंधारात गडप झाला.

"साले आमचंच खातात अन् आमच्यावरच गुरगुरतात !" गंगादीन नावाचा तो कोचवान रागाने उद्गारला, "शाहे जमनच्या राजवटीत ही अंदाधुंदी !..." तो बडबडत राहिला. गौतम नीलांबर पुन: आपल्या विचारात गढून गेला. मध्यरात्रीनंतर तो राजा टिकैतराय यांच्या एका धर्मशाळेत उतरला. गंगादीन अजून बडबडत होता. नीलांबराबरोबर गाडीतून उतरलेले रेसिडेन्सीचे शिपाई व जासूद पाहून धर्मशाळेतील लोक आपसात कुजबुजू लागले, "बंगाली बाबू आहेत. कलकत्याला चाललेत. त्यांना

इंग्रजी येतंय. त्यांना विचारा की कंपनी बहादुर आमचा शेतसारा कधी कमी करणार आहे?...लंडनमध्ये तयार झालेले हे कायदे इथंही लागू होणार आहेत म्हणे. बंगाल आणि बिहारमध्ये एकच कायदा का लागू करीत नाहीत हे? बाबूसाहेब, आमचा शेतसारा कमी करवून द्या. आमची कंबर अगदी मोडून चाललीय." अंगणातील फरशीवर नीलांबराच्या भोवती ही गर्दी जमली. ते सारे आसपासच्या खेड्यांतील शेतकरी होते. आपापल्या फिर्यादी घेऊन ते राजधानीला चालले होते. एक जख्ख म्हातारा जमीनदार काठी टेकत नीलांबराजवळ जाऊन बसला.

"कुठून आलात?" त्याने विचारले.

"बंगालहून."

"तर मग तुम्ही आमचे पाहुणे आहात. माझ्या गावी चला. मी तुमची चांगली सरबराई करीन. माझं घर इथून फक्त एक कोसभर दूर आहे."

नीलांबराचे हृदय भरून आले. ही सारी माणसे किती निरागस, किती भोळी आहेत! आपण अवधपुरी सोडून चाललो आहोत, याचे त्याला दुःख झाले.

"भय्या!" त्या म्हाताऱ्याने आजूबाजूला पाहात हलकेच म्हटले, "तुझ्या इंग्रज सरकारला म्हणावं, आमच्यावर फार जुलूम करू नका."

तो गप्प राहिला.

"तू लखनौहून येतो आहेस ना?"

"होय."

"तिथं आमच्या बादशाहांचं दर्शन घेतलंस?"

"हो."

"आमच्या बादशाहांना कंपनी बहादुर पैशासाठी फार सतावून राहिलेत, म्हणं!"

"काही कल्पना नाही."

"स्पष्ट सांगत का नाहीस, बंगाली भय्या? तुला सगळं माहीत आहे." आता तो म्हातारा अधिक तावातावाने बोलू लागला, "कंपनी बहादुरांनी आमच्या बादशाहांना वचनं दिली आणि ती एकामागून एक सारी मोडली. तुला माहीत आहे की बक्सरच्या पराभवानंतर जनाबे आलींशी..."

ध्या! पुनः बक्सर आणि जनाबे आली यांचे चऱ्हाट सुरू झाले...नीलांबर दचकला. म्हाताऱ्याने नीलांबराकडे क्षणभर निरखून पाहिले. "तुला या गोष्टीत गोडी असणार नाही. पण आमच्या अंतःकरणावर त्यांचे घाव झालेले आहेत. आमचा देश कंपनी सरकारनं धुळीला मिळवलाय...तुला माहीत आहे की बक्सरच्या पराभवानंतर इंग्रजांनी अवधच्या बादशाहांना असं लिहून दिलं होतं की आपण पस्तीस

हजारापेक्षा जास्त सैन्य ठेवणार नाही. आता मंडियावनमध्ये काय दिसतंय ? स्वर्गीय आसिफउद्दौलांनी कलकत्त्याला लिहिलं होतं, 'इंग्रजी सैन्यानं देशाचं सारं उत्पन्न गिळंकृत केलंय. शेतकऱ्यांना खायला काही मिळत नाही. शेती उद्ध्वस्त झालीय. माझ्या गळ्यावर ही सुरी कुठवर राहाणार ?' पण त्याचा काय उपयोग झाला ? आम्ही अधिकाधिक दरिद्री होत गेलो. भय्या, आम्ही फार दुःखी आहोत. मनरोनं हल्ला केला तेव्हा आमचे सैनिक 'या हुसैन ! या हुसैन !' असं पुकारीत, आक्रोश करीत लढले. असे आम्ही फिरंग्यांशी लढलो. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. आता कंपनीच्या खजिन्यात भरायला आमच्याजवळ काहीही शिल्लक उरलेलं नाही."

इतके बोलून तो स्तब्ध राहिला.

दिव्याची ज्योत वाऱ्याने थरथरली. नीलांबर भितीला पाठ लावून बसून राहिला.

## १७

कलकत्त्याला पोहोचल्यानंतर तो पुनः आपल्या नेहमीच्या परिचित जगात गढून गेला. कचेरी, पुस्तके, इंग्रजी व बंगाली वृत्तपत्रे, व्याख्याने...तो सुजातादेवीला भेटण्यासाठी धरमतल्लयाला गेला. परंतु तेथे गेल्यावर ती निधन पावली असल्याचे त्याला समजले. पावसाळ्याच्या दिवसांत ती पूजेसाठी कालीघाटाकडे चालली होती. तिला साप चावला आणि ती मेली. स्मिल्साहेब जिल्ह्यामध्ये कोठेतरी दौऱ्यावर गेले होते.

नीलांबर घरी परत येऊन आपल्या ओसरीत चटई अंथरून बसला आणि दिवा लावून इंग्रजी शब्दकोशात तल्लीन झाला.

परंतु आता त्याचे मन नोकरीत लागत नव्हते. माणिकतल्लयात त्याच्या घरापासून थोडया अंतरावर एक मोठे सुंदर गार्डनहाउस होते. त्या बंगल्याच्या बागेत अनेक तरुण गोळा होत. तेथे बाबू राममोहनराय राहात असत.

एके दिवशी तो आपल्या एका मित्राबरोबर राममोहनबाबूंचे व्याख्यान ऐकण्यास गेला. ते व्याख्यान ऐकल्यानंतर धर्माविषयी त्याच्या मनात ज्या शंकाकुशंका होत्या त्या जास्तच वाढल्या. आता त्याने कालीघाटावर जाणे सोडून दिले. घरी बसल्या बसल्याच तो विचार करीत असे. श्रीरामपूरचे किरिस्तॉव म्हणतात ते खरे असेल काय ? राममोहन-बाबूंचा मार्ग बरोबर आहे काय ? कोण बरोबर आणि कोण चूक हे कुणी सांगावे ?... या प्रश्नांनी अस्वस्थ होऊन शेवटी त्याने असा निर्णय घेतला की आपण स्वतःच सर्व

गोष्टींचा चांगला अभ्यास करून काय ते ठरवायचे. कंपनी सरकारची नोकरी सोडून देऊन तो हिंदू कॉलेजात दाखल झाला. याच कॉलेजात शहरातील एक मोठे जमीनदार प्रिन्स द्वारकानाथ टागोर यांचा मुलगा देवेंद्रनाथ हाही शिकत होता. ते दोघे वर्ग संपल्यानंतर एकत्र बसून पाश्चात्य तत्त्वज्ञानासंबंधी विचारविनिमय करीत, आत्मा व परमात्मा यांचा शोध घेण्याचा प्रयत्न करीत. देवेंद्रनाथांमध्ये सूफी संतांची वैशिष्ट्ये होती. नीलांबराला ती वैशिष्ट्ये रोचक वाटत. संध्याकाळी ते राममोहन राय यांच्या घरी जाऊन त्यांच्या चर्चेत सामील होत; विद्वान व तत्त्वज्ञ यांचे विचार ऐकत; एकेश्वरवादी भजने गात किंवा नीलांबर देवेंद्रनाथांकडून हाफिझच्या फारसी गझला ऐके.

ज्या वर्षी नीलांबर दत्त बी. ए. झाला त्याच वर्षापासून तो राजा राममोहन राय यांच्या ब्रह्म समाजाचा मोठा उत्साही व सक्रिय कार्यकर्ता झाला. एके दिवशी त्याने सर सिरिल हावर्ड ॲश्ले हे अर्धांगवायूने निधन पावल्याचे वर्तमानपत्रात वाचले. मृत्युसमयी त्यांची धर्मपत्नी लेडी ॲश्ले आपल्या दोन वर्षांच्या मुलासह दार्जिलिंगला गेलेली होती. तीन वर्षांपूर्वीच त्या दोघांचे लग्न झाले होते.

* * *

सिरिलला बिहारच्या एका उदास व अनोळखी डाक बंगल्यात मरण आले. तो दौरा करून परत आला होता आणि बूट काढून आरामखुर्चीत विश्रांती घेत होता. इतक्यात त्याच्या नोकराने त्याला त्याच्या किरकिऱ्या, घमेंडखोर व अत्यंत कुरूप बायकोचे पत्र आणून दिले. त्यात तिने दार्जिलिंगच्या सोसायटीसंबंधी ताज्या बातम्या लिहिल्या होत्या. पत्र वाचून झाल्यानंतर सिरिलने वृत्तपत्रांच्या गठ्ठ्याकडे हात नेला. इतक्यात अचानक आपण मरणाच्या दाढेत चाललो असल्याचे त्याला जाणवले. त्याने आपल्या चोपदाराला हाक मारण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याची जीभच जणू लुळी पडली. दुसऱ्याच क्षणी त्याची इहलोकीची यात्रा संपली.

कलकत्त्याच्या वृत्तपत्रांत त्याच्यासंबंधी लेख प्रसिद्ध झाले. त्याने आपल्या आयुष्याची चाळीस वर्षे बंगालमध्ये घालविली होती. बंगाल एशियाटिक सोसायटीने त्याच्या सन्मानार्थ एक खास दुखवट्याची सभा घेतली. कॉलेजात त्याच्याविषयी भाषणे झाली. त्यानंतर पंधरा दिवसांत लोक त्याला विसरले.

त्याची बायको लेडी ॲश्ले ही मद्रासच्या चीफ जस्टिसची बहीण होती. ती अतोनात दारू पीत असे. आपल्या मुलाला घेऊन ती साऱ्या सामानसुमानासह इंग्लंडला गेली. सर सिरिल मृत्युसमयी कोट्यधीश होता. त्याचा पैसा 'सिटी' मध्येही गुंतलेला होता आणि कलकत्त्यातही होता.

त्याचा मुलगा सिल एडवि नडेरिक अंश्ले मोठा झाल्यावर त्याने बापाच्या पेशावर खूप मोठा व्यापार सुरू केला... आता ब्रिटनचे साम्राज्य साऱ्या जगभर पसरले होते. ब्रह्मदेशात टिनाच्या खाणी होत्या, मलायात रबराचे मळे होते आणि चीनमध्ये अफूचा व्यापार!

इ. स. १८५७ नंतर हिंदुस्तान रीतसर व्हिक्टोरिया राणीच्या साम्राज्यात सामील झाला होता. सारे पौर्वात्य जग आता स्वर्गीय सर सिल हावर्ड अॅश्लेचा मुलगा लॉर्ड सिल एडविन डेरिक अॅश्लेचे होते.

## १८

एके दिवशी प्रोफेसर गौतम नीलांबर दत्त टपाच्या बग्गीतून खाली उतरून आपल्या घराच्या पोर्चमध्ये पोहोचतात न पोहोचतात तोच त्यांच्या माळ्याने मरिया बुरुजाचे नबाब साहेब नुकतेच येऊन गेल्याचे त्यांना सांगितले...नीलांबर दत्त परत पावली बाहेर गेले आणि रस्त्यावर येऊन घाईघाईने सगळीकडे पाहू लागले. समोरच एक म्हातारा गृहस्थ रस्त्याच्या कडेने चालला असल्याचे त्यांना दिसले. त्याने अंगात वेलबुट्टीदार अंगरखा घातला होता व तो काठी टेकत चालला होता. नीलांबर दत्तांनी झटकन जाऊन त्याला गाठले.

"अरे वा:! मियाँ नीलांबर दत्त साहेब!" म्हाताऱ्याने आनंदाने म्हटले, "मला वाटलं होतं की आता तुमची भेट होणार नाही."

"काय नबाबसाहेब, सगळं ठीक आहे ना? कित्येक दिवसांत तुमची भेट होत नाही. आता चला, थोडा वेळ आपण गप्पागोष्टी करू. माझी नात शाळेच्या बोर्डिंगातून घरी आलीय. तुम्ही अजून तिला पाहिलं नसावं." असे म्हणत ते नबाबसाहेबांचा हात धरून त्यांना घरात घेऊन गेले.

"अच्छा मियाँ," नबाबसाहेब दिवाणखान्यातील सोफ्यावर बसत म्हणाले, "तुमची भेट झाली. आता तुमच्या मुलांनाही पाहून घ्यावं म्हणतो. पुन: जिवंत परत येणं होईल की नाही, कुणी सांगावं?"

"का बरं? कुठं जायचा कार्यक्रम आहे? लखनौला?"

"पवित्र कर्बल्याला जायचा विचार आहे. खुदानं तिथलीच माती या शरीराला द्यावी. इथं काय ठेवलंय आता?" त्यांचा गळा भरून आला. त्यांनी थरथरत्या हातांनी आपला इराणी रुमाल खिशातून काढून डोळे पुसले.

नीलांबर दत्त त्यांच्याकडे प्रेमाने व श्रद्धेने पाहात राहिले. नोकर चहा घेऊन आला. दिवाणखाना समकालीन व्हिक्टोरियन पद्धतीने सजविलेला होता. भिंतींवर अनेक तसबिरी होत्या. त्यांत नैसर्गिक देखावे व छायाचित्रे होती. दरवाजांवर मोत्यांच्या झालरी असलेले पडदे होते. शेजारच्या खोलीत पियानो वाजत होता.

पियानोचे स्वर नीलांबर दत्तांना अचानक उदासवाणे वाटले. ते आपल्या नातीला उद्देशून म्हणाले, "नीलिमा, बाळ, पियानो बंद कर आणि इकडे ये. हे पाहा, तुमचे मटिया बुरुजाचे काका आलेत."

पंधरा वर्षांची एक मुलगी दिवाणखान्यात आली.

"नबाबसाहेब, ही माझी नात. तुम्ही हिला अजून पाहिलं नव्हतं. शाळेच्या वसतिगृहातच राहाते ती."

नबाबसाहेब अंधुक नजरेने तिच्याकडे पाहात राहिले. ती पंधरा वर्षांची मुलगी लग्न करून मुलाला मांडीवर खेळविण्याऐवजी शाळेत इंग्रजी शिकत होती आणि ऑर्गन पियानो वाजवीत होती.

नबाब कम्मन सोफ्यावर बसल्याबसल्या खिडकीतून बाहेर पाहू लागले. कलकत्ता शहर दिव्यांनी उजळून निघाले होते. नीलांबर दत्त त्यांच्याशी इकडच्या तिकडच्या गप्पा गोष्टी करीत होते. त्या दोघांजवळ भूतकाळात जमा झालेल्या युगाव्यतिरिक्त दोघांच्या समान आवडीचा असा दुसरा कोणताच विषय नव्हता. परंतु त्या भूतकाळाची स्मृती फार काळ ताजी ठेवणे नीलांबर दत्तांना शक्य नव्हते. त्यांच्यासमोर भविष्यकाळ होता. नबाब कम्मन यांच्याजवळ मात्र फक्त भूतकाळच होता. औपचारिक शिष्टाचार पाळण्यासाठी ते दोघे एकमेकांना मोठ्या प्रेमाने भेटत असत. लखनौचे वैभव नष्ट होऊन कलकत्त्याच्या मटिया बुरूज भागात दुसरे प्रति लखनौ निर्माण झाले तेव्हा बादशाहांबरोबर नबाब कम्मनही येथे आले. त्यांनी नीलांबर दत्ताला भेटावयास बोलावले. तो एव्हाना कलकत्त्याचा प्रख्यात पत्रकार झाला होता. नीलांबर त्यांना वर्षातून एकदोनदा न चुकता भेटत असे. राजा सुरेन्द्रमोहन टागोर यांच्या घरी संगीताच्या आधुनिकीकरणाची मुहूर्तमेढ रोवण्यात आली आणि सबंध देशातील संगीतकार कलकत्त्यात गोळा होऊ लागले तेव्हाही नीलांबर, नबाब कम्मन यांना नवीन संगीताच्या मैफलींचे आमंत्रण देत राहिला.

एव्हांना घरात दिवे लागले होते. नीलांबर दत्त यांच्या घरात वरच्या मजल्यावर त्यांचा मुलगा मनोरंजन दत्त याचे विद्यापीठातील सहकारी व आर्ट स्कूलचे विद्यार्थी एका इंग्रजी नाटकाची तालीम करीत होते. मनोरंजनाचे मित्र मायकेल मधुसूदन दत्त यांनी एक नवीन नाटक लिहिले होते. याच नाटकाची तालीम करण्यात सर्वजण गढून गेले होते.

अधूनमधून हास्याचे फवारे उडत होते. कॅंपबेल मेडिकल स्कूलचा एक विद्यार्थी खिडकीत बसून हार्मोनियम वाजवीत होता.

मनोरंजन तरुलतेची नवीन इंग्रजी कविता वाचत होता. हार्मोनियमचे सूर, मुलांचे खिदळणे आणि संवादांचे आवाज खालच्या दिवाणखान्यापर्यंत येऊन पोहोचत होते.

नवाबसाहेब हातातल्या छडीवरून हलकेच बोटे फिरवीत होते. हा एक वेगळाच जमाना होता, एक नवेच युग होते. इसवी सन १८७१ चे साल चालू होते. नबाब कमाल रजा यांचे जग म्हातारे झाले होते. गौतम नीलांबर दत्तही त्यांच्याच वयाचे होते. परंतु त्यांचे जग मात्र तारुण्यात पदार्पण करीत होते. अचानक नबाब कम्मन यांना असे वाटू लागले की या नव्या जगात आपल्याला काही स्थान नाही. राजधानीतील त्या आधुनिक दिवाणखान्यातील आपली उपस्थिती त्यांना अगदीच हास्यास्पद वाटू लागली.

"नबाबसाहेब, मनोरंजन लखनौच्या कॅनिंग कॉलेजात कायद्याचा अध्यापक म्हणून चाललाय." गौतम नीलांबर दत्तांचा आवाज त्यांच्या कानांवर पडला. हा आवाज जणू दुसऱ्याच कोणत्यातरी ग्रहगोलावरून आला होता. ते दचकले. "अच्छा! अच्छा! माशाअल्लाह! फार छान!" ते गहिवरून उद्गारले, "जाऊ द्या! जाऊ द्या! इमाम जामिन त्याचं रक्षण करोत." आणि ते काठीच्या आधाराने उठून नीलांबर दत्तांना 'खुदा हाफिज' करून मटिया बुरुजाकडे परत गेले.

बरीच रात्र झाली होती. नबाब कम्मन गेल्यानंतर नीलांबर दत्त थोडा वेळ दिवाणखान्यात येरझाऱ्या घालीत राहिले. फिरत्या कपाटातून त्यांनी एक पुस्तक काढले व ते त्याची पाने उलटू लागले. परंतु त्यातही त्यांचे मन लागेना. त्यांनी सभोवताली नजर फिरविली. सारी कपाटे पुस्तकांनी भरलेली होती. शिवाय वृत्तपत्रांच्या बांधणी केलेल्या फायली, कायद्याची नियतकालिके, समित्यांचे अहवाल, आणि ठराव. सगळीकडे समस्याच समस्या होत्या; आणि त्या समस्यांची उत्तरे त्यांनी शोधून काढली होती.

समस्यांची उत्तरे त्यांना मिळाली होती?...नीलांबर दत्तांचा जीव गुदमरू लागला. वारा पडला होता आणि उकाडा होत होता. बाहेर रस्त्यांवर दिवे मिणमिणत होते. अकस्मात नगरांची राणी कलकत्ता नगरी त्यांना अत्यंत भयानक वाटू लागली. ते अस्वस्थ होऊन बाहेर व्हरांड्यात आले. अशा या रात्रीच दुःखी आत्म्यांची अदृश्य स्वरूपातील चाहूल ऐकू येते. आंगणात केळी व ताड यांची पाने निश्चल होती. बागेतील हौदाच्या शेजारी एक कुत्रा आपली शेपटी पायांत दुमडून झोपला होता. त्यांचा पुनर्जन्मावर विश्वास असता तर समोरचा कुत्रा हा कोणाचा तरी दुःखी आत्मा आहे असे त्यांना कदाचित वाटले असते. ते व्हरांड्यातून खाली उतरून बागेत हिंडू लागले. नंतर त्यांनी चंद्राकडे पाहिले. तो तरंगत-तरंगत 'दत्त हाउस'च्या अगदी माथ्यावर

आला होता. त्याचे किरण हौदाच्या पाण्यात पडले होते. चंद्राने त्यांना अनेक कथा ऐकविल्या. ती पौर्णिमेची रात्र होती.

त्या दिवशी रात्री माणिकतलयाहून परत आल्यानंतर नबाब अबुल मन्सूर कमालुद्दीन अली रजा बहादुर गार्डनरीचजवळील मटिया बुरुज भागातील आपल्या बंगल्यात पोहोचले आणि आपल्या पलंगावर पहुडल्यानंतर विचार करू लागले : माणूस फक्त एकदाच या जगात येतो आणि नाहीसा होतो ही किती विचित्र गोष्ट आहे! जीवन हे फक्त एकदाच जगावयास मिळते. माणूस एकदा मरून गेला की पुनः कधी त्याला हे जग पाहावयास मिळत नाही....शाहे जमन गाजीउद्दीन हैदर, नसीरुद्दीन हैदर, मुहम्मद अली शाह, अमजद अली शाह या सर्वांचा मृत्यू नबाब कम्मन यांनी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिला होता. हे सारे अवधपुरीचे राजे होते; परंतु मृत्यू आला आणि ते पटकन नाहीसे झाले. आणि बिचारे सुल्ताने आलम वाजिद अली शाह—जे यावेळी शेजारच्या 'राधामंजिल'मध्ये 'इंद्रसभा' नाटक करावयास लावून आपण अजून लखनौच्या कैसरबागेतच आहोत अशी स्वतःची समजूत करून घेत आहेत, तेही एके दिवशी नाहीसे होतील. बादशाहाची गादी असो की मातृभूमीचा वियोग, अपार आनंद असो की असह्य यातना असोत, मृत्यू येऊन सारा खेळ खलास करून टाकतो. मेल्यानंतर काय भोगावे लागत असेल कोण जाणे! थडगे आतल्या आत उघडले जाईल आणि मुन्कर व नकीर हे दोघे देवदूत मृतात्म्याची उलटतपासणी घेण्यासाठी हजर होतील...आणि...आणि...त्या कल्पनेने नबाब कम्मन भयंकर घाबरले. त्यांनी उशीवरून डोके उचलून आपल्या घरच्या माणसांना हाक मारण्याचा प्रयत्न केला. अली व हुसैन यांच्या नावाचा जप करून त्यांनी अब्बास अंमलदाराला हाक मारली. परंतु गळ्यातून आवाजच बाहेर पडला नाही. अत्यंत उकाड्यामुळे जीव गुदमरत होता. त्यांनी पलंगावरून उठण्याचा प्रयत्न केला; परंतु ते तसेच मागे कोसळले.

कारण पवित्र कर्बल्याच्या यात्रेऐवजी नबाब अबुल मन्सूर कमालुद्दीन अली रजा बहादुर यांनी परलोकयात्रा सुरू केली होती.

## १९

नबाब सफदरजंग यांच्यापासून सुलताने आलम यांच्यापर्यंत नऊ राज्यकर्त्यांनी अवधपुरीवर राज्य केले. सुलताने आलम यांच्या कारकीर्दीत स्लीमन साहेब आला. सफदरजंगांनी आपल्या सामर्थ्याच्या जोरावर या राज्याचा पाया घातला होता. दिल्लीच्या अस्तानंतर

हे भारतातील सर्वांत अधिक भव्य राज्य होते. त्याचे बादशाह फ्रान्सच्या चौदाव्या लुईहून अधिक प्रतापशाली होते. परंतु स्लीमन साहेब त्या सर्वांपेक्षा सामर्थ्यवान होता. यामुळे त्याने हां हां म्हणता एवढी जोराची फुंकर मारली की सारी दीपमाळ बघता-बघता विझून गेली. हॅवलॉकचा जय झाला. सुल्ताने आलम पराभूत झाला. लखनौची इंद्रपुरी उजाड झाली. दशावतारी खेळ संपले. कैसरबागेतील चांदीच्या बारदरीतील हरित परीचा नाच, ऐषबागेतील जत्रा, मोहरम व रामलीला यांचे जल्लोष...सारे काही संपले. दिलकुशा महाल आता रिकामा पडला आहे. बेलीगार्ड तोफांनी उडवून देण्यात आली. हजरतगंजमध्ये इंग्रजी दुकाने आहेत; अमीनाबादेत शाळा व कॉलेजे आहेत. वृत्तपत्रे प्रसिद्ध होत आहेत. टेलिग्राफच्या तारा किणकिणत आहेत. अयोध्येच्या रामचंद्रांची गादी लुटली गेली. सकाळी उठून डोळे उघडले तो हा सारा जादूचा खेळ असल्याचे दिसून आले. शेवटचा अंक सुरू होण्यापूर्वीच राजा इंद्राला त्याच्या अप्सरांसह देवलोकातून हद्दपार करण्यात आले.

कलकत्त्याचे प्रोफेसर नीलांबर दत्त आपल्या मुलाला भेटण्यासाठी लखनौला आले होते. आगगाडी स्टेशनात पोहोचली; आणि ते बग्गीत बसून स्टेशनाच्या आवाराबाहेर आले. सारे चित्रच बदलून गेले असल्याचे त्यांना दिसले. अठ्ठेचाळीस वर्षांपूर्वी, १८२३ साली ते लखनौला आले होते. ते बादशाहाचे लखनौ होते. हे इंग्रजांचे लखनौ आहे. येथे घूमीबेग कोतवालाऐवजी इंग्रज डेप्युटी कमिशनराचे राज्य आहे. तो सआदतअली खानच्या 'नूरबख्श' महालात बसतो. बिचाऱ्या सआदत अली खानाच्या 'हयातबख्श' महालाला आता 'बॅक्स हाउस' असे म्हणतात. कैसरबागेत कॅनिंग कॉलेज आहे. त्या कालेजात कलकत्त्याचा मनोरंजन दत्त अध्यापक आहे. शहरातील गल्ल्या आणि मोहल्ले तेच आहेत; परंतु जमाना बदलला आहे. काळोखाने भरलेल्या मोहल्ल्यांतील मोडकळीस आलेल्या घरांमध्ये बदललेल्या काळाचा आघात झालेले लोक मान खाली घालून वावरत आहेत. रावांचे रंक झाले, रंकांचे राव झाले. बंडखोरांना फाशी आणि स्वामिभक्तांना जमीनदाऱ्या मिळाल्या. अख्तर पिया वर्तेजद अली शाह परदेशी (कलकत्त्याला) गेल्यापासून त्यांच्यासाठी विलाप करणाऱ्यांचे अश्रूही सुकून गेले. ही अवधपुरी आहे. इथल्या रामालाही असाच वनवास भोगावा लागला होता.

बग्गी स्टेशनातून बाहेर पडून शहराकडे चालली. डोकीला पंचा गुंडाळलेल्या कोचवानाने नीलांबर दत्तांना विचारले, "बाबूसाहेब, मागच्या बाजूला साईस बसलाय. याला वर बोलावून घेऊ? म्हातारा आहे. पडला तर मरून जाईल."

"घे ना!" त्यांनी उत्तर दिले. त्याबरोबर एक म्हातारा उडी मारून पुढे आला आणि कोचबॉक्समध्ये बसला. बग्गी पुढे चालू लागली.

"बाबूसाहेब, कलकत्त्याहून येणं झालं आपलं?"

"होय!"

"आपणही कलकत्त्याला जावं असं वाटतंय मला. इथं आता मन लागत नाही." तरुण कोचवान म्हणाला.

"कोण आहेत?" म्हाताऱ्या साइसाने तरुण कोचवानाच्या कानाशी तोंड नेऊन रहस्यमय ढंगात विचारले.

"कलकत्त्याचे बाबू आहेत." तरुणाने जोराने ओरडून सांगितले. त्याचे नाव शंभू असे होते.

"कलकत्ता!..." म्हातारा उद्‌गारला. त्याचे नाव गंगादीन. त्याला कमी ऐकू येत होते. अविश्वासाच्या स्वरात त्याने पुनः एकदा 'कलकत्ता!' असा उद्‌गार काढला आणि मागे वळून आपल्या अंधुक डोळ्यांनी बंगाली वृद्धाकडे पाहिले.

"अरे होय बाबा! डोक्यात शिरत नाही?" शंभू म्हणाला.

"बाबूसाहेब!" गंगादीन मागे वळून अत्यंत केविलवाण्या स्वरात नीलांबर दत्तांना म्हणाला, "खुदावंत, मला कलकत्त्याला पाठवून द्या. तिथं आमचे बादशाह राहतात."

तरुण कोचवान हसला. नीलांबर दत्तांना उद्देशून तो म्हणाला, "हुजूर, या आजोबांच्या बोलण्याकडे तुम्ही लक्ष देऊ नका. आगगाडीतून उतरणाऱ्या प्रत्येक प्रवाशाला ते हेच सांगत असतात, 'बाबा मुसाफिरा, तू कलकत्त्याहून आला आहेस. आम्हांलाही तिथंच नेऊन सोड!' आता यांना काय म्हणावं? आधीच आमचे बादशाह तिथं काय हाल-अपेष्टा भोगताहेत, त्यात यांची भर! जणू फक्त यांचीच उणीव आहे तिथं."

नीलांबर दत्त स्तब्ध राहिले. बग्गी आता अमीनाबादकडे चालली होती.

"सरकार, यापूर्वी कधी लखनौला आला होता आपण?" कोचवानाने विचारले.

"होय!" नीलांबर दत्तांनी दचकून उत्तर दिले.

"केव्हा?"

"खूप वर्षे झाली. तुझा जन्मसुद्धा झाला नसेल त्यावेळी. गाजीउद्दीन हैदरांच्या जमान्यात!"

"बाबा!" कोचवानाने पुनः जोराने ओरडून म्हाताऱ्या गंगादीनच्या कानात सांगितले, "बाबूसाहेब, तुमच्या गाजीउद्दीन हैदरांच्या काळात इथं आले होते म्हणे!"

नंतर तो नीलांबर दत्तांना उद्देशून म्हणाला, "बाबा सांगत असतात की आपण गाजीउद्दीन हैदरांचे चोपदार होतो म्हणून. त्यापूर्वी ते घोडागाडी चालवीत असत. सुल्ताने आलमही यांना फार मानत असत."

"खुदावंत!" गंगादीन म्हणाला, "सुल्ताने आलमना तुम्ही पाहिलंय? खुशाल

आहेत!" आणि तो लहान मुलाप्रमाणे रडू लागला.

नीलांबर दत्त हेलावले. माणसे इतकी भावनाप्रधान असू शकतात याची त्यांना आतापर्यंत कल्पनाच नव्हती. कित्येक वर्षांपासून ते बुद्धिवादाचे उपासक होते. आता मात्र त्यांनी अंतःकरणाच्या महानतेचे मनातल्या मनात कौतुक केले. बग्गी एव्हाना अमीनाबादच्या चौकात येऊन पोहोचली होती.

अकस्मात कोचवान ओरडला. "अग ए म्हातारडे, बाजूला हो. का फुकट मरतेस?" आणि त्याने लगाम खेचून गाडी थांबविली. दुलई पांघरलेली एक म्हातारी समोर आली आणि तिने हात पसरून यांत्रिकपणे भीक मागण्यास सुरुवात केली. "जनाबे अमीरका सदका! खुदा तुम्हें सिवाय गमे हुसैनके और कोई गम न दे!"

नीलांबर दत्त बग्गीतील तक्क्याला टेकून विचार करीत होते, लखनौ हे काय फक्त म्हाताऱ्यांचंच शहर झालंय? इथले तरुण कुठं गेले?"

भिकारीण डोळे मिटून तशीच बडबडत राहिली, "खुदा तुम्हांला हुसैनच्या दुःखाखेरीज इतर कसलंही दुःख न देवो. एक पैसा!... फक्त एक पैसा!"

गौतम नीलांबर दत्त केवढे दचकले!

हा आवाज अगदी ओळखीचा होता. या आवाजाने किती गुलगुल गोष्टी केल्या होत्या. संगीत ऐकविले होते. खळाळणारे हास्य केले होते.

त्यांनी गडबडीने चष्मा नीट केला आणि बग्गीतून बाहेर पाहिले. परंतु रस्त्याच्या कडेला तीच भिकारीण उभी होती—तपकिरी रंगाची जुनी, फाटकी दुलई लपेटून उभी असलेली भिकारीण!

"हिला काही देऊ नका, खुदावंत!" शंभू आपल्या जागेवरून मागे वळून हलक्या आवाजात म्हणाला, "हिला कोकेनचं व्यसन आहे. जे काही मिळतं त्याची कोकेन घेऊन खाते, दळभद्री!"

नीलांबर दत्तांनी आपल्या थरथरत्या हातांनी खिशातून एक रुपया काढून भिकारिणीच्या हातावर ठेवला.

भिकारिणीने आपल्या मिचमिचत्या डोळ्यांनी त्या म्हाताऱ्या बंगाल्याकडे पाहिले. त्याची लांब दाढी पांढरी शुभ्र झालेली होती; त्याने झुळझुळीत धोतर नेसलेले होते; आणि शेंदरी रंगाची शाल अंगाभोवती लपेटून, मांडीवर मांडी ठेवून तो बग्गीत बसला होता.

गौतम नीलांबरांनी म्हातारीला ओळखले. ती चंपा होती. तो रुपया मुठीत घट्ट धरून ठेवून एक क्षणभर ती त्यांच्याकडे आश्चर्याने पाहात राहिली. पैसा मागितला असताना रुपया देणारा हा कोण जगावेगळा दयाळू रईस आहे! रुपया घट्ट धरून ती आपल्या नेहमीच्या शब्दांत त्याला दुवा देऊ लागली, "सरकार, गरीबपरवर, तुम्हांला

नातवंडांची खुशाली पाहायचं भाग्य लाभो. बंदानवाज, बंडाच्या आगीत मी होरपळल्ये आहे. शाही जमान्यात माझ्या दारात हत्ती झुलत होता. आता कुणी पोटभर भाकरीही देत नाही. अल्ला तुम्हांला..." शंभूने घोड्याला चाबूक मारला. बग्गी पुढे चालू लागली. शंभू हसून म्हणाला.

"म्हातारीच्या गोष्टी! दारात हत्ती झुलत होता म्हणे. जो तो हेच सांगतोय...मी बंडापूर्वी यंव होतो आणि त्यंव होतो. या आमच्या आजोबांकडेच बघा ना बाबूसाहेब, बंडापूर्वी हे बादशाहांचे खास चोपदार होते. आता मोतद्दारी करताहेत."

चंपाने संध्याकाळच्या अंधुक प्रकाशात तो रुपया उलटसुलट करून निरखून पाहिला आणि हळूहळू ती एका काळोख्या गल्लीत शिरली. तेथे एका तळघरातील दुकानात कोकेन विकत मिळत असे. भांग व चरस यांचे व्यसन असणारे लोक तेथे झिंगून पडलेले असत.

बग्गी अमीनाबादच्या चौकातून पुढे गेल्यावर नीलांबर दत्तांनी पुनः एकदा मागे वळून पाहिले. दुलई पांघरलेली चंपा रस्त्याच्या कडेला उभी राहून त्यांनी दिलेला रुपया दिव्याच्या प्रकाशात न्याहाळून पाहात होती. जणू तिचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वासच बसत नव्हता. तिचे केस चांदीसारखे चमकत होते. तिच्या चेहऱ्यावर असंख्य सुरकुत्या पडल्या होत्या. तिच्या दुलईला जागजागी ठिगळे लावलेली होती. अधूनमधून जरीचे भरतकाम शिल्लक राहिलेले होते. मात्र त्यांची जर उसवून बाहेर पडली होती.

त्यांनी बग्गीतील तक्क्याला पाठ टेकून डोळे मिटून घेतले...

कारण गौतम नीलांबराला वैशालीची आम्रपाली दिसत होती!

* * *

गोमतीच्या पैलतीरावर शाहे नजफच्या समोरच सिंघाडेवाली कोठी होती. बाबू मनोरंजन दत्त यांनी आपल्याला राहाण्यासाठी ही हवेली भाड्याने घेतली होती.

त्या दिवशी रात्री जेव्हा मनोरंजन आपल्या खोलीत जाऊन झोपला आणि घरमालकाच्या खोल्यांतील दिवे मालविण्यात आले तेव्हा नीलांबर दत्त व्हरांड्यात येऊन उभे राहिले. त्या व्हरांड्याच्या पायऱ्या नदीच्या पात्रापर्यंत गेलेल्या होत्या. ते बराच वेळपर्यंत नदीच्या प्रवाहाकडे पाहात राहिले. मध्यरात्र उलटून चालली होती. परंतु खोलीत जाऊन झोपण्याऐवजी ते बाहेर पडले आणि गोमतीच्या काठाकाठाने जाणाऱ्या रस्त्याने चालू लागले. सगळीकडे अगदी सामसूम होती. त्यांच्या मागून एक भली मोठी भुतावळ त्यांचा पाठलाग करीत येत होती. पुढे पंख असलेल्या पऱ्या नाचत चालल्या होत्या. समोर थोड्या अंतरावर पुलाखाली नावा बांधलेल्या होत्या आणि चंडीचे मंदिर दिसत होते. झाडांवर लालबुंद डोळ्यांची माकडे-वानरे झोपली होती. नीलांबर दत्तांच्या

मागून दात विचकून लंगडत, उड्या मारीत येत असलेली भुते त्यांच्या चांगलीच परिचयाची होती.

अवधचे सारे बादशाह...सआदत अलीखान व जॉन बेली, नासीरुद्दीन हैदर आणि त्यांचा युरोपियन न्हावी, कुदसियामहल आणि म्हातारे मुहम्मद अली शाह, स्लिल हावर्ड ॲश्ले आणि सुजाता, लॉर्ड मेकॉले आणि बिशप हेबर—या इंग्रजी भुतांना ती जिवंत असतानाच तो चांगला ओळखत होता. आता मेल्यानंतर ते लोक कोणत्या नरकात जाऊन पडले असतील कोण जाणे! पण त्यांची भुते मात्र अजून पूर्वीसारखीच मानगुटीवर बसलेली होती. जगातील सारे चढ-उतार, उत्थाने व पतने गौतमाने पाहिली होती. आता त्याला काय पाहावयाचे उरले होते? नदी वाहात होती. तिच्या काठी घरे होती. त्या घरांना नावे होती. त्या घरांत माणसे झोपली होती. त्या माणसांची ही नावे होती. घरे दगडांची बनलेली होती. नदीच्या काठी दगड विखुरले होते. काळ प्रवाही होता. काळ दगडांमध्ये गोठून गेला होता. स्मशानात ज्वाळा उफाळत होत्या. आज रात्री कोण कोण मेले असेल देव जाणे!

नीलांबर दत्त पुढे चालत राहिले.

समोर स्मशान होते. स्मशानात काली नृत्य करीत होती—साऱ्या सृष्टीला, तिचा अंत झाल्यावर, आपल्यामध्ये सामावून घेणारी काली! जो कोणी आपल्या, साऱ्या वासनांवर विजय मिळवून तिच्या अस्तित्वात विलीन होऊ शकत असेल, फक्त तोच तिला न भिता तिची आराधना करू शकतो.

स्मशान! येथे साऱ्या इच्छा-आकांक्षा जळून खाक होतात. आणि काली! ती बुद्धी व वाणी यांच्या पलीकडे साऱ्या प्राणिजगताला अस्तित्वरहित बनवून टाकते; ती शून्याला पूर्ण बनविते. हे पूर्ण म्हणजेच प्रकाश व शांती

कालीचे परिधान समाधी हे आहे. ती स्वतःच विस्तार आहे, कारण ती सीमारहित आहे. ती महान शक्ती आहे. ती मायेहून श्रेष्ठ आहे; कारण ती स्वतःच माया बनून सृष्टीची निर्मिती करते.

स्मशानात काली शिवाच्या श्वेत शरीरावर उभी आहे. चितेतून उठणाऱ्या धुरात काली नृत्य करीत आहे. ती काली आहे—तारा धूमवती! ती शांतरसाचे नृत्य करीत आहे आणि सृष्टी जयजयकार करीत आहे.

गौतम नीलांबरांनी कालीला सती, गौरी व योगमाया यांच्या रूपांत पाहिले होते. त्यांनी स्मशानाकडे दृष्टिक्षेप केला आणि तिला ओळखले.

ते थोडा वेळ पुलावर उभे राहून मंद पडत चाललेल्या ज्वाळांकडे पाहात राहिले. नंतर जड पावलांनी सिंघाडेवाली कोठीकडे परत फिरले.

पहाटे चार वाजताच घरच्या मालकीणबाई अंथरुणावरून उठल्या आणि त्यांनी जाऊन मोलकरणीला उठविले. "चहाला ठेव. छोटीची शाळा आज सहा वाजता आहे." त्यांनी सांगितले. मोलकरीण डोळे चोळीत उठली. आणि पाण्याला नळाकडे गेली. आता ती स्नानगृहात पाणी भरून ठेवील. बडेसाहेब व भय्यासाहेब यांना दाढीसाठी गरम पाणी देईल आणि चहाची व्यवस्था करील.

घरच्या मालकीणबाई पूजेसाठी देवघरात गेल्या. देवघर दुसऱ्या मजल्यावर पूर्वेकडच्या बुरुजात होते. देवघरात उकाडा होता आणि पावसाळ्यातील काहिली अजून कमी झालेली नव्हती. दार उघडताच आतील काळोखात गोपाळकृष्ण नेहमीप्रमाणे आपल्या भावशून्य डोळ्यांनी समोरच्या पोकळीत पाहात असल्याचे दिसून आले. त्यांच्या पीतांबराला नकली जरीचा काठ लावलेला होता. त्यांच्या मुकुटात एकच मोरपीस होते. ते किंचित वाकडे झाले होते. ते नेहमीप्रमाणे एका पायावर दुसरा पाय आडवा ठेवून बासरी ओठांना लावून, पितळेच्या लहानशा देव्हाऱ्यात कोंबल्यासारखे उभे होते. त्यांच्या चेहऱ्यावर मोठे भयंकर स्मित दिसत होते. देवघरात डास गुणगुणत होते. बुरुजाच्या समोर व्हरांड्याच्या दुसऱ्या टोकाला आणखी एक बुरूज होता. व्हरांड्यात दोन्ही मुली झोपल्या होत्या. व्हरांड्याच्या दुसऱ्या टोकाला असलेला दुसरा बुरूज छतर मंजिलच्या समोर होता. तेथे मुलींचा मोठा भाऊ झोपत होता. जवळच टेबल-पंखा घूं-घूं करीत होता. बुरुजाचे आठही दरवाजे सताड उघडे होते आणि थंड वारा आत येत होता. कपाटांमध्ये असंख्य पुस्तके होती—फारसी, उर्दू व इंग्रजी भाषांतील पुस्तके! पलंगाजवळच्या टेबलावर उर्दूची नवी पुरोगामी मासिके व साप्ताहिके यांचा ढीग पडला होता. भिंतींवर नंदलाल बोस, अवनीन्द्रनाथ ठाकुर, खस्तगीर, एल. एम. सेन, रविवर्मा यांनी रेखाटलेली जलरंगातील व तैलरंगातील चित्रे होती. त्यांतच जवाहरलाल नेहरूंचे एक छायाचित्र होते, आणि विद्यापीठातील ग्रुप फोटो फ्रेम करून लावण्यात आलेले होते. १९३७-३८ व ३९ साली अखिल भारतीय वक्तृत्व स्पर्धेत मिळविलेल्या ढालींचे फोटो होते. कोपऱ्यातील कॉर्निसवर एक ग्रुप फोटो होता. तो आता अगदी पिवळा पडला होता. त्याच्यावर १८९७ साल लिहिलेले होते. हा ग्रुप फोटोही कॅनिंग कॉलेजातला होता. हे छायाचित्र मुलाच्या वडिलांच्या विद्यार्थीजीवनातील होते. त्यामध्ये त्या मुलाचे वडील गोल टोपी व बंद गळ्याचा कोट घालून अगदी कडक शिस्तीत, फॅकल्टी ऑफ आर्ट्सचे अध्यक्ष कै. डॉ. मनोरंजन दत्त यांच्या मागे उभे होते. डॉ. मनोरंजन दत्त यांनी टागोरांप्रमाणे लांब, शुभ्र दाढी ठेवलेली होती (अर्थात प्रत्येक दाढीवाला बंगाली टागोरांसारखाच दिसतो, ही गोष्ट अलाहिदा!) आणि ते आपल्या छडीवर दोन्ही हात ठेवून कॅमेऱ्याकडे टक लावून पाहात होते.

डॉ. मनोरंजन दत्त याच हवेलीत सुमारे सत्तर वर्षांपूर्वी भाडेकरू म्हणून राहात होते.

खालच्या मजल्यावर एक दिवाणखाना होता. तेथे भिंतीतील शेगडीच्या वरच्या बाजूस एक तैलचित्र टांगलेले होते. त्या चित्रात एक जुन्या पद्धतीचा म्हातारा हिरव्या किनारीचा अंगरखा आणि चुणीदार पायजमा घालून, डोकीला मंदील बांधून नक्षीदार खुर्चीवर बसला होता. हे चित्र बादशाही जमान्यात एका इंग्रज चित्रकाराने काढले होते. त्याच्या खाली उर्दूत लिहिले होते, 'रायजादा बक्षी मेहताबचंद.' या हवेलीला तीन बुरूज होते. तिसऱ्या बुरुजात लाकडी फरशी होती. येथे वाद्ये ठेवण्यात आली होती आणि संध्याकाळी सूरजबक्षसाहेब आले म्हणजे मुली त्यांच्याकडून संगीत व नृत्य शिकत.

ही हवेली म्हणजे येथील रहिवाशांच्या दृष्टीने विश्वकेंद्र किंवा सारसर्वस्व होते. (तसे पाहिल्यास प्रत्येक घर हे त्यात राहणाऱ्यांच्या दृष्टीने विश्वकेंद्रच असते!)

येथून प्रिय व्यक्तींच्या अंत्ययात्रा निघाल्या, नववधूंचे मेणे आले, वराती निघाल्या, मुली सासरी गेल्या, आणि सण साजरे केले गेले. येथे मुले जन्माला आली. ती आपापसात मांडली, हसली, रडली. प्रत्येक घरात हे सारे होतच असते. प्रत्येक घर हे सारे निमूटपणे पाहात असते. त्याची कहाणी कोणी ऐकत नाही. काळाशी त्याच सतत संघर्ष चाललेला असतो. "तू कुठवर माझ्या बरोबर राहू शकशील? तू कुठवर माझा माग काढशील?...मी बघतोच." काळ म्हणतो. तरीही घर गप्प राहाते. वर्षे लोटतात. शतके बदलतात. ऋतुचक्र चालत राहाते. घर काळरूपी समुद्रात लहानशा जहाजाप्रमाणे नांगर टाकून उभे असते. केव्हातरी मग लाटा त्याला वाहून नेतात; आणि त्याचे नावनिशाणही शिल्लक उरत नाही.

ही हवेली नबाब सआदत अली खानांच्या अमदानीत त्यांचे अर्थमंत्री रायजादा बक्षी महेताबचंद यांनी बांधली होती. यावेळी त्यांचे पणतू तिच्यात राहात होते. ते बऱ्यापैकी बॅरिस्टर होते. त्यांना एक मुलगा होता आणि दोन मुली. तिघेही अजून शिकत होते.

बॅरिस्टरसाहेबांचा सारा वेळ कॉंग्रेसच्या कामात निघून जाई. त्यातून फुरसत मिळाली की ते 'जमाना' व 'निगार' या उर्दू मासिकांत काव्यासंबंधी लेख लिहीत. अशा स्थितीत प्रॅक्टिसकडे लक्ष कोण देणार? परंतु घरची जमीनदारी होती, त्यामुळे मजेत चालले होते. दोन्ही मुलींच्या हुंड्यांची तरतूद झालेली होती. ज्या केंब्रिजमध्ये त्यांनी स्वतः शिक्षण घेतले होते तेथेच आपल्या मुलाला पाठविण्याचा त्यांचा विचार होता. या वेळी ते पोर्चवरील उघड्या गच्चीत मच्छरदाणी लावून झोपले होते. पत्नीच्या खुडबुडीमुळे त्यांना जाग आली. त्यांच्या पत्नीला हीच तर भारी वाईट खोड होती. भल्या पहाटे आपल्या खडाकांच्या आवाजाने ती साऱ्या घराला जागे करून टाकी. कधी गुलामांचे

दार उघडील तर कधी कोठीघरातील कपाटच बंद करील; कधी या खोलीत जाईल तर कधी त्या खोलीत. त्यानंतर ती पूजेला बसे आणि जोरजोराने रामायण वाचू लागे.

मोठी आल्हाददायक हवा होती. समोर नदीवर अजून धुके पसरलेले होते. मोती-महाल पुलावर अजून सामसूम होती.

"ऊठ बाळ, लौकर ऊठ! आजपासून तुझी शाळा सकाळची झालीय ना!" जमुना मोलकरणीने लहान मुलीला म्हटले. मुलगी खडबडून उठून बसली. आजपासून शाळा सुरू होणार होती. ती पलंगावरून उडी मारून घाईघाईने स्नानगृहाकडे पळाली.

थोरल्या मुलीने आळसाने कूस बदलली, डोळे उघडले आणि ती नदीकडे पाहात राहिली. ती सतरा-अठरा वर्षांची असेल. ती कॉलेजात शिकत होती आणि तिचे कॉलेज चौदा जुलैला उघडणार होते. तिचे लग्न लौकरच होणार होते आणि तिला कॉलेजची मुळीच पर्वा नव्हती. ती निश्चिंतपणे पडल्यापडल्या नदीकडे पाहात राहिली.

पुढच्या खोलीतून तिचा भाऊ सिंहासारखा चपला फरफटत बाहेर आला आणि दोन्ही व्हरांड्यातील एका खांबाला टेकून आळसावलेल्या नजरेने नदीकडे पाहू लागला. त्या बाजूला पूल होता. त्याने जोराने आळोखेपिळोखे दिले आणि खांद्यावर टॉवेल टाकून मस्तीच्या आवाजात गात तो स्नानगृहात घुसला.

"बरं का ग, शाळेत तुझ्या मैत्रिणीला सांग, म्हणावं संध्याकाळी येऊन 'बडकी'च्या परकराला काठ लावायचं काम पुरं करून जा." वरच्या मालकिणीने देवघरातून बाहेर येऊन छोट्या मुलीला उद्देशून म्हटले. ती भरभर चहा पिऊन, पुस्तके घेऊन जिन्याकडे धावत चालली होती. खाली पोर्चमध्ये लामार्तिनेरच्या बसने हॉर्न वाजविला.

"बरं बरं! सांगते हं!" जिन्याच्या पायऱ्या उतरत तिने वळून उत्तर दिले.

मालकीणबाई अस्सल पूरबी (उत्तरप्रदेशाच्या पूर्व भागातील) होत्या. त्या थोरल्या मुलीला 'बडकी' म्हणत आणि धाकटीला 'छुटकी!' बॅरिस्टरसाहेबांनी त्यांना मुंबई, कलकत्ता, काश्मीर वगैरे सर्व ठिकाणी हिंडवून आणले होते. दरसाल त्या नैनिताल व मसुरीला जात असत. परंतु त्यांच्या वागण्याबोलण्यात तिळमात्रही फरक पडला नव्हता.

इतक्यात मोठ्या मुलीने व्हरांड्यातून खाली डोकावून पाहिले. खाली बागेतील रस्त्यावर शाळेची बस उभी होती. त्या बसमध्ये दोनचार हिंदी मुली सोडल्या तर बाकी सर्व इंग्रज मुली होत्या. हिंदी मुलींपैकी एकीने खिडकीतून डोके बाहेर काढले आणि हात हलवून ती म्हणाली, "आम्ही संध्याकाळी मॅरिस कॉलेज आटोपून परत येऊ."

"अच्छा!" थोरल्या मुलीने उत्तर दिले.

बस फाटकातून बाहेर पडली.

त्यानंतर मुलगा शीळ घालीत खाली उतरला. पोर्चमध्ये त्याची सायकल होती. त्याने

रुबाबात एक वही सायकलच्या हँडलमध्ये अडकविली आणि बेफिकीरपणे पॅडल मारीत तो कच्च्या सडकेवरून युनिव्हर्सिटीकडे रवाना झाला.

सूर्य वर आला. सारे जग आपापल्या कामात दंग झाले. संध्याकाळ झाली. दिवे लागले. नदीकाठच्या त्या हवेलीच्या व्हरांड्यातून मुलींच्या हास्याचा खळखळाट ऐकू येऊ लागला. त्या चारपाच तरुण मुली व्हरांड्याच्या कठड्यावर बसून अशा काही हसत होत्या, जणू त्यांच्या जीवनात दुःख नावाची एखादी चीजच नव्हती...दुःखाचा स्पर्शच त्यांना झालेला नव्हता.

छतरमंजिलच्या मागे सूर्य अस्तास गेला. नदीच्या काठाकाठाने असलेल्या होड्यांतून दिवे लुकलुकू लागले. नदीचा प्रवास अखंडपणे चालू होता.

## २०

सूर्य जांभळींच्या मागे पोहोचला की चम्पी मॅरिस कॉलेजहून परत निघे आणि आपल्या ठराविक गतीने नदीच्या पुलावर येई. नदीचा पूल ओलांडला की एक स्वच्छ, सरळ रस्ता विद्यापीठाकडे जाई. त्याला युनिव्हर्सिटी रोड असे म्हणत. त्याच्या दोन्ही बाजूंनी नदीच्या काठाकाठाने दोन कच्चे रस्ते होते. तेथून चाँदबागेपर्यंत बंगले होते. तेथे इझाबेला थॉबर्न कॉलेज होते. हा मोठा शांत व नीरव भाग होता. क्वचित एखादी मोटार येजा करी किंवा कॉलेजचा एखादा विद्यार्थी किंवा विद्यार्थिनी सायकलवरून जाताना दिसे. उपनगरात किंवा डालीगंजकडे जाणारे एक्के फैजाबाद रोडवरून येजा करीत. त्याच्या पुढे मुस्लिम गर्ल्स कॉलेज होते. त्याच्या पुढे तुरीची शेते व उसाचे मळे होते. त्यानंतर कागदाची गिरणी लागे. त्याच बाजूला लकडीपूलही होता. तिकडून चिरैया तलाव व भैंसाकुंड यांच्याकडे रस्ता जाई. त्याच्या पुढे शिकंदर बाग व बनारसी बाग. त्यानंतर गव्हर्नमेंट हाउसचा भाग येई. त्याच्या मागे गाजीउद्दीन हैदर कालवा होता आणि हजरतगंज व लामार्तिनेर कॉलेज होते. लामार्तिनेर रोड हिरव्यागार वनश्रीमधून दिलकुशा पॅलेसकडे जाई. त्याच्या पुढे हिरवीगार छावणी होती.

मोतीमहाल पुलाच्या पुढे मॅरिस कॉलेज, कैसरबागेची बारादरी व कैसरबाग होती. त्याच्या पुढे अमीनाबाद व अमीरुद्दौला हे दोन पार्क होते. तेथून पुढे रस्ते बाजारपेठेकडे व चौकाकडे जात होते. तेथे मेडिकल कॉलेज होते, शाहमीनाचा दरगा होता आणि हुसेनाबादचा इमामवाडा होता. तेथेच अकबरी दरवाजा व गोल दरवाजा होता.

हा सारा भाग म्हणजे जुने लखनौ शहर. नव्या लखनौहून हा भाग खूप दूर होता. परंतु नव्या लखनौमध्ये मात्र जागजागी जुने लखनौ विद्यमान होते. एका बादशाही महालात गव्हर्नमेंट हाऊस आले होते. नदीच्या काठी मोतीमहालात इंपीरियल बँक होती. हजरतगंजाच्या अगदी मध्यभागी बेगम हवेली होती. छतर मंजिलमध्ये क्लब होता. हे शहर मोठे डौल्दार आखीवरेखीव होते. येथील वस्तू नव्या असूनही पुरातन होत्या. या शहरामध्ये मोठ्या गंभीरपणे व स्थैर्याने जगण्यास काळपुरुष शिकला होता.

अशाच निश्चिंतपणाच्या व शांत वातावरणात बग्गी संध्याकाळच्या निळसर गुलाबी प्रकाशात मंद गतीने चालत मोतीमहाल पुलापर्यंत जाई. पूल ओलांडल्यानंतर विद्यापीठ मार्गाने जाण्याऐवजी बग्गी बहुधा डाव्या हाताच्या कच्च्या रस्त्याने चालू लागे. त्या बाजूला जुन्या काळचे काही बंगले होते.

गंगादीन कोचवान आरामात कोचबॉक्सवर बसल्याबसल्या मागे वळून अदबीने विचारी, "बिटिया, सिंघाडेवाली कोठीकडे नाही जायचं ?"

"ही गोष्ट मी आता इथून सांगते." तलअत सांगू लागली, "जुन्या हकीगती सांगण्याच्या अनेक पद्धती असतात. त्यांतली एकही पद्धत माझ्या मनाला येत नाही. कोणती पात्रं जास्त महत्त्वाची आहेत...गोष्ट कुठून सुरू झाली...क्लायमॅक्स कुठे होता...हीरॉइन कोण होती...आणि तिचा शेवट कसा व्हायला हवा होता....हीरो कोण होता......ही कथा सांगणारा कोण आणि ऐकणारा कोण ? माझा थोरला भाऊ कमाल एके काळी असं म्हणत असे की केव्हातरी बसून मी हे सारं नक्की करीन. परंतु कमाल अजूनपर्यंत काहीच ठरवू शकलेला नाही. तेव्हा चंपाताईला विचारायला कोण जाणार ?......'होय, जायचं !' मी गंगादीनला सांगे......बग्गी हळूहळू कच्च्या रस्त्यावरून चालू लागे. तिथं कशी अगदी सामसूम असे. त्याच रस्त्यानं पुढं गेलं की स्मशान घाट लागे. नदीच्या पाण्यात मोती महालाच्या रुपेरी इमारतीची पडछाया थरथरत असे आणि छतरमंजिलचा सोनेरी घुमट व नजफ अशरफचा इमामवाडा— नदी या इमारतींच्या पायऱ्यांजवळून सभ्यपणे वाहात राही. सिंघाडेवाली कोठीच्या पायऱ्याही पाण्यापर्यंत जाऊन पोहोचल्या होत्या. ही दुमजली इमारत होती. तिच्या तीन अष्टकोनी बुरुजांमुळे तिला सींघाडेवाली (शिंगाड्याच्या आकाराची) कोठी असे नाव मिळाले होते. या बुरुजांवर मातलेल्या शेवाळाच्या किटणामुळे ते आता हिरवे दिसत होते हिंवाळ्यात संध्याकाळी सूर्य फार लौकर अस्ताला जाई. 'बिटिया, निर्मलाबिटियाच्या घरी नाही जायचं ?' गंगादीन कोचबाक्सवर बसल्याबसल्या विचारी.

"आणि मग बग्गी रस्त्याच्या उतरणीवरून खाली उतरुन एक धक्का घेऊन सिंघाडेवाली कोठीत प्रवेश करी.

"'हे पाहा, मैयन तुझा 'आमद्‌नामा' देऊन गेलेत.' लाजवती पोर्चच्या गच्चीवरून ओरडून सांगे.

"मैयन म्हणजे हरिशंकर श्रीवास्तव. युनिव्हर्सिटीत होता. त्यानं बी. ए. ला फारसी घेतली होती.

"निर्मलेची थोरली बहीण लाजवती आरामात मांडी ठोकून नदीच्या बाजूला तोंड करून बसे. 'आता मला सांग की शाननं कुसुमला काय उत्तर दिलं?'

"मॉरिस कॉलिजचं राजकारण सुरू होई. लाज तिथून पाचव्या वर्षाची परीक्षा उत्तीर्ण झाली होती आणि आता तिचं लग्न होणार होतं.

"'राजकुमारी लाहोरला चाललीय!' मी म्हटलं.

"'लाहोर! अरे बापरे!'

"लाहोर फार दूर होतं. जणू दुसऱ्या ग्रहगोलावरचं शहरच म्हणाना का! असं वाटायचं जणू राजकुमारी सिंगापूरला जाणार होती.

"'अय्या!' पायात घुंगरू तसेच ठेवून निर्मला बाहेर येई आणि आपलं मत व्यक्त करी. पूर्वी तीही माझ्याबरोबर मॉरिस कॉलेजात होती. परंतु मागल्या वर्षी जेव्हा ती आजारी पडली तेव्हा डॉक्टरांनी सांगितलं की डान्स स्कूल आणि मॉरिस कॉलेज अशी दुहेरी मेहनत तिच्याकडून करवून घेण्यात येऊ नये. आता आमची मैत्रीण मालती हिचे थोरले बंधू संध्याकाळी येऊन एक तासभर तिच्याकडून तालीम करवून घेत. ती शंभू महाराजांच्या घराण्यातल्या एका कथ्थक नृत्यकाराकडून नृत्य शिकत होती. लामार्तिनेरमध्ये निर्मला आणि मी एकाच वर्गात होतो. आम्ही दोघी दोन वर्षांनंतर सीनियर केंब्रिजची परीक्षा देऊ.

"'आपणही नवीनवी ठिकाणं पाहावीत. असं मला फार वाटतं.' निर्मलेने जणू आपला भयंकर इरादा व्यक्त केला.

"मावळत्या सूर्यांचे रंगीबेरंगी किरण आता नदीच्या लाटांवर चमकू लागत. सारे जग, ही सृष्टी, भावी जीवन यासंबंधीचा जो पुसटसा आराखडा आमच्या डोक्यात होता तो आराखडा आमच्या समोरच्या त्या लाटांवर नाचू लागे. बादशाही जमान्यातल्या इमारती, बोटक्लबच्या होडया, सिंघाडेवाली कोठीच्या सुरक्षित, शेवाळलेल्या पायऱ्या... भूगोलाच्या विशेषज्ञांप्रमाणे आम्ही मेंदूवर जोर देऊन विचार करीत असू 'याच्या पुढं, नंतर काय असेल?...काय काय होत असतं?'

"'अप्पी (ताई) इथून निरोप घेऊन कुठं जाईल?' निर्मला विचार करता करता मध्येच विचित्र प्रश्न विचारी.

"'जिथं भैयासाहेब घेऊन जातील तिथं जाईल. आणखी कुठं जाणार?' मी गोंधळून उत्तर देई.

"'भय्यासाहेब कुठं जाणार?'

"'कोण जाणे!' मी गडबडून म्हणाले."

आता कमाल आपल्या कोपऱ्यातून उठून पुढे आला आणि एका टेबलाजवळ बसला. जणू तलअतचे बोलणे पूर्ण होण्याची तो वाट पाहात होता. त्यानंतर जणू ते सूत्र हाती घेऊन तो बोलू लागला,

"भैय्यासाहेब माझे चुलतभाऊ होते. ते माझे मेहुणे-माझ्या बहिणीचे यजमानही होऊ शकत होते. लहानपणापासून मी तसंच ऐकत आलो होतो. भैयासाहेब मोठे झाले. शिकून सवरून 'बडे आदमी' बनले म्हणजे ते अप्पीशी लग्न करून तिला घेऊन जातील असं बोलल्लं जात होतं. मला सख्खा भाऊ नव्हता. तेच माझे हीरो होते.

"भैय्यासाहेब कित्येक वर्षांपासून आमच्या घरी राहात होते. ते स्वित्झर्लंडमध्ये लुसानच्या एका शाळेत शिकत असताना आमचे काका त्यांना भेटायला गेले होते. तिथंच ते अकस्मात वारले. त्यानंतर भैय्यासाहेबांना स्वित्झर्लंडहून परत बोलाविण्यात आलं. ते मुंबईहून सरळ अल्मोड्याला आमच्या घरी आले. पोर्चमध्ये ते फुलबूट घालून उभे होते. त्यांच्या स्विस शाळेतील हिरव्या व काळ्या रेघा असलेल्या मफलरमध्ये त्यांचा चेहरा जवळजवळ झाकला गेला होता. त्यांचे डोळे रडून रडून सुजले होते आणि त्यांच्या नाकाचा शेंडा लाल झाला होता. आपले उचंबळून येणारे अश्रू दाबून ठेवून त्यांनी मला आणि अप्पीला आपल्याजवळ बोलावलं आणि आम्हां दोघांना बाहूंत कवटाळून ते ओक्साबोक्शी रडू लागले. तलअत त्यावेळी फार लहान होती. ती त्यावेळी घरातील इतर मुलांबरोबर वेल्दोडयाच्या झाडावर चढून होमवर्क करीत होती.

"त्यानंतर भैय्यासाहेब आमच्याकडे राहू लागले. बाबा त्यांच्याकडे पाहून जगत होते. आई त्यांना जिवापलीकडे जपत होती. त्यांची आई फार पूर्वीच वारली होती. सारे कुटुंब त्यांचे कौतुक करीत होते.

"भैय्यासाहेब हे आमच्या काकांचे एकुलते एक चिरंजीव होते.

"उन्हाळ्याच्या सुटीनंतर भैय्यासाहेबांना लामार्तिनेर कॉलेजात दाखल करण्यात आले. हे कॉलेज दीडशे वर्षांपूर्वी नबाब आसिफउद्दौला यांचे खास मित्र जनरल क्लॉड मार्टिन फ्रान्सिस यांच्या पैशातून युरोपीय विद्यार्थ्यांसाठी स्थापन करण्यात आले होते.

"आता प्रश्न असा उत्पन्न होतो की या कथेचे नायक भैय्यासाहेबही होऊ शकत होते काय? मी कथाकथन सुरू केलंय, तेव्हा, पात्रांसंबंधी निश्चय करणंही माझंच काम आहे. मला वाटतं, भैय्यासाहेबांमध्ये कथानायकाला आवश्यक असणारी सारी वैशिष्ट्यं विद्यमान होती. तुम्ही चांगले शहाणेसुरते आहात. तेव्हा आतापर्यंत मी जे काही सांगितलं त्यावरून येवढी रोमँटिक पार्श्वभूमी कथानायकाखेरीज इतर कोणाची असणं

शक्य नाही, हे तुम्ही ओळखलंच असेल. तुम्ही जुनाट विचारांचे वाचक नसाल तर भैय्यासाहेबही अत्यंत देखणे होते, हे माहीत झाल्यानं तुम्ही अगदी गोंधळून जाल. फ्रान्स व स्वित्झर्लंड येथील शाळांमध्ये त्यांचं शिक्षण झालं असल्यामुळे प्रारंभी त्यांचे उच्चारही अगदी फ्रेंच लोकांसारखे होते. ते जेव्हा 'ट' व 'ड' ऐवजी 'त' व 'द' असा उच्चार करून अडखळल्यासारखं बोलत तेव्हा इझाबेला थॉबर्न कॉलेजच्या मुलींची हृदयं कशी धडधडत असतील याची कल्पना तुम्ही करू शकता.

"अप्पी आणि भैय्यासाहेब एकमेकांच्या बाबतीत लक्ष घालीत नसत. त्या दोघांचे वेगवेगळे गट होते. अप्पी भैय्यासाहेबांच्या मित्रांचं उणंदुणं काढून टिंगल करी तर भैय्यासाहेब अप्पीच्या मैत्रिणींच्या नकला करीत. लाजवती श्रीवास्तव ही अप्पीची सर्वांत प्रिय मैत्रीण. ती माझा आवडता मित्र हरिशंकर याची बहीण. कोण जाणे का, परंतु चंपाताईचं नाव निघालं की लाजवती एकदम गप्प होई. अप्पी बेफिकीरपणे हसत राही. हरिशंकर खुळ्यासारखा सिगारेट फुंकू लागे. चंपाताई आमच्यापैकी कुणाच्याच गटात नव्हती. ती सर्वांहून वेगळी, आम्हांला काहीशी अनोळखी वाटे. आम्ही सगळे जन्मल्यापासून एकमेकांना ओळखत होतो. सर्वांची पार्श्वभूमी एकच होती. सगळे एकाच वर्गातील होतो. चंपाताईची पार्श्वभूमी आम्हांला ठाऊक नव्हती. मला नेहमी दाट शंका येई की चंपाताई कनिष्ठ मध्यम वर्गातली असावी.

"भैय्यासाहेब कायद्याचा अभ्यास करीत होते त्यावेळी चंपाताई बनारसहून येऊन इझाबेला थॉबर्न कॉलेजात प्रविष्ट झाली.

"ही इसवी सन १९४१ ची गोष्ट आहे.

"अप्पी लामार्तिनेर शाळेतून इझाबेला थॉबर्न कॉलेजात आली होती. ज्या वर्षी अप्पीनं आपलं शिक्षण संपवलं त्याच वर्षी भैय्यासाहेब आणि अप्पी यांचं लग्न मोडलं.

"आता मी मनातल्या मनात एका गोष्टीचा विचार करतोय. ती गोष्ट अशी की त्या काळाची ही हकीगत मी ज्या पद्धतीनं, जितक्या विस्तारानं सांगू इच्छितो त्या पद्धतीनं आणि तितक्या सविस्तरपणानं मला ती सांगता येणार नाही. पुष्कळच लहानसहान गोष्टी आहेत. बादशाह बागेचं शाही जमान्यातलं फाटक, फुलांचे ताटवे, रस्त्याने जाणाऱ्या पाणीवाल्या बाया, आणि लाल घागरा नेसून दुपारच्या निःस्तब्ध वेळी रस्त्यावर पडलेल्या चिंचा वेचणारी आणि एके दिवशी आगगाडीखाली मरून गेलेली ती म्हातारी...!

"माझ्या दृष्टीनं या साऱ्या गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत. परंतु तुम्हाला त्या निरर्थक वाटतील. त्या काळचं वातावरण, त्या काळाचा सारा प्रभाव, स्वप्नवत वाटणारी ती दुनिया तुमच्यासमोर जशीच्या तशी उभी करिता येईल अशी काही युक्ती सापडावी

असं मला वाटतं...याला 'कम्युनिकेशन' असं म्हणतात. ती फार अवघड गोष्ट आहे. मी कलावंत नाही. त्यामुळं मी कम्युनिकेट करू शकत नाही.

"तरीपण...जसं सुचेल तसं तुमच्या समोर मांडतो.

"हा पाहा. हा बॅनेट हॉल आहे. मी यातील एका उंच जागेवर बसलोय आणि रेडिओसाठी पदवीदान समारंभाचं धावतं वर्णन देतो आहे. खाली ऐसपैस चौकात काळ्या टोप्या व गाउन घातलेले लोक इकडे तिकडे वावरताहेत. काळ वेगानं धावतो आहे. त्याच्या धावण्याचा आवाज माझ्या कानांत घुमतो आहे. खाली हिरवळीवर खूप लोक जमले आहेत. मोटारींच्या रांगा लागल्या आहेत. भैय्यासाहेब लाल गालीचांच्या कडेकडेने चंपाताईबरोबर चालत दुसऱ्या चौकाकडे जात आहेत. लाउडस्पीकरवर अचानक न्यू थिएटर्सची नवी रेकॉर्ड लावण्यात आली आहे...'यह कूच के वक्त कैसी आवाज' (प्रस्थानाच्या वेळी हा कसला आवाज)...पहाडी संन्यालाचा आवाज सर्वत्र घुमतो आहे. समोरून उपकुलगुरू येत आहेत. त्यांच्या मागून अनेक प्राध्यापक गाउन घालून चालत आहेत. परंतु असाही एक दिवस उजाडेल की जेव्हा याच्यापैकी एकही व्यक्ती शिल्लक असणार नाही.

"आता मी मायक्रोफोन माझा पूज्य मित्र हरिशंकर याच्या हातात देतो...'हॅलो!' ...माझा आवाज येतो, 'हॅलो!'

"हॅलो!...हॉं!" दिव्याच्या मागे अंधारात लपून बसलेल्या हरिशंकरानं उत्तर दिलं. जणू स्टेजच्या बाहेरून त्याचा आवाज घुमत येत आहे असा भास झाला. तो स्वतः दिसत नव्हता.

"हॅलो...हॅलो...मी हरिशंकर...आता मी तुमच्याशी बोलतो आहे. मी हरिशंकर श्रीवास्तव. कमालाचा मित्र. सावलीसारखा त्याच्याबरोबर राहाणारा...लाज आणि निर्मला यांचा एकुलता एक थोरला भाऊ. चंपाताईचा सहकारी. माझी भूमिकाही खूपच महत्त्वाची आहे...माझ्या भूमिकेचे अनेक पैलू आहेत. या कथेत मी इतक्या वेगवेगळ्या भूमिका बजावतो आहे...आता मी निवेदनाला कुठून सुरुवात करू? रंगभूमीवर कसा येऊ? मोठीच पंचाईत आहे."

(पुनः तळअत बोलू लागते.) "बग्गी रस्त्यातले खड्डे पार करीत एक धक्का घेऊन सिंघाडेवाली कोठीत शिरली. अप्पीचं लग्न ज्यावर्षी मोडलं त्याच वर्षीची ही गोष्ट आहे.

"लाजवती आतून बाहेर आली. ती केशरी साडी नेसली आहे. तिच्या पायात जोडवी आहेत कारण तिचे लग्न झाले आहे. अप्पी तिच्या बरोबर पोर्चमध्ये आली आहे. तिनं अजून जोडवी घातलेली नाहीत.

"मी गाडीतून उडी मारून आत पळाले.

"'अप्पी, तू इथं केव्हापासून आली आहेस ? कमालभैय्या स्टेशनवरून येऊन तुझी चौकशी करीत होते. मी नुकतीच भैंसा कुंडाच्या बाजूनं चालले होते तेव्हा तिथं चंपाताईच्या हिरवळीवर त्या दोघांना बसलेलं मी पाहिलं.'

"'दोघे कोण ?'

"'भैय्यासाहेब अन् कम्मन भैय्या...छत्रीच्या खाली. चंपाताईच्या मामांच्या घरी ते बहाव्याचं झाड नाही काय ? तिथंच ! आमची बग्गी रस्त्यानं जाताना पाहून चंपाताईनं जोरानं हात हलवून स्मित केलं. फारच सुंदर दिसत होती.' मी एका दमात सारं काही सफाईनं सांगून टाकलं.

"अप्पी आणि लाज निमूटपणे ताटव्यांच्या कडेला असलेल्या पायवाटेनं पोर्चकडे निघून गेल्या. जणू त्यांनी माझं बोलणं ऐकलंच नव्हतं.

"मी चमेलीचा ताटवा ओलांडून निर्मलेकडे गेले. ती आणि मालती बुरुजावरच्या म्यूझिकरूममध्ये बसल्या होत्या.

"'भैय्यन तर मिर्झापूरला अन् दिल्लीला गेले होते ना ?' मालतीनं विचारलं.

"'होयं, सकाळीच आले. पण येताक्षणीच सरळ चंपाताईकडे गेले. या वेळी ते तिथंच ठिय्या मारून बसले असतील.' निर्मला म्हणाली.

"त्याच वेळी मला कदीरच्या बायकोची आठवण झाली. मी कॉलेजमधून येऊन चहाच्या मेजाजवळ बसले होते. इतक्यात कदीरच्या बायकोनं अत्यंत रहस्यपूर्ण पद्धतीनं खिन्न स्वरात सांगितलं होतं, 'थोरल्या ताईनी लग्नाला नकार दिला.'

"'अप्पीच्या लग्नात नेसण्यासाठी मी अशी छान साडी घेणार आहे. वेलबुट्टीदार...' निर्मला म्हणत होती."

आणि अचानक तलअत गप्प राहिली. "हे पाहा," ती कमालला म्हणाली, "आज मला असं प्रतीत झालं की माझा भूतकाळ हा फक्त माझ्यापुरताच महत्त्वाचा आहे. जगाच्या दृष्टीनं, इतरांच्या दृष्टीनं त्याला काही अर्थ नाही. त्यांना त्यात काहीच स्वारस्य वाटणार नाही."

"माझा भूतकाळ हा फक्त माझा भूतकाळ आहे." कमालने तलअतच्या विधानाचा पुनरुच्चार केला.

"आणि जगाला फक्त 'आज' हवा आहे." हरिशंकर म्हणाला.

"परंतु काल हाच आज आहे. आज भूतकाळात समाविष्ट आहे आणि भविष्य-काळातही. काळाच्या या कोड्यानं मला अगदी गोंधळात टाकलंय." तलअत उदासपणे म्हणाली. "या काळानं मला अगदी बेजार करून सोडलंय. तुमच्यापैकी कुणी मला मदत का करीत नाही ?"

"तलअत बेगम, तुला मदत करणं बहुधा आइन्स्टाइनलाही शक्य होणार नाही." हरिशंकर उत्तरला.

"काळ हा सतत विद्यमान आहे. काळ हा सदैव 'आज' असतो." तलअत म्हणाली.

ही मंडळी १५ डिसेंबर १९५४ रोजी तिसऱ्या प्रहरी लंडनच्या सेंट जाजवुडमध्ये बसून गप्पागोष्टी करीत होती. खिडक्यांच्या काचेच्या तावदानांवर त्यांच्या सावल्यांमुळे चित्रविचित्र आकार निर्माण होत होते. काळाच्या विशाल अंधकारात उंच भिंती, सडका, गल्ल्या व आवाज यांच्या चक्रव्यूहात ती तिघेही अडकून पडली होती.

काळाच्या याच काळोखात तलअत १९४० च्या जुलै महिन्यात सिंघाडेवाली कोठीच्या ओसरीवर बसून निर्मला व मालती यांच्याशी बोलत होती. या तलअतमध्ये आणि त्या तलअतमध्ये काही फरक नव्हता. परंतु त्या दोघी जणू अगदी वेगवेगळ्या होत्या. शाक्यमुनी महात्मा बुद्ध म्हणाले होते की माणूस प्रत्येक क्षणी बदलत असतो. माणूस लहानपणी जसा असतो तसा तरुणपणी व वृद्धपणी असत नाही. तुम्ही या क्षणाच्या पूर्वी नव्हता. केवळ निरंतरता बाकी उरते. दूर डोंगरांवरून हिमनद्या तुकडे तुकडे होऊन वाहात होत्या. वारा, काळोख आणि काळ. हा काळ प्रवाहीही होता आणि बर्फात गोठलेलाही होता.

"आपण आपल्या जुन्या गोष्टी उकरून काढून स्वतःला समाधान मिळवू पाहातो," हरिशंकर म्हणाला, "कारण आपल्याला भय वाटते."

"आपण काळाला नि अंधाराला घाबरतो कारण काळ एके दिवशी आम्हांला मारून टाकणार आहे आणि अंधार हे आपलं शेवटचं आश्रयस्थान असेल." तलअत म्हणाली.

"आणि गौतम नीलांबरसुद्धा किती भ्याड निघाला!" कमाल म्हणाला.

"गौतम नीलांबराचं यावेळी नाव काढू नका. कारण मग तुम्ही मूळ विषयापासून फार दूर जाल. आपल्याला हे ठरवायचं आहे की जीवनातला वास्तविक विषय कोणता? मी चौदा वर्षांपूर्वीही विद्यमान होतो आणि जिवंत राहिलो तर चौदा वर्षांनंतरही मला हरिशंकरच समजण्यात येईल. काळाचे सारे प्रयोग जेव्हा आपण आपल्यावर करून घेऊ तेव्हा लहान-लहान गिनीपिग(डुकरां)सारखे असणारे आपण सारे नष्ट होऊन जाऊ आणि ज्यांचा उल्लेख या कथेत आहे ते इतर सारेही नाहीसे होतील."

काळाच्या आकृतिबंधात तलअत तेथे बसलेली होती परंतु ती त्याच आकृतिबंधात आणखी एके ठिकाणीही विद्यमान होती. या दोन्ही बिंदूंमध्ये कित्येक वर्षांचे अंतर होते. या अंतराच्या मार्गावर माणूस फक्त पुढे जाऊ शकतो; मागे जाणे अशक्य असते. फुटलेल्या आरशाच्या तुकड्यांत एकाच चेहऱ्याची वेगवेगळी प्रतिबिंबे दिसत असतात, त्याप्रमाणे हजारो तलअती असंख्य तुकड्यांमध्ये विखुरलेल्या, असंख्य ठिकाणी विद्यमान होत्या.

# २१

लखनौ—इ. स. १९४० !

सर्वत्र दिवे लागले होते. नदीच्या काठावरील होड्यांतही दिवे लागले. नदीचा प्रवास चालू होता. ओसरीवर दिवे लावण्यात आले होते. त्यांवर पावसाळी किडेपतंग घिरट्या घालीत होते.

मुली व्हरांड्यात बसून राहिल्या.

जेव्हा रात्र अधिक होऊ लागली तेव्हा खाली हौदाच्या काठावर बसून मोलकरणींशी गप्पागोष्टी करणाऱ्या गंगादीनने खालूनच म्हटले, "ताईसाहेब, आता चला!"

तलअत त्या सर्वांना 'गुडनाइट' करून खाली आली आणि बग्गी रायबिहारीलाल मार्गावरून चालू लागली.

काही फर्लांग गेल्यानंतर बग्गी एका मोठ्या सीमेंटच्या बंगल्याच्या आवारात शिरली. बंगल्याच्या डाव्या बाजूस असलेल्या बागेत रातराणी फुलली होती. घरची सर्व माणसे मागल्या चबुतऱ्यावर बसली होती.

खुर्च्या मांडलेल्या होत्या. पलंगाजवळ मेजपंखा होता. घडवंचीवर पाण्याच्या सुरया होत्या. त्यावर चमेलीचे गजरे लपेटलेले होते. व्हरांड्यात नमाज पढण्याचा चौरंग होता. या बंगल्याचे नाव 'गुलफिशाँ' असे होते. 'गुलफिशाँ'सारखे अनेक बंगले होते. त्यांत एकाच प्रकारचे लोक राहात असत. त्या सर्वांकडे मोटारी होत्या. तो मोठा दृढ व मजबूत समाज होता. ते सारे खानदानी लोक होते—पद्धतशीर जीवन घालविणारे समृद्ध व प्रतिष्ठित लोक. त्यांचे रीतिरिवाजही सारखे होते. त्यांची सुखदुःखे व समस्या सारख्याच होत्या. त्यांच्याकडील फर्निचर, त्यांच्या बागांतील झाडे, त्यांची पुस्तके, कपडेलत्ते सर्व समान होते. त्यांचे नोकर, त्यांची कामे, त्यांच्या अभिरुची सारख्याच होत्या.

तलअतच्या घरचा खानसामा(बबरची)ही इतर सर्व बंगल्यांतील खानसाम्यांसारखाच होता. त्याचे नाव हुसैनी.

सर्व बबरच्यांची नावे हुसैनी, हुसैनबक्ष किंवा मदारबक्ष अशी असतात. सगळे धोबी नत्थू या नावाचे असतात. सारे कोचवान गंगादीन असतात. सगळ्या मोलकरणींची नावे बुलाकन, रसूलिया, हमीदनकी माँ आणि मंजूरुन्निसा असतात. ज्याप्रमाणे हॉटेलांत व्हायोलिन वाजविणारा हटकून 'टोनी'च असतो त्याप्रमाणे सगळे हरकाम्ये 'अब्दुल' या नावाचे असतात. सगळ्या बापांची नावे खान बहादुर, तकी रजा बहादुर अशी असतात.

कादंबऱ्यांतील वडिलांची नावेही अशीच असतात आणि वास्तविक जीवनातील

वडिलांची नावेही हीच असतात. म्हणून तर कादंबऱ्यांमध्ये जीवनाचे यथार्थ चित्रण असते असे म्हटले जाते. अर्थात ज्या कादंबऱ्यांत इकडच्या तिकडच्या फालतू गप्पा असतात त्यांची गोष्ट वेगळी.

कदीर मोटार ड्रायव्हर मिर्झापूरचा राहाणारा होता. त्याच्या बायकोचे नाव कमरुन्निसा. मोठी मजेदार बाई होती. उन्हाळ्यात दुपारच्या वेळी सारे घर झोपी जाई तेव्हा नोकरांच्या निवासस्थानातून कदीरच्या गाण्याचा आवाज ऐकू येई. तो आल्हागीत गात असे. तुम्ही कधी जाऊन पाहिले असते तर मियाँ कदीर दारात उकिडवे बसून पेट्रोलचा रिकामा डबा वाजवीत असल्याचे दिसले असते आणि कमरुन एका बाजूला बसून लांब सुयांनी जाळी विणत असलेली दिसली असती. तुम्ही येताना दिसलात की झटकन पितळेचे पानदान पुढे ओढून ती विडा बनवू लागे. कमरुन काळीसावळी परंतु सुंदर व नीटनेटकी स्त्री होती. कमरुन व कदीर दोघेही शेतकरी कुटुंबातील होते. ड्रायव्हर होण्यापूर्वी कदीर हा आपल्या जिल्ह्यातील किसान सभेचा कार्यकर्ता होता आणि चरख्याचा प्रचार करीत हिंडत होता. मोतीलाल नेहरूंचा विलायतेला जाऊन आलेला मुलगा जेव्हा अवधच्या किसानांचा पुढारी होऊन गावोगाव फिरत होता तेव्हाचा तो काळ होता. जमीनदारी पद्धतीमुळे शेतकऱ्यांची जी दुर्दशा झालेली होती तिची कल्पना कदीरहून अधिक कोणाला असणार ? यामुळेच 'गुलफिशाँ'च्या हिरवळीवर कमालाची मित्रमंडळी समाजवादासंबंधी ऐसपैस चर्चा करीत तेव्हा कदीरही काहीतरी निमित्त काढून तेथे जाऊन उभा राही आणि त्यांचे विचार समजून घेण्याचा प्रयत्न करी. त्याला फक्त येवढेच माहीत होते की त्याच्या गावच्या ठाकुर फूलसिंह या जमीनदाराच्या शिपायांनी एके दिवशी शेतसारा न दिल्याबद्दल त्याच्या बापाला इतके मारले होते की त्यातच त्याचा अंत झाला होता. कदीरला कलकत्त्याला जाऊन साफसफाईची कामे करावी लागली होती आणि घरच्या लोकांना अजूनही पोटभर अन्न मिळत नव्हते.

परंतु लखनौ शहरात जे काही चालले होते ते मात्र कदीरच्या डोक्यात शिरत नव्हते. असंतोष व गोंधळ यांचे मूळ कारण आर्थिक होते. जमीनदार आणि कुळे यांच्यात संघर्ष होता. सामान्य जनतेचे लक्ष दुसरीकडे वेधण्यासाठी ब्रिटिश सरकार या असंतोषाला जातीय रूप देत होते.

कमरुन्निसा व कदीर यांच्या प्रेमाचा आदर्श इतर नोकराचाकरांसमोरच नव्हे तर नातेवाइकांसमोरही ठेवण्यात येई. कमरुन्निसा इतर नोकरांच्या बायकांशी विशेष घसट ठेवीत नसे कारण मोटार ड्रायव्हरची बायको असल्यामुळे तिचा सामाजिक दर्जा सर्व्हंट्स-क्वार्टरच्या सोसायटीत खूप उंच होता. ती रोज नियमाने दुपारची जेवणे आणि साफसफाई झाल्यानंतर फहनला कडेवर घेऊन बंगल्यात येई आणि मग अम्माँ बेगम यांच्या

खोलीत त्यांची मैफल जमे. अम्माँ बेगम पलंगावर पडल्या-पडल्या 'नैरंग-ए-ख़याल' किंवा 'इस्मत' यांसारखी उर्दू मासिके वाचीत आहेत, खाला बेगम नमाजाच्या चौरंगावरच आडव्या झाल्या आहेत, कोणी पाहुणी आलेली असेल तर तीही एखाद्या पलंगावर अर्धवट पहुडली आहे. समोर पानदान आहे.

"आलीस कदीर की बीबी? ये...बैस!"

कमरुन्निसा मोठ्या नाजुक ढंगाने सर्वांना सलाम करून गालिच्यावर बसते. फद्दनला जवळच झोपविते. बाजी अम्माँ पानाचा विडा तयार करून तिला देतात.

"हं? काय बीबी? आज काय स्वयंपाक केला होतास?" खाला बेगम विचारतात.

"आमटी, भात आणि मुगाच्या डाळीच्या वड्या, बेगमसाहेब."

आणि मग जेवणखाणासंबंधी चर्चा सुरू होई. माज्या आणि तूप यांच्या भावांसंबंधी विचारविनिमय झाल्यानंतर संभाषणाचा ओघ आपोआप अत्यंत प्रिय विषयाकडे वळे: लग्नाशी संबंधित गोष्टी आणि कौटुंबिक राजकारण. कमरुन त्या सर्व चर्चेत भाग घेई. सगळे लोक कमरुनला 'ड्रायव्हर की बीबी' या नावाने संबोधीत. म्हणून कदीरही तिला त्याच नावाने संबोधी. तिसऱ्या प्रहरी कमाल, अप्पी, तलअत व भैयासाहेब आपापल्या कॉलेजांतून घरी परत आले की घरात एक वेगळेच चैतन्य निर्माण होई. येवढ्यात मोटार पोर्चमध्ये येऊन दाखल होई. नबाबसाहेब बहुधा दररोज चीफ कोर्टात खटले चालविण्यासाठी जात. त्यांना घेऊन कदीर परत येई. मोटारीचा आवाज ऐकताच कमरुन डोक्यावरून पदर घेई आणि फद्दनला कडेवर घेऊन आपल्या खोलीकडे जाई.

गंगादीन मोतदार भैय्यासाहेबांच्या तैनातीला होता. तो त्यांच्या वडिलांचा नोकर होता आणि त्यांच्या घरून तो येथे आला होता त्यामुळे त्यांच्यावर त्याची विशेष भक्ती होती. अप्पी व भैय्यासाहेब यांच्या लग्नासंबंधी तो आपले मत व्यक्त करीत नसे कारण हे लग्न झाले पाहिजे असे जरी सगळे जग म्हणत असले तरी स्वतः भैय्यासाहेबांनी मात्र या बाबतीत आपले मत मुळीच व्यक्त केलेले नव्हते.

## २२

सन १९४० च्या डिसेंबर महिन्यात तलअत ज्यूनियर केंब्रिजच्या परीक्षेला बसणार होती. परंतु त्याच वर्षी सप्टेंबर महिन्यात तिला डबल न्युमोनिया झाला. तिने रडून आकांत केला. 'माझं एक वर्ष वाया गेलं, माझं वर्ष फुकट गेलं'—असा धोशा लावला.

घरचे सगळे लोक तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत. परंतु डिसेंबरात तिची परीक्षा होती आणि ती अंथरुणाला खिळली होती, यावर उपाय काढणे कोणाच्या हाती होते !

एके दिवशी सकाळीच हरिशंकर तिच्या खोलीत येऊन म्हणाला, "तलअत, तुझं काम आम्ही केलंय. तुला टट्टरवाल्या शाळेत प्रवेश मिळतोय. तू एप्रिलमध्ये हायस्कूलची परीक्षा दे आणि मजेत आय. टी. कॉलेजात जा."

"रघुवीरमामांच्या शाळेत !" तलअतने उत्कंठेने विचारले.

"होय !" हरिशंकर उत्तरला आणि तसाच नाटकी ढंगाने तो दुसऱ्या दाराने बाहेर पडला.

तलअत हायस्कूलची परीक्षा देऊन आय. टी. त जाणार असल्याचे समजताच निर्मलेने आकाशपाताळ एक केले. म्हणून तिलाही लामार्तिनेरमधून काढून तलअतबरोबर नव्या शाळेत घालण्यात आले.

टट्टरवाला स्कूलही आपल्या परीने ऐतिहासिक महत्त्वाची शाळा होती. बादशाही जमान्यातील एका इमारतीत ही शाळा होती. त्या शाळेभोवती चटईच्या भिंती उभारण्यात आल्या होत्या. त्यावर निळ्या फुलांच्या वेली पसरल्या होत्या. ती रघुमामांची शाळा होती. ती बनारस हिंदू विश्वविद्यालयाशी संबद्ध होती आणि थोड्या निवडक मुलीच तेथे शिक्षण घेत. अगदी घरगुती वातावरण होते. शेजारच्या घरात रघुमामा सहकुटुंब राहात असत. ते जुन्या विचारांचे कायस्थ गृहस्थ म्हणजे देवमाणूस होते. चांगल्या घरंदाज कुटुंबांतील मुली मोटारींतून येऊन येथे शिक्षण घेत. लामार्तिनेरच्या अस्सल इंग्रजी वातावरणाशी तुलना करिता टट्टरवाला स्कूल म्हणजे अगदी वेगळेच जग होते. तलअत व निर्मला या आपल्या उच्च मध्यम वर्गातील इतर व्यक्तींप्रमाणे जिला इंडो-युरोपीय संस्कृती म्हणता येईल अशा दुरंगी वातावरणात वाढल्या होत्या. इंग्रज दायांबरोबरच गावठी मोलकरणी व आया यांचाही हातभार त्यांच्या विकासाला लागलेला असे. या मुलींचे शिक्षण कॉनव्हेंट शाळेत होई परंतु लग्नाची वेळ आली की आठवडेच्या आठवडे आधीपासून त्या अंगाला हळद लावून व पिवळी वस्त्रे नेसून बसत असत आणि जुन्या काळच्या नव्या नवरीसारख्या त्या लाजत मुरकत असत. पुष्कळदा त्यांची लग्ने त्यांच्या इच्छेविरुद्धही केली जात. हे लोक 'मॉडर्न' (आधुनिक) बनले होते; परंतु 'अल्ट्रा-मॉडर्न' (अत्याधुनिक) बनले नव्हते. वरून त्यांनी पाश्चात्त्य रंग स्वीकारला होता परंतु आतून ते अगदी कट्टर भारतीय होते. या लोकांनी एका फार मोठ्या फाट्यावर, जेथे दोन रस्ते येऊन मिळतात अशा ठिकाणी आपली घरे बांधली होती. हा ब्रिटिश वसाहतवादी समाज होता. सरंजामशाही समाजाच्या सहकार्याने, बदलत चाललेल्या हिंदुस्थानात, जुन्या पायांवर या समाजाची निर्मिती करण्यात आली होती

एकोणिसाव्या शतकात येथे जी राजकीय जागृती निर्माण झाली होती तिच्यामुळे प्राचीन भारतीय संस्कृतीच्या आधुनिकीकरणाचे आंदोलन येथे चालले होते. आता भारतीय संगीत, भारतीय कला आणि भारतीय आचारविचार यांवर अधिक जोर देण्यात येत होता. पाश्चात्त्य रंगात रंगलेल्या 'काळ्यासाहेबां'ची टर उडविली जाई. काँग्रेसच्या चळवळीने या आधुनिकीकरणाला अधिक सामर्थ्यशाली बनविले. परंतु जातीयवादी लोक प्राचीन हिंदू संस्कृती आणि इस्लामी सुवर्णयुग यांच्या गोष्टी करीत होते. संयुक्त राष्ट्रीयत्व व विशुद्ध भारतीय संस्कृती यांच्या आदर्शाला जोराचा धक्का लागला होता. आता असा प्रश्न उपस्थित झाला होता की वस्तुतः भारतीयत्व म्हणजे तरी काय? एका राजकीय पक्षाचे असे म्हणणे होते की हे सारे हिंदूंनी निर्माण केलेले राजकीय ढोंग आहे. मुसलमान हे वेगळे राष्ट्र आहे. त्यांच्या परंपरांचा भारताशी काही संबंध नाही. दुसऱ्या एका राजकीय पक्षाचे म्हणणे असे की या देशाचे खरे मूळ रहिवासी हिंदू आहेत; मुसलमान परकीय आहेत. 'गुलफिशाँ'च्या सर्व्हंट्स क्वार्टर्समध्ये राहाणाऱ्या मिर्जापूरच्या कमरुन्निसाला आणि रमदैया माळिणीला या बाबतीत कोणीच विचारले नाही. खरे म्हणजे त्यांनाच विचारायला हवे होते की, "भारताचे खरे नागरिक तुम्ही आहात. तेव्हा या बाबतीत तुमचं काय मत आहे?"

तलअत आणि निर्मला या उच्च वर्गात लहानाच्या मोठ्या झालेल्या मुली होत्या. पौर्वात्य व पाश्चात्त्य अशा संमिश्र वातावरणात त्या वाढल्या होत्या. त्यामुळे जेव्हा त्या दोघी लामार्तिनेरमधून निघून रघुमामांच्या शाळेत गेल्या तेव्हा जशा त्या लामार्तिनेरच्या युरोपीय वातावरणात मिसळून गेल्या होत्या तशाच या नव्या शाळेच्या वातावरणाशीही एकरूप होऊन गेल्या.

दुसरे महायुद्ध सुरू होऊन एक वर्ष झाले होते. काँग्रेसच्या मंत्रिमंडळांनी राजीनामे दिले होते. राजकीय परिस्थिती दिवसेदिवस अधिकाधिक बिघडत चालली होती.

मार्च महिना आला आणि मुली परीक्षेसाठी बनारसला निघाल्या. कमाल व हरिशंकर निर्मला व तलअत यांना निरोप देण्यासाठी स्टेशनवर गेले. "तुम्ही चला पुढं. आमच्या परीक्षा झाल्या की आम्हीही तुमच्या मागोमाग आलोच. कित्येक वर्षात रामनगरचे आंबे खाल्ले नाहीत." कमाल म्हणाला. त्या दोघांची ही फार जुनी प्रथा होती. उन्हाळ्याची सुट्टी सुरू झाली रे झाली की दोघेही भटकंतीसाठी घरातून बाहेर पडत. सबंध देशभर भटकत फिरत. कोण जाणे कोठेकोठे जात. स्टूडंट्स फेडरेशनचे अधिवेशन आहे, चालले दिल्लीला. इंदिरा नेहरूंनी बैठक बोलावलीय, चालले अलाहाबादला.

"बनारसहून कुठं जाणार?" निर्मलेने विचारले.

"अग, आम्ही संन्यासी माणसं! आमचं काय विचारतेस? जिकडे वाट दिसली

तिकडे चालले." कमाल गंभीरपणे म्हणाला. मुली प्लॅटफॉर्मवर आपापल्या सामानाजवळ उभ्या राहून गप्पागोष्टी करीत होत्या. रघुमामा प्रवासाची व्यवस्था करण्यासाठी धावपळ करीत होते.

"फार मोठे संन्यासी लागून गेलात की नाही! ध्यानस्थपणाचा भाव आणणारे बगळे कुठले!" निर्मला हसून म्हणाली.

गाडी आली आणि हा मजेदार काफला बनारसला रवाना झाला.

# २३

चंपा अहमदने बेझंट कॉलेजच्या क्लासरूमच्या खिडकीत येऊन खाली नजर टाकली. उन्हाळी वारे वाहात होते. दूर रस्त्याच्या बाजूने एक बगळा उडत चालला होता. खाली कॉलेजचे विशाल निस्तेज मैदान तिसऱ्या प्रहरीच्या उन्हात होरपळत पडले होते. "पाऊस केव्हा पडणार देव जाणे!" चंपा मनाशी म्हणाली. घंटा वाजली आणि शेजारच्या वर्गातून मुली बाहेर आल्या. लीला भार्गवबरोबर ती जिन्यातून खाली आली आणि टांग्यात बसून त्या दोघी विद्यापीठाकडे निघाल्या.

चंपाचा हा रोजचा कार्यक्रम होता. बेझंट कॉलेज, विद्यापीठ आणि घर! हिवाळा, उन्हाळा, पावसाळा आणि पुनः हिवाळा. ती अठरा वर्षांची होती; परंतु म्हातारीसारखी विचार करी. तिचे हृदय कवीचे होते. ती लहान मुलांसारखी हसे किंवा दुःखी होई. तिचे वडील एक मध्यमवर्गीय प्रतिष्ठित गृहस्थ होते. आईदेखील एक मध्यमवर्गीय सज्जन स्त्री होती. त्यांच्या घरात कसलेही 'ग्लॅमर', कसलाही झगमगाट नव्हता. कसल्याच 'परंपरा' किंवा ऐतिहासिक घटना नव्हत्या. चंपाचे वडील वकील होते. ते मुरादाबादचे राहाणारे होते. चंपाचे आजोळ बनारसला होते. तेथेच तिचे वडील वकिली करीत. सामान्य आवक होती. त्यांच्या घरी टेलिफोन नव्हता, मोटार नव्हती की फ्रीज नव्हता. ते लोक बंगल्यात राहात नव्हते. चंपा आपल्या आईबापांची एकुलती एक मुलगी होती. तिच्यासाठी हुंडा तयार ठेवला होता. तिला सारख्या मागण्या येत होत्या. चंपा बी. ए. झाली की तिचे लग्न करून टाकावे असे घरच्या लोकांनी ठरविले होते. चंपा कोणत्याही कॉनव्हेंट स्कूलमध्ये शिकली नव्हती; किंवा उन्हाळ्यात मसुरीला जाऊन ती रोलर-स्केटिंगही करीत नसे. चंपाचे मामा चांगले सुखवस्तू होते. ते लखनौला राहात असत. तेथे वजीरहसन रोडवर त्यांचा बंगला होता. चंपाच्या वडिलांना

राजकारणात माफक रुची होती. तिचे एक काका मुरादाबाद शहर मुस्लिम लीगचे अध्यक्ष होते.

चंपा कॉलेजमधून परत आल्यानंतर माडीवरील आपल्या लहानशा खोलीत बसून क्षितिजा-पर्यंत पसरलेल्या देवळांच्या शिखरांकडे पाहात राही किंवा मग इंग्रजी कादंबऱ्या वाची. ती जॉन ऑस्टिनच्या लिखाणावर खूष होती. मध्ययुगावर तिचे भारी प्रेम होते. तसेच एकोणिसाव्या शतकातील कीट्स, रोझेटी वगैरे कवीही तिला आवडत. विद्यापीठाच्या ग्रंथालयात अवनीन्द्रनाथ टागोर व नंदलाल बोस यांची चित्रे पाहिली की तिला फार बरे वाटे. चंपा अहमद ही देखील एक रोमँटिक तरुणी होती, हे सांगण्याची आवश्यकता नाही.

लीला भार्गवबरोबर ती विद्यापीठात गेली. तेथेही सगळीकडे परीक्षेचे वातावरण पसरलेले होते—धांदल, धावपळ, किलबिल! सगळे ओळखीचे चेहरे होते. ती मुले आणि मुली सर्व तिच्याच जगात वावरणारी होती. गर्दीत असली की चंपाला धीर येई. समुदाय आपल्याबरोबर आहे, तो आपले रक्षण करील, असे तिला वाटे. ते सारे तिचे भाऊबंद होते—विद्यार्थी, प्राध्यापक, मुली, मद्रासी व बंगाली वृद्ध प्रोफेसर! विद्यापीठ म्हणजे ज्ञानाचा सागर. ज्ञानाच्या क्षेत्रात जातीयवाद कसा काय घुसतो ते तिला समजत नव्हते. जातीयवाद व द्वेष, संकुचितता, संशय, दुराग्रह वगैरे भुतांशी अजून तिची ओळख झाली नव्हती. आपल्या सभोवतालच्या जगात खूप कोलाहल माजला आहे, येवढेच तिला माहीत होते आणि हा कोलाहल तिच्या शांततेत अडथळा आणीत होता व त्यामुळे तिला फार मानसिक त्रास होत होता.

समोर एका ओट्यावर शामियाना उभारलेला होता. तेथे हायस्कूलच्या संगीत विषयाची परीक्षा चालली होती. चोहोबाजूंनी मुलींच्या गुणगुणण्याचा आवाज ऐकू येत होता. याच मुलींमध्ये लखनौहून आलेल्या मुलींचा घोळकाही सामील होता.

इतक्यात घंटा झाली. शामियान्यातून मुली बाहेर पडू लागल्या. दोन मुली लहान मुलांप्रमाणे उड्या मारीत पायऱ्यांवरून खाली उतरल्या.

येवढ्यात दोन तरुण गर्दीतून पुढे आले. त्यांच्या रंगारूपांवरून ते त्या मुलींचे भाऊ असावेत असे वाटत होते. रामनगर संस्थानची एक मोटार येऊन तेथे थांबली आणि ती चौघे तिच्यात जाऊन बसली. दुसऱ्याच क्षणी गाडी धुरळा उडवीत निघून गेली.

* * *

बनारसला गेल्यानंतर तलअत, निर्मला व इतर सर्व मुली ज्या ठिकाणी उतरल्या होत्या ते ठिकाण मोठे मजेदार होते.

तो एक तीनमजली वाडा होता. त्याच्याभोवती खूप मोठे अंगण होते. त्या

वाड्याची मालकीण एक निपुत्रिक विधवा ब्राह्मण बाई होती. ती खूप श्रीमंत होती आणि नेहमी तीर्थयात्रा करीत असे.

त्या वाड्यात दिवसभर इतका कोलाहल चालू असे की अनेक वऱ्हाडे तेथे उतरली असावीत असा भास होई. जिकडे पाहावे तिकडे मुलीच मुली दिसत.

गाण्याची लेखी परीक्षा जेव्हा होती त्या दिवशी कमाल व हरिशंकर दत्त म्हणून हजर झाले. तलअत व निर्मला परीक्षा देऊन शामियान्यातून बाहेर पडल्या तो त्यांना सरस्वतीच्या मंदिराजवळ दोन मुली दिसल्या. या मुलींच्या शेजारीच कुठूनतरी कमाल व हरिशंकर येऊन उगवले. त्या मुलींपैकी एकीचे रूप फारच सुंदर होते आणि तिचा रंग उन्हामध्ये बावनकशी सोन्यासारखा चमकत होता. कमाल व हरिशंकर रामनगरच्या दिवाणांकडे उतरले होते. त्यांच्याशी कमाल व तलअत यांचे नाते होते. त्यानंतर प्रखर उन्हात नदी ओलांडून ती चौघे रामनगरला पोहोचली आणि तलअतला कदीरची आठवण आली.

"मला कमरुनसाठी साड्या आणि बांगड्या घ्यायच्या आहेत." तलअत जोराने ओरडून म्हणाली.

"अजून तुमची खरेदी-मोहीम सुरू झाली नाही वाटतं ?" कमालने मागे वळून विचारले

"अंऽहं !...पैसे दे !"

त्याबरोबर त्या दोघा तरुणांनी त्या दोघींकडे डोळे वटारून पाहिले.

"तुम्हांला काय वाटतं, आम्ही सावकार आहोत ? आमच्या पेढ्या आहेत की काय ?" कमालने रागाने विचारले.

"अग, आम्ही तर बिचारे दरिद्री, ब्रह्मचारी विद्यार्थी आहोत. आम्ही स्वतःच इतरांच्या दानावर जगतो आहोत." हरिशंकर म्हणाला.

"अन् तरीही आमची हृदयं मात्र बादशहाची आहेत." कमाल उद्गारला.

"खरं आहे तुझं म्हणणं." हरिशंकर घसा साफ करीत म्हणाला.

"तरीपण सरस्वती मंदिराच्या सावलीत उभी असलेली ती स्वरूपसुंदरी कोण होती, हे जर तुम्ही आम्हाला सांगितलं तर बनारसमधल्या साऱ्या बांगड्या आम्ही तुम्हांला विकत घेऊन देऊ." कमाल म्हणाला.

"कोणती स्वरूपसुंदरी ?" तलअत व निर्मला एकमेकींकडे पाहू लागल्या.

"तुम्ही जर त्यांचा पत्ता काढला..." हरिशंकर म्हणाला.

"भैय्या, तुझ्यासाठी पोरींचे पत्ते काढता काढता आमच्या नाकी नऊ आलेत." निर्मला चिडून म्हणाली.

असेच भांडततंटत ते रामनगरला पोहोचले. तेथे वाळ्याच्या पडद्याआड बसून त्यांनी दिवस घालविला. आंबे खाल्ले. नातेवाइकांशी गप्पागोष्टी केल्या आणि दिवाणसाहेबांच्या

बेगमसाहेबांनी तावडतोब काशीच्या अनेक श्रीमंत घराण्यांतील मुलींशी हरिशंकराचे लग्न ठरवूनही टाकले. सर्वजण खूष झाले.

* * *

वैशाख महिना गेला. ज्येष्ठात किंवा आषाढात परीक्षेचा निकाल लागला. चंपा अहमद पास झाली होती. आता तिच्या प्रवासाची तयारी सुरू झाली. लखनौच्या मामांना पत्र लिहिले गेले—जुलैमध्ये चंपाबेगम येत आहे.

लीलाला तिच्या घरी सोडून चंपा नेहमीप्रमाणे आपल्या घरी परतली. मोलकरणीने टांग्यातून उतरून लहानसे फाटक उघडले. ती आत गेली आणि अंगणात जाऊन बसली. बाहेर गल्लीतही शुकशुकाट होता. जवळपासच्या तीनचार घरांमध्ये अनेक रेडिओ एकाच वेळी चालू होते. लखनौ केंद्रावरून बातम्या दिल्या जात होत्या. चंपाचे वडील बैठकीच्या खोलीत कोण्या अशिलाशी विचारविनिमय करण्यात दंग होते.

"आजच्या टपालात तुझं हे पत्र होतं बघ." असे म्हणून तिच्या आईने निळ्या रंगाचे एक चपटे पाकीट तिच्या हातात दिले आणि ती स्वयंपाकघरात निघून गेली.

संध्याकाळच्या वाढत्या काळोखात तिने ते पाकीट उघडले आणि व्हरांड्यातील दिवा लावून ती ते पत्र वाचू लागली. पत्रातील बायकी अक्षर अपरिचित होते आणि कुणा अनोळख्या व्यक्तीने ते लिहिले होते. ते मसुरीहून आले होते. इंग्रजीत लिहिलेले होते. 'माय डिअर चंपा' असे निःसंकोचपणे व आपलेपणाने संबोधून पत्र लिहिले होते. त्यात लिहिले होते, "या वर्षी तू आमच्या कॉलेजात येणार असल्याचे समजले आणि मला फार आनंद झाला." त्यानंतर त्या कॉलेजाविषयी सविस्तर माहिती त्या पत्रात दिली होती. सर्व छात्रालये आणि विद्याविभाग यांविषयीही पुष्कळ माहिती दिली होती. शेवटी असा खुलासा करण्यात आला होता की "तू नवीनच या कॉलेजात येणार असल्यामुळे तुझी जबाबदारी माझ्यावर सोपविण्यात आली आहे. मी तुझी 'ऑफिशल् ॲडव्हाइझर' आहे. सोळा तारखेला जेव्हा तू कॉलेजात येशील तेव्हा फ्लॉरेन्स निकल्स हॉलच्या पायऱ्यांवर मी तुला भेटेन आणि तुझ्या साऱ्या अडचणी दूर करीन."

पत्राच्या खाली पत्रलेखिकेचे नावपत्ता होता :

तहमीना रजा, रोज माउंट, मसुरी.

चंपा आश्चर्यचकित होऊन विचार करू लागली. ही तहमीना रजा कोण? हिला आपला पत्ता कोठून मिळाला? ते पत्र तिला मोठे रहस्यपूर्ण वाटले. खरे म्हणजे असल्या घटना फक्त कथाकादंबऱ्यांतच घडत असतात. आपण आता एका विचित्र वातावरणात व अद्‌भुत जगात प्रवेश करीत आहोत, असे तिला वाटू लागले.

तिची ही कल्पना चूक नव्हती.

## २४

ठरल्याप्रमाणे सोळा तारखेला तहमीना रजा चंपा अहमदला फ्लॉरेन्स निकल्स हॉलच्या पायऱ्यांवर भेटली. चंपा काहीशा सचितपणे इकडेतिकडे पाहात होती. इतक्यात तिच्याच वयाच्या एका मुलीने पुढे होऊन तिला विचारले, "तुझं नाव चंपा अहमद ना?"

"होय!"

"ये. माझ्याबरोबर चल."

आणि दुसऱ्याच क्षणी चंपा चांदबागेच्या दुनियेत मिसळून गेली. त्या दिवशी रात्री हॉलमध्ये मुलींना कॉलेजच्या परंपरांची माहिती देणारे एक व्याख्यान देण्यात आले. त्यांना तेथील जीवनाच्या विभिन्न पैलूंची ओळख करून देण्यात आली. त्याचवेळी तिला समजले की दरवर्षी कॉलेजाच्या कचेरीकडून नव्याने येणाऱ्या मुलींचे पत्ते वरच्या वर्गातील मुलींना कळविले जातात आणि त्याना त्यांच्या सल्लागार म्हणून काम सोपविण्यात येते.

तहमीनाची धाकटी बहीण तलअत आरा पहिल्या वर्षाला होती. ती अगदी मोकळेपणाने तिला म्हणाली, "अग चंपाताई, आम्ही तर तुला बनारसलाच पाहिलं होतं." चंपा इतर मुलींबरोबर 'गुलफिशॉं'मध्ये गेली.

तेथे सर्वांनी तिचे मोठ्या आपलेपणाने स्वागत केले. सिंघाडेवाली कोटीनेही तिचे प्रेमाने स्वागत केले. शंकर श्रीवास्तव तिच्यासाठी स्वत: चहाचा ट्रे घेऊन आला.

एका रविवारी तिसऱ्या प्रहरी चंपा 'गुलफिशॉं' हवेलीत गेली. तलअत व तहमीना मागील व्हरांड्याच्या शेजारच्या खोलीत खिडकीजवळच्या माचावर बसल्या होत्या. कांदे आणि मिरच्या यांची टोपली खाली ठेवलेली होती. निर्मला बटाटे सोलत होती. बहुधा संध्याकाळी त्यांच्याकडे कोणाला तरी मेजवानी असावी.

चंपाही माच्यावर बसून बटाटे सोलू लागली. इतक्यात भैय्यासाहेब आत आले. त्यांच्या हातात टेनिसची रॅकेट होती. त्या पोशाखात ते मोठे छान दिसत होते. भैय्यासाहेब सामान्यत: घराच्या अंतर्भागात जात नसत. विशेषत: तहमीनाच्या मैत्रिणी आलेल्या असल्या म्हणजे तर ते तिकडे मुळीच फिरकत नसत कारण तहमीनाभोवती गोळा होणारा घोळका त्यांना विशेष पसंत नसे. तहमीनाचे खरे मित्र कमाल व हरिशंकर हेच होते.

परंतु भैय्यासाहेब हे अखेर भैय्यासाहेबच!

चंपा बटाटे सोलण्याचे, चिरण्याचे काम करीत राहिली. त्यांच्याकडे पाहाण्यात तिने आपली बोटे कापून घेतली नाहीत.

भैय्यासाहेब रात्रीच्या जेवणासंबंधी तहमीनाला काही विचारण्यासाठी आले होते. तिच्याशी बोलून ते उलटपावली परत फिरले.

परंतु आपल्या खोलीत जाताच त्यांनी गंगादीनला बोलावून विचारले, "काय रे, जी नवीन मुलगी आत बसलीय ती कोण आहे?"

"माहीत नाही, सरकार!" गंगादीन गडबडला. भैय्यासाहेबांनी आजपर्यंत त्याला कोणत्याही मुलीसंबंधी काही विचारले नव्हते. किती झाले तरी तहमीनाशी त्यांचे लग्न ठरले होते. "बडी बिटिया(तहमीना)कडे चांदबागेतल्या साऱ्या मुली येत असतात."

"अच्छा. जा!"

कमाल आला. पण त्याला काय विचारणार? तलअत च्या बडबड्या स्वभावाला ते फार घाबरत. त्यांनी जरा आडवळणाने जरी विचारायचा प्रयत्न केला असता तरी ती सगळीकडे डांगोरा पिटत फिरली असती. काय पीडा आहे पाहा! तहमीनाशी ते 'ऑफिशलि' बांधले गेले होते. त्यामुळे जगातल्या कोणत्याही दुसऱ्या मुलीकडे डोळे भरून पाहायचीही त्यांना बंदी होती! काय ही कैद!

वस्तुस्थिती अशी होती की ते अत्यंत एकाकी होते.

भैय्यासाहेब आपल्या व्यक्तित्वाच्या रोमान्समध्ये स्वतःच अडकून पडले होते.

अमलाने चंपाला सांगितले, "हे महाशय तहमीनाचे नियोजित वर आहेत. परंतु तहमीना त्यांना मुळीच महत्त्व देत नाही."

छे:! किती विचित्र परिस्थिती होती! 'गुलफिशाँ' सारखी नावे असलेल्या बंगल्यांतून राहाणाऱ्या लोकांसंबंधी तिने जेवढ्या कथा वाचल्या होत्या त्या सर्वांमध्ये जवळजवळ असेच घडलेले असे.

परंतु तुम्ही जवळ जाऊन पाहाल तर या कथांमध्ये काहीच राम नव्हता असे तुम्हांला आढळून येईल. जो इतरांचे जीवन म्हणजे एक कथा असते असे समजतो तो वस्तुतः स्वतःच एक कथा असतो आणि इतर लोक ती कथा वाचीत असतात....ही गोष्ट चंपाला त्यावेळी माहीत नव्हती.

* * *

पावसाळा संपला. कार्तिक पौर्णिमा आली. नंतर पौष व माघ महिन्यातील गार वारे लागले. खोल्यांतून शेगड्या पेटविण्यात आल्या. बागांवर धुके पसरले. रात्रीच्या फुलांवर दवबिंदू दिसू लागले. चांदबागेत नाताळाच्या उत्सवाची तयारी सुरू झाली. श्रीमंतांनी या वर्षीच्या नव्या फॅशनचे ओव्हरकोट शिवून घेतले. गोरगरीब थंडीने कुडकुडून मेले. बड्या लोकांनी शिकारीसाठी काल्पी व तराईकडे कूच केले. कलकत्त्याची शोभा

द्विगुणित झाला. हिवाळा संपला. वसंत आला. मोहरी फुलली. पालवी फुटली. उन्हाळा आला. तळघरातील वर्दळ वाढली. वाळ्याचे पडदे लागले. जिल्ह्यातील कंपनी बागा चमेलीच्या वासाने दरवळल्या. लीची फळे उतरविण्यात आली. गरम वारे वाहू लागले. गोमतीच्या वाळवंटात टरबुजे पिकली. श्रावण आला. आंबरायांत झोपाळे टांगले गेले. बघता बघता एक वर्ष निघून गेले. अमूल्य आयुष्यातील एक वर्ष नाहीसे झाले. आता दिवाळी येईल.

'गुलफिशाँ'च्या मागल्या व्हरांड्याच्या सर्वांत खालच्या पायरीवर तलअत लोळत पडली होती. तेथून बागेचे दृश्य फार सुंदर दिसत होते. आकाशाच्या गडद निळाईने डोळे दिपून जात होते. ही निळाई दूर अंतरावर खाली उतरून झाडांच्या हिरव्या रंगात सामावून गेली होती. सर्वत्र निर्मळ निःस्तब्धता पसरली होती. घरात बहुधा भैय्यासाहेब व्हायोलिन वाजवीत होते. तिने जमिनीला कान लावला. "याजूज व मोजूज" यांच्याप्रमाणे मी जमिनीला कान लावून पहुडल्ये आहे." असे मनाशी म्हणत तिने हात पुढे केला आणि आंबटगोड तिनपतिया (तिपानी) गवताचे पान खुडून ते मजेत चघळू लागली.

एक वर्ष निघून गेले होते. भैय्यासाहेब विद्यापीठाला रामराम ठोकून स्पर्धात्मक परीक्षेची तयारी करीत होते. कमाल व हरिशंकर एम. ए. च्या शेवटच्या वर्षात आले होते. अप्पी बी. ए. झाली होती. तलअत व निर्मला दुसऱ्या वर्षात होत्या. भैय्यासाहेब थोडे चक्रम झाले होते काय? ते चंपाताईवर प्रेम करू लागले होते आणि तिलाही ते आवडू लागले होते. चंपाताईवर तर सगळेच फिदा झाले होते. कमाल व हरिशंकर अष्टौप्रहर तिची तारीफ करीत. ते तलअतला म्हणत, "तू जेव्हा मोठी होशील तेव्हा चंपाचं व्यक्तित्व किती अद्‌भुत आहे, याची कल्पना तुला येईल." "असेल बाबा, असेल!" तलअत उत्तर देई.

अप्पीने अजूनही चंपाशी पूर्वीची मैत्री तशीच कायम ठेवली होती. अप्पी मोठी मजेदार स्त्री होती. अगदी मोकळ्या मनाने, निःसंकोचपणे ती तिला भेटे. तिचे हृदय विशाल होते. अप्पी आणि चंपाताई यांपैकी अधिक अद्‌भुत व प्रशंसनीय कोण होते? "पण हे सारं या लोकांना कुणी सांगायचं? मी पाहून ठेवलंय," तलअत मनाशी म्हणे, "हे पुरुष नुसत्या रूपाला भाळतात. चंपाताई सुंदर आहे, अप्पी सुंदर नाही. बस्स! हाच काय तो इत्यर्थ!..." हा विचार मनात येताच तिला फार वाईट वाटले. "बाप्र

---

१. याजूज व माजूज हे हजरत नूर (नोहा) यांच्या नातवांचे वंशज. हे अत्यंत भांडखोर व उपद्रवी होते.

सौंदर्याला माणसांनी इतकं महत्त्व देऊन ठेवलंय!" तिने दुःखावेगाने आणखी थोडे गवत ओरबाडले आणि ती ते चघळू लागली.

* * *

कमाल डेहराडूनच्या एका रस्त्यावरून खिन्नपणे चालला होता. तो नेहमीप्रमाणे दिवाळीच्या सुट्टीतील सहलीला बाहेर पडला होता. त्याच्या जुन्या लामार्तिनेर कॉलेजचा, काही वर्षांपूर्वीच ऑक्सफोर्डहून भारतात आलेला एक तरुण इंग्रज प्रोफेसर साधू होऊन घरातून बाहेर पडला होता. कमाल त्याचा आवडता विद्यार्थी असल्यामुळे त्याला धरून आणण्यासाठी कमालला पाठविण्यात आले होते. त्याप्रमाणे त्याने हरिशंकरला बरोबर घेऊन हरिद्वार, चकराता, हरकी पैडी वगैरे मार्गांतील देवळे आणि हिमालयातील आश्रम धुंडाळले. अखेर एके दिवशी योगमाया देवीच्या मंदिराजवळ त्यांना प्राध्यापक-महाशय सापडले. त्यांची विनंती ऐकून ते म्हणाले, "बाबांनो, मी एकदा त्या जंजाळातून मुक्त झालोय. आता पुनः मला त्यात अडकवू नका. मी मोठ्या आनंदात आहे." यावर कमाल त्यांना म्हणाला, "लखनौमध्ये अशी अफवा पसरलीय की पब्लिसिटी मिळवायसाठी तुम्ही ही क्लृप्ती केलीय."

"बाबांनो!" ते हात जोडून काकुळतीने म्हणाले, "मेहेरबानी करा आणि आल्या वाटेनं परत जा!" येवढे बोलून ते आपली भगवी वस्त्रे सावरून एका नाल्यातून पलीकडे गेले आणि जंगलात दिसेनासे झाले. म्हणून आता कमाल मान खाली घालून डेहराडूनच्या मोहिनी मार्गावरून चालला होता. नेहमीप्रमाणे हरिशंकर त्याच्याबरोबर होता. समोर रिसपना कालवा वाहात होता.

"यार हरिशंकर!" कमाल म्हणाला.

"हाँ यार!"

"यार, या प्रोफेसर हॅमिल्टनचं म्हणणं बरोबरच होतं. खुदाची कसम. आपण लोक कसल्या जंजाळात अडकलोय."

त्या दिवशी त्यांनी 'त्याग' या विषयावर खूप विचार केला. गंभीर तत्त्वज्ञानाच्या मनःस्थितीत ते वावरले.

"ते जाऊ दे. आपण आता घरांची नि बंगल्यांची नावं वाचू. आपल्या घरासाठी नाव निवडण्यात घरमालकाची सायकॉलॉजी दिसून येते." चालता-चालता मध्येच थांबून एका फाटकाजवळ जात हरिशंकर म्हणाला.

"आपण तरी कधी घर बांधणार नाही, बुवा! कारण 'शाहीं बनाता नहीं आशियाना' (बहिरी ससाणा कधी घरटे बांधत नसतो)." कमाल उद्गारला.

"बरोबर आहे. हे बघ ना, मध्यमवर्ग किती भयंकर सेंटिमेंटल असतो ते. हे नाव वाच बघू!"

"स्वाबिस्तान![1] लाहौल विलाकूवत!"

"परंतु तू स्वतःही 'गुलफिशाँ'[2] आणि 'खियाबाँ'[3] मध्येच राहातोस."

"मला माहीत आहे."

"यार कमाल!"

"हाँ यार!"

"जरा विचार कर. लोकांनी घरं बांधून ठेवली आहेत. या टोकापासून त्या टोकापर्यंत. एकापेक्षा एक सुंदर. साऱ्या जगभर घरं बांधण्यात आली आहेत."

"होय दोस्त. मोठी विचित्र गोष्ट आहे खरी!"

ते दोघे एका फाटकाजवळच्या छोट्या पुलावर बसले आणि पुनः या समस्येवर विचार करू लागले. खरे म्हणजे प्रोफेसरसाहेबांच्या वैराग्याने ते अत्यंत अस्वस्थ झाले होते. "एक अत्यंत बुद्धिमान माणूस, वैज्ञानिक, अरण्यात निघून जातो याचा अर्थ काय? कमाल आहे!"

"याचा अर्थ काही ना काही अवश्य असला पाहिजे."

अंधार पडेपर्यंत डालनवालाच्या शांत, सुगंधित रस्त्यांवरून घरांची नावे वाचीत फिरले—नस्तरन[4], दौलतखाना[5], शॅमरॉक[6], आशियाना[7], राजमहाल. कमालाच्या वडिलांचे 'खियाबाँ' हे घरही समोरच होते.

या बंगल्यांच्या आवारातील डोंगरी फळांच्या झाडांचा सुगंध सर्वत्र दरवळला होता आणि जग मोठे मोहक भासत होते.

ते दोघे खिन्न चेहऱ्याने पुनः एका फाटकाजवळच्या छोट्या पुलावर बसले आणि कालव्याच्या पाण्याकडे पाहू लागले. हा कालवा रस्त्याच्या कडेकडेने वाहात होता. एक फाटलेला जोडा प्रवाहाच्या वेगामुळे वरखाली होत कालव्यातून वाहात चालला होता.

---

१. स्वाबिस्तान = स्वप्नलोक. २. गुलफिशाँ = पुष्पवृष्टी करणारा; ३. खियाबाँ = उद्यान, वृक्षवीथि (अॅव्हेन्यू). ४. नस्तरन = शेवंती. ५. दौलतखाना = लक्ष्मीनिवास. ६. शॅमरॉक = त्रिपर्णी. ७. आशियाना = घरटे.

# २५

आणखी दोन वर्षे निघून गेली. ऑगस्ट १९४२ ची चळवळही भूतकाळात जमा झाली होती. 'पंडितजी', 'मौलाना' व इतर पुढारी अहमदनगरच्या किल्ल्यात स्थानबद्ध होते. जगाचा रागरंग झपाट्याने बदलत होता. समाजात सगळीकडे लष्करी लोक दिसत होते.

'गुलफिशाँ'चे सैय्यद आमिर रजा (भैय्यासाहेब) यांनीही इंपीरिअल सर्व्हिसच्या चढाओढीत अयशस्वी झाल्यानंतर आरमारात कमिशन घेतले होते. तहमीना एम. ए. च्या शेवटच्या वर्षात आली होती. चंपा एम. ए. च्या पहिल्या वर्षात होती आणि कैलाश हॉस्टेलमध्ये राहात होती. तलअत व निर्मला या बऱ्याच गाजलेल्या अंडर-ग्रॅज्युएट विद्यार्थिनी होत्या. चंपादेखील अलीकडे बऱ्याच दिवसांपासून शहरातील 'फॅशनेबल् स्मार्ट इंटलेक्च्यूअल् सेट' या नावाने संबोधल्या जाणाऱ्या गटात सामील झाली होती. किती वेगवेगळी नावे, किती विविध प्रकारचे चेहरे त्यात होते. या सर्व लोकांचे चांगले संघटन होते.

काळ्यागोऱ्या चेहऱ्यांचा समुद्र सभोवताली उसळ्या मारीत होता. त्या सर्वांमध्ये त्या सर्वांकडून घेरली गेलेली ती एकटी उभी होती. कारण अखेरच्या मूल्यमापनात असे स्पष्ट दिसून येते की मानव हा अगदी एकाकी आहे. तरीपण आपल्या भोवतालच्या माणसांची नाना प्रकारची समीकरणे बनविण्याचा, जोड्या लावण्याचा आपण प्रयत्न करीत असतो.

जेव्हा ही समीकरणे चुकीची असल्याचे सिद्ध होऊ लागते तेव्हा आपण अगदीच सामान्य असल्याची जाणीव आपल्याला होते.

हीच गोष्ट एके दिवशी चंपाने सैयद आमिर रजा ऊर्फ भैय्यासाहेब यांना अनपेक्षितपणे सांगितली.

त्या दिवशी भैय्यासाहेब मद्रासला जाणार होते. जाण्यापूर्वी ते तिला भेटायला कैलाश हॉस्टेलवर गेले होते. त्यावेळी ती ग्रंथालयात चालली होती. आपली सायकल हातात धरून ती त्यांच्याबरोबर चालत रस्त्यापर्यंत गेली. भैय्यासाहेब तिला म्हणाले, "मी इथून पळून जाऊ इच्छितो. देवाच्या कृपेनं मला फरारी व्हायची संधी मिळाली आहे. तू...तू...माझ्याशी लग्न करून माझ्याबरोबर यायला तयार आहेस?"

भैय्यासाहेब आधीच अत्यंत देखणे व सुंदर होते. त्यात पुनः आरमारात भरती झाल्यामुळे जणू दुधात साखर पडली होती. चार्ल्स बॉयरला गणवेष चढविल्यावर तो जसा दिसला असता तसे ते दिसत होते.

चंपाचा चेहरा कोणत्या तरी अज्ञात भावनेने लाल झाला. तिने आता जे काही ऐकले

होते ती एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट होती. एक पुरुष तिला आपल्या जीवनात सहभागी होण्याचे आवाहन करीत होता आणि तो पुरुष तिला अत्यंत आवडत होता.

परंतु ती म्हणाली, "कमाल आहे! असं विचारताना तुम्हांला थोडीसुद्धा लाज वाटली नाही?"

"तर मग तू मला बागेतल्या पायवाटेवरून कशाला फिरवलंस?" त्यांनं रागारागाने विचारले.

"मी तुम्हांला कुठल्याही बागेत फिरवलं नाही."

"तुला माझ्याविषयी आकर्षण वाटत नव्हतं असं तू इमानानं सांगू शकतेस? तुझी मैत्रीण तहमीना हिच्याशी माझं लग्न होणार असल्याचं माहीत असूनही तू मला झुलवत राहिलीस, हे खोटं आहे?"

ती गप्प राहिली. मैय्यासाहेबांचे म्हणणे अगदी खरे होते. आता आपल्यामध्ये उणिवा असल्याची जाणीव तिला प्रथमच झाली. सिद्धांत, उच्च विचार, तत्त्वज्ञान वगैरे गोष्टी वेगळ्या आणि आपले वास्तविक जीवन वेगळे. त्या जीवनात आपण आपल्या विचारांहून अगदी वेगळे आचरण करीत असतो. विशुद्ध तत्त्वज्ञान आणि नैतिक सिद्धांत यांचा भावना व अंतःप्रेरणा यांच्याशी काही संबंध नसतो. खरोखरी आपण अत्यंत दुबळे असतो.

मैय्यासाहेबांना जणू तिच्या मनातील विचार समजले. ते म्हणाले, "तूही अगदीच सामान्य निघालीस."

"मी असामान्य आहे, असं तुम्हांला कधी सांगितलं होतं मी?" तिने विचारले. ते एव्हाना बादशाह बागेच्या फाटकापर्यंत आले होते. "थांबा! तुम्ही माझ्याबरोबर का येताहात? मला माझ्या कामाला जायचंय. तुम्ही तुमच्या घरी जा."

"मला घरच नाही."

"तसं पाहिलं तर आपल्यापैकी कुणालाच कुठंच घर नाही." चंपा हासून म्हणाली, "परंतु यावेळी तुमच्याशी तत्त्वज्ञानाची चर्चा करण्याची माझी इच्छा नाही. तुम्हांला घर आहे. त्याचं नाव 'गुलफिशाँ' लाहौल विला...किती बोगस नाव आहे!...आणि तिथं तहमीना आहे. तुम्ही परत जा कसे."

"तू अगदीच सामान्य आहेस; आणि सामान्य बायकांसारखी तू माझ्याशी भांडते आहेस. तुझ्या साऱ्या प्रतिक्रिया अगदीच सामान्य आहेत. अखेर तूही वळणावर गेलीस. तुझ्यासारख्या हजारो पोरी जगात आहेत. आधी तू माझ्याशी फ्लर्टिंग केलंस आणि आता माझ्याबरोबर यायची हिंमत तुला होत नाही. कमाल आहे."

"सामान्य पुरुषांप्रमाणंच तुम्हीही माझ्याशी भांडता आहात." ती हसून म्हणाली

"सारांश काय की आपल्यापैकी कोणीही असामान्य, देवदेवतेच्या दर्जाचं नाही हेच सिद्ध झालं. खुदा हाफिज!" असे म्हणून ती सायकलवर बसली आणि वेगाने टागोर ग्रंथालयाकडे निघून गेली.

'गुलफिशाँ'मध्ये जाऊन भैय्यासाहेबही एकाग्र चित्ताने सामानाची बांधाबांध करू लागले. त्याच दिवशी तहमीना एम. ए. चा शेवटचा पेपर देऊन विद्यापीठातून परत आली होती. सबंध दिवसभर घरात कुजबूज चालू होती. अप्पीचे शिक्षण पुरे झाले. भैय्यासाहेब आरमारात अधिकारी झाले. आता लग्नाला उशीर कशासाठी?

रात्री भैय्यासाहेब काहीही न बोलता मोटारीत बसून स्टेशनवर गेले.

घरामध्ये एकप्रकारचे त्रासिकपणाचे वातावरण पसरले.

कमाल व हरिशंकर तहमीनासमोर जाण्याचे टाळत होते. उन्हाळ्याची सुटी सुरू झाली होती. चंपा बनारसला परत गेली. नेहमीप्रमाणे थंड हवेच्या ठिकाणी जाण्याचा कार्यक्रम आखण्यात आला. घरची सर्व मंडळी नैनितालला गेली. कमाल आपल्या आत्याच्या आमंत्रणावरून मसुरीला गेला.

जुलैमध्ये पुनः सर्व लोक थंड हवेच्या ठिकाणाहून परतू लागले. 'गुलफिशाँ'चे दरवाजे उघडले. पूर्वेकडील वाऱ्याने बागेतील झाडे थरारली. इतक्यात एके दिवशी अकस्मात भैय्यासाहेब येऊन पोहोचले. ते तीन दिवस 'गुलफिशाँ'त राहिले. तिन्ही दिवस ते आपल्या खोलीतच बसून होते. परत निघण्यापूर्वी ते अम्माँ बेगम यांच्या खोलीत गेले.

"तुमची मुलगी एम. ए. झाली, त्याबद्दल अभिनंदन!" त्यांनी पलंगाच्या कडेला बसत शांत स्वरात म्हटले.

अम्माँ बेगम काही बोलल्या नाहीत.

"मला वाटतं, आता तिचं लग्न व्हावं."

"कुणाशी?" अम्माँ बेगमनी कडवटपणे विचारले.

"माझ्याशी, आणखी कुणाशी?" भैय्यासाहेबांनी तितक्याच कडवटपणे उत्तर दिले.

"आता असं बोलताना तुला लाजही वाटत नाही? आपली चुलत बहीण असताना तिला सोडून तू परक्या मुलीच्या प्रेमात अडकलास. जिकडे जावं तिकडे लोक हेच बोलतात."

"मला माझ्या कर्तव्याची जाणीव नाही हे आपण कशावरून ठरवलं? या घरानं मला अशासाठीच तर लहानाचं मोठं केलं की मी तहमीना बेगमशी लग्न करावं. मी इतका कृतघ्न निश्चितच नाही की तुमच्या मुलीला फशी पाडीन." एवढे बोलून ते बाहेर निघून गेले.

सोसन तह्मीनाकडे जाऊन म्हणाली, "त्रिटिया, मी इमानबाँदीला विवाहगीतं गाण्यासाठी बोलवायला चाललेय. तुमचं लग्न ठरलंय, ही बातमी तुमच्यापर्यंत अजून आली की नाही ?"

"सोसन ! तू जाऊन सगळ्यांना सांग की इकडचं जग तिकडे झालं तरी मी भैय्यासाहेबांशी मुळीच लग्न करणार नाही."

एवढे बोलून तह्मीना ओक्साबोक्शी रडू लागली. सोसन आश्चर्यचकित होऊन पाहातच राहिली.

यानंतर साऱ्या घरात आणीबाणीची परिस्थिती जाहीर करण्यात आली. सगळीकडे फोन आणि ट्रंककॉल करण्यात आले. कमालला मसुरीला तार देण्यात आली की 'ताबडतोब येऊन आपल्या बहिणीची समजूत घाल.' प्रत्येक व्यक्तीने तह्मीनाला समजावून सांगण्याचा आपापल्या परीने आटोकाट प्रयत्न केला.

तह्मीना खास मुलींच्या पद्धतीने अहोरात्र रडत होती. तरीपण तिच्या तोंडून काही केल्या होकार निघत नव्हता.

कमालने मसुरीहून येऊन घराचे हे चित्र पाहिले. नंतर तो चंपाला भेटण्यासाठी कैलाश हॉस्टेलवर गेला. तेथे त्याला समजले की चंपा अजून आपल्या मामांच्या घरी आहे; ती पुढल्या आठवड्यात हॉस्टेलवर येईल. तेथून तो चंपाच्या घरी गेला. तेथे त्याची भैय्यासाहेबांशी गाठ पडली. ते आता चंपाला काय सांगायला गेले होते कोण जाणे. त्याला पाहताच ते उठून निघून गेले. त्याच दिवशी ते मद्रासला गेले.

हळूहळू परिस्थिती पूर्वपदावर आली. चंपा पूर्वीप्रमाणेच आपल्या टोळक्यात वावरू लागली. त्या दोघींनी अत्यंत शालीनतेने एकमेकींशी मैत्री कायम ठेवली. कधी चुकूनही भैयासाहेबांचा उल्लेख येऊ दिला नाही. दोघीही आपापल्या मनाशी असे समजत होत्या की आपण अत्यंत गंभीर व शिस्तीच्या मुली आहोत; भावनाप्रधानतेच्या उथळपणात रुतलेल्या आजकालच्या पोरी थोड्याच आहोत !

आणि वस्तुस्थिती अशी आहे की आघात ताजा असताना आपल्याला ज्या गोष्टी प्रलयासारख्या भयंकर वाटतात त्या काळ निघून गेल्यानंतर इतक्या क्षुद्र वाटू लागतात की त्यांच्या पायी आपण इतके अस्वस्थ झालो होतो या कल्पनेनेच आपल्याला हसू येते.

दुष्काळपीडितांच्या साहाय्यासाठी कमाल कलकत्त्याला जाणार होता. इतक्यात त्याला भावोजींचे पत्र मिळाले. लाजवतीच्या लग्नाला एक वर्ष झाले होते. ती आपल्या नवऱ्याबरोबर दिल्लीत राहात होती. भावोजी तेथे कोणत्यातरी सरकारी खात्यात अंडर सेक्रेटरी होते. आता निर्मलेच्या लग्नाची काळजी सुरू झाली होती. भावोजींनी त्याला लिहिले होते, "तू कलकत्त्याला जात आहेस. सर दीपनारायण यांचा मुलगा गौतमही सध्या तेथेच आहे. निर्मलेच्या बाबतीत त्यांच्याकडे विचारावे अशी आमची इच्छा आहे. तोही तुमच्या बंगालरिलीफ आणि इप्टाबिप्टाच्या चक्रात अडकून तेथे गेला आहे. किंवा कदाचित विश्वभारतीत काही काम करीत असावा. ते कसेही असो. तू जरा त्याला भेट आणि मुलगा कसा काय आहे ते पाहा. त्याच्या स्वभावात काही गांभीर्य आहे की तोही तुम्हा सर्वांसारखाच 'बोहीमियन' आहे ?

कमालाने पत्र खिशात ठेवले. "कमाल आहे भावोजींची. देशात माणसं किड्या मुंग्यांप्रमाणं मरताहेत. देश विनाशाकडे चाललाय आणि यांना लग्नाची काळजी लागलीय." (कमाल हा मोठा उत्साही विद्यार्थीकार्यकर्ता होता आणि तहमीना व भैय्यासाहेब यांच्या लग्नाचे त्रांगडे झाल्यानंतर एकूण लग्नसंस्थेविषयीच त्याच्या मनात तिटकारा निर्माण झाला होता.) "मी कलकत्त्यात उपासमारीनं मेलेल्या माणसांची प्रेतं उचलणार की निर्मलाबाईसाहेबांसाठी वरसंशोधन करीत हिंडणार ?" तो त्रासिकपणे तलअतला म्हणाला. तरी पण कर्तव्य म्हणून त्याने त्या गृहस्थांचा पत्ता टिपून घेतला. (भावोजींनी तो पत्ता पत्रातून कळविला होता.) आणि कमाल कलकत्त्याला रवाना झाला. त्याच्याबरोबर विद्यापीठातील इतर अनेक मुलेमुली होत्या. सबंध प्रवासात ती इकबाल, बोश, टागोर, नजरूल इस्लाम यांची आवेशपूर्ण गाणी गात होती. आगगाडीच्या खिडकीतून तो समोवतालची हिरवीगार शेते पाही आणि मनाशी म्हणे, "हा माझा देश आहे. हा माझा देश आहे." देशभक्ती व क्रांती, राष्ट्रीयत्वाचा जोष आणि ब्रिटिश सरकारविरुद्ध क्रोध व प्रक्षोभ इत्यादी भावनांनी त्याच्या अंतःकरणात कल्लोळ माजविला.

गंगेच्या काठी एका लहानशा सुबक स्टेशनावर गाडी थांबली. मुले खिडकीबाहेर पाहू लागली. सगळीकडे तळी, हिरवळीने आच्छादलेली मैदाने आणि वेळूची बेटं होती. दूर क्षितिजाजवळ सूर्य गंगेच्या लाटांमध्ये अस्तास चालला होता. स्टेशनवर दोन पालख्या उतरल्या होत्या. फलाटावर ग्रामीण लोकांची गर्दी होती. हे लोक खायला भात मिळेल या आशेने कलकत्त्याला जाण्यासाठी गाडीवर तुटून पडत होते.

प्लॅटफॉर्मच्या दुसऱ्या बाजूला समोरच सैनिकांनी भरलेली दुसरी गाडी उभी होती.

"ही लष्करी गाडी पुढं गेल्याखेरीज तुमची गाडी इथून हलणार नाही." एका गार्डाने कमालाला सांगितले, "तुमची गाडी सुमारे चारपाच तास लेट होईल. हा युद्धकाळ आहे, साहेब!"

मुले व मुली प्लॅटफॉर्मवर उतरल्या.

कमाल व त्याचे सहकारी गाणी गाऊन गाऊन थकून गेले. गाडी हलण्याचे लक्षण दिसत नव्हते.

इतक्यात रेखा ओरडली आणि एका बाजूला धावली. तिचे सहकारीही तिच्या मागोमाग धावले. प्लॅटफॉर्मच्या एका टोकाला शेतकऱ्यांचे एक लहानसे कुटुंब घाबरलेल्या स्थितीत संकोचून बसले होते. आखूड व तुरळक काळी दाढी असलेला एक तरुण तेथे मरून पडला होता. त्याची पत्नी, काळी-सावळी, कृश शरीराची तरुणी, धाय मोकलून रडत होती. तिची दोन्ही मुले तिच्याबरोबर आक्रोश करीत होती.

"कमाल" नरेंद्र म्हणाला, "इकडे ये. प्रेतं उचलण्याचं आपलं काम इथूनच सुरू होतंय."

त्या तरुणीने रडत-रडत बंगालीत सांगितले की ती व तिचा नवरा अबुल मन्सूर अन्नाच्या शोधात कलकत्त्याला चालले होते. गेल्या आठ-दहा दिवसांपासून त्यांना अन्नाचा कणही मिळाला नव्हता. आमीना बीबीनेही काही खाल्ले नव्हते. लष्करी शिपायांनी गाडीतून फेकलेले बिस्किटाचे व पावाचे दोनचार तुकडे तिने गोळा करून आपल्या मुलांना खाऊ घातले होते. येवढे बोलून तीही प्लॅटफॉर्मवर कोसळली आणि सर्वांच्या डोळ्यांदेखत तिने प्राण सोडला.

अँग्लो इंडियन स्टेशनमास्तर तेथे आला. "काय गडबड चालवलीय तुम्ही मंडळींनी इथं? आजकाल दररोज शेपन्नास माणसं याच प्लॅटफॉर्मवर मरतात. आम्ही कुणाकुणाची म्हणून काळजी वाहायची? हे रेल्वेस्टेशन आहे, इस्पितळ नव्हे. हा बंगाली नेहमीच उपाशी असतो. भुके बंगाली! तुम्ही कशाला त्यांची चिंता करता?"

"इथं कबरस्तान कुठं आहे?" कमालाने रागाने दातओठ खात विचारले.

"आम्हांला माहीत नाही...तुम्ही या लोकांसाठी कबरी खोदणार की काय? दॅट इज व्हेरी फनी!!"

कबरस्तान व एखादा मौलवी यांच्या शोधासाठी मुले गावात गेली.

कमाल प्रेताजवळ बसून राहिला. प्लॅटफॉर्मच्या त्या टोकाला दाट काळोख पसरला होता. वेळूच्या बेटांतून सोसाट्याचा वारा वाहात होता. कमालाने आपल्या होल्डॉलमधून एक चादर काढून त्या प्रेतांवर घातली. लाल साडी नेसलेली आमीना बीबी आणि

ठिगळांनी भरलेली निळ्या रंगाची, चौकड्यांची लुंगी नेसलेला अबुल मन्सूर दोघेही त्या एका चादरीखाली अखेरची विश्रांती घेत राहिले.

थोड्या अंतरावर गंगा वाहात होती. तिच्या लाटांवरुन एक लहानशी नौका एकाकी चालली होती. नावेत दिवा तेवत होता आणि कोणीतरी अंतःकरणाला स्पर्श करून जाणाऱ्या आवाजात नाविकगीत गात होता. त्या गाण्याचे शब्द कमालाला नीटसे समजले नाहीत. झाडांच्या समुदायात लॉर्ड कॉर्नवालिसच्या काळात बांधलेली, भक्कम खांब व जाळीदार व्हरांडा असलेली, जिल्हा-कलेक्टराची रुबाबदार बंगली होती. तेथून जवळच जिल्ह्यातील सर्वात मोठे जमीनदार राजा गिरीशचंद्र राय यांचा वाडा होता. तेथे रेडिओ चालू होता. रात्रीच्या निःस्तब्धतेत वाऱ्यावर तरंगत येणारे बी. बी. सी. च्या सुगम संगीताचे सूर येथे स्पष्ट ऐकू येत होते. कमालाचे अंतःकरण दुःखाने व निराशेने व्याप्त झाले. त्याने डोळे मिटून घेतले. हा रवींद्रनाथ, सरोजिनी देवी आणि शरच्चंद्र यांचा देश होता कादंबरीकार व कवी यांचा आवडता विषय !

आपण सर्वच वेगवेगळ्या ग्रंथांचे विषय असतो....इतिहासातील प्रकरणे, शब्द, आकडे, अहवाल, कॉंग्रेसच्या व मुस्लिम लीगच्या पुढाऱ्यांची भाषणे, कम्युनिस्ट पक्षाचा जाहीरनामा...गेल्या आठवड्यात डॉक्टर अश्रफ म्हणत होते की वेगळ्या राष्ट्रांच्या स्वातंत्र्याची मागणी ही लेनिनच्या सिद्धांतांनुरूपच आहे. पाकिस्तान !...मग काय, जो मुसल्मान आहे तो स्वाभाविकपणेच—ऑटोमॅटिकली—पाकिस्तानी होईल ? की आणखी काही होईल ? लेनिन, स्टालिन, गॉर्की, डॉक्टर अश्रफ, सज्जाद जहीर, जिना साहेब, महात्मा गांधी, पंडितजी...

कमालाच्या डोक्यात घटना, नावे व व्यक्ती यांनी काहूर माजविले. परंतु यावेळी तरी साऱ्या जगाचा केंद्रबिंदू या दोन प्रेतांमध्ये सामावला होता. सगळ्या घटनांच्या व सिद्धांतांच्या साखळीचा दुवा याच केंद्रावर येऊन तुटत होता. आमीना बीबी आणि अबुल मन्सूर...दोन प्रेते !

दुसऱ्या दिवशी सकाळी ते सर्वजण पुढे रवाना झाले. संध्याकाळी गाडी हावड्याला पोहोचली. मुले व मुली आपापल्या मुक्कामाच्या ठिकाणी गेली. त्या सर्वांनी प्रमोदकुमाराच्या घरी दुसऱ्या दिवशी एकत्र जमावयाचे ठरले होते. कमाल माणिकतल्ल्याला गेला. तेथे त्याचे मामा 'मटिया बुरुजवाले नबाब' राहात होते.

* * *

माणिकतल्ल्यातील एका जुनाट वाड्याच्या फाटकासमोर एक बंदगाडी येऊन थांबली. या वाड्याची बांधणी कंपनीच्या काळातील होती. अशाच प्रकारचे वाडे कलकत्त्यात

जागोजागी पाहावयास मिळतात. मोठमोठे खांब, रुंद व्हरांडा, दरवाजावर व व्हरांड्यावर व्हेनिशियन जाळीचे पडदे. आतील दिवाणखान्यात वेलबुट्टीदार सोनेरी चौकटीमध्ये इंग्लंडमधील दृश्यांची चित्रे होती. काश्मिरी भरतकाम असलेले पडदे होते. आतील बाजूस चिनी पाम सजविलेला होता; बाहेर बागेत फुले दरवळत होती.

वरच्या मजल्यावरून मुली ओरडल्या, "अय्या! कम्मन भैय्या आले लखनौहून!" घरभर गडबड उडाली. नोकर व मोलकरणी बाहेर आल्या. खाली व्हरांड्यात फर्नची पाने झुलत होती. नबाबसाहेब माच्याच्या स्वागतासाठी आरामखुर्चीवरून उठले.

हा वाडा पन्नास पंचावन्न वर्षांपूर्वी दत्त कुटुंबाकडून मटिया बुरुजवाले नबाब कमाल रजा बहादुर यांच्या धाकट्या मेहुण्यांनी विकत घेतला होता. एके काळी या वाड्यात ब्राह्मसमाजाच्या मोठमोठ्या सभा होत असत. वरच्या मजल्यावरील एका खोलीत अजूनही दत्तकुटुंबातील लोकांची अंधुक पडलेली छायाचित्रे टांगलेली होती. एक ग्रुप फोटोग्राफ होता. त्यात महर्षी देवेंद्रनाथ टागोर मध्यभागी बसले होते. त्या खोलीत एका बाजूला एक संगमरवरी चबुतरा होता. तेथे बसून महर्षी हार्मोनियमवर भजने गात असत, असे म्हणतात. एके काळी लखनौच्या कॅनिंग कॉलेजात प्रोफेसर असलेले बाबू मनोरंजन दत्त हे त्या वाड्याचे मालक. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मुलांनी हा वाडा विकून बालीगंज भागात एक मोठा बंगला बांधला होता. त्यांच्या वंशजांमध्ये आता कित्येक आय. सी. एस. ऑफिसर होते तर कित्येक कम्युनिस्ट पुढारी होते. त्या घराण्यातील बहुतेक मुली युरोपात शिक्षण घेत होत्या. बाबू मनोरंजन दत्तांच्या एका नातीचे लग्न चितगावच्या डोंगरी राज्यांपैकी एका राज्याच्या राजाशी झालेले होते.

या वाड्याचे सध्याचे मालक लखनौचे एक माजी नबाब होते. त्यांना तनखा मिळत होता आणि ते कलकत्त्यात राहात होते. फक्त जिवंत राहाणे येवढेच त्यांचे काम होते.

नबाब कमाल रजा बहादुर हे सुलताने आलम वाजिदअली शाह यांच्याबरोबर मटिया बरुजात आले होते. नबाब अली रजा बहादुर हे त्यांच्या सर्वात धाकट्या बहिणीचे यजमान व चुलतभाऊ होते. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरचे कलकत्ता हे अत्यंत आधुनिक शहर होते. तेथे कॉलेजे होती आणि छापखाने व वृत्तपत्रेही होती. नवीन बंगाली कादंबऱ्यांतून हिंदू संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाचा प्रचार केला जात होता. देशात सर्वत्र राजकीय व सांस्कृतिक चळवळींची चर्चा चालू होती. परंतु नबाब अली रजा बहादुर यांना या साऱ्या धामधुमीशी काही कर्तव्य नव्हते. अलीगडला एम. ए. ओ. कॉलेज सुरू झाले होते. परंतु नबाबसाहेबांना इंग्रजी शिक्षणात काही रुची नव्हती.

त्यांचा सगळा वेळ लखनौ, दिल्ली व अजीमाबाद (पाटणा) येथील साहित्यिक व काव्यविषयक शरसंधानात निघून जाई. तनखा मिळत असल्यामुळे आर्थिक विवंचना नव्हती. डोक्यावर ब्रिटिश सरकारचे कृपाछत्र होते.

अशा वेळी त्यांच्या घराण्यात प्रथमच एक अभूतपूर्व घटना घडली. नबाब अली रजा यांचे जे जावई लखनौला राहात असत त्यांनी आपल्या थोरल्या मुलाला शिक्षणासाठी अलीगडला पाठविले.

नबाब अली रजा यांचे दुसरे जावई पाटण्याचे राहाणारे होते. ते मोठे सुधारक व पुरोगामी विचाराचे निघाले. पाटण्यात वकिलीचा व्यवसाय विशेष प्रतिष्ठित समजला जाई. त्यामुळे नबाब अली रजा यांचा पाटण्याचा नातू बॅरिस्टरीच्या अभ्यासासाठी विलायतेला गेला.

नबाब अली रजा यांचे लखनौचे जावई इंग्रजी शिक्षणाचे तर समर्थक होतेच परंतु आता ते राजकारणातही रस घेऊ लागले आणि ते कॉंग्रेसमध्ये सामील झाले. आता त्यांच्याकडे, लखनौच्या गोलागंज भागातील घरी, वैश्य हिंदू गोळा होऊ लागले. ही सर्व मंडळी अद्यापि राजनिष्ठ होती परंतु थोडीफार राजकीय मोकळीक, सवलती मिळाल्या पाहिजेत आणि सामाजिक सुधारणा घडून आल्या पाहिजेत, असे त्यांचे म्हणणे होते. असंख्य मुसल्मान या चळवळीत सामील झाले होते.

हिंदुस्थानातील मुसल्मानांच्या राजकीय स्थानाची समस्या अधिकाधिक बिकट होत चालली होती. हिंदूंनी शंभरसव्वाशे वर्षांपूर्वीच इंग्रजी शिक्षणाचा स्वीकार केला होता; मुसल्मानांच्या अमदानीत हिंदूंनी फारसी शिकून राज्यकारभार आपल्या हातात ठेवला होता. ईस्ट इंडिया कंपनी आली तेव्हाही त्यांनी ताबडतोब परिस्थितीशी तडजोड केली. आणि मोंगलांचा नोकर असलेला मुन्शी बघता बघता ईस्ट इंडिया कंपनीचा कारकून झाला. गेल्या शंभर वर्षांपासून हिंदूंनी पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा प्रभाव स्वीकारण्यास सुरुवात केली होती. इंग्रजांनी १८५७ च्या बंडानंतर मुसल्मानांना सर्वत्र ठेचून काढले होते. हिंदूंमध्ये राष्ट्रीयत्वाची भावना जशी वाढू लागली तशी इंग्रजांनी मुसल्मानांना हाताशी धरण्यास सुरुवात केली. हिंदूंमध्ये एक मध्यमवर्ग (बुर्झ्वाजी) निर्माण झाला होता. तो नेतृत्वासाठी आणि प्रागतिक राजकारणासाठी तयार होता. मुसल्मान मात्र अजून सरंजामशाही अवस्थेतून बाहेर पडले नव्हते.

इंग्रज आणि देशी जमीनदार व सरंजामदार यांची गट्टी चांगलीच यशस्वी ठरली होती. बंगालमध्ये मुसल्मानांच्या राजवटीत इनाम जमिनींच्या उत्पन्नातून शाळा चालत असत. ईस्ट इंडिया कंपनीने या जमिनी ताब्यात घेतल्या. शाळा बंद झाल्या आणि मुसलमान मागासले. त्याच वेळी हिंदू इंग्रजी शिकू लागले होते. मुस्लिम जहागीरदार

नामशेष झाला होता. मुसल्मान कारागीर पद्धतशीरपणे नाहीसा करून टाकण्यात आला होता. मुस्लिम जहागीरदाराची जागा लॉर्ड कॉर्नवालिसच्या कायमधारा पद्धतीतून निर्माण झालेल्या हिंदू जमीनदारांनी व हिंदू मध्यम वर्गाने घेतली. आता बंगालचे बहुसंख्य शेतकरी मुसल्मान होते आणि जमीनदार हिंदू होते. वर्गोच्या या अदलाबदलीच्या पार्श्वभूमीबरोबरच बंगालमध्ये सर्वात प्रथम जागृती आली. नवा हिंदू मध्यम वर्ग नेतृत्व सांभाळण्यास एव्हाना तयार झाला होता.

हिंदूंच्या पुनरुत्थानाचे किंवा प्रबोधनाचे आंदोलन बंगालमध्येच सुरू झाले. त्याचे एक उदाहरण म्हणजे बंकिमचंद्र चटर्जी यांची १७७० सालचा दुष्काळ व संन्याशांचे बंड यांवर आधारलेली सुप्रसिद्ध कादंबरी 'आनंदमठ' हे होय. ही कादंबरी मुसल्मानांच्या विरुद्ध होती. हे संन्यासी मुसल्मानांना या देशातून संपूर्णपणे नष्ट करू इच्छित होते, असे या कादंबरीत सांगण्यात आले होते. वस्तुतः १७७० चा दुष्काळ ईस्ट इंडिया कंपनीने चालविलेल्या लुटीमुळे, आर्थिक शोषणामुळे पडला होता. परंतु भारतातील नव्या राजनिष्ठ मध्यमवर्गाचे प्रतिनिधी बंकिमचंद्र यांनी या कादंबरीत इंग्रजांच्या न्यायप्रियतेचीच प्रशंसा केली होती. 'आनंदमठा'तील संन्यासी मुसल्मानांप्रमाणेच इंग्रजांशीही लढतात, त्यासंबंधी बंकिमचंद्रांचे म्हणणे असे की इंग्रज लोक भारताच्या उद्धारासाठी आले आहेत, ही गोष्ट संन्यासी बंडखोरांना समजली नाही. इंग्रजांचे राज्य व इंग्रजी शिक्षण यानेच हिंदूंचा उद्धार होईल असे बंकिमचंद्रांचे मत होते. (याच धर्तीवर मुस्लिम पुनरुत्थानाचे नेते इंग्रजी शिक्षण व इंग्रजी राजवट यापासून होणाऱ्या फायद्यांचे पोवाडे गात असत.) एक महत्त्वाची गोष्ट ही होती की मुसल्मानांविरुद्ध तिरस्कार व द्वेष पसरविणाऱ्या 'आनंदमठ' कादंबरीतील 'वंदे मातरम्' गाण्यालाच राष्ट्रगीत बनविण्यात आले. त्यामुळे राष्ट्रीय ऐक्यासंबंधी मुसलमान जास्तच साशंक बनले. अशा प्रकारे राष्ट्रीय संघटनेमध्ये पदोपदी अडथळे निर्माण होऊ लागले.

नोकऱ्या मिळविण्याच्या शर्यतीत हिंदू मुसल्मानांहून फार पुढे निघून गेले होते. मुसल्मानांमध्ये भीती व आशंका निर्माण होऊ लागली होती. या भीतीला इंग्रजांनी योग्य वेळी खतपाणी घातले.

इंग्रजी शिकलेल्या राजनिष्ठ मुसलमानांचा मध्यमवर्ग तयार होऊ लागला. घाम गाळून, जिवापाड मेहनत करणाऱ्या मुसल्मान शेतकऱ्यांचा व विणकऱ्यांचा विचारही मुस्लिम लीगच्या पुढाऱ्यांच्या मनाला शिवला नाही. त्या सर्वांना, आपल्याला जास्तीत जास्त आर्थिक सुरक्षितता व नोकऱ्या कशा मिळतील याचीच काळजी होती.

यानंतर पहिले महायुद्ध सुरू झाले. डॉक्टर अन्सारी व अली बंधू राजकीय रंगभूमीवर आले. खिलाफतीची चळवळ सुरू झाली. गांधी आले आणि कॉंग्रेसने उघडउघड

स्वराज्याची मागणी सुरू केली. आता परिस्थिती झपाट्याने बदलू लागली. सबंध देशात एक अद्‌भुत आवेश संचारला.

नबाब अली रजा बहादुर यांचे जावई जमीनदार नकी रजा बहादुर उघडपणे राष्ट्रीय चळवळीत भाग घेऊ शकत नव्हते. अवधच्या जमीनदारांनी १८५७ साली अवधचे राज्य वाचविण्यासाठी इंग्रजांशी जोराची झुंज दिली होती. परंतु त्यानंतर हेच जमीनदार इंग्रजांचे भक्त झाले कारण इंग्रजांशी हातमिळवणी केल्यानेच शेतकऱ्यांवरील त्यांचे आधिपत्य कायम राहाणार होते. तो लखनौमधील 'नबाब' सर हरकोर्ट बटलर याचा काळ होता. त्याने जमीनदारांच्या सवयी लावून घेतल्या होत्या. लखनौच्या जमीनदारांच्या दृष्टीने हे सुवर्णयुग होते. एकीकडे स्वातंत्र्याचे वारे वाहात होते तर दुसरीकडे जाने आलम यांच्या युगाचे नवीनीकरण चालू होते. ते महमूदाबादचे महाराजा, ठाकुर नबाब अली व राय राजेश्वरबली यांचे लखनौ होते.

याच काळात नबाब नकी रजा बहादुर यांचे अलीगडला शिक्षण झालेले चिरंजीव नबाब अब्दुल मकारम तकी रजा बहादुर यांना बडी अल्लाह आमीन यांच्यापासून एक मुलगा झाला. त्याचे नाव त्याच्या आजीचे मामा मरिया बुरुजाचे नबाब कमालुद्दीन अली रजा बहादुर यांच्या नावावरून कमाल असे ठेवण्यात आले.

त्यांच्या घरी दोन वर्षांची एक मुलगी आधीपासूनच होती. तिचे नाव तहमीना बेगम असे होते. कमालाला त्याच्या श्रीमंत वर्गातील इतर मुलांप्रमाणे प्रथम डेहराडूनच्या शाळेत घालण्यात आले. त्यानंतर लामार्तिनेर कॉलेजात त्याचे शिक्षण झाले. हे कॉलेज ब्रिटिश व सरंजामशाही परंपरांचा बालेकिल्ला होते.

कमालाला आपल्या बाळपणीचा काळ चांगला आठवत होता. त्यावेळी त्याला घरामध्ये वडील मंडळीच्या तोंडून राजकारणाच्या गोष्टी ऐकावयास मिळत होत्या. नबाब अबुल मकारम तकी रजा बहादुर यांचे घराणे आता जुन्या काळचे घराणे राहिले नव्हते. आता या घराण्यातील लोक सरकारी नोकऱ्याही करू लागले होते. कमालाचे काका (चचा मियाँ) म्हणजेच भैय्यासाहेबांचे वडील बॅरिस्टर होते आणि कॉंग्रेसचे पुढारीही होते. परंतु ते ऐन तारुण्यातच निवर्तले. पाटण्याचे मामाही कॉंग्रेसी होते आणि सारखे तुरुंगाच्या वाऱ्या करीत असत. कमालाला असहकार आंदोलनाचा काळ चांगला आठवत होता. त्यावेळी पाटण्याचे मामा त्याला बरोबर घेऊन जात. तेथे तो श्रोत्यांसमोर व्यासपीठावर उभा राहून आपल्या बोबड्या स्वरांत उर्दूच्या राष्ट्रीय कविता गाऊन दाखवी. नंतर पोलिस येत आणि लाठीहल्ला करून सभा उधळून लावीत. राजकारण हे आता केवळ वृत्तपत्रांपुरतेच मर्यादित राहिले नव्हते. ते दैनंदिन जीवनातही प्रविष्ट झाले होते.

कमाल थोडा मोठा झाला आणि आपण हिंदी असल्याबद्दल त्याला अभिमान वाटू लागला. या अभिमानामध्ये आपल्या भूतकाळासंबंधीची गौरवभावनाही होती. आम्ही असे होतो, आम्ही तसे होतो ! अशाच अर्थाची व्याख्याने पुढारी लोक देत असत. सेलर्स सुटाऐवजी त्याच्या पाटण्याच्या मामींनी त्याला खादीची शेरवानी शिवली. त्याचे मामेभाऊ दिल्लीच्या जामिया मिलिया या राष्ट्रीय विद्यापीठात शिकत होते. आपल्यालाही दिल्लीला पाठवावे, म्हणून कमालने हट्ट धरला. परंतु त्याचे कोणी ऐकले नाही. तरीपण 'कर्नल ब्राउन्स स्कूल' आणि लामार्तिनेर येथील इंग्रज मुलांच्या तुलनेने तो हिंदुस्थानी होता आणि हिंदुस्थान ही त्याची प्रिय मातृभूमी होती.

हा हिंदुस्थान काय होता, कसा होता याविषयी त्याने आपल्या मनाशी जाणीवपूर्वक कधी विश्लेषण केले नाही. जेथे तो जन्मला होता, जेथे त्याचे पूर्वज गेल्या सात आठशे वर्षांपासून जन्म घेत आले होते त्या हिंदुस्थानाची त्याला लहानपणापासून सवय झालेली होती. या हिंदुस्थानात मोहरीची शेते होती आणि विहिरीवर रहाटगाडगी होती. तेथे शीतळादेवीचे देऊळ होते. त्याचा हिंदुस्थान म्हणजे बस्ती जिल्ह्यातील एक मठ होता. तेथे ओसरीवरील चौरंगावर बी. ए. पास झालेला एक जाडजूड महंत बसलेला होता. त्याला त्याच्या आईने दहा रुपये दक्षिणा म्हणून दिले होते आणि त्याने तिला आशीर्वाद दिला होता. त्याचा हिंदुस्थान म्हणजे इटाव्याचा शेवाळलेला दरगाही होता. त्याच्या गच्चीवर अनेक अवलिये उकिडवे बसलेले असत. त्यांच्यापैकी एकाने कमालाला बटवलची संत्री खायला दिली होती. त्याचा हिंदुस्थान म्हणजे मिर्झापूरच्या स्टेशनवर पिवळे लुगडे नेसून कमालासाठी मातीची खेळणी घेऊन आलेली कदीर ड्रायव्हराची म्हातारी आई होती. त्याचा हिंदुस्थान म्हणजे संध्याकाळच्या वेळी साहेबांच्या कुत्र्यांना फिरावयास घेऊन जाणारे त्यांचे 'डॉग बॉईज' ज्या रस्त्यानी जात ते सिव्हिल लाइन्समधील रस्ते होते. याखेरीज कमालाची आई, मावश्या व घरातील इतर बायका याही हिंदुस्थानीच होत्या. त्या आपसात बोलत असत ती उर्दू, तिच्यातील वाक्प्रचार, गाणी, रीतिरिवाज, घरच्या दासींकडून ऐकावयास मिळणाऱ्या कहाण्या—"अयोध्येचा राजा दशरथ याला दोन राण्या होत्या. एकीचं नाव कैकयी नि दुसरीचं कौसल्या."—हिंदू पुराणातील आणि दैत्यांच्या व राक्षसांच्या गोष्टी, मुसलमान साधूंच्या कथा, मोंगल बादशाहांच्या गोष्टी, या सर्वांनी कमालाची मानसिक पार्श्वभूमी तयार केली होती. भूतकाळाविषयी अभिमान, वर्तमानकाळाविषयी विषाद व भविष्यकाळाविषयी आशा या तीन गोष्टींनी त्याचा मनःपिंड तयार केला होता. केवळ एक पंचा नेसून फिरणारे गांधी, देशातील कबीर, तुलसीदास व तुकाराम यांच्या परंपरेच्या कसोटीला उतरत होते. फक्त पंचा नेसून अर्धनग्न स्थितीत वावरणाऱ्या

भारतीय किसानांचा ते प्रत्यक्ष अवतारच होते. ज्या नेहरूंच्या अंतःकरणात या अनंत सागराच्या लाटा उसळत होत्या ते या नव्या पिढीचे प्रतीक होते.

या हिंदुस्थानात असंख्य रहस्ये होती—धर्म, तत्त्वज्ञान, कला, साक्षात्कार, सूफी साहित्य, संगीत...येथे काय नव्हते? एका बाजूला ही महान सामर्थ्यशाली ठेव होती तर दुसऱ्या बाजूला इंग्रजी संस्कृती होती. साहेबांचे राज्य होते. असेंब्लीचे कायदे होते. गव्हर्नरांचे दरबार होते. 'गुलफिशॉं' मध्ये मेजवान्या झोडण्यासाठी येणारे इंग्रज अधिकारी होते. त्यांच्या गोलागंजमधील हवेलीत बसून ते ताबुतांची मिरवणूक पाहात असत. हे इंग्रज हॅलीबरीच्या अधिकाऱ्यांचे वारसदार होते. त्यांना असे शिकविण्यात आले होते की, हे हिंदी लोक जेव्हा तुम्हांला सलाम करण्यासाठी तुमच्या बंगल्यावर येतील तेव्हा त्यांना व्हरांड्यातच बसवून ठेवा. त्याचबरोबर त्यांपैकी कोणाला दिवाणखान्यात प्रवेश करण्याचा सन्मान द्यावा, कोणाला उभ्याउभ्याच भेटीची हाली घेऊन परत पाठवावे, कुणाच्या घरी, निमंत्रण मिळाल्यावर, स्वतः जावे वगैरे गोष्टीही त्यांना शिकविण्यात आल्या होत्या. ज्या वर्गातील लोकांना इंग्रजांशी बरोबरीच्या नात्याने भेटण्याचा गौरव प्राप्त झालेला होता अशा भाग्यवान वर्गात कमालाचा जन्म झालेला होता—भारतातील सरंजामदारांचा वर्ग!

इ. स. १९३४ साली पंडित नेहरूंनी अशी गोड आशा व्यक्त केली होती की मुस्लिम राजकारणावर सरंजामशाहीचा पगडा असला आणि मुसलमानांतील कनिष्ठ मध्यम वर्ग औद्योगिक दृष्टया मागासलेला असला तरी त्यांच्यामध्ये सामाजिक संबंधांची जाणीव अधिक प्रबळ असल्यामुळे हे लोक कनिष्ठमध्यमवर्गीय हिंदूंच्या मानाने समाजवादाच्या दिशेने अधिक झपाट्याने प्रगती करतील. पंडित नेहरू असेही म्हणत असत की आमचे भांडवलदार, उद्योगपती व गिरणीमालक हे अत्यंत प्रतिगामी आहेत. ते अजून नव्या युगाचे भांडवलदारही झालेले नाहीत. कॉंग्रेसवर हिंदू बहुमताचा पगडा आहे आणि बहुसंख्य हिंदू जातीयवादाच्या आहारी गेलेले आहेत. अशा स्थितीत मुसलमानांमध्ये साशंक वृत्ती निर्माण होणे अपरिहार्य आहे आणि या परिस्थितीचा इंग्रज सरकार आपल्या हितासाठी भरपूर उपयोग करून घेत आहे. सामान्य जनतेला आर्थिक स्वातंत्र्य मिळावे अशी देशातील सरंजामदारांची मुळीच इच्छा नाही. म्हणून त्यांनी ब्रिटिश सरकारशी संगनमत केले आहे. मध्यम वर्गातील बुद्धिजीवी लोकांमध्ये फॅसिझमचा विचार बळावत आहे. या सर्व संकटांना तोंड देण्यासाठी आपल्याला आपली शक्ती एकवटली पाहिजे. पंडित नेहरू हे मोठे कट्टे समाजवादी होते. कमाल व त्याच्या बरोबरीच्या तरुणांची पिढी पंडित नेहरूंचे पूर्णपणे प्रतिनिधित्व करीत होती.

जहागीरदार, मध्यमवर्गीय पुढारी, बुद्धिवादी व विद्यापीठातील आवेशपूर्ण तरुण

यांच्या जगाव्यतिरिक्त आणखी एक जग होते. तोच खरा भारत होता. हे जग म्हणजे आसाम व दक्षिण भारत येथील चहा-कॉफीचे मळे, आणि कानपूर, मुंबई, कलकत्ता, अहमदाबाद व टाटानगर येथील कारखाने यांमध्ये काम करणाऱ्या मजुरांचे. देशभर विखुरलेल्या लाखो खेड्यांत राहाणाऱ्या शेतकऱ्यांचे व कारागिरांचे जग होते. शेतकऱ्यांच्या बाबतीत ब्रिटिश सरकारने वेगवेगळ्या प्रांतांत वेगवेगळे धोरण अवलंबिले होते. ज्या बंगालमध्ये त्यांनी मुसलमानांकडून सत्ता हस्तगत केली होती तेथे मुसलमानांना आर्थिक दृष्ट्या पूर्णपणे उद्ध्वस्त करून त्यांच्या जागी त्यांनी हिंदूंना सामर्थ्यवान केले होते. त्यांनी पंजाब प्रात शिखांकडून घेतला होता. म्हणून तेथे मुसलमानांना त्यांनी हाताशी धरले. जे प्रांत सर्वात जास्त काळ इंग्रजांच्या ताब्यात होते त्यांची सर्वात अधिक दुर्दशा झाली होती—बंगाल, बिहार, ओरिसा, मद्रास. बंगालमध्ये सारखे दुष्काळ पडत. पंजाब सर्वात शेवटी इंग्रजी अंमलाखाली आला होता त्यामुळे तो सर्वात अधिक सुखी व संपन्न प्रांत होता. संयुक्त प्रांतातील शेतकरी सर्वात अधिक दरिद्री होता. हा शेतकरी कॉंग्रेसच्या चळवळीकडे आकर्षित होत होता. त्याला वाटत होते की स्वराज्य म्हणजे जमीनविषयक सुधारणा. या सुधारणा घडून आल्या म्हणजे जन्मोजन्मीच्या अत्याचारांतून व कर्जाच्या ओझ्याखालून आपली सुटका होईल, अशी आशा तो बाळगून होता.

साम्यवादी हा एक नवीन घटक आता राजकीय रंगभूमीवर आला होता. त्यांच्यापैकी बहुतेकजण युरोपातील विद्यापीठांतून शिक्षण घेतलेले बुद्धिजीवी होते.

कमाल लामार्तिनेरमध्ये शिकत होता. इतक्यात १९३७ साली लखनौमध्ये महत्त्वाच्या घटना घडल्या. मुस्लिम लीगचे अखिल भारतीय अधिवेशन आणि कॉंग्रेस मंत्रिमंडळाची स्थापना. ७ ऑगस्ट १९४२ रोजी 'भारत छोडो' ठराव पास झाला. देशात बंड उभारले गेले. विद्यापीठांतील विद्यार्थी या आंदोलनात अग्रभागी होते. सरकारी गोळीबारात दहा हजार भारतीय ठार झाले.

आता बंगालमध्ये प्रलय कोसळला. चौतीस लाख माणसे आतापर्यंत उपासमारीने मेली होती.

चौतीस लाख माणसे—

चौतीस लाख आमीना व अबुल मन्सूर!

दुसऱ्या दिवशी सकाळी कमाल घाईघाईने न्याहारी करून 'दत्त हाऊस'मधून निघाला आणि प्रमोददांच्या घराकडे रवाना झाला.

२७

पार्क सर्कसमधील प्रमोददांच्या घरी अनेक मुले व मुली जमल्या होत्या. कलकत्ता विद्यापीठाचे विद्यार्थी, इप्टाचे कार्यकर्ते, पार्टीचे लोक आणि लखनौहून आलेले सर्वजण तेथे हजर होते.

प्रमोददा कलकत्त्यातील विद्यार्थ्यांचे पुढारी होते. या वेळी त्यांच्या बंगल्यातील मोठ्या दिवाणखान्यात धामधूम दिसत होती. दुष्काळ पीडितांच्या मदतीसाठी निधी जमविण्याकरिता जो कार्यक्रम रंगभूमीवर करावयाचे योजिले होते त्याची रंगीत तालीम चालू होती. कोपऱ्यात वाजाची पेटी होती. एकदोघी जणी रवीन्द्रनाथांच्या 'चित्रांगदा' नाटकातील गाण्याचा सराव करीत होत्या. दिवाणखान्याच्या एका टोकाला काचा लावलेला व्हरांडा होता. तेथे प्रमोददांच्या बहिणीचा स्टूडिओ होता. त्या स्टूडिओत एक तरुण अंगावर पांढरी शाल पांघरून चित्रफलका समोर (ईझल) उभा राहून एका तैलचित्रावरून शेवटचा हात फिरवीत होता. नाटकानंतर हे चित्रही निधीसाठी लिलावाने विकले जावयाचे होते.

सर्वजण आपापल्या कामात मग्न होते.

ब्रश स्वच्छ करून एका बाजूला ठेवून देऊन कपाळावर आलेली झुलपे बाजूला सारीत तो तरुण चित्रकार दिवाणखान्याच्या दरवाजात येऊन उभा राहिला. त्याने दिवाणखान्यातील दृश्यावर एक दृष्टिक्षेप केला. सर्वजण इतक्या तल्लीनतेने आपापल्या कामात व्यग्र असलेले पाहून त्याच्या ओठावर एक प्रकारचे उदास स्मित उमटले.

हा तरुणही संयुक्त प्रांतातील धनिकपुत्र होता. सध्या तो विश्वभारतीत आला होता. अलाहाबाद विद्यापीठातून त्याने एम. ए. व एल. एल. बी. च्या परीक्षा दिल्या होत्या. आपण यापुढे काय करावयाचे यासंबंधी अजून त्याचा निश्चय होत नव्हता. अनेक गोष्टी समोर होत्या : वृत्तपत्रव्यवसाय, राजकारण, "मोठमोठ्या गूढ विषयांवर मी ग्रंथ लिहीन...असे अद्‌भुत दृष्टिकोण प्रस्तुत करीन की जग तोंडात बोटे घालील... कलासमीक्षक होईन..." राजकीय दृष्ट्या विचार करिता हे महाशय पक्के साम्यवादी होते. इतर सर्व वडिलांप्रमाणे यांच्याही वडिलांचा आग्रह यांनी आय. सी. एस. ला बसावे असा होता. ते स्वतः इंग्रज सरकारचे 'नाइट' (सर) होते आणि सर्वोच्च समजले जाणारे बॅरिस्टर होते. परंतु विद्यापीठातील शिक्षण समाप्त झाल्यावर हा आपल्या वडिलांना म्हणाला, "बाबा, मला विश्वभारतीत जायचंय." वडिलांनी रोखून पाहात विचारले, "का रे बाबा? चित्रकार व्हायचं आहे काय? कुठून ही अवदसा आठवली

तुला ?" जगातल्या कोणत्याही बापाने असेच म्हटले असते. परंतु एकुलता एक मुलगा असल्यामुळे वडिलांनी त्याचा हट्ट पुरा केला. आता तो गेल्या दोन वर्षांपासून बोलपूरला शांतिनिकेतनात होता आणि विश्वभारतीच्या इतर विद्यार्थ्यांबरोबर दुष्काळनिवारण निधी जमविण्यासाठी कलकत्त्याला आला होता.

"लखनौहून जी मंडळी आली आहेत त्यांना तू भेटला नाहीस ?" कोणीतरी त्याच्या जवळून जाताना त्याला म्हटले. तो दिवाणखान्याच्या दुसऱ्या टोकाला गेला. तेथे कमाल इतर तरुणांसह जोरजोराने 'पालकी चले, पालकी चले हो...' हे गीत गात होता. तोही नाटकाचाच एक भाग होता. हा तरुण त्याच्या जवळ जाऊन उभा राहिला आणि गाणे संपण्याची वाट पाहू लागला.

सगळीकडे जोरजोरात बंगाली भाषा बोलली जात होती.

कमालाने मान वर करून त्याच्याकडे पाहिले आणि गाणे संपल्यानंतर बाजाची पेटी बंद करीत तो त्याला उद्देशून म्हणाला, "नोमोश्कार!"

"आदाब अर्ज!" त्याने हसून उत्तर दिले.

कमालाच्या जिवात जीव आला. बंगाली बोलता बोलता तो अगदी वैतागून गेला होता.

"गौतम नीलांबर!" त्या तरुणाने आपला परिचय करून दिला.

"कमाल रजा!" उत्तर मिळाले. दोघांनी हस्तांदोलन केले.

दोघांचा पोशाख सारखाच होता. तंग पायजमा, सदरा, नेहरू जाकीट आणि अंगावर काश्मिरी शाल. या दलातील बहुतेक सर्वच तरुणांचा पोषाख असा होता.

"अरे बाबा, तू इथं कुठून अडकलास ? या बंगाल्यांनी बंगाली बोलून बोलून माझं अगदी डोकं उठवलंय. चल, आपण जरा चौरंगीपर्यंत चक्कर मारून येऊ."

"ये, मी तुला माझी चित्रं दाखवतो." अरुणादीदीच्या चित्रशाळेत कमालला घेऊन जात गौतम म्हणाला.

"दोस्ता, तू हरिशंकराला भेटला नाहीस ?" कमालाने विचारले.

"हा हरिशंकर कोण ?" गौतमाने विचारले; आणि बड्या कलावंताच्या रुबाबात सिगारेट ओठांत धरून तो चित्र पूर्ण करू लागला.

"हरिशंकर ? माझा दोस्त आहे. मोठा चुणचुणीत पोरगा आहे."

"कुठं आहे ? बोलाव ना त्याला!" गौतम नबाबी थाटात म्हणाला.

"खुळा की काय तू ? अरे तो इथं नाही, लखनौला आहे. आजारी पडलाय बिचारा."

"तुम्ही सगळे लोक लखनौला का राहाता ?" गौतमाने ब्रश एका बाजूला ठेवून त्याच्याकडे वळून विचारले.

"तर मग कुठं राहायचं?"

"बाकी तेही खरंच म्हणा!"

"तू या चित्राचं नाक चुकीचं रेखाटलं आहेस."

"ओठ रेखाटणं फार अवघड असतं."

"शाबास पठ्ठे! काय पण नंबरी उत्तर आहे. साखळ्या केवढ्याच्या म्हणून विचारलं तर म्हणे डोकं दुखतंय!"

"ही सिगारेट घे!"

"तू चित्रकार आहेस वाटतं!"

"मग, काय हजाम असल्यासारखा दिसतोय?"

"अरेरे! तुझाच उल्लेख केलाय भावोजींनी पत्रात!"

"भावोजी? हे कोण महाशय?"

"आमच्या लाजचे यजमान."

"ही तुझी लाज कोण?"

"कमाल आहे! भावोजी तर तुला ओळखतात."

"मला खूप लोक ओळखतात."

"छान! म्हणजे हाही एक भ्रम उराशी बाळगून आहेस वाटतं?"

"होय! तू एखादा भ्रम उराशी बाळगत नाहीस?"

"बाळगतो खरा,..."

"ठीक आहे!" गौतम चित्र रेखाटण्यात गढून गेला.

"असाच शांतिनिकेतनात चारपाच वर्षे राहिलास तर मोठ्या मिनतवारीनं चित्रकार होशील. सध्या तरी तशी काही आशा दिसत नाही." कमालाने त्याच्या चित्राकडे लक्षपूर्वक पाहात आपले मत व्यक्त केले.

"फक्त चित्रकारच? अरे, माझा तर बंगलोरला जाऊन रामगोपाळाकडून भरत-नाट्यही शिकून घ्यायचा विचार आहे." गौतमाने आणखी एक टोला लगावला.

"हा विचार तर कधीकाळी या सेवकाच्या डोक्यातही घोळत होता. परंतु जेव्हा मी तो सर्वांना सांगितला तेव्हा माझ्या बहिणींची हसून-हसून पुरेवाट झाली. त्यांनी माझा अगदी मामा बनवला. खरं म्हणजे या पोरी शुद्ध 'बोगस' असतात. कला कशाशी खातात हे कळायची अक्कलच त्यांच्यात नसते."

"म्हणजे तुला बहिणीही आहेत तर!"

"होय. तुला बहिणी नाहीत?"

"अंऽहं!"

" फारच दुःखाची गोष्ट आहे. बहिणी असल्या की जीवनात एक शांत, कोमल भावना वावरत असते."

" अस्सं!...मग काय झालं?"

" कशाचं काय?"

" तू सांगत होतास की..."

" तू पार्टीत आहेस?"

" पार्टी?...छेः, अजून माझी लायकी तेवढी झालेली नाही. त्याच्यासाठी स्वतःवर जबरदस्त ताबा मिळवावा लागतो."

" होय. खरं आहे. तसा तू मोठा क्रांतिकारक असशील असंही वाटत नाही." कमाल म्हणाला.

गौतमाने रागाने त्याच्याकडे पाहिले.

" महात्मा गांधींनी तुझ्या गुरुदेवांना काय सांगितलं होतं ते तुला माहीत आहे ना? ते म्हणाले होते, घराला आग लागलीय अन् तुम्ही पक्ष्यांचा कलरव ऐकत बसला आहात." कमाल म्हणाला.

गौतमाने ब्रश झाडून ठेवला. " असं वेडपटासारखं बोलू नकोस. तुझ्या त्या हरिशंकरा-मध्येही तुझ्याइतकाच पोरकटपणा आहे काय रे?"

" तू भैय्यासाहेबांनाही भेट." कमालाने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत म्हटले.

" हे कोण आणखी?"

" ते माझे चुलत बंधू आहेत."

" तेही मोठे लायक गृहस्थ आहेत?"

" होय."

" लखनौलाच असतात?"

" होय, पण सध्या आघाडीवर गेलेत."

" याचा अर्थ असा की लखनौमध्ये एकापेक्षा एक लायक माणसं आहेत..."

" होयच मुळी!"

" बरं चल, आपण आता ग्रँड हॉटेलमध्ये जाऊन जेवण करू." गौतमाने चित्रावर आवरण घालीत म्हटले.

" ग्रँड हॉटेल? तू तर अगदीच बूर्ज्वा दिसतोस!"

" फालतू बडबड करू नकोस."

" ते जाऊ दे. तू मला असं सांग...प्रत्येक बाबतीत माणसानं कसं अगदी स्पष्ट असावं..." कमाल म्हणाला.

"शट !...चालू दे !"

"वर्ग, क्लासेस यांच्याविषयी तुझं काय मत आहे ? येणारं युग हे श्रमजीवीवर्गाचं, प्रोलेतारियतचं युग आहे, हे तुला मान्य आहे काय ?"

"होय."

"दे टाळी !" असे म्हणून कमालाने टाळी दिली.

"सरंजामदार समाज आपल्या मरणानं मरेल असं तुला वाटतं की नाही ?"

"वाटतं !"

त्यांनी पुनः टाळी दिली.

"सरंजामदार समाजाविषयी आपल्याला खरा, मनापासून तिटकारा वाटतो आणि त्या समाजाचं समूळ उच्चाटन केल्याशिवाय आपण स्वस्थ बसणार नाही, याविषयी तुझी स्वतःची खात्री आहे काय ?"

"माझी अगदी पक्की खात्री आहे. पण एवढ्या लंब्याचवड्या गप्पा मारणारा तू स्वतःच सरंजामदार समाजाचा घटक आहेस ना ?"

"तुला कसं समजलं ?" कमाल गडबडून म्हणाला. जणू त्याची फार मोठी चोरी पकडली गेली होती.

"मला कसं समजलं !...नुकतंच कुणीतरी सांगत होतं की मटियाबुरुजात राहणाऱ्या लोकांशी तुझं नातं आहे आणि तू 'दत्त हाउस' मधल्या नबाबसाहेबांचा..."

"हां हां ! असो...जे झालं ते झालं. इतिहासापुढं माझं काय चालणार ? तरीपण आता मात्र आपण त्या वर्गातून बाहेर पडायचं, स्वतःला पूर्णपणे 'डी-क्लास' करायचं, या दृष्टीनं माझा आटोकाट प्रयत्न चालल्लाय."

"तुझा हरिशंकरही सरंजामदार आहे ?"

"आहे खरा; पण तोही बिचारा काय करणार ?"

"छान !" गौतम हसून म्हणाला. "पण मी मात्र पक्का मध्यमवर्गीय आहे." त्याने खुलासा केला.

"त्याबद्दल वाईट वाटून घेऊ नको." कमाल त्याचे सांत्वन करीत म्हणाला. "खरं म्हणजे आता जो नवा समाज जन्माला येऊ घातलाय त्या समाजाचे आपण घटक आहोत—जनतेचा समाज !"

अशा प्रकारची बौद्धिक चर्चा केल्यानंतर ते दोघे बाहेर पडले.

* * *

लखनौला परत गेल्यानंतर कमालने भावोजींना जे पत्र लिहिले त्यात गौतम नीलांबराची अतोनात स्तुती केली होती.

त्याच वर्षी गौतम उन्हाळ्यात लखनौला गेला. त्याने आपल्या मुक्कामाच्या ठिकाणाहून 'गुलफिशाँ'मध्ये फोन केला. तेथे सर्व मंडळी रेडियोस्टेशनवर गेली असल्याचे समजले. आकाशवाणीला फोन केल्यावर तिथल्या माणसाने सांगितले की, "ती सगळी मंडळी नुकतीच सिंघाडेवाली कोठीवर गेली आहेत."

"सिंघाडेवाली कोठी!...काय फडतूस नाव आहे...इथल्या घरांची नावंही विचित्र दिसतात. 'खरबूजेवाली हवेली', 'टरबूजवाला किला', 'गाजर मंजिल', 'मुळा हाउस' अशीही नावं असतील इथं." त्याला हसू आले.

त्याने सिंघाडेवाली कोठीला फोन केला. चंपाने रिसीव्हर उचलला.

"हॅलो!" चंपा म्हणाली.

"हॅलो! आदाब अर्ज! हे पाहा...माझं नाव गौतम...गौतम नीलांबर!' तुम्ही मंडळी तिथून आणखी कुठं जाणार नसाल तर मी तिथं येतो."

"अवश्य या." चंपाने उत्तर दिले.

गौतम सिंघाडेवाली कोठीत गेला. सर्वजण नदीच्या बाजूला असलेल्या व्हरांड्यात बाऊन बसले. तेव्हा गौतमाने विचारले, "तुमच्यापैकी तलअत आरा बेगम कोणत्या?"

"जी, मैं हूँ! फरमाइए!"

"हे पाहा मिस साहिबा, आता कुणी लिहायला बसलं तर त्याची लेखणी थोडीच धरून ठेवता येणार? पण तुम्ही असं केलं नसतं तर फार बरं झालं असतं."

"हे पाहा महाशय, तुम्ही 'इप्टा'च्या वतीनं कलकत्त्यात जी बोगस नाटकं करून दाखवली त्यांची हकीगत मी कमालाकडून ऐकलीय. आता मी तुम्हांला पंधरा मिनटांचा अवधी देते. त्या अवधीत तुम्ही आमच्यावर आपली छाप टाका. तेवढ्याच वेळात आम्हीही तुमच्यावर छाप टाकू. त्यानंतर तुम्ही 'नॉर्मल' व्हा. कारण 'नॉर्मल' असणं नेहमीच चांगलं असतं. ठीक आहे. सुरू करा. आपली छाप टाकायचा प्रयोग होऊ द्या. तुम्ही विश्वभारतीची शोभा वाढवीत आहात असं ऐकलंय. इयंही एकापेक्षा एक सरस कलावंत आहेत—सर्व क्षेत्रातले! ते सारे पाळीपाळीनं, एकामागून एक, आणि सगळे मिळून तुमच्यावर छाप पाडू पाहातील. प्रथम तुम्ही तुमचे राजकीय विचार आमच्यासमोर मांडा. तुम्ही प्रतिगामी तर नाही? किंवा हिंदूमहासभेचे?"

"तुम्ही मुस्लिम लीगी आहात?" गौतमाने प्रतिहल्ला चढविला.

"कमाल भैय्या सांगत होते की तुम्ही प्रति-गुरुदेव बनणार आहात म्हणे!"

"तुम्ही चेलेही बनवता काय?" निर्मलेने विचारले.

"सामान्यतः नाही; परंतु कधी-कधी बनवतो."

"गौतम हे तुमचं टोपणनाव आहे?" तलअतने विचारले.

"अंऽहं! बहराइचच्या पंडितांनी, माझं हेच नाव ठेवलं होतं. आपल्याला गूढ गोष्टी समजतात असा त्यांचा दावा आहे."

"भैय्यासाहेब नाही आले अजून?" कमाल म्हणाला, "आपण इथंच चहाला येऊ असा फोन केला होता त्यांनी."

"भैय्यासाहेब!..." तलअतने घड्याळात पाहून घाईघाईने घोषणा केली. "घोड-स्वारीसाठी गेले होते. आता पोहून परत निघाले असतील."

सर्व जण बसल्याजागी काहीसे चकित झाले.

"हरे राम!...हे कोण गृहस्थ आहेत? कुणी फिल्मस्टार...अशोककुमार वगैरे?..." गौतमाने विचारले.

"मी तुला सांगितलं नव्हतं, भैय्यासाहेबांना तू अवश्य भेटलं पाहिजेस म्हणून?" कमाल म्हणाला.

"अवधच्या जहागीरदारांसंबंधी मला फारशी माहिती नाही. तुम्ही सर्व मंडळी घोड्यावरून रपेट करणं, पोहणं वगैरे गोष्टीच करीत असता काय? खरं म्हणजे इतर सर्व मध्यमवर्गीय लोकांप्रमाणे मीही धनिक वर्गावर पार भाळलोय. महायुद्धापूर्वी मी माझ्या वडिलांबरोबर विलायतेला गेलो होतो. त्यावेळी ब्रिटिश लॉर्ड पाहायला मिळावेत म्हणून मी किती भटकलो! दूरवर एखादा लॉर्ड दिसला की मी त्याच्याजवळ धावून जाई. नंतर समजलं की तिथले 'अंडरटेकर्स' (अंत्येष्टिक्रियेची व्यवस्था करणारे किंवा कबरींची देखभाल करणारे) ही लॉर्डासारखे कपडे घालतात."

"आम्हीही 'अंडरटेकर्स'च आहोत." कमाल म्हणाला.

"आणि, मागल्या जमान्याच्या थडग्यांचे मुजावर किंवा समाधींचे पुजारी आहोत." हरिशंकर म्हणाला.

"परंतु तू आम्हांला पसंत केलंच पाहिजेस." कमाल पुनः म्हणाला. "कारण आमच्या ठिकाणी जे आकर्षण आहे, त्याच्याच आधारावर आम्ही जिवंत आहोत."

"मी तुम्हांला अवश्य पसंत करीन; कारण माझं हृदय फार विशाल आहे." गौतम मोठ्या रुबाबात उत्तरला.

चंपा आता समूहात सामील झाली होती. तिने समूहाच्या नियमांशी तडजोड केली होती. कारण तो समूह स्वतःच एकाएकी होता. आपण किती केविल्वाणेपणाने आधार शोधीत असतो! ज्याप्रमाणे वातावरण हे या साऱ्या नाटकातले एक पात्र होते त्याप्रमाणे समूह हेही एक पात्रच होते. ते कल्पनांचे साकार रूप होते. मानवी संबंध हे मोठ्या नाजूक व गुंतागुंतीच्या पायांवर आधारलेले असतात. हे संबंध सारखे तुटतही असतात. म्हणून तर मीर अनीस या कवीने म्हटले होते की,

**ख़याल–ए–ख़ातिर–ए–अहबाब चाहिए हर दम।**
**'अनीस' ठेस न लग जाये आबगीनों को॥**

[प्रत्येक क्षणी सहकाऱ्यांच्या भावनांची जपणूक केली पाहिजे. या भावना काचेच्या पेल्यांसारख्या असतात. त्यांना धक्का लागता कामा नये.]

आणि मीर तकी 'मीर'ने म्हटले होते,

**ले साँस भी धीरे से कि मुश्किल है बहुत काम।**
**आफाक की इस कारगहे शीशागरी का।**

[जगरूपी या काचेच्या घरात वावरणे फार अवघड आहे. येथे श्वासोच्छ्वासही सावकाश करा.]

सगळीकडे काचेच्या घरांत ठेवलेली काचेची भांडी होती.

सगळा काचेचा मामला होता. कमाल तिला म्हणाला, "चंपाताई, तुम्ही आमचं घर राखा; आम्ही तुमचं घर राखू. आम्ही तुम्हांला कधी एकाकी सोडणार नाही. तुम्ही तुमच्या मनाला थोडी शिस्त लावा. तीच मुद्द्याची गोष्ट आहे. खरी अडचण ही आहे की तुम्ही 'रोमँटिक' आहात."

परंतु जीवनात शिस्तीला वावच कुठे होता? तेथे सगळीकडे इतकी अव्यवस्था, इतकी अंदाधुंदी माजलेली होती! कमाल म्हणाला, "तुम्ही कलावंत असता तर बरं झालं असतं. तुम्ही या अव्यवस्थेला शब्दांच्या रूपांत साकार बनवलं असतं. परंतु तुम्ही लिहीतही नाही किंवा दुसऱ्या एखाद्या मार्गानं स्वतःला अभिव्यक्त करीत नाही. म्हणूनच तुमच्या बाबतीत शिस्त फार महत्त्वाची आहे."

"हे लेखक मोठे समतोल असतात काय?" चंपाने विचारले.

"समतोल नसतील कदाचित, परंतु कलाकृतीच्या निर्मितीच्या प्रक्रियेतून ते आपला स्वर शोधून काढतात....चंपाताई, तुम्ही चित्रंच का काढीत नाही ?"

"तू मला अगदी व्हिक्टोरियन युगातली रोमान्सपूजक समजतो आहेस ! तसं नाही कमाल. ठीक आहे. मी आहे तीच बरी आहे. मी तुम्हा सर्वांच्या बरोबर राहीन. मी तहमीनाबरोबरही राहीन."

"परंतु त्याचबरोबर तुम्ही हेही ठरवून टाका की मन आणि बुद्धी यांचं आपसात काय समीकरण असलं पाहिजे. एवढं तुम्ही ठरवलंत की नाव सुखरूपपणे पैलतीराला लागली म्हणून समजा."

"पुनः तेच !"

"ते असो. तुम्ही प्रयोग करू इच्छिता ? चंपाताई, तुम्ही स्वतःवर प्रयोग करू नका. जगच तुम्हांला इतके धडे शिकवील की डोकं ताळ्यावर येईल."

हिरवळीवर बसल्या-बसल्या किंवा रस्त्याला चालताना हे लोक अशा प्रकारचे दीर्घ वादविवाद करीत.

आता चंपा, तहमीना, निर्मला व तलअत एकत्र वेळ घालवीत. एके दिवशी तहमीना चंपाला म्हणाली, "चल ये, आपण जरा 'प्रौढ' पातळीवर या समस्येचा विचार करू. भैय्यासाहेब डिसेंबरात मद्रासहून येणार आहेत. यंदा तू एम. ए. होशील. मोठमोठी आत्मिक संकटं झेलण्याचा अणि शूर बनण्याचा विचार बाजूला ठेव आणि त्यांच्याशी लग्न कर."

"काहीतरी बरळू नकोस."

"यात बरळण्याचा काय संबंध ?"

"तू स्वतःच त्यांच्याशी लग्न कर ना !"

"मी तुझी पडछाया बनून राहू इच्छित नाही."

"ह्या शुद्ध मूर्खपणा आहे." चंपा म्हणाली.

थोड्या वेळानंतर तहमीना म्हणाली, "शिवाय, भैय्यासाहेब हेच जीवनाचं उद्दिष्ट बनता कामा नये. पुरुषांना इतकं महत्त्व द्यावं, इतकी त्यांची लायकीच नाही."

"ते तर स्पष्टच आहे."

"जीवनाचा आदर्श म्हणजे कम्युनिस्ट पार्टी. होय की नाही ?"

"होय !" चंपाने थोडा वेळ थांबून उत्तर दिले.

तलअत शेजारच्या खोलीत बसली होती. त्यांचे बोलणे तिच्या कानांवर पडले तशी ती मोठी खूष झाली. "खुदाची मेहेरबानी ! या दोघींना अक्कल सुचली." तिने निर्मलेला फोनवर सांगितले. निर्मलेनेही देवाचे आभार मानले.

परंतु भैय्यासाहेब डिसेंबरात लखनौला आले आणि चंपाचे सारे नवे विचार वाऱ्यावर उडून गेले. ती दिवसभर खुषीत वावरू लागली.

याच सुमारास गौतम नीलांबरही आला. त्याला एका इंग्रजी वृत्तपत्रात नोकरी मिळाली.

या लोकांनी एकमेकांच्या सहवासात हा जो काळ घालविला तो त्या सर्वांच्या जीवनातील सर्वश्रेष्ठ काळ होता — असा काळ, जो एकदा गेला की पुनः कधी परत येत नसतो.

# २१

"शांता, ही किती शांत जागा आहे! वृक्षांवर कोकिळा बसल्या आहेत. आंब्याच्या बागा आहेत. त्यांतून एक माळीण पायातले वाळे वाजवीत चालली आहे. मोठमोठ्या प्रतिष्ठित, सेवानिवृत्त कलेक्टरांचे, जमीनदारांचे व बॅरिस्टरांचे बंगले इथं आहेत. छायादार रस्त्यांवर लांब, पिवळी फुलं टप-टप पडतात. रविवारी सकाळी मुली त्यांची छत्र्या हातात घेऊन एकमेकींच्या घरी जातात; आणि हिरवळीवर बसून विणकाम-भरतकाम करतात. अत्यंत 'इंटलेक्चुअल' चर्चा करणं हे यांचं वैशिष्ट्य असतं. जीवनात सर्वत्र टापटीप आणि नाजुकपणा आहे. खोल्यांना उंच, मोठे दरवाजे आहेत आणि त्या दारांवर जाळीदार पडदे आहेत. रुंद पायऱ्या, उंच जोते, सभोवती हिरवळ. जणू हिरवळीच्या समुद्रावर हे बंगले तरंगत असतात. छतांना महिरपी आहेत. छतांवर लहान-लहान इटॅलियन पद्धतीचे खांब असलेल्या जाळीदार खिडक्या आहेत. अशी घरं या प्रांतात सगळीकडे पसरलेली आहेत. याचा पाया किती पक्का आणि मजबूत असेल! व्हरांड्यांच्या पायऱ्यांवर एके काळी पंखा हलविणारे नोकर डुलक्या घेत असतील. ज्या बहराइचमध्ये माझा जन्म झाला तिथलं माझं घरही अगदी असंच आहे. पाहा, मी घरांच्या गोष्टीतच दंग झालो. शांता, तपशिलानं प्रभावित होणं आणि त्यातच गढून जाणं, हा माझा स्वभाव आहे. मला त्या स्वभावाचा अगदी वैताग आलाय. पण करणार काय? आता माणसांनी ही घरं बांधली आहेत. त्यांच्याकडे लक्ष जाणारच. अन् त्यांची नावं तरी किती चित्र-विचित्र!

"नावंही मोठी विचित्र असतात. उदाहरणार्थ चंपा बेगम! चांगलं नाव आहे नाही? आहे की नाही तूच सांग शांता. हे पाहा, तू इतक्या दूर आहेस, पण मला असं वाटतं की प्रत्येक गोष्ट तू माझ्या डोळ्यांनी पाहावीस. शांता, पुष्कळ दिवसांत तू मला दटावलंही नाहीस. तुझ्या ठिकाणी जी एक आई लपलेली आहे तिलाच मी आवाहन

करीत नाही काय? शांता, तू इथं असतीस आणि या सर्वांना भेटली असतीस तर किती छान झालं असतं.

"मजेची गोष्ट अशी की मला एक प्रकारे अनौपचारिक—अन् ऑफीशियल—वर-संशोधनासाठी बोलवण्यात आलं होतं. निर्मलाबाईंनी नेहमीच्या परंपरेत वाढलेल्या मुलींप्रमाणे थोडंफार लाजून, हार्मोनियमवर गाऊन दाखवण्याऐवजी मुळीच न लाजता साफ नाही म्हणून सांगितलं. त्यांचे आईवडील माझ्याशी त्यांचं लग्न जमवू पाहात आहेत. हेही बहुधा त्यांना माहीत नसावं. ते कसंही असो. तिनं माझ्यामध्ये कसलीच रुची दाखविली नाही. बाकी तिला गप्पागोष्टींतून सवडच कुठं मिळतीय म्हणा. तिचा भावी कार्यक्रम फारच प्रचंड आहे—ती केंब्रिजला जाणार, तिथं डॉक्टरेट करणार. निर्मल आणि तलअत दोघीही मोठ्या हुशार आणि चुणचुणीत पोरी आहेत. देव त्यांच्यापासून रक्षण करो. सारख्या गुरकावत असतात..."

"झालं लिहून भाषण?"

निर्मलेने व्हरांड्याच्या जाळीवरून डोकावून पाहात विचारले.

"लिहितोय."

"पाहू द्या!"

"बापरे!...खरं सांगू? मी भाषण लिहीत नव्हतो. एक तातडीचं पत्र लिहायचं होतं. ते लिहीत होतो."

"ही काय पत्र लिहायची वेळ आहे? मी म्हणते..."

दिवाणखान्यात सर्वांनी मिळून एक कव्वाली गाण्यास सुरुवात केली होती.

"चला, कवाली गायला बसा." निर्मलेने दुसरा हुकूम सोडला.

जणू सिंघाडेवाली कोठीत येऊन कव्वाली गाणे ही इतकी गंभीर अत्यावश्यक गोष्ट होती! त्याने निर्मलकडे उदास नजरेने पाहिले. खुळी पोरगी! किती खूष आहे!

त्याने मान वर करून पाहिले. पोर्चच्या पायऱ्यांवर भैय्यासाहेब उभे असलेले त्याला दिसले. ते गोंधळून गेल्यासारखे स्मित करीत होते. त्यांचे स्वागत करण्यासाठी सर्वजण व्हरांड्यात गोळा झाले.

"बरेच नर्व्हस-टाइपचे गृहस्थ दिसतात." गौतम हळूच म्हणाला.

"मुलींना घाबरतात बिचारे! फार सज्जन आहेत." निर्मलेने सांगितले.

"ते सज्जन आहेत, आणि आम्ही सगळे लफंगे आहोत की काय? छान!" हरिशंकराने आपला विरोध नोंदवला.

"त्यांच्या अचेतन मनात, अंतर्मनात काही तरी गुंतागुंत असावी." गौतमाने आणखी एक शेरा मारला. हरिशंकराने त्याला मूठ वळवून बुक्कीची खूण केली.

भैय्यासाहेब वर पाहात चंपाजवळ गेले. चंपा खुर्चीवरून उठली आणि जमिनीवर बसून त्यांच्यासाठी चहा तयार करू लागली.

" ही भानगडही आहे वाटतं ! " गौतमाने अकस्मात वैतागून प्रथमच गंभीरपणे म्हटले.

" भैय्यासाहेब नाचतात फार छान. " निर्मलेने प्रसंग निभावून नेण्यासाठी सांगितले. ते तिघेही इतर लोकांपासून दूर जाऊन व्हरांड्याच्या पायऱ्यांवर बसले होते.

" लोकनृत्य की अभिजात ? " गौतमाने उत्सुकतेने विचारले.

" ओल्ड वाल्ज (चक्रनृत्य) करण्यात प्रवीण आहेत. " निर्मलेने निर्जीव स्वरात सांगितले.

दिवाणखान्यात कसली तरी चर्चा सुरू झाली होती. हरिशंकर जोरजोरात बोलत होता.

" शि: ! कसली बडबड करता तुम्ही लोक. " गौतम म्हणाला.

" जीवन अनेक युगांत विखुरलेलं आहे... " कमालाने मुक्ताफळे उधळली.

" छान !... म्हणजे काय ? "

" हे केवळ बडबडण्याचं युग आहे. "

" तर मग काही तरी करून दाखवायचं, काही निर्माण करण्याचं युग केव्हा येणार ? "

" बाबा रे, जगाच्या प्रारंभापासून......पैगंबर, प्रेषित, तत्त्वज्ञ आणि विचारवंत यांनी विचार व्यक्त केले नसते तर आज जगाच्या ग्रंथालयांत गाढवं लोळताना दिसली असती. आम्ही बोलतो आहोत आणि तू ऐकतो आहेस, ही देवाची कृपा समज. असा एक काळ येणार आहे जेव्हा आमचा आवाज ऐकायला मिळावा म्हणून तुमचे कान तळमळतील. " कमाल म्हणाला.

" काळ सर्वनाशक आहे, हे तू मान्य करतोस ? " गौतमाने विचारले.

" होय ! " कमाल उत्तरला.

सूर्य नदीत बुडत होता आणि छतरमंजिलचे सोनेरी घुमट त्या प्रकाशात नारंगी रंगाचे दिसत होते. समोर एक नाव लाटांवर तरंगत संथपणे पुढे चालली होती.

" प्रतीकं गूढतेनं भरलेली असतात, हे तुला मान्य आहे ? " गौतमाने अकस्मात कमालाला विचारले.

" होय ! "

" ही जी नाव समोरून चाललीय ते एक प्रतीक आहे. त्यात मोठं रहस्य भरलेलं आहे. " गौतम अत्यंत सामान्य गोष्टही अत्यंत नाट्यपूर्ण व दार्शनिक ढंगात मांडीत असे. त्याची ती लकब लोकांना फार आवडे. हरिशंकरही त्याच्या जवळ येऊन बसला.

ते नदीच्या पात्रापर्यंत जाणाऱ्या पायऱ्यांवर जाऊन उभे राहिले.

"नदी हा प्रवाहशील काळ आहे. दगड हे कालरहित अस्तित्वाचं—'टाइमलेस विकम'चं प्रतीक आहे. दगड हे काळाचं सघन रूप आहे. आणि या साऱ्या जगाचा अंत उंदराच्या मृत्यूप्रमाणे अटळ आहे—आणि तसाच महत्त्वहीनही! वेदान्तात असं लिहिलंय की..."

"ही नदी म्हणजे आपल्या जीवनाचं प्रतीक आहे..." हरिशंकर उद्‌गारला. "मी नद्यांवर फिदा आहे. तू नद्यांवर फिदा आहेस?" त्याने कमालाकडे वळून अत्यंत गंभीर स्वरात विचारले.

"होय!"

"मी नदीत बुडून मरणार आहे." गौतमाने आणखी एक जाहीर घोषणा केली.

"गौतम, तू काय पेटी-बूर्झ्वा रोमान्सपूजक बनत चालला आहेस?" त्याच्या बरळ येऊन उकिडवे बसत तलअतने व्याकुळ स्वरात विचारले.

"छेः छेः!" तो दचकून म्हणाला, "ही काळाची जादूगिरी आहे, तलअत आरा बेगम!" हवेत बोट फिरवीत तो पुढे म्हणाला. "काळाच्या सामर्थ्याची तुला कल्पना नाही."

पुलाच्या पलीकडून दूर अंतरावरून नौबतीचा आवाज ऐकू आला. सायंकाळच्या निःस्तब्धतेत ते निःशब्दपणे तो आवाज ऐकत राहिले.

"चला, आपण भुतं शोधू या!"

"चला!"

ते चौघेही हिरवळीवर परत आले.

"चंपाबेगम, भैय्यासाहेब, अप्पी—" गौतमाने अत्यंत अदबीने वाकून त्यांना म्हटले, "चला, आपण सर्वजण मिळून भुतांना शोधू या."

ते न बोलता मोटारीकडे गेले.

सर्वत्र संधिप्रकाश पसरला होता. मोटार आता लाकडी पुलावरून चालली होती.

"रस्त्याचं एक वळण असं असतं की तिथून माणूस कधी परत येत नाही." आमिर रजा स्वतःशी उद्‌गारले.

कमालाने मोटार थांबविली. "या, आपण जरा लाटा मोजू." ते पुलाच्या उंच कठड्यावरून वाकून पाहू लागले.

खालच्या बाजूने नदीच्या लाटांवरून रंगीबेरंगी नावांची एक मिरवणूक चालली होती. त्यांत बसलेल्या लोकांनी चित्रविचित्र कपडे घातलेले होते. झोकदार फेटे, दागदागिने, माळा, मलमलीचे दुपट्टे, भारी किमतीचे पायजमे. त्यांच्या अंगावरील जडजवाहिराने नदीचे पाणी चकाकले.

त्या नावांतील लोकांनी या लोकांना हातांनी खुणा करून बोलवायला सुरुवात केली. ते काय म्हणत होते ते या लोकांना समजत नव्हते. पक्ष्यांच्या किलबिलाटाप्रमाणे सुरेल, अस्पष्ट, सारंगीच्या स्वरासारखा तीव्र व भीतीदायक असा तो आवाज वाटत होता. नदीच्या काठावर कुत्री आणि कोल्ही ओरडत होती. स्मशानातील जळत्या लाकडांचा चट्चट् असा आवाज ऐकू येत होता. कब्रस्तानात शवपेट्या बनविण्यासाठी करवतीने फळ्या कापल्या जात होत्या.

"चला, पळा इथून! पुढं जाऊ या आपण." चंपा म्हणाली. तिला वाटले, आपला आवाज जणू खोल पाण्यातून येत आहे.

"या आवाजांना घाबरून कुठं पळून जाणार? हे शेवटचे आवाज आहेत." गौतम उत्तरला. लाकडे चटपटली.

"मला चक्कर येतीय. मला भुतांपासून वाचवा." असे म्हणून आमिर रजा यांनी पुलाच्या कठड्यावर डोके टेकवले. चंपा त्यांच्याजवळ उभी होती.

"देखण्या पुरुषा, तुझं मन मला कळलं असतं तर किती बरं झालं असतं."

"ते तुला कळायचं नाही. मला कुणीच जाणणार नाही." आमिर रजा उद्गारले.

पुन: एक धक्का घेऊन मोटार सुरू झाली. कँमाल गाऊ लागला. चांदणे एकदम फाकले. त्यामुळे त्या सर्वांचे चेहरे धुतल्यासारखे उजळ दिसू लागले.

"पूल! जिकडे तिकडे पूल बनविलेत." गौतम रागाने पुटपुटला.

ते शिकंदरबागेच्या सडकेवर पोहोचले. जवळून एक हत्ती डुलतडुलत गेला. त्या हत्तीवर अवधचे बादशाह गाजीउद्दीन हैदर बसलेले होते. चंपाने बारकाईने त्यांच्याकडे पाहिले. तिला ते अगदीच विदूषकासारखे दिसले.

"त्यांना निदान 'हाउ डू यू डू' तरी करा!"

"हे तर मोठे इंग्रज म्हणून मशहूर आहेत. कसा विलायती बादशाहासारखा जामानिमा केलाय पाहा तर खरे!" कमाल म्हणाला.

शाहे जमन अंबारीत मान खाली घालून बसून राहिले. मोटार पुढे गेली. सगळे गप्प होते. गौतम आपला पाइप तळहातावर आपटीत स्वत:शी म्हणाला, "हे लोक कसला विचार करताहेत हे जर कुणी मला सांगेल तर मी त्याला खूप मोठं बक्षीस देईन." चंपा पुन: स्वत:शी म्हणाली, "या लोकांबरोबर मी तासन्तास वादविवाद केले परंतु या लोकांना काय हवंय याचा मात्र मला कधीच थांगपत्ता लागला नाही. समुदायाची सोबत निरर्थक आहे. एकांत हे वास्तविक सत्य आहे."

कमालाने अकस्मात मोटार थांबविली. समोर लामार्तिनेर कॉलेज होते.

"इथं मला त्यांनी काय-काय शिकवलं नाही?" कमाल, आमिर रजा आणि

हरिशंकर बोटे नाचवीत एका स्वरात उद्गारले. नंतर त्यांनी मागे वळून गौतमाला विचारले, "तू इतकं कशाला शिकतोस ?"

"यांना लागलंय खूळ ! यांच्याशी बोलण्यात काही अर्थ नाही." तलअत म्हणाली गौतम गप्प राहिला.

सर्वजण मोटारीतून उतरून इमारतीजवळ गेले; आणि खिडक्यांतून आत डोकावू लागले. खोल्यांमध्ये काळोख व सामसूम होती. सकाळी येथे पुनः वर्ग भरतील. भिंतीवर जोफनीने रेखाटलेले जनरल मार्टिनच्या हिंदी बेगमेचे चित्र टांगलेले होते. तलअत खिडकीच्या काचेला नाक लावून उभी राहिली. इतर लोक माना खाली घालून तलावाकडे गेले.

"या, इकडे या, माझ्याकडे !" तलअतने वळून पाहिले. जनरल मार्टिनची हिंदी बेगम तळ्याच्या काठावर उभी होती. तिने खूण करून त्यांना पुनः बोलावले.

"माझ्याशी बोला ना !" ती म्हणाली, "माझ्याशी कुणी बोलतच नाही. दिवसभर इथं इतका कोलाहल चाललेला असतो ! पुस्तके वाचली जातात, व्याख्याने दिली जातात. कुणी माझ्याकडे वळून पाहातही नाही." ती स्फुंदून-स्फुंदून रडू लागली. तलअत गडबडली. तिला कसे उगी करावे हे तिला कळेना. "हे पाहा, माझं ऐका !" तिला समजावण्याचा प्रयत्न करीत तलअत म्हणाली, "तू अनंताच्या बिंदूवर आपलं लक्ष केंद्रित कर. काळाचे वेगवेगळे तुकडे म्हणजे खरोखरी......"

"तू आम्हांला असं वचन दे की, 'यापुढं मी कधीही शिकणार नाही'." कमाल जोरजोरात गौतमाला सांगत होता.

"इथून आमचा एक इंग्रज प्रोफेसर पुस्तकं टाकून हिमालयात पळून गेला होता. तो अजून जिवंत आहे की एखाद्या वाघानं त्याला खाऊन टाकलं, कोण जाणे. पक्ष्यांनी त्याच्या दाढीत घरटी बांधली असतील किंवा एखाद्या गुहेत बसून तो नारदमुनींचं संगीत ऐकत असेल." हरिशंकर म्हणाला.

"ॐ... ॐ... ॐ !" असा ओंकारनाद वातावरणात दुमदुमला. सारे वातावरण थरारले. "हरी ! हरी !" ते तलाव मागे टाकून लाल मुरुम पसरलेल्या रस्त्यावरून चालू लागले. चंपाने हात पुढे करून एका फुलांच्या फांदीला स्पर्श केला. एक पान गळून रस्त्यावर येऊन पडले.

"या पानाच्या गळण्यात श्रीविष्णू लपलेले आहेत. हरी ! हरी !" चंपा पुनः म्हणाली.

तळघरात जनरल मार्टिन विश्रांती घेत पहुडला आहे. त्याच्यावरून सारे जग पुढे चालले आहे.

ग्रंथालयाच्या छतावरून एक एकाकी चंडोल पक्षी उडून निघून गेला. ग्रंथांतील शब्द मिरवणुकी, तांडे बनवून गटागटांनी सर्वत्र विखुरले—लॅटिन, फ्रेंच, इंग्लिश, अर्थहीन शब्द! त्यांचे अर्थ आग्यावेताळाप्रमाणे वेडावून दाखवीत होते. पुष्कळसे शब्द गच्चीवर ठेवलेल्या तोफेवर चढून बसले आणि आपले काटकुळे, काळे पाय हलवू लागले. तोफेने गर्जून माहिती दिली. "माझं नाव 'लॉर्ड कॉर्नवॉलिस' असं ठेवण्यात आलं होतं; आणि श्रीरंगपट्टणाच्या लढाईत माझा वापर करण्यात आला होता." गच्चीवर बसलेले दगडी वाघ आणि कठड्यावर ठेवण्यात आलेल्या मूर्ती जास्तच जोराने खदखदून हसू लागल्या. तलअतला काही तरी आठवले आणि ती खळखळून हसली. "चला, आपण 'दिलकुशा'त जाऊ." झोपी गेलेल्या सुगंधित रस्त्यांनी ते 'दिलकुशा'कडे निघाले.

मध्येच गडप झालेला कमाल थोड्या वेळाने त्यांना येऊन मिळाला. आता ते 'दिलकुशा'च्या फाटकात येऊन पोहोचले होते.

"अरे, तू कुठं गुप्त झाला होतास?" गौतमाने रागाने विचारले.

"मी असं ऐकलं होतं की बादशाह गाजीउद्दीन हैदर यांच्याकडे वसंत ऋतूचा सण मोठ्या थाटात साजरा केला जातो. तोच पाहायला मी गेलो होतो. फरहबक्षमध्ये अद्भुत दृश्य पाहायला मिळालं. दिवाणखान्याच्या एका कोपऱ्यात एक इंग्रज तिपाईवर बसून बॅगपाइप वाजवत होता. त्यानंतर रजबअली फजलअली कव्वाल यानं वसंत रागातला ख्याल सुरू केला. व्हरांड्यात इंग्रजी बॅंड वाजत होता. त्यानंतर लंडनच्या बादशाहाच्या आरोग्यासाठी मद्याचे प्याले रिकामे करण्यात आले. बादशाह गाजीउद्दीन हैदर यांना एंजिनीरिंगचा षोक आहे. कुठून-कुठून कसली कसली यंत्रं त्यांनी जमवली आहेत.

रॉबर्ट होम तसबीर रेखाटत बसला होता. बिशप हेबरही तिथं होते. मला पाहाताच एकदम धर्मोपदेशाचा धडाका त्यांनी सुरू केला. बादशाह जिन्याच्या शेवटच्या पायरीवर उभे राहून इंग्रज पाहुण्यांचे स्वागत करीत होते. नंतर ते त्या सर्वांना आपल्या पिक्चर-गॅलरीत घेऊन गेले. जेवण मेजावर होतं; आणि तेही अगदी शुद्ध इंग्रजी पद्धतीचं. दरबारात इंग्रजीपणा फारच वाढलाय, बुवा! माझा तर जीव कासावीस झाला. नंतर जेव्हा मी फरहबक्षातून परत यायला निघालो तो रस्त्यातच रेसिडेंटसाहेब बहादुर गोंडेदार पगडी, शिरपेच, कानांत कुंडलं अशा अगदी खास हिंदी पोशाखात, झालरदार पालखीत बसून चालले असल्याचं मला दिसलं. मी त्यांना विचारलं, 'कुठं चाललीय स्वारी?' ते म्हणाले, 'बादशाहांचा राज्याभिषेक आहे. त्याच्या मिरवणुकीत सामील व्हायचंय.' मी विचारलं, 'कोणत्या बादशाहांचा? एकाच्या दरबारातून तर मी नुकताच येतो आहे.' ते म्हणाले, 'ते तर कधीच मेले. त्यांचे चिरंजीव नसीरुद्दीन हैदर आता

गादीवर बसले आहेत.' अजब तमाशा आहे. यार हरिशंकर, हे बादशाह लोक मरतही, नाही?" आणि तो गप्प बसला.

आता ते सगळे 'दिलकुशा' च्या बागेत जाऊन दाखल झाले होते. पौर्णिमेचे चांदणे सगळीकडे सूं सूं करीत होते. एका पिवळ्या रंगाच्या बंगल्याच्या मागे १८५७ साली या ठिकाणी मारल्या गेलेल्या इंग्रज सैनिकांची थडगी होती. त्यांनी झाडांझुडपांतून जाऊन त्या थडग्यांवर लावलेल्या नावांच्या संगमरवरी पाट्या वाचल्या. 'लेफ्टनंट पॉल, फोर्थ पंजाब रायफल्स', 'कॅप्टन मॅक्डोनल्ड, ९३ हायलंडर्स', 'लेफ्टनंट चार्ली डॅशवुड...'

"हॅलो! हाउ डू यू डू?" त्या तिघांनी समोर येऊन खुषीने हस्तांदोलन करण्यासाठी आपले हात पुढे केले.

"हॅलो चार्ली! घे, पाइप ओढ." गौतमाने त्याला तंबाखू देऊ केला.

नंतर नबाब कुदसिया महल चमेलीच्या ताटव्यातून बाहेर आली आणि म्हणाली, "मला जर कुणी मनःशांती मिळवून देईल तर मी त्याला माझं सगळं राज्य देऊन टाकीन."

"माझ्या मनात नेहमी असा विचार येतो की तू विष का खाल्लं असावंस?" चंपाने एखाद्या कॉलेज-मैत्रिणीशी गप्पा मारण्यात इतक्या सहजपणाने नबाब कुदसिया महलशी बोलण्यास सुरुवात केली. सगळ्या मुली एकमेकींना ओळखतात. चोवीस वर्षांची स्वरूपसुंदरी अवधची राणी नाजूकपणे आपली सलवार सावरीत एका दगडावर बसली. इतर मंडळी फिरत फिरत दिलकुशा महालाच्या भग्नावशेषांकडे गेली.

"एके दिवशी इथं एक फ्रेंच गृहस्थ आपला प्रचंड फुगा (बलून) उडविण्यासाठी आला होता. किती गर्दी जमली होती! माझे सासरे शाहे जमनही ती गंमत पाहायला आले होते. काय मजा आली म्हणून सांगू! तो फ्रेंच गृहस्थ फुग्यात बसून जो उडाला तो शहराच्या बाहेर बारा मैलांवर असलेल्या कबुतरांच्या चौकींवर जाऊन उतरला. तू कधी फुग्यात बसली आहेस?" राणीने चंपाला विचारले.

"नाही! पण तू विष का खाल्लं होतंस?" चंपाने पुनः तोच प्रश्न विचारला. परंतु राणी त्या प्रश्नाचे उत्तर देण्याची टाळाटाळ करू लागली. ती आपल्या बोटातील खड्याच्या आंगठीकडे टक लावून पाहात राहिली.

"तू तर खूपच दानशूर म्हणून प्रसिद्ध होतीस. लखनौच्या गादीवर तुझ्यापेक्षा अधिक दानशूर अन् सहृदय बेगम दुसरी कुणीच होऊन गेली नाही. तू गरिबांना लाखो रुपये वाटलेस. तू मला असं सांग की या साऱ्या औदार्याच्या नि प्रेमाच्या बदल्यात जगानं तुला काय दिलं? खरंच. सांग ना, गडे!" चंपा म्हणाली.

"जिधर देखता हूं उधर तू ही तू है! (जिकडे पाहावं तिकडे केवळ तूच आहेस.)" राणी विमनस्कपणे गुणगुणत होती. "ही माझ्या बादशाहाची काव्यपंक्ती आहे." ती चंपाला उद्देशून म्हणाली.

वसंतातील साऱ्या फुलांचा सुगंध बागेत दरवळत होता. जणू गंध्यांनी अत्तराच्या हजारो बाटल्या तिथे ओतल्या होत्या.

"पावसाळ्याचे दिवस होते. तू दिलकुशा महालात मन रमविण्यासाठी आली होतीस. परंतु बादशाह तुझ्यावर नाराज झाले होते. म्हणून तू सोमल विष खाल्लंस. याचा अर्थ काय, ते मला सांग ना! माणसानं आपल्या प्राणांचं मोल द्यावं, एवढी लायकी पुरुषांमध्ये असते काय? खरं म्हणजे, आपण त्यांची एवढी देखील पर्वा करता कामा नये—नखाएवढीदेखील!" चंपाने बोटावर बोट ठेवीत म्हटले.

कुदसिया महालने यावर काही उत्तर दिले नाही.

"अय्या! ते पाहा, राजा गालिबेजंग इकडे येताहेत. आज पौर्णिमा आहे ना? बादशाहा इथं सहलीला येत असतील. मला पाहिलं तर पुनः रागावतील, बाई! आता मी जाते."

"कुठं जातेस?" चंपाने घाबरून विचारले.

"कुठं नाही. आम्ही सर्वजण इथंच तर आहोत. आम्ही आणि तुम्ही वेगवेगळे थोडेच आहोत? पण आता तूही जा. तुझे या क्षणीचे सहकारी तुला बोलावताहेत."

"चंपाताई! चंपाताई!" रात्रीच्या निःस्तब्धतेत कमालचा आवाज कानांवर आला. ती त्या दगडावरून उठून दिलकुशा महालाकडे गेली. भग्नावशेषाच्या सर्वांत वरच्या पायरीवर सर्वजण बसले होते. आत भग्नावशेषाच्या दिवाणखान्यात बादशाह-ए-अवध नसीरुद्दीन हैदर यांच्या इंग्रज बेगमा मोठमोठ्या झालरदार सावल्या नेसून, तळहातावर गाल टेकवून अत्यंत तल्लीनतेने गिटार ऐकत होत्या. नंतर त्या बेगमांनी सामुदायिक पोल्का नृत्य सुरू केले. ते सगळेच पायऱ्यांवरून उतरून बागेत गेले.

चंपा पुनः एकटी राहिली.

"माद्मोजेल, वूजेत तरीशारमा! माद्मोजेल!!" तिने वळून पाहिले. बादशाह नसीरुद्दीन हैदर यांचा फ्रेंच न्हावी समोर उभा राहून हसत होता. मोठ्या आदबीने त्याने आपला झालरदार रुमाल दगडावर पसरला आणि गुडघे टेकून नम्रतेने म्हणाला "तशरीफ रखिए...बसावं!"

चंपा टक लावून समोर पाहात राहिली.

"माद्मोजेल! तुम्ही स्वतःच्या सौंदर्यावर मनमुराद खुष व्हा. मनमुराद गर्व करा. दुःख करण्यात काही अर्थ नाही. या, मी तुम्हांला मृत स्त्रियांचं गीत ऐकवतो." त्याने एक झंकार करून गिटार वाजवायला सुरुवात केली. "मृत स्त्रियांचे गाणे :

**मला सांगा, लेडी फ्लोरा आणि सौंदर्यवती हायपेशिया आणि**
**ताइस कुठं लपल्या?**
**जिला इंग्रजांनी जाळलं होतं ती जोन कुठं गेली? या सगळयांचं**
**काय झालं?**
**परंतु भूतकाळातील बर्फ कुणी पाहिलंय?**

मादमोजेल! लक्षात ठेवा, सुंदर स्त्रिया दोनदा मरतात. आपल्या सौंदर्याबद्दल गर्व वाटू द्या. संपत्ती, कीर्ती व प्रतिष्ठा यांविषयी गर्व बाळगा. वेळ फार थोडा आहे. फार लौकर हे सारं तुमच्या जवळून निघून जाईल. माझं ऐका. मी पॅरिसचा न्हावी. मी बादशाहांची अशी हजामत केली की चोवीस लाख रुपयांनी माझं घर भरून गेलं. सबंध लखनौवर माझा ताबा होता. बादशाह माझ्या इशाऱ्यावर चालत होते. देशाचा खरा सत्ताधीश मी होतो. आता कुणाला माझं नावही आठवत नाही." इतके बोलून त्याने आपल्या सॅटिनच्या बुटांकडे उदासपणे पाहिले.

चंपा पायऱ्या उतरू लागली.

"आता मी आणखी कुठं तरी जाऊन घिरट्या घालीन. मला परवानगी द्या, माद्-मोजेल!" तो अदबीने वाकून म्हणाला.

ते मोटारीकडे गेले. "चला. आपण 'छत्तरमंजिल'मध्ये जाऊन नृत्य करू या!" कमालाने सूचना मांडली.

ते फाटकातून बाहेर पडून कॅसलस रोडवर आले. किंग गाजीउद्दीन हैदराच्या कालव्या-वरून ते हजरतगंजमध्ये आले. तेथून ते कैसरबागेकडे वळले.

समोर चांदीची बारादरी प्रकाशात चमकत होती.

"अय्या! आज तर इथं वसंताचा मेळावा आहे." तलअत आनंदून उद्गारली.

"सुलताने आलम आज इथं ऑपेराही करणार आहेत, असं दिसतंय." निर्मला म्हणाली, "आत जाऊ या?"

"कसं जायचं? आपल्याला निमंत्रण कुठं आहे?" कमाल चाचरत म्हणाला.

"चला, चला! आपण चोपदारांच्या मागे उभे राहू." शंकर म्हणाला.

ते गुपचूप इमारतीत शिरले. रंगमंचावर राजा इंद्राच्या दरबाराच्या खांबावर चांदी मढविलेली होती. सगळीकडे आरसे चमकत होते.

ते सर्वजण गुडघ्यांवर रांगत रंगमंचाच्या मागे जाऊन उभे राहिले. आता 'पुखराज परी' आपली गझल गाऊ लागली :—

**है जल्वा-ए-तन से दरो-दीवार बसन्ती ।**
**पोशाक जो पहने है मेरा यार बसन्ती ॥**
**क्या फ़स्लेबहारी ने शगूफ़े हैं खिलाये ।**
**माशूक़ हैं फिरते सरे-बाजार बसन्ती ॥**

[या शरीराच्या तेजामुळे सर्वत्र वसंत फुलला आहे. माझ्या प्रियकराने वसंत ऋतूचा पिवळा पोशाख परिधान केला आहे. या उत्फुल्ल वसंताने काय बहार उडवून दिली आहे! वसंतऋतूचे प्रेमिक भर बाजारातून हिंडत आहेत.]

दिवाणखाना 'वाह! वाह'च्या आवाजाने दुमदुमला. ते सर्वजण हळूच तेथून निघून एका दरवाजात आले.

'पुखराज परी' गात होती :—

**मोती कानों में नहीं यार की ज़ुल्फों के करीं ।**
**झाले भादों के वो हैं और ये घटा सावनकी ॥**

[ते जे मोती दिसतात ते प्रियकराच्या कानांतील नसून त्याच्या केसांच्या बटांत आहेत. ते मोती म्हणजे माद्रपदातले टपोरे पावसाचे थेंब आहेत; आणि कपाळावर आलेले केस म्हणजे श्रावणातले काळे मेघ आहेत.]

'इंदर सभा'ची संगीतिका चालत राहिली. ही मंडळी गर्दीत मिसळून इकडे-तिकडे फिरू लागली. ते लोक झरोक्यातून डोकावून पाहात असल्याचे लक्षात येताच रंगमंचावर जाण्याची तयारी करीत रंगपटात उभी असलेली सब्जपरी घाबरून 'काळ्या दैत्या'ला म्हणाली, "हे पाहा, भविष्यकाळातली भुतं आपल्याकडे टक लावून बघताहेत."

'काळा दैत्य' खदखदून हसला. तो म्हणाला, "काहीतरीच काय बरळतेस? कुठली भुतं?"

कमालाने एका चोपदाराला विचारले, "'सब्ज परी' कोण आहे?"

"अरे, तुम्ही ओळखत नाही तिला खुदावंत? ती तर चंपाबाई! शाहे जमन गाझी उद्दीन हैदर यांच्या काळापासून तिची चढती कमान आहे. चाळिशीच्या घरात आलीय, पण अजून तोच रुबाब, तोच नखरा आहे. काय रूप आहे. सल्ले अल्लाह! सब्जपरीची भूमिका तिच्यापेक्षा अधिक चांगली कुणालाच करता येणार नाही. अल्लानं तिच्या गळ्यात जणू दैवी तेज ओतलंय. काय तिचं गाणं! तुम्ही लखनौत राहात नाही वाटतं?"

कमाल तेथून झटकन बाजूला झाला.

इतक्यात 'काळ्या दैत्या'चा पहाडी आवाज घुमला :—

**लाया शहजादे को मैं जाकर हिंदुस्तान ।**
**तू अपने माशूक़ को सब्ज़ परी पहचान ।**
**तू अपने माशूक़ को...**

[मी हिंदुस्थानात जाऊन राजपुत्राला घेऊन आलो. हे सब्जपरी, तू आपल्या या प्रियकराला ओळख...]

आता 'शहाजादा गुलफाम' रंगमंचावर आला होता. तो खड्या सुरात गाऊ लागला :

**महलों में रहता हूँ मैं, ऐश है मेरा काम ।**
**शहजादा हूँ हिन्द का, नाम मेरा गुल्फ़ाम ॥**

[मी महालात राहातो. विलास हेच माझे काम. मी हिंदुस्थानचा राजपुत्र आहे. माझे नाव गुल्फाम.]

आणि मग त्याने मोठ्या हृदयभेदक आवाजात म्हटले,

**सुबह होती हैं, मेरी जान, कोई आन के बीच ।**
**भैरवी मुझको सुना चलके परिस्तान के बीच ॥**

[माझ्या प्राणेश्वरी, आता लौकरच पहाट होईल. तू परिस्तानात चल आणि मला भैरवी ऐकव.]

हे लोक बारादरीतून बाहेर आले. आतून राजपुत्राचा आवाज येत होता :

**उड़के तू जायेगी इक पल में परिस्तान के बीच ।**
**हाथ फैलाके मैं रह जाऊँगा अरमान के बीच ॥**

[तू एका क्षणात उडून पाकिस्तानात जाशील. मी मात्र इथे भग्नहृदय होऊन राहीन.]

बाहेर जलपऱ्यांचे फाटक, चिनी बाग, जुलूखाना (आंगण) वगैरे सर्व ठिकाणी प्रकाश ओसंडत होता. कुंजामध्ये श्रीकृष्णाचा रास चालला होता. जाने आलम भगवी वस्त्रे परिधान करून, शेकोटी पेटवून एका झाडाखाली बसले होते. तेथे जमलेल्या सर्व लोकांच्या अंगावर भगवी वस्त्र होती. दुर्गा परशाद कत्थक बकुळीच्या झाडाखाली फुलांच्या तबकाच्या काठावर नृत्य करून दाखवीत होता. कारंजांतून सुवासिक पाणी थुईथुई उडत होते. जिकडे तिकडे फुलेच फुले होती.

बारादरीतून जोगिणीच्या कंठातून निघालेले भैरवीचे सूर कानी येत होते.

तारकशी दुपट्टा तू ओढ़े किरन जो टाँक के।
हो शबे माहताब में क्या ही सनम झलाझली ॥
आयी बहार, साकिया, जामे शराब दे पिला।
फूल खिले, फले शजर, अब्र उठा, हवा चली ॥
बहके ज़मीने शेर में पाँव, 'अमानत' अपना क्या।
जब हुई लगज़िश इक ज़रा निकला ज़बाँ से या अली ॥

[हे प्रियतमे, किरणांचे भरतकाम केलेला जरीकाठी दुपट्टा तुझ्या अंगावर आहे. वसंत ऋतू आला. हे प्रियतमे, तू मला मद्यचषक दे. फुले उमलली, झाडांना फळे आली. ढग भरून आले. वारा सुटला. काव्यक्षेत्रात पाऊल कसे का पडेना, माझे काय जाते ? जरा कुठे ते डळमळू लागले की तोंडून 'या अली' असा उद्‌गार बाहेर पडतो.]

जोगिणीचा स्वर हळूहळू चांदण्यात विरून गेला. ही मंडळी तेथे जमलेल्या लोकांच्या गर्दीतून बाहेर पडून रस्त्यावर आली.

रस्त्याच्या पलीकडे छतरमंजिल अंधुक प्रकाशात उभी होती. आतून वाल्ट्झ संगीताचा आवाज ऐकू येत होता. मोटारींच्या रांगा लागल्या होत्या. या लोकांनी फाटकातून आत जाऊन आपली गाडी उभी केली.

बाहेर पायऱ्यांच्या टोकाला गोमती संथपणे वाहात होती. गच्चीवर कोणी नव्हते. पायऱ्यांवर नसीरुद्दीन हैदर शाह बादशाह अनवाणी बसले होते. त्यांनी आपला एक जोडा प्रवाहात फेकून दिला होता. तो वाहात थोडा दूर गेला की ते टाळी वाजवीत. टाळी ऐकून एखाद्या चोपदाराने पुढे यावे, अशी त्यांची अपेक्षा असे. परंतु कोणीच चोपदार येत नसे. फक्त बॉलरूममधून बाहेर पडणाऱ्या हसण्याखिदळण्याचा आवाज ऐकू येई. तेव्हा ते स्वतःच उठून पाण्यावर वाकत आणि जोडा बाहेर काढून घेत. थोड्या वेळानंतर ते पुनः दुसरा जोडा पाण्यात फेकून देत. अशा प्रकारे ते आपले मन रमवीत बसले होते. बराच वेळपर्यंत हा खेळ चालत राहिला. अखेर गौतमाने पुढे होऊन त्यांनाही सिगारेट देऊ केली.

"नको! आम्ही कस्तुरीचा सुगंध असलेली गुडगुडी ओढत असतो. कुणी आहे तिकडे ?"

"माफ करा! आम्ही आहोत." गौतम घाबरून म्हणाला.

"तुम्ही कोण ?" त्यांनी चिडून विचारले.

"आम्ही...आम्हीच आहोत."

ते गप्प बसले.

"यांना इथंच सोडून देऊ...आपण काय करणार यांचं ?...चला, दुसरीकडे जाऊ." कमाल हळूच गौतमाला म्हणाला.

"चला, आपण प्राध्यापक बॅनर्जीकडे जाऊ." त्यांनी घोषणा केली.

ते बादशाह बागेच्या मुख्य फाटकात प्रविष्ट झाले. बागेचा हा भागही सुगंधाने दरवळला होता. काल्याच्या काठावर लाल बारादरी चांदण्यात न्हाऊन निघाली होती. टागोर ग्रंथालयाची इमारत शांत व गंभीर दिसत होती. "शब्दांत मोठं सामर्थ्य आहे." ती इमारत म्हणाली. "तुम्ही माझ्या आत या. मी तुम्हांला तुमच्या दुःखांचा विसर पाडीन."

"शब्द दुःखाचा विसर पाडीत नसतात. ते दुःखाला अधिक सखोल बनवितात." गौतमाने उत्तर दिले.

"मौन ही सर्वश्रेष्ठ गोष्ट आहे. म्हणूनच लोक मुनी बनतात; मौन धारण करतात." हरिशंकर म्हणाला.

"मौनाची भाषा किती तापदायक असते, याची तुला काय कल्पना ? सामसूम जीवघेणी असते." कमाल हरिशंकरला म्हणाला.

ते काल्याच्या पुलावर जाऊन बसले. विद्यापीठाच्या इमारतीवर चांदण्याची बरसात चालू होती. नसीरुद्दीन हैदरांची बादशाह बाग...

बिचारे नसीरुद्दीन हैदर!

मग ते प्राध्यापकांच्या निवासस्थानांकडे निघाले. दूर झाडीत लपलेल्या आपल्या हिरवळीवर प्राध्यापक बॅनर्जी मूकपणे येरझारा घालीत होते.

"हे लोक इतक्या साऱ्या प्रश्नांची उत्तरं कशी शोधून काढतात कोण जाणे!" कमाल खिन्न स्वरात उद्गारला.

विद्यापीठाच्या आवारातून चालत चालत ते विद्यापीठाच्या रस्त्याच्या बाजूने मोतीमहाल पुलावर जाणाऱ्या एका रस्त्याला लागले. तेथून ते सिंघाडेवाली कोठीकडे जाणाऱ्या कच्च्या रस्त्यावर आले.

मध्यरात्रीचे टोल वाजले. गौतमानें एक डोळा किलकिला करून नदीच्या वाहत्या पाण्याकडे पाहिले. तो सिंघाडेवाली कोठीच्या पायऱ्यांवर व्हरांड्यातील खांबाला टेकून बसला होता. चंपा, तलअत, निर्मला व तहमीना दुसऱ्या पायऱ्यांवर बसल्या होत्या. कमाल, हरिशंकर व आमिर रजा पाण्यात पाय सोडून बसले होते. नदी वाहात होती. नदीच्या पलीकडे, दुसऱ्या काठावर नजफ अशरफ, मोतीमहाल व छतरमंजिल या इमारती मूकपणे उभ्या होत्या. समोरून एक नाव तरंगत गेली.

काळाची जादू आता संपली होती.

"सुबह होती है मेरी जान कोई आज के बीच। भैरवी मुझको सुना चलके परिस्तान के बीच ॥" गौतम हल्क्या आवाजात गुणगुणला.

"शिः! गौतमभाई, तू तर 'इंदरसभे'तले शेर गुणगुणायला लागलास. किती 'डिकेडंट' आहेस." तलअत म्हणत होती.

तो आळोखे-पिळोखे देत उठला.

"चलो यार, आता मैफल बरखास्त करू या. सारी रात्र इथंच बसून घालवली आपण." कमाल म्हणाला.

ते सगळे विखुरले आणि आपापल्या निवासस्थानाकडे रवाना झाले.

"शांताचं पत्रही मला पुरं करता आलं नाही." गौतम आपल्या निवासस्थानाकडे जाता-जाता उदासपणे स्वतःशी म्हणाला.

## ३०

प्राध्यापक बॅनर्जी आंतरराष्ट्रीय कीर्तीचे अर्थशास्त्रज्ञ होते. रविवारी तिसऱ्या प्रहरी बहुतेक मुले व मुली आपल्या सायकलींवरून त्यांच्या घरी जात. त्यावेळी प्राध्यापकसाहेब आपल्या बंगल्याच्या आवारात सावरीच्या झाडाखाली खुर्चीवर बसलेले किंवा आत चहाच्या टेबलाशी बसलेले असत. त्यावेळी ते आपल्या विद्यार्थ्यांशी अत्यंत उदास स्वरात बोलत. प्राध्यापक महाशयांच्या या बैठकीत गौतम नीलांबराला विशेष महत्त्व प्राप्त झालेले होते.

"सर," एके दिवशी चंपाने विचारले, "मन आणि भावना यांच्या ओढाताणीतून कशी सुटका होईल? सगळीकडे या सावल्या पसरल्या आहेत. ज्याप्रमाणे जंगलात वादळ सुरू झालं की झाडांच्या सावल्यांचा आपापसात गुंताडा होतो त्याप्रमाणे ही ओढाताणही प्रत्येक पातळीवर चालू असते. जमाती, राष्ट्रे, राजवटी, माणसे, जाती—या सर्वांचा सगळ्या बाजूंनी गुंता झाला आहे. माझ्या सभोवती भीतीचं अधिराज्य पसरलंय. अविश्वास, घृणा, परकेपणा, भीती आणि एकनिष्ठता यांच्यात ओढाताण चाललीय. मला माझ्या मनाशी नि बुद्धीशी प्रचंड संघर्ष करावा लागत आहे.

"मी बनारसला शिकत होते तेव्हा 'दोन राष्ट्रां'च्या सिद्धांताविषयी मी कधी विचारही केला नव्हता. काशीचे मोहल्ले व गल्ल्या, देवळे नि घाट हे सारं जितकं माझ्या

मैत्रिणीचं, लीला भार्गवचं, होतं तितकंच माझंही होतं. पण आता हे काय घडतंय! आता मी मोठी झाले आहे; आणि मला असं आढळून येतं, असं सांगितलं जातं की या शिवाल्यांवर माझा काही हक्क नाही, कारण मी कपाळावर कुंकू लावीत नाही आणि माझी आई तपलेश्वराची आरती करण्याऐवजी नमाज पढते. बस्स! एवढ्याचसाठी माझी संस्कृती वेगळी, माझ्या निष्ठा वेगळ्या! मी बसंत कॉलेजात तिरंगी झेंड्यासमोर उभं राहून 'जन गण मन' गीत म्हटलं आहे. तरीपण मला तिथं नेहमी असं वाटायच की या तिरंगी झेंड्याखाली मला परकं समजण्यांत येतंय. मी तर याच देशाची रहिवासी आहे. स्वतःसाठी दुसरा देश कुठून आणू? देशत्यागाचं तत्त्वज्ञान मला कधीच आकलन झालं नाही. युरोपात युद्ध सुरू झाल्यानंतर एक नवीन समस्या माझ्यासमोर आली. आक्रमक राष्ट्रं एका देशातील रहिवाशांना हाकलून देतात; आणि मग ते लोक राजकीय निर्वासित बनतात. ते मग जगभर भटकत फिरतात. या निर्वासितांचे दोन प्रकार आहेत. ज्यांनी स्वेच्छेनं आपला देश सोडला ते, आणि ज्यांना नाइलाजानं देश सोडावा लागला ते. याच वेळी मुस्लिम राजकारणात नवी घोषणा ऐकू येऊ लागली. माझ्या बरोबरचे मुसलमान मोठ्या आनंदाने आपली मातृभूमी सोडून जायला आणि एक नवा देश वसवायला उत्सुक आहेत असं मला दिसून आलं. मला ही कल्पना फार आवडायची; कारण माणसाला स्वभावतःच आदर्शवाद प्रिय असतो. तसं नसतं तर जगात कोणताच नवा विचार अमलात आला नसता अथवा नवनवीन स्वप्नं पडली नसती. परंतु या नव्या स्वप्नांची इतरांच्या स्वप्नांशी टक्कर झाली. मला पुनः ओढाताणीला आणि संघर्षाला तोंड द्यावं लागलं.

"युद्ध आणि शांतता यांची समस्या मोठी जटिल आहे. परंतु शांततेचा अर्थ काय? निष्ठा कशाला म्हणायचं हे ठरविणारा कोण? जातीयवाद अत्यंत घातक आहे, हे मला माहीत आहे. आम्ही जर एकदा एकमेकांना दुरावलो तर पुनः कधीच एकत्र येऊ शकणार नाही."

"तू कधी या गोष्टीवर विचार केला आहेस काय," प्राध्यापकमहाशय झाडाच्या फांदीवर बसलेल्या एका चिमणीकडे पाहात हलक्या आवाजात म्हणाले, "इंग्रजांच्या आगमनापूर्वी या देशात हिंदुमुसलमानांचे दंगे होत नसत, युद्धं होत असत? आणि ही युद्धं राजकीय असत. हिंदू राजांच्या सैन्यात मुसलमान सेनाधिकारी आणि सैनिक असत. मुसलमानांच्या बाजूनं हिंदू लढत असत. त्या राजकीय गटबाज्या असत. कालांतरानं इंग्रजांनी लिहिलेल्या इतिहासाच्या पुस्तकांच्या द्वारे द्वेषाचं बी पेरलं गेलं. परंतु आमचा आजचा धार्मिक माथेफिरूपणा..."

"तुमच्या मते धर्म निरर्थक आहे? तुम्ही तर स्वतः कट्टर वैष्णव आहात."

"वैष्णव धर्म हा भक्तीचा धर्म आहे. शुद्ध प्रेम हा त्याचा पाया आहे."

"सर, प्रत्येक धर्मच शुद्ध प्रेमावर आधारलेला आहे. तेव्हा या बोलण्यात काय अर्थ?"

"तू फारच कडवट बोलते आहेस. असं करू नकोस."

"सर, इथं सगळीकडे कटुता भरलीय. मी तरी काय करू? तिथं आम्ही भूतकाळासंबंधी आणि काळाच्या कूटप्रश्नाविषयी विचार करीत होतो. घरी परतल्यानंतर मी अंथरुणावर पडले, पण डोळ्याला डोळा लागला नाही. सकाळ होईपर्यंत मी जागीच राहिले. माझ्या डोक्यात एकच विचार घोळत होता : अखेर आमचा आणि आमच्या इतिहासाचा परस्पर संबंध तरी काय आहे आणि काय असला पाहिजे? आपण सतत गुन्हा आणि शिक्षा यांच्या समस्येला तोंड देत असतो. भूतकाळाचं प्रायश्चित्त आम्हांला करावं लागतं. आज, या क्षणापर्यंत जे काही घडलंय त्याचा परिणाम माझ्यावर झालाय. माझ्या मनात जे विचार येताहेत त्यांचं प्रायश्चित्त भावी पिढ्यांना घ्यावं लागेल. माझ्यामुळं जगाची धुळधाण होईल की ते सुखी नि संपन्न बनेल? इतिहासातील द्वेष आणि धार्मिक कडवेपणा यांच्यासंबंधी मी जसजशी विचार करू लागते तसतशी माझ्या उरात धडकी भरते. कोणाही हिंदूला व्यक्तिशः माझ्याविषयी द्वेष वाटत नाही; परंतु संपूर्ण समाजाचा एक घटक या नात्यानं त्याला माझा द्वेष करणं भाग पडू शकतं."

"हा तुमचा आध्यात्मिक भारत आहे. इथं राजकीय आणि आर्थिक असंतोषानं नेहमीच धार्मिक संघर्षाचं रूप धारण केलं. बंगालचं अठराव्या शतकातलं संन्याशांचं बंड आणि अवध नि बंगाल इथलं वहाबी आंदोलन. हे सारे आध्यात्मिक नेते एकमेकांचे गळे कापत राहिले...लाहौल विलाकूवत!" कमाल म्हणाला.

"कमाल, भारतात अल्पसंख्याकांची समस्या विद्यमान आहे. एवढं तरी तू मान्य करशील की नाही?" चंपाने थोडा वेळ स्तब्ध राहिल्यानंतर विचारले.

"नक्कीच!" कमाल घसा साफ करीत म्हणाला, "परंतु इथं रशियासारखं 'मल्टी-नॅशनल' (अनेक राष्ट्रांचा समावेश असलेलं) राज्य निर्माण करिता येणं शक्य आहे. हे पाहा चंपाताई, मला धर्माशी काही कर्तव्य नाही. या वेळी माझ्यासमोर इतर प्रश्न आहेत. माणसाला शांतता पाहिजे, भाकरी पाहिजे. तेवढं मिळाल्यावर तो अवश्य इमाम गझालीच्या तत्त्वज्ञानासंबंधी विचार करू शकेल." आता तो पुनः पार्टीलाइनवर गेला.

कमाल हा नव्या पिढीचा प्रतिनिधी तरुण होता. तो बुद्धिवादी, सिद्धांतप्रिय, प्रामाणिक, कल्पनाशील होता. चंपा त्याच्याकडे टक लावून पाहात राहिली.

"आणखी एक गोष्ट..." कमाल सांगू लागला, "तुम्ही फक्त शहरी राजकारणाचा विचार करता. तुम्हांला खेड्यांची माहिती नाही. शहरांत प्रतिगामी भांडवलदार आहेत. ते आपल्या समाजाचं स्थान टिकवून धरण्यासाठी दंग्यांचं राजकारण खेळत असतात

आमचं सारं राजकारण विशेषाधिकार आणि गेलेले हक्क परत मिळविण्याची चढाओढ यांच्याच पायावर आधारलेलं राहिलं आहे. मुसलमानांना इतक्या नोकऱ्या मिळाल्या. पाहिजेत; शिखांना इतक्या आणि हिंदूंना इतक्या! मध्यम वर्गाचं राजकारण!"

"माझे बाबा खानबहादुर नबाब तकी रजा बहादुर ऑफ कल्याणपूर, मुस्लिम लीगमध्ये सामील झाले. त्यांना असं वाटतं की काँग्रेस जमीनदारांचा नाश करायला बसलीय. ते सरंजामशाही आदर्शांचे शेवटचे पुरस्कर्ते आहेत. मला त्यांच्याविषयी पूर्ण सहानुभूती वाटते. ते कोणत्या दृष्टिकोनातून विचार करतात याची मला चांगली कल्पना आहे. मी घरी जाऊन त्यांच्याशी वाद घालणार नाही."

"कमाल, मुसलमानांना पाकिस्तानातच सुरक्षितपणे राहाता येईल असं त्यांना वाटत असेल तर त्यावर आक्षेप घेणारा तू कोण? प्रत्येकाला विचारस्वातंत्र्य असलं पाहिजे, हे तू मान्य करीत नाहीस?" चंपाने विचारले.

तलअत तिच्याकडे टक लावून पाहात राहिली. नंतर ती म्हणाली, "चला चंपाताई, प्राध्यापकमहाशय चहासाठी बोलावताहेत."

प्राध्यापकमहाशयांच्या जवळच हिरवळीवर गौतम येऊन बसला होता. त्याने उठून चंपाला नमस्कार केला.

"चंपाताई भयंकर कट्टर मुस्लिम-लीगी झाल्या आहेत. आजच्या वृत्तपत्रांत मुसलमानांनी हिंदूंवर सामाजिक बहिष्कार घालावा, अशा अर्थाचं जिनासाहेबांचं पत्रक प्रसिद्ध झालंय. म्हणून उद्यापासून त्या आपल्यात सामील होणार नाहीत." कमाल कडवटपणे म्हणाला.

संध्याकाळच्या फिकट निळ्या प्रकाशात ते झाडांवर लावलेल्या विजेच्या दिव्याखाली बसून राहिले. वातावरणातील उदासीनता अधिक गंभीर होऊ लागली.

## ३१

कैलास हॉस्टेलच्या वार्षिक संमेलनात 'अनारकली' नाटकाचा प्रयोग चालला होता. नाटक संपले. शेवटचा पडदा पडला आणि लोक आपसात गप्पागोष्टी करीत बाहेर पडले.

कमाल म्हणाला, "चंपाताई, तुम्ही नुसती सोंगं करीत राहा. तुम्हांला 'अनारकली'हून अधिक चांगलं असं दुसरं नाटकच मिळालं नाही वाटतं? रोमान्सपूजकतेलाही काही मर्यादा हवी." आणि इतके बोलून तो गर्दीत दिसेनासा झाला.

गौतमाने जवळ येऊन विचारलें, "चंपाताई, तुम्ही कमालावर रागावला आहात असं दिसतंय. त्या दिवशी प्रोफेसरसाहेबांच्या घरी कमाल तुमच्याशी फारच कडवटपणानं बोल्ला. त्यांच्या वतीनं मी तुमची क्षमा मागतो."

"छे: छे:! गौतम, मी कमालावर रागवले नाही. कुणावर रागवायचा मला अधिकारच नाही."

"तुम्ही अगदी हुतात्म्याचा आव आणताहात. हा असा दुःखी स्वर कशासाठी?"

"तू—तुम्ही सारे अगदी नीच आहात." ती कडवटपणे म्हणाली.

"खरं म्हणजे आम्ही फक्त मोकळ्या मनाचे लोक आहोत. परंतु मोकळ्या मनाच्या माणसांचा बहुधा आणखी एक प्रकार असतो. त्या प्रकारात भैयासाहेब मोडतात."

"तू—तू असं का बोलतो आहेस? मला असं वाटतंय की जणू मी एका लांबलचक स्वच्छ गॅलरीत उभी आहे आणि माझ्यासमोर एकामागून एक पडदे भराभर वर जात आहेत. आता शेवटी फक्त एक काळा पडदा उरलाय."

"चंपाताई, तुमची समस्या ही तुमची अगदी खासगी बाब आहे. तुमचं भैयासाहेबांवर पराकाष्ठेचं प्रेम आहे. बस्स. सगळ्यांचं तात्पर्य हे आहे. इतर सारी निरर्थक बडबड आहे. आणि तुमची दुसरी समस्या शब्दांची आहे. शब्दांच्या जंजाळातून तुम्ही बाहेरच पडू शकत नाही." गौतमाने आपल्या नेहमीच्या सवयीप्रमाणे एखाद्या प्रौढ विद्वानाप्रमाणे मुद्द्याची गोष्ट सांगितली.

"तलअत सांगत होती तेच खरं आहे. तूही सदा आव आणतोस. तुझ्याशी बोलायला लागलं की खलील जिब्रानच्या अल्‌मुस्तफाशी बोलल्यासारखं वाटतं."

"चंपाताई!" तो गडबडून म्हणाला, "मेहेरबानी करून रागावू नका. चला, मला तुमच्या घरी नेऊन कॉफी पाजा. तिथं आपण या प्रश्नांसंबंधी अधिक विचार करू. पण कृपा करून रागावू नका. माणूस फक्त एकदाच जन्माला येत असतो...चला."

चांदबागेतील एक प्राध्यापिका सीता दीक्षित हिच्याबरोबर चंपा कॉलेजच्या मागच्या बाजूस एका लहानशा कॉटेजमध्ये राहात होती. तेथे जाऊन ती दोघे व्हरांड्यात बसली. समोर पेरूच्या बागेतील राखणदार पोपटांना उडवून लावण्यासाठी जोरजोराने ओरडत होता.

गौतम वेताच्या खुर्चीवर बसून केळीच्या बनाकडे पाहात राहिला. चंपा कॉफी तयार करून घेऊन आली आणि त्याच्यासमोर सोफ्यावर बसली.

"चंपाताई, तुम्ही खरोखरीच ग्रेट आहात. देवाशपथ!"

"खरंच?"

"चंपाताई, मला एक गोष्ट सांगा."

"विचार!"

"तुम्ही भैयासाहेबांना कधीपासून ओळखता?"

"कित्येक वर्षांपासून."

"आणि या अवधीत तुम्ही काय केलं?"

"शिकत होते. दुसरं काय करणार?"

"त्यानंतर? ..."

"आणखी शिकले."

"त्यानंतर?"

"बस्स, शिकत राहिले." चंपाने त्राग्याने उत्तर दिले.

"आणि इतकी वर्षं तुम्ही भैयासाहेबांना सहन करीत आहात. तुम्ही त्यांना प्रथम भेटलात तेव्हा तुमचं वय सतरा-अठरा वर्षांचं असेल. तुम्ही स्वतः गर्भश्रीमंत नसला तरी त्यांच्याविषयी तुमच्या मनात फार श्रीमंती विचार घोळत असतील नाही? मी तुम्हांला एक गोष्ट सांगतो. तुम्ही जरा गंभीरपणानं विचार केला असता तर तुम्हांला आढळून आलं असतं की तुमचं हे प्रेमप्रकरण..."

"काही तरी वाह्यातपणानं बरळू नकोस."

"वाह्यातपणा? कमाल आहे! तुम्ही तर अगदी पक्क्या 'ब्लू स्टॉकिंग' (महाविदुषी) निघालात की! अहो, प्रेमात काय पाप आहे? अत्यंत उत्कृष्ट गोष्ट आहे ती. मी स्वतः पुष्कळदा प्रेमात पडतो. परंतु मध्यमवर्गीय तरुणींना तसं बोलणं मात्र रुचत नाही. निदान तसं त्या दाखवतात तरी. चंपाताई, माफ करा हं! किती छान वेळ आहे ही. खरं म्हणजे तुमच्याकडून सतारीवर त्रितालातला बागेश्री राग ऐकायला हवा होता मी. ते दिलं सोडून आणि मी तुमच्याच समस्यांचा पंचनामा करायला लागलो."

"इतरांच्या समस्यांचा पंचनामा करीत बसणं हाही एक वाह्यात षोकच आहे. अन महाशय, तुम्ही विसरता की तुमच्यासारख्या विद्यार्थ्यांना मी रोज कॉलेजात शिकवीत असते."

"तुम्ही असं म्हणणार, याची मला कल्पना होतीच. आपलं जीवन झिजलेली वाक्यं पुनः पुनः उच्चारण्यातच निघून जात असतं." तो उदासपणे बाहेर पाहात म्हणाला, "आपला रोमँटिकपणा कायम टिकवून ठेवण्यासाठी तुमचे भैयासाहेब कोणकोणत्या कलृप्त्या करीत असतील, कोणती वाक्यं उच्चारीत असतील, याची मला चांगली कल्पना आहे. ते फ्रेंच फार छान बोलतात म्हणे!"

"पण, तुला भैयासाहेबांविषयी इतकी चीड का?" चंपाने विचारले.

तो एकदम शरमला. तो इतका लाजला की त्याचा चेहरा लालबुंद झाला.

"मी चिडेन. तुम्हांला काय करायचंय?" तो म्हणाला. चंपाला आश्चर्य वाटले. एवढा भक्कम पुरुष आणि इतका दुर्बळ निघाला!

"मला काय करायचंय ?..." चंपा म्हणाली, "त्याचं असं आहे की आमच्या कंपूतले सारेजण भैयासाहेबांना थोरला भाऊ समजून त्यांचा आदर करतात. तुला निदान एवढं तरी लक्षात ठेवलं पाहिजे. इथं आला आहेस तर थोडा शिष्टाचार तरी शिकून घे. उठल्यासुटल्या ही काय हुल्लडबाजी, उथळपणा, पाचकळपणा! हा अफिण्यांचा अड्डा कमी पडत होता म्हणून तू येऊन त्यात भर घातलीस की काय ?"

"दुसरं असं, चंपाताई, की तुम्ही त्यांच्याशी लग्न करणार ही कल्पनाच किती हास्यास्पद वाटते. अगदी विदूषकासारख्या दिसता तुम्ही. अप्पीची गोष्ट वेगळी होती. तिचा जन्मच यासाठी झाला होता. परंतु तुम्ही...कमाल आहे."

आता खजील होण्याची पाळी चंपावर आली. तिने लगेच मोठेपणाचा आव आणून म्हटले, "मी तुझा सल्ला मागायला आलेली नाही."

"मी सल्ला कुठं देतोय? माझा सल्ला घ्यायची अक्कल तुमच्या ठिकाणी असती तर हा प्रसंगच ओढवला नसता. पण तुम्ही म्हणजे...हाय!...या तथाकथित सुशिक्षित मुलीची काय ही दशा!" तो उठून फेऱ्या घालीत नाटकी ढंगात बोलू लागला. "ही अर्थशास्त्राची प्राध्यापिका, 'डायलेक्टिक्स'संबंधी डोकेफोड करणारी, बिचारी गेली अनेक वर्षं केवढ्या मोठ्या आपत्तीत सापडलीय. रोमँटिसिझमला बळी पडलेल्या हे खुळ्या पोरी!" तो मध्यभागी उभा राहून राणा भीमदेवी थाटात गरजला.

"गौतम, तू अगदीच वेडा आहेस रे!" चंपा हसून म्हणाली.

"आता मात्र हद्द झाली. जो पुरुष नियमानं क्लबात जाऊन ओल्ड वाल्ज नृत्य करतो, पिकनिक आणि पार्ट्या यांमध्ये कॉलेजच्या पोरींचे फोटो काढीत फिरतो, स्वतः पोरींसारखा देखणा आहे आणि सर्वांवर कडी म्हणजे ज्याला स्वतःच्या सौंदर्याचा गर्व आहे, त्याच्यावर तुम्ही जीव टाकता. तुम्हाला इष्कच करायचं असेल तर माझ्याशी करा ना. किंवा मग कमाल आणि हरिशंकर तरी काय वाईट आहेत ? त्यांच्याखेरीजही इतर हजारो आहेत. अर्थात त्या सर्वांहून मी काही वेगळाच आहे, ही गोष्ट वेगळी." आणि लगेच तो गंभीरपणे बोलू लागला, "छेः छेः! चंपाताई, खरी आफत ही आहे की तुम्ही लोक परंपरांवर जीव टाकता. तुमची परंपरा, भैयासाहेबांच्या 'ग्लॅमर'ची परंपरा, 'गुलफिशाँ' व 'सिंघाडेवाली कोठी'ची परंपरा. दुसऱ्याचं मन मोहून टाकणं. परंतु या निव्वळ चित्ताकर्षकतेचा काय उपयोग ? काहीतरी भरीव काम केलं असतं तुम्ही..."

"शिकवायचं काम करते ना!" चंपा म्हणाली. आपण अगदी असहाय आहोत, आपल्यावर अनपेक्षितपणे, अगदी निर्दय हल्ला चढविण्यात आला आहे, व त्यामुळे आपली सारी चिलखते मोडून पडली आहेत, त्यांचे तुकडे तुकडे झाले आहेत, असे तिला

वाटले. इतकी वर्षे ती स्वतःला, आपल्या भावनांना, अनुभूतींना अत्यंत महत्त्वपूर्ण, श्रेष्ठ समजत होती. परंतु एका क्षणात तिला स्वतःचीच कीव वाटू लागली. ती आवाज चढवून म्हणाली, "प्रत्येकाला कलावंत बनणं काही शक्य नसतं."

"कलावंत नका बनू. आजकाल कलावंतांच्या झुंडीच्या झुंडी सर्वत्र भटकताहेत. काहीतरी मूलभूत, भरीव काम करा. करण्यासारखं इतकं आहे." त्याने चोहोकडे नजर फिरवून एक उसासा सोडला आणि विचारले, "तुम्हांला दिसत नाही?"

"दिसतंय ना!" चंपा म्हणाली, "पण जिवंतही राहायचं आहे ना! ही नोकरी करते, म्हणून दरमहा तीनशे रुपये मिळतात. माझे बाबा सामान्य प्रतीचे वकील आहेत. तुम्हां गर्भश्रीमंतांच्या पोरांप्रमाणे गरिबी म्हणजे काय हे मला पुस्तकांतून शिकावं लागलेलं नाही. तुमचं गरिबीचं ज्ञान पुस्तकी आहे. मी गरिबी अनुभवलीय."

"आणि भैयासाहेबांशी लग्न झालं तर तुम्हीही क्लबात जाऊन ओल्ड वॉल्ट्ज नृत्य कराल आणि रायडिंगलाही जाल, नाही?" त्याने भाबडेपणाने विचारले.

"तर मग काय मी लाल झेंडा घेऊन रस्त्यांतून घोषणा करीत जावं?"

"याचा अर्थ असा की लग्न हे तुमच्या दृष्टीनं आर्थिक अडचणींचं निराकरण आहे. चंपाबेगम, मी तुम्हांला इतरांहून काही वेगळ्या समजत होतो. तुम्ही मला असं सांगा, हे महाशय तुम्हांला इतके का आवडतात?"

"कोण जाणे!" लहान मुलीप्रमाणे लाजून ती म्हणाली. तो प्रश्न तिच्या जिव्हारी लागला.

"अच्छा, तुम्हांला सुंदर चेहरे आवडतात, नाही? कवीचं मन आहे तुमचं?" आणि तो येरझाऱ्या घालीत हॅटरॅकच्या आरशासमोर जाऊन उभा राहिला व भुवया चढवून आपला चेहरा निरखून पाहू लागला. "एखादी मुलगी माझ्यावरही असंच उच्च प्रेम करू शकेल काय? तसं पाहिलं तर मी काही अगदीच कुरूप नाही."

"शांता तुमच्यावर उच्च प्रेम करीत नाही?"

आता थक्क होण्याची पाळी गौतमावर आली होती. त्याच्या अंगावरील चिलखत मोडून पडत आहे, हे पाहून चंपाला बरे वाटले.

"गौतम बहादुर! तूही काचेच्या घरात राहातोस. इतरांवर दगड फेकण्यापूर्वी या गोष्टीची आठवण ठेवीत जा."

"तुला शांतासंबंधी काय माहीत आहे?"

"तू तिच्यावर प्रेम करीत नाहीस? ती कुणी का असेना, ती तुझ्या चुलतभावाची बायको आहे आणि तुझ्यापेक्षा पाच वर्षांनी मोठी आहे. कुणी कुणाला उपदेश करावा आणि कुणी कुणाला गुरू समजावं? आणि तू आपल्या शांता नीलांबरला विसरतही

चालला आहेस. कित्येक दिवसांत तू तिला पत्र लिहून इथली हकीगत कळवली नाहीस. ती तुझी बौद्धिक–इन्टलेक्चुअल–मैत्रीण आहे. तू तिच्याशी लग्न करू शकत नाहीस. खरं म्हणजे तू कुणाशीच लग्न करू शकणार नाहीस—निर्मलेशीसुद्धा! गौतम बहादुर, या मोठ्या अगम्य समस्या आहेत. इथं तुझे सिद्धांत टिकणार नाहीत. मला भैयासाहेब आवडतात. त्यांचा माझा कसलाही बौद्धिक संबंध नाही. परंतु गौतम बहादुर, मला तर तूही आवडतोस. आता तूच सांग यावर काय उपाय? मानवी संबंध मोठे अद्भुत असतात. हळू-हळू तूही मला आवडू लागला आहेस. म्हणून काय मी फ्लर्ट ठरते? मुळीच नाही. माणसांवर प्रेम करणं मला येतं. हा जो एवढा मोठा कबुलीजबाब मी आता दिला त्याचं कारण असं की तुझंही काचेचं घर फुटलं आहे. खेदाची गोष्ट अशी की तू स्वतःच ते फोडून टाकलं आहेस. आणखी काही दिवस ते शाबूत ठेवलं असतंस तर बरं नसतं झालं?" ती उदासपणे म्हणाली.

अंधारात ती ज्या नावेत बसली होती ती वादळी लोंढ्याबरोबर कुठल्या कुठे जाऊन पोहोचली. तो निमूटपणे उभा राहिला.

चंपाला त्याची कीव आली. किती गोड छोकरा आहे! हरिशंकर व कमाल यांच्याशी हा किती मिळताजुळता आहे! त्यांच्यासारखाच गंभीर आणि खट्याळही! ते दोघेही कोण जाणे कुठून कुठून आपल्यासारखेच 'क्रुक' (कुटिल) शोधून आणतात. याच्याकडे पाहा ना, कोण जाणे कुठून वाहात-वाहात आलाय.

"तुला शांताविषयी काय माहीत आहे ग?" गौतम गुरगुरला. तो तिच्याशी भांडू इच्छीत होता. याचाच अर्थ असा की त्याने तिला दटावावे, तिला घालूनपाडून बोलावे, तिची कानउघाडणी करावी, इतका तो तिच्या जवळ आला होता. आत्मीयतेच्या या अनुभूतीने चंपाला आणखीच उदास बनविले.

"गौतम!" ती म्हणाली, "वापरून गुळगुळीत झालेल्या या वाक्याबद्दल माफ कर! परंतु खरं म्हणजे आपण सारे उघडी पुस्तकं आहोत. आपल्यापैकी कुणाच्याही जीवनात काही रहस्य नाही. तू मला किती जवळून ओळखू लागला आहेस! प्रत्येक माणूस बेहद्द 'एक्सपोज्ड' आहे, तीव्र प्रकाशात आहे. जिथं जाऊन तू स्वतःला लपवू शकशील असा सौम्य अंधार, अंधुक प्रकाश तुला कुठंही मिळायचा नाही....जेव्हा मी तुला बघते तेव्हा मला असं वाटतं की मीही याच तीव्र प्रकाशात उभी आहे. आणि तू मला आरपार पाहातो आहेस. परंतु मी स्वतःही तुला आरपार पाहात आहे. म्हणूनच मला समजतंय की तू मला...."

"आरपार पाहातो आहे...चंपा, हे शब्द आता पुरेत...शब्द आपल्याला गिळून टाकतील."

"शब्द नाहीसे करून काय होणार? त्यांचे अर्थ तर शिल्लक राहाणारच. तूच सांग, आपण काय करू शकतो?" चंपा अत्यंत असहायपणे उद्गारली.

# ३२

"अन् बरं का ग, आपले हे जे भैयासाहेब आहेत ते गौतमाविरुद्ध जळफळत असतात." एके दिवशी सिंघाडेवाली कोठीत तलअतने निर्मलेला बातमी दिली.

"गौतमाविरुद्ध? हाय रे दैवा! ही म्हणजे मोठी गंमतच आहे की. त्या बिचाऱ्याची ईर्ष्या कोण करणार? तो तर इतका निराधार, डिफेन्सलेस आहे..."

"हो ना! नाही तर काय? म्हणजे असं की तो... हद्द झाली बाई!"

ठगांच्या टोळीप्रमाणे या कंपूतील लोकांचीही आपल्या कंपूविषयी निष्ठा होती. जो कोणी या कंपूत सामील होई, त्याच्या जिवाला जीव द्यायला इतर सर्वजण तयार होत.

"पण मग चंपाताई तर...?" निर्मलेने अकस्मात विचारले.

"इश्श! असल्या पोरकट शंका काढू नकोस."

"यात पोरकटपणा काय आहे? काळाचा महिमा असतो." निर्मला प्रौढपणाचा आव आणून म्हणाली.

"साफ चूक!" तलअतने जोरदार विरोध केला. "चंपाताई काही आता अशा 'इम्मॅचुअर' नाहीत. बरं तं जाऊ दे. तू करू शकशील गौतमावर प्रेम?" तिने भयंकर प्रश्न विचारला.

"गौतमावर? तुझी तर बाई कमाल झाली! इतकी ओळख झाल्यानंतर प्रेम करायला अवकाशच कुठं आहे? अहो वेडाबाई, प्रेम करायचं म्हणजे थोडं तरी रहस्य, गूढता हवी त्यात." निर्मला म्हणाली.

"आणि याच रहस्याविरुद्ध, गूढतेविरुद्ध आपण धर्मयुद्ध पुकारलंय." तलअत म्हणाली.

"नाहीतर काय?" निर्मलेने अनुमोदन दिले.

"खरं म्हणजे चंपाताईच्या या अव्याहत चालू असलेल्या प्रेमप्रकरणानं आपणा सर्वांची 'सायकॉलॉजी'च खराब करून टाकलीय. मोठी आफतच आहे. त्या इथं आल्या तेव्हापासून...आठवतंय तुला? आपण फर्स्ट ईयरला होतो. तेव्हापासून हे प्रकरण चाललंय. किती थर्डक्लास गोष्ट आहे ही!"

"अत्यंत थर्डक्लास!" निर्मलेने पुनः अनुमोदन दिले.

"आणि मला समजत नाही, भैयासाहेब इतके मागे लागलेत तर चंपाताई त्यांच्याशी लग्न करून का टाकीत नाहीत?"

इतक्यात एक सायकल आवारात शिरली आणि गौतम नीलांबर तेथे येऊन पोचला.

"मित्रहो, मी तुम्हांला हे कळवायला आलो होतो की या सेवकाचं इथलं वास्तव्य आता संपलं!"

"कुठं चाललास?" तलअतने विचारले.

"जरा आपलं विलायतेपर्यंत! वृत्तपत्र पाठवतंय."

"जरा आपलं विलायतेपर्यंत! हं?" तलअत त्याची नक्कल करीत म्हणाली. "काय पण रुबाब दाखवतो आहेस. जणू काय आम्हांला कधी विलायतेला जाताच यायचं नाही. तू चल पुढे. आम्ही आलोच तुझ्या मागोमाग."

"दोस्त, तू चाललास, याचं खरोखरच फार वाईट वाटतंय." हरिशंकर म्हणाला.

"होय दोस्त, दुःख तर झालंच पाहिजे. मी किती चांगला माणूस होतो!" गौतम उत्तरला.

त्या दोघांचे बोलणे चालू असतानाच तलअत आत बसलेल्या निर्मलेकडे गेली.

"गुरू चालला!" ती म्हणाली.

"मी आताच ऐकलं!" निर्मला रडत म्हणाली. तलअत आश्चर्याने पाहातच राहिली.

"शि: ! काय मूर्ख पोरगी आहेस तू! रडतेस कशाला? त्याच्याशी लग्न करून तूही जा त्याच्याबरोबर. तुझ्यासाठी त्याच्याकडे कधीच शब्द टाकण्यात आलाय."

"तो माझ्याशी लग्न करणार? चंपाताईवर भाळलाय तो. जन्मभर तो त्यांच्याशी माझी तुलना करील. मी चंपाताईची सावली बनून राहू इच्छीत नाही." निर्मला रडत-रडत म्हणाली.

"चंपाताई! चंपाताई! किती दुष्ट आहेस तू! अजून तू कुणाकुणाचं नशीब उद्ध्वस्त करशील कोण जाणे!" तलअत उंबऱ्यावर बसून मनाशी म्हणाली. भरलेल्या गळ्याने ती निर्मलेला सांगू इच्छीत होती. "रडू नको वेडे पोरी, रडू नको."

व्हरांड्यातून गौतम व हरिशंकर यांच्या हसण्याखिदळण्याचा आवाज ऐकू येत होता. तलअतला चंपाविषयी इतका तिटकारा यापूर्वी कधी वाटला नव्हता.

* * *

चंपा खिडकीत जाऊन संध्याकाळच्या आकाशाकडे पाहू लागली.

"बनत बनाऊँ बन नहीं आवे हरि के बिना...हरि के बिना!..." शेजारच्या खोलीत कोणीतरी मुलगी पूर्व रागातील ख्याल गात होती.

अचानकपणे याचा अर्थ तिला समजला. वस्तुतः विरह म्हणजेच प्रेम.

हिरवळीवर मुली रमतगमत गप्पागोष्टी करीत होत्या. सोशलरूममध्ये पियानो वाजत होता. ती वरून खाली आली आणि बादशाहबागेकडे निघाली. प्रोफेसरसाहेबांच्या बंगल्यावर बरीच गर्दी जमली होती. तिला जरा आश्चर्य वाटले.

"डायरेक्ट ॲक्शन...कलकत्ता...दोन हजार माणसं मारली गेली......"

हे लोक कशासंबंधी बोलताहेत? जणू तिला कोणीतरी स्वप्नातून गदगदा हलवून जागे केले. समोर गौतमही होता. तो खाली वाकून कागदावर भरभर काहीतरी लिहीत होता.

"काय झालं?" तिने घाबरून विचारले.

"जरा आपल्या पुढाऱ्यांना जाऊन विचारा, चंपाबेगम!" कोणीतरी तिच्याजवळ येऊन उत्तर दिले.

चंपाने गोंधळून सभोवती पाहिले. "माझे पुढारी?" तिच्या घशाला कोरड पडली.

"हो, हो! तुमचे पुढारी. मोठ्या जोरात लीगला मत द्यायला गेला होता ना?"

"हे खोटं आहे!" ती हलक्या आवाजात म्हणाली. तिने गौतमाकडे वळून पाहिले. परंतु गौतमाने आपले तोंड दुसरीकडे वळविले.

"चला, इथून आता निघू. आमच्या घरी चला. तिथं बसून ठरवू." हरिशंकर म्हणाला.

तेथे जमलेले लोक तिच्याकडे डोळे रोखून पाहू लागले.

आणखी एक व्यक्ती (हेही सगळे काळे-गोरे चेहरे होते) हरिशंकराला उद्देशून म्हणाली. "तुमच्या कम्युनिस्ट पार्टीनं ही काय कोलांटी उडी मारलीय? म्हणे, पाकिस्तानची मागणी जनतेची मागणी आहे."

"आम्ही शांततेचे पुरस्कर्ते आहोत!" गौतम उद्गारला.

"शांतता? हुंः! या गांधीवाद्यांपेक्षा अधिक लबाड लोक जगात दुसरे नसतील, गांधीवाद म्हणजे एक मोठं 'फ्रॉड' आहे." तिसरा म्हणाला.

ती पुनः परत फिरली. कैलास हॉटेलात युनियनची आणीबाणीची बैठक चालली होती. ती तेथून पुढे गेली. चाँदबागेच्या चॅपेलमधून ऑर्गनचा आवाज ऐकू येत होता. रायबिहारीलाल रोडवरून जाताना तिने दोन्ही बाजूंच्या घरांकडे पाहिले. तिचे स्वागत करणारा एकही दरवाजा तिला तेथे दिसला नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी तिला समजले की आपली टोळी जिवावर उदार होऊन कलकत्त्याला रवाना झाली आहे. निर्मला, तलअत, तहमीना सगळीजण गेली होती. फक्त तीच एकटी राहिली होती.

काही महिने निघून गेले.

हा ग्रूप कलकत्त्यानंतर आता बंगाल व बिहारमध्ये 'शांतते'चे तुणतुणे वाजवीत फिरत होता. ते लोक दिवसभर जखमी लोकांची सेवा-शुश्रूषा करीत होते आणि संध्याकाळी गांधीजींबरोबर बसून 'रघुपति राघव राजाराम' ची धुन गात होते.

मुली परत आल्या होत्या. लखनौचे जीवन नेहमीप्रमाणे चालू होते. एके दिवशी चंपाने वर्तमानपत्रात वाचले की बिहारमध्ये फल्गू नदीच्या काठी दंगेखोरांनी काही कार्यकर्त्यांवर हल्ला केला असून जखमी लोकांमध्ये कमाल, हरिशंकर व गौतमही होते. चंपा घाबरली. तिने लगेच सायकल घेतली आणि ती 'गुलफिशाँ'कडे गेली. फाटकात प्रवेश करतानाच स्टेशनवॅगनमध्ये प्रवासाचे सामान भरले जात असल्याचे तिला दिसले. तहमीना, तलअत व निर्मला प्रवासाला निघाल्या होत्या. तहमीनाने तिला सांगितले, "सुदैवानं हरिशंकराचे काका त्यावेळी गयेला होते. ते त्या तिघांना मोटारीतून गोरखपूरला घेऊन आले. ते गोरखपूरचे सिव्हिल सर्जन आहेत. आता आम्ही गोरखपूरला चाललो आहोत."

"चंपा, तूही चल ना!" तहमीना म्हणाली. "गेले काही दिवस तू आमच्या-पासून इतकी फटकून राहिलीस...आम्हांला वाटलं, कॉलेजच्या कामातून तुला सवड होत नसेल...पण आता तर कॉलेज बंदच आहे तुझं...चल आमच्याबरोबर. परत येताना आम्ही तुला बनारसला तुझ्या घरी सोडून देऊ."

चंपाला तिच्या ग्रुपने अशा प्रकारे पुनः परत बोलावले.

* * *

ते तिघेही शूर शिलेदार सिव्हिल सर्जनसाहेबांच्या बंगल्याच्या मागील बाजूच्या रुंद व्हरांड्यात पलंगावर पडल्यापडल्या घसा खरडून गात होते. "चोलो हे ना गोरी... जोल पाये गोरी धाये!" तिघांनाही खूपच मार लागला होता. दिवसभर पडल्यापडल्या इकडचीतिकडची गाणी गात असत. गौतम दररोजच्या बातम्यांप्रमाणे आपला भावी कार्यक्रम बदलत होता. त्याच्या डाव्या हाताच्या बोटांवर अजून प्लास्टर बांधलेले होते. "माझी ही तीन बोटं मला कधीकाळी वापरता येतील की नाही, कोण जाणे!" तो उदास होऊन म्हणे. एके दिवशी तो कर्कश स्वरात म्हणाला, "चंपा, यापुढं मला कधीही पियानो वाजवता येणार नाही, असं नाही तुला वाटत?"

"का वाजविता येणार नाही? दोस्त, असा 'मॉरबिड' बनू नकोस. काय नाटक चालवलं आहेस!" कमाल म्हणाला. त्याच्या स्वतःच्या पायाचे हाड मोडले होते.

ते तिघे हिंडूफिरू लागले तेव्हा त्यांच्या परतण्याची तयारी सुरू झाली.

"चला, जरा भटकून येऊ. पुनः या बाजूला कधी येणं होईल कोण जाणे!"

कमाल म्हणाला. अलीकडे त्याच्या तोंडाला जणू कुलूप लागले होते. तो बसल्या जागी विचारात बुडून जाई; परंतु गौतमाला 'मॉरबिड' (रोगट) न बनण्याचा उपदेशही करीत असे.

"आपण इथल्या खेड्यांची स्थिती पाहिली पाहिजे. आपण मिर्झापूरलाही जाऊ. तिथं आमच्या कमरूनचं घर आहे."

तेथे प्रवासाचे वाहन म्हणजे फक्त हत्ती होते. ते हत्तींवर बसून कपिलवस्तूला गेले. गावचे लोक त्यांच्याकडे आश्चर्याने पाहात होते.

कमाल मोठ्या तल्लीनतेने एक दगड आपल्या रुमालाने पुसू लागला.

"आता या ठिकाणी ती कमळाची सरोवरं, सोनेरी हरिणांचे कळप आणि लता-वेलींचे कुंज, चमेलीच्या फुलांनी झाकलेल्या बारादर्‍या कुठं आहेत?" चंपाने आपल्या मनाशीच म्हटले.

"यार, भलतीच सामसूम आहे इथं." कमाल एकदम घाबरून म्हणाला.

"फारच गंभीर निःस्तब्धता आहे," हरिशंकर उत्तरला. "चला, आता परत निघू. हत्ती आपली वाट पाहात असतील."

कमाल खिन्नपणे बसून राहिला.

"शंकर, यार, इतिहास म्हणजे एक भयंकर 'फ्रॉड' आहे. इतिहास आपल्याला सारखा फसवत असतो." तो म्हणाला.

"खरं आहे." शंकराने नेहमीप्रमाणे त्याला पाठिंबा दिला.

ते हळूहळू चालत हत्तींजवळ आले. त्यांच्या सावल्या मोठ्या विचित्र दिसत होत्या.

## ३३

परत येताना चंपा बनारसला उतरली. कँटोनमेंट स्टेशनवर उतरून तिने आपल्या सहकाऱ्यांचा निरोप घेतला आणि टांग्यात बसून ती आपल्या घराकडे निघाली. रामलीलेची धामधूम सुरू झाली होती. आपल्या आळीत पोचल्यानंतर तिला दुरून आपल्या घराचे लहानसे फाटक दिसले. गुलाबी थंडीची रात्र होती. काळोखाने भरलेल्या समुद्रात जहाजावरील दिवे उठून दिसावेत तसे तिच्या घरातील दिवे दिसत होते. ती आत गेली. एका दूरच्या बहिणीच्या लग्नाची धामधूम चालली होती. सगळीकडे गडबड उडून गेली होती. दिवाणखान्याच्या दरवाजांवर सुती पडदे लावले होते. आत माचावर कलाबंतिणी

बसल्या होत्या. चंपा एका बाजूला अंधारात असलेल्या एका पलंगावर जाऊन पहुडली. त्या पलंगाच्या पायथ्याशी कुणा पाहुणीचे मूल दुलईत गुरंगटून झोपलेले होते. दिवाणखान्यातून हुसैनबाँदी कलावंतिणीचा भरदार आवाज ऐकू येत होता :

उसने कहा, 'तू कौन है ?'
मैंने कहा, 'शैदा[1] तेरा !'
उसने कहा, 'करता है क्या ?'
मैंने कहा, 'सौदा तेरा !'

आंगणाच्या भिंतीवर बायकांच्या हालचाल करणाऱ्या सावल्या थरथरत होत्या. कोणीतरी धपदिशी ओट्यावर लोटा आपटला. ओसरीवर झोपलेली कुणी मुलगी झोपेतच रडू लागली.

कलावंतिणी गात होत्या :

उसने कहा, 'करता है क्या ?'
मैंने कहा, 'सौदा तेरा !'

ती डोळे मिटून ऐकत राहिली. स्वयंपाकघरात तेलाचा दिवा जळत होता. सगळीकडे धुराचा धुरकटपणा आणि फोडणीचा वास पसरला होता.

घर !...घर !!...आपलं घर !!!

थोड्या वेळानंतर रात्रीची निःस्तब्धता पसरली. एक बैलगाडी खिडकीच्या खालून कर्रकर्र करीत जाऊ लागली. तिच्या चाकांतून एक प्रकारचा विचित्र, कर्कश आवाज निघत होता. चंपाला आठवले, एकदा रसूलन मोलकरीण म्हणाली होती, "जेव्हा गाडीतून असा आवाज ऐकू येतो तेव्हा भवानी आई कोपलीय म्हणून समजावं. मोठा अपशकुन असतो हा...फार मोठा अपशकुन..."

अचानक तिची छाती धडधडू लागली. काय होणार ? काय वाढून ठेवलंय भविष्यात ?...परंतु तिच्या बुद्धिवादी मनाने तिला समजावले, "काही नाही होणार... सारं काही ठीक होईल. अजून काही अराजक तर माजलेलं नाही..." परंतु कमाल तर म्हणतोय की...हुं: ! कमाल गेला मसणात !...त्याचंच विश्लेषण बरोबर असेल म्हणून कुणी सांगितलंय ? आणि हे कम्युनिस्ट काय म्हणतात ? हुं: !...त्यांची आपली उंटाची चाल !...विचार करिता करिता गौतम नीलांबर व कमाल यांचा आवेश, तलअतचा वाचाळपणा, तहमीनाचे गांभीर्य, वगैरे गोष्टी एकामागून एक तिच्या मनश्चक्षूंसमोरून

१. शैदा = आषक; फिदा झालेला.

तरळत जाऊ लागल्या...पण मी स्वतः कोण आहे? काय आहे? लोक मला काय समजतात? गौतमाचं माझ्याविषयी काय मत आहे? खड्ड्यात गेला गौतम!...आणि आमिर रजा...आमिर रजा...

दुसऱ्या दिवशी सकाळी दिवस कासराभर वर आला तरी ती उठली नव्हती.

दिवस जात होते. शूर्पणखेचे नाक कापण्यात आले, रावणाचे दहन झाले, भरतभेट झाली, कृश शरीरयष्टीची मुले तोंडाला पावडर व सफेती लावून, बेगडाचे नकली मुकुट घालून राम-लक्ष्मण बनली आणि मोठ्या अभिमानाने फिरत्या सिंहासनावर आरूढ झाली. त्यांच्या ठिकाणी माणसांना परमेश्वराचे दर्शन झाले. सुटी संपल्यानंतर ती लखनौला परतली. कार्तिक महिन्याच्या (आपल्याकडील आश्विनाच्या) अमावास्येला दिव्यांनी प्रकाशमान बनविले. घरोघरी लक्ष्मीची पूजा करण्यात आली. "आज लोणा चांभारणीचं राज्य आहे." 'गुलफिशाँ'च्या व्हरांड्यात बसलेल्या खाला बेगम मुलांना सांगत होत्या, "बाळांनो, आज बाहेर भटकू नका. आज रात्री किती जादू-टोणे केले जातील, देव जाणे!" समोरच्या चौकात एका द्रोणामध्ये मिठाई ठेवण्यात आली होती आणि त्याच्याजवळ दिवा जळत होता. ते तिथे कोण ठेवून गेले होते, कोण जाणे. "तुम्हांला आठवतंय? एकदा जादूची हंडी उडत आली होती आणि ती आपल्या आंगणात पडली होती ते?" तलअत म्हणाली. ती मंडळी हिरवळीवर येऊन आभाळाकडे पाहू लागली. "आज रात्री लक्ष्मी आपल्या वाहनावर बसून साऱ्या जगभर संचार करते. कुणाकुणाच्या घरात ती प्रवेश करील, कोण जाणे!...अरे मुलांनो, बाहेर हिरवळीवर जाऊ नका." खाला बेगम पुन्हा बजावून सांगू लागल्या, "पावसाळ्यातला साप दिवाळीचा दिवा चाटून बिळात जात असतो."

जागजागी चौकांतून व गल्लीबोळांतून जुगार खेळला जात होता. रामऔतार व कदीर जुगार खेळायला गेले. ("अरे, आज जुगार खेळलो नाही तर पुढल्या जन्मी चिचुंद्रीची योनी मिळेल." रामऔतार म्हणाला.) मग भाऊबीज आली. नंतर मार्गशीर्ष व पौष महिन्यांतील दवाने झाडांवर चांदीचा वर्ख चढविला. खेड्यापाड्यांतून नौटंकीची गाणी दुमदुमली. शुभ्र आखूड साड्या नेसून खिस्ती स्त्रिया गात फिरू लागल्या. "आ हो, येशू आला आकाशातून...आकाशातून!" खिचडीचा (रथसप्तमीचा) सण आला आणि लोक माघस्नानासाठी त्रिवेणीसंगमावर जाऊ लागले. वसंतपंचमीला घरोघरी सरस्वतीपूजा करण्यांत आली. मानवांनी आपल्या कल्पनेच्या चक्षूंनी पाहिले की गोरीपान देवी शुभ्र साडी नेसून श्वेतकमळावर बसली आहे आणि दैवी जळावर तरंगत आहे. कुंभारांनी बनविलेल्या मातीच्या मूर्तीतही त्यांना देवी दिसली. आणि मग फाल्गुन आला. शिवरात्रीची तयारी सुरू झाली.

मोहरमाची धामधूम सुरू झाली. घरोघरी गवताचे, मेणाचे व कागदाचे ताबूत बनविण्यात आले. लोकांनी आपले कलाकौशल्य त्यांवर पणाला लावले. त्या कागदाच्या, बेगडाच्या व रेशमाच्या पाळण्यांमध्ये व ताबुतांमध्ये देखील त्यांना ईश्वरी तेजाचे दर्शन झाले. इमामवाड्यांवर रोषणाई करण्यात आली. गल्लीबोळांतून पिलू व दुर्गा रागांत हसन-हुसैनांसंबंधीची शोकगीते गायिली गेली. मार्च महिन्यात सारे वातावरण अबीर व गुलाल यांनी रंगून निघाले. होळीची गीते गाण्यात आली. ती गाणारे लोक रस्त्यांतून फिरू लागले.

हा सारा बुद्धिभ्रंश होता. मनाची फसवणूक, नजरबंदी होती. कोणत्याच गोष्टीत काही अर्थ नव्हता. केवळ वैयक्तिक आनंद ही मूलभूत गोष्ट होती. हा आनंद जेथून मिळेल, जेवढी किंमत देऊन मिळेल, तेथून व तेवढ्या किमतीला घ्या. तुमचे सिद्धांत, तुमच्या तुरुंगाच्या वाऱ्या, तुमची काँग्रेस, तुमची मुस्लिम लीग हा सारा निव्वळ बकवा आहे. तुम्ही लोक मानवतेच्या भाग्याचा निर्णय लावायला निघाला आहात— तुमच्या मारामाऱ्यांमध्ये माणसाचे खंडोगणती रक्त वाहिले आहे. छेः छेः! मला फक्त वैयक्तिक आनंद हवा...खासगी आनंद! घर, शांतता, मुलेबाळे, पतीचे प्रेम!

"शिः! कसले भयंकर विचार डोक्यात घोळवते आहेस, चंपाबेगम! जरा तरी लाज वाटू दे तुला. केवढी शरमेची गोष्ट आहे ही—" खिडकीत तंगड्या अडकवून बसलेले तिचे बुद्धिवादी अस्तित्व तिच्याकडे वळून म्हणाले, "काही लाजलज्जा?" त्या आवाजाचा प्रतिध्वनी वातावरणात दुमदुमला. भाद्रपदातील पावसाचे टपोरे थेंब आपल्याला उद्देशून हे शब्द उच्चारीत आहेत, असा भास तिला झाला. काळ्या ढगांनी चोहो बाजूंनी येऊन तिला वेढले. एवढा जोराचा लोंढा आला की आकाश-पाताळ एक होऊन गेले. नद्यानाले दुथडी भरून वाहू लागले. गौडमल्हाराच्या आलापांमध्ये जगाची सारी वेदना केंद्रित झाली. पूर्वेच्या वाऱ्याने हृदयाचे तुकडे-तुकडे केले.

झाडांच्या फांद्या बाजूला सारीत ती रस्त्यावर आली. समोर प्रोफेसर बॅनर्जींचा बंगला होता. त्यांच्या दिवाणखान्यात आज पुनः खूप लोक जमले होते. आज जगातील फार महत्त्वाचे निर्णय घेण्यात आले. (हे लोक निर्णय घेताना माझा विचार का करीत नाहीत? मी चंपा अहमद, जी इथे एकाकी उभी आहे!) दिवाणखान्यातील पडद्यांमागे ते सगळे गोळा झाले होते. ती हळूच चमेलीच्या ओल्या ताटव्यांतून वाट काढीत खिडकीखाली जाऊन राहिली, आणि तिने आत डोकावून पाहिले. प्रोफेसरसाहेब शुभ्र धोतर व सदरा घालून स्तब्धपणे सोफ्यावर बसले होते. तेथे गौतमही होता आणि कमालही होता. गौतम नवीन भारतीय वकिलातीबरोबर मॉस्कोला चालला होता.

दिल्ली, सिमला, नं. १० औरंगजेब रोड, व्हाइसरीगल लॉज, भंगी कॉलनी—वगैरे शब्द

चंपाच्या कानी आले. ती खिडकीजवळून दूर झाली; आणि पुनः सडकेवर आली.

आता तिच्यासमोर दोन जगे होती.

एका जगात हे लोक होते. त्यांचे विचार, त्याचे आदर्श, त्यांचे संघर्ष. परंतु येथे भविष्यकाळ अस्पष्ट होता. दुसऱ्या जगात शांतता होती, सुरक्षितता होती, वैयक्तिक आनंद होता. आमिर रजा पाकिस्तानला चालले आहेत. का जाणार नाहीत ? ते कमालासारखे माथेफिरू थोडेच आहेत ? इथे त्यांना काय भवितव्य आहे ? नव्या राष्ट्रात वर चढत ते कुठल्या कुठे जाऊन पोचतील. वैयक्तिक आनंद, वैयक्तिक उन्नती, वैयक्तिक उद्दिष्ट...यांचा विचार माणसाने का करू नये ? अखेर, राजकारण म्हणजेच काही संपूर्ण जीवन नव्हे. इतरांचा विचार मी का करावा ? इतरांनी आतापर्यंत माझ्यासाठी काय केलंय ?...ती तपशीलवारपणे विचार करू लागली....मी आमिर रजाशी शादी करून पाकिस्तानात जाईन. किती सोपी गोष्ट आहे !...अचानक तिला असा भास झाला की सगळी दंगल थांबली आहे, सगळीकडे शांतता नांदते आहे. कल्पनेनेच तिने आपले नाव वाचले; बेगम आमिर रजा, कराची. किती छान ! पण हे लोक...यांची आठवण मेली कधी जायची नाही. परंतु माणसाला जगात हवी असलेली प्रत्येक गोष्ट कधी मिळतच नसते. केक खायलाही हवा आणि शिल्लक उरायलाही हवा, हे कसं शक्य आहे ? ती शाही फाटकापर्यंत जाऊन पोचली. तिच्या मागून गौतम येत होता.

"चंपाताई, खुदा हाफिज !" तो म्हणाला.

"मॉस्कोला चाललास ना ?"

"होय. कमाल जुलैत जाईल. तलअत आणि निर्मलाही चालल्याहेत. त्या सर्वांना केंब्रिजमध्ये प्रवेश मिळालाय."

ती बादशाहबागेच्या फाटकाच्या जुनाट विटांना पाठ टेकवून उभी राहिली.

"अखेर मी काय करावं, ते तू मला सांगत का नाहीस ?" ती जवळजवळ ओरडूनच म्हणाली.

"तुम्हांला कोणकोणत्या बाबतींत माझा सल्ला हवाय ? तुम्हीच तर म्हणाला होता की कुणी कुणाला सल्ला द्यावा ? कोण कुणाचा उपदेशक बनणार ? चंपाताई, मी हलकट नाही; फक्त वास्तववादी आहे !"

"तुझ्याजवळ माझ्यासाठी फक्त हेच शब्द आहेत ?"

"तुम्ही तर शब्दांमध्ये त्यांचे अर्थही पाहू इच्छीत नाही. तेव्हा काय फरक पडणार ? मी जे काही बोलेन ते निरर्थकच असेल. खुदा हाफिज ! 'गुलफिशाँ'मध्ये गेलात तर अप्पीला सांगा. मी सकाळी दिल्लीला चाललोय." इतके बोलून तो निघून गेला.

एवढ्यात कमाल तेथे आला.

"चंपाताई, अभिनंदन! तुमचं पाकिस्तान तुम्हांला मिळालं!" त्याच्या स्वरात इतकी कटुता, घृणा व निराशा दडलेली होती की तिच्या केवळ कल्पनेनेच चंपाच्या जिवाचा थरकाप झाला. आता कमाल एक चांगलं लेक्चर झोडणार, घालूनपाडून बोलणार, असे ती गृहीत धरून चालली होती. परंतु हे काय? कमाल अगदी गप्प होता. जणू आता काही सांगण्याची, ऐकण्याची, रागावण्याची, वाद घालण्याची वेळ टळून गेली होती. आता वाणीचे काम उरले नव्हते. निर्णय व अंमलबजावणी यांची प्रतीक्षा करणारे एक वास्तव जग समोर उभे होते. कमाल एक क्षणभर निमूटपणे फाटकाकडे पाहात राहिला. त्यानंतर तोही काही न बोलता पुढे निघून गेला.

ती एकटीच त्या अंधुक काळोखात तेथे उभी राहिली. ते सारे तिची साथ सोडून आपापल्या मार्गांनी निघून गेले होते.

ती रस्त्यावर आली. सर्वत्र सामसूम होती. घरे व झाडे यांच्या पलिकडे 'गुलफिशाँ' बंगला होता. आता 'गुलफिशाँ' तिला परका झाला होता. परंतु त्यात 'तो'ही होता— जो तिचा हात आपल्या हातात घेणार होता 'तो'. ती त्याच्या मार्गाने जाणार होती. अखेर जीवनात रोमान्स, प्रेम, गुलाबाच्या कळ्या यांना काही स्थान आहे की नाही? माणूस सावल्यांचा पाठलाग कुठवर करणार? मी त्याला म्हणेन, "घे. ही मी आल्ये. दंगली संपल्या. आता शांततेची, विश्रांतीची वेळ आहे. या लोकांना संघर्षांच्या व कष्टांच्या दरीत वेड्यांप्रमाणे आपले केस उपटत, भटकत राहू द्या. अखेर अशी एक वेळ येईल की जेव्हा हेही थकून जातील आणि मान खाली घालून आसरा शोधू लागतील. ही पाहा मी आल्ये. निर्भेळ रोमान्सचा अर्थ मला पूर्णपणे समजलेला नाही. त्या रोमान्सचे प्रतीक तू आहेस. (इथं प्रत्येक गोष्टीचं प्रतीक आहे. या लोकांनी सारं जीवन प्रतीकांमध्ये विभागून टाकलंय!) पण आता मी तुझ्याकडे आल्ये आहे."

* * *

'गुलफिशाँ'च्या फाटकावर तिला रामऔतार माळी भेटला.

"भैयासाहेब आहेत?" तिने विचारले. आपला आवाज थरथरत असल्याचे तिला अकस्मात आढळून आले. ती चोरांप्रमाणे घाबरली आहे. ती 'गुलफिशाँ'मध्ये घरफोडी करायला आली आहे.

"भैयासाहेब तर आताच गेले."

"कुठं?"

एवढ्यात बागेच्या अंधारातून गंगादीनही पुढे आला.

"कुठं गेले भैयासाहेब?" चंपाने पुनः विचारले.

"तिकडेच !" रामऔताराने कडवटपणे उत्तर दिले, "मुसल्मानांच्या पाकिस्तानात! आता तुम्हीही जाणार असाल ना? सगळेजण जाणार? आम्ही इथं एकटेच राहाणार!"

"भैयासाहेब मुंबईला गेलेत. तिथं जहाजांची वाटणी व्हायची आहे. ते आपली मुसलमानी जहाजं घेऊन कराचीला जाणार आहेत, असं कदीर म्हणत होता." रामऔताराने माहिती दिली, आणि 'हो लाला ला लाला!' असे ओरडत त्याने पोपटांना उडवून लावण्यासाठी फळांच्या झाडांवर एक दगड भिरकावला.

गंगादीन व रामऔतार यांना तसेच विचारमग्न अवस्थेत सोडून ती परत निघाली. भैयासाहेब निघून गेले. कारण घोडे, मोटारी आणि पोरी यांच्या व्यतिरिक्त त्यांच्या जीवनात एक नवे आकर्षण निर्माण झाले होते. नवा देश, नवा हुद्दा, बढती, नव्या समस्या—पुरुषांचे जग किती वेगळे असते!

"या माणसासाठी मी किती वेळ वाया घालविला! अरेरे, किती मूर्ख मी!" ती मनाशी म्हणाली, "थोडक्यात इत्यर्थ हा की भैयासाहेब अत्यंत देखणे आहेत आणि त्यांच्या संगतीत माझा वेळ फार छान गेला. स्मृतींच्या खजिन्यात अशा वेळाचीही जरूर असते. पण, माझं काही त्यांच्यावर प्रेम नव्हतं. छेः, मुळीच नव्हतं!" समोर भैयासाहेबांचे पूर्वीचे जग होते. 'गुलफिशाँ'ची हिरवळ, तिच्या कडेला असलेली युकॅलिप्टसची झाडे...त्यांचे सोबती...कमाल, गंगादीन...त्यांचे घराणे, त्यांची चुलतबहीण तहमीना. ती आत बसली असेल. तीही त्याच्यासाठी जीव टाकीत होती. भैय्यासाहेब रूपवान होते आणि अहंमन्य, घमेंडखोरही! त्यांना एवढी कसली घमेंड होती कोण जाणे!—या विचाराने चंपाला हसू आले. तिला वाटले, आपण खूप जोरजोराने, खदखदून हसावे. "अखेर माणसे घमेंड बाळगतात कशाची? आपल्या व्यक्तिमत्त्वाची? व्यक्तिमत्त्व! गौतम नीलांबराला आपल्या बुद्धीची घमेंड आहे. कमालाला आपल्या सिद्धांतांना चिकटून राहिल्याचा अभिमान आहे. तहमीनाला आपल्या कोमल भावनांचा गर्व आहे. माणसं इतकी गर्विष्ठ का असतात?..." चंपाने चालता-चालता आकाशाकडे पाहिले. "पाऊस येणार. वारा मुक्तपणे वाहतो आहे. पानांच्या सळसळीत एक विचित्र प्रकारचे समाधान लपले आहे. हे सारे केवळ मलाच जाणवते आहे की इतर लोकांनाही या स्वातंत्र्याचा अनुभव येत असेल? उदाहरणार्थ तहमीना...आणि गौतम...आपल्या चुलतभावाच्या बायकोवर प्रेम करणारा..."

"हा! हा! हा!... हाऊ फनी!" ती मनात म्हणाली.

आणि ती झपझप चालू लागली. ओली सुगंधित धरती दूरवर पसरली होती. आंब्याच्या झाडांवर गडद तपकिरी ढग भरून आले होते. 'गुलफिशाँ'ला एक प्रदक्षिणा

घालून ती परसदारच्या रस्त्यावर आली. तिकडून एक कच्चा रस्ता 'सिंघाडेवाली कोठी' आणि नदी यांच्याकडे जात होता. समोर बोरूच्या घाटांचा कूड होता. चोहोंकडे फुलांच्या वेली डवरल्या होत्या. प्रत्येक गोष्ट जशीच्या तशी होती. समोर दुध्या भोपळ्याच्या वेलातून तिला कमरूनचा पदर दिसला.

"काय हो, काय झालं?" कमरूनने एकाएकी पुढे होऊन विचारले.

"काही नाही, ड्रायव्हरकी बीबी!" ती म्हणाली.

कमरून काही न बोलता तिच्याकडे पाहात राहिली.

"मी इथं थोडा वेळ बसू, ड्रायव्हरकी बीबी?"

"या, या ना बाईसाहेब! अवश्य बसा. पाऊस येतोय. इथं ओसरीवर या ना!"

ती सर्व्हंट्स क्वार्टरच्या ओसरीवर गेली. तेथील जमीन ओलसर होती. कट्टयावर ठेवलेली मांडी लकाकत होती. एका चादरीवर पापड पसरलेले होते.

"पापड वाळवीन म्हटलं तर उन्हाचं दर्शन नाही." कमरून सांगू लागली. काहीतरी बिनसले आहे, हे तिने ओळखले होते. बंगल्यातही सगळे सामसूम होते. "बाई ग, तुम्हांला पुरुषांचा स्वभाव कळत नाही. आम्हांला चांगलं ठाऊक आहे की जेव्हा आम्ही पुरुषाची चांगली सेवा-चाकरी करू, त्याच्यासाठी आपला जीव गहाण टाकू तेव्हाच तो खूष राहातो. तसं पाहिलं तर पुरुषमाणूस कधीच खूष होत नाही. पण आपण धडपडत राहायला पाहिजे. मी तहमीनाताईना किती समजावलं की, बाई ग, मुलींनी आपली शक्ती, आपली मर्यादा ओळखली पाहिजे. पण त्या तर भैयासाहेबांशी भांडतच राहिल्या. आता बघा ना, त्यांच्याशी एक शब्दही न बोलता ते पाकिस्तानला निघून गेले. आता बाईसाहेब बसल्याहेत रडत."

"अग, भैयासाहेबांना काय सोनं लागलंय? ते नाहीत तर दुसरे कुणी! सगळे पुरुष सारखे थोडेच असतात, ड्रायव्हरकी बीबी!" चंपा गोंधळून म्हणाली.

"अंऽहं! सगळे पुरुष एका माळेचे मणी असतात, बाईसाहेब!" कमरून म्हणाली, "विडा बनवू?"

"नको कमरून, राहू दे. आता मीही निघते." चंपा पिढ्यावरून उठत म्हणाली; आणि छत्री हातात धरून पायवाटेने जात झाडांच्या गर्दीत दिसेनाशी झाली.

कमरून ओसरीवरून उदासपणे बाहेर पाहात रामऔताराची बायको छुटकी हिला म्हणाली, "या आजकालच्या पोरींना एवढी गोष्ट का कळत नाही, कोण जाणे."

"या मुलींमध्ये हिम्मत नाही. त्या घाबरतात. इंग्रजीची चार बुकं वाचली म्हणजे आपल्याला जगाचं ज्ञान झालं, असं त्यांना वाटतं. त्यांच्यात हिम्मत नाही, हेच खरं." -छुटकीने मान हलवून उत्तर दिले.

# ३४

तलअत तंबोरा घेऊन व्हरांड्यात येऊन बसली. तिला 'अबके सावन घर आ जा' ही चीज गायची होती. परंतु तिच्या गळ्यातून आवाजच बाहेर पडेना. तहमीना खोलीत बसून शिवण्याच्या यंत्रावर ब्लाउझ शिवत होती. पाऊस थांबल्यामुळे उकाडा एकदम वाढला होता. तलअत उठून खोलीत गेली.

तहमीनाने मान वर करून तिच्याकडे पाहिले—जणू ती कोणीतरी रहस्यमयी मुलगी होती. पंखा घर्रघर्र करीत होता. बाहेर वृक्षावर एक कोकिळ सारखा 'कुहू कुहू' करीत होता. खूप दुरून रामऔताराचा आवाज येत होता. अचानक तलअतचा आत्मविश्वास परत आला.

"अप्पी, हा सारा भावनांचा खेळ आहे. भावना, बौद्धिक सहानुभूती आणि समीकरणं!" ती विद्वत्तापूर्ण भाषण देऊ लागली. गौतम वगैरे मंडळींच्या सहवासात इतका काळ घालविल्यामुळे या शब्दांवर तिचाही विश्वास बसला होता.

"म्हणजे आता तूही हे चारशेवीस सुरू केलंस तर!" तहमीना चिडून म्हणाली.

"चारशेवीस?" तलअत घाबरून म्हणाली, "अप्पी, हे सत्य आहे. समस्यांचा त्रिकोण बनतो. तुझी समस्या, भैयासाहेबांची किंवा चंपाताईची समस्या, आणि सर्वांची 'इंटर ॲक्शन', म्हणजे..."

तहमीना तिच्याकडे निरखून पाहात म्हणाली, "तू केंब्रिजला जाणार ना?"

तलअतला राग आला. अप्पी मला अगदीच बावळट समजते. देवाशपथ, अप्पी मला खुळी समजते.

"म्हणजे तुझ्या दृष्टीनं मी अगदीच बावळट आहे, नाही?" तिने दुःखी स्वरात विचारले.

"छे ग बाई, तू किती किती शहाणी आहेस...पण अखेर तू स्त्रीही आहेस."

"अप्पी!" तलअत ओरडून म्हणाली, "शिः! तू तर कमालच केलीस. तू इतकी बूर्झ्वा बनली आहेस! तुझं सारं शिक्षण चुलीतच गेलं म्हणायचं की." तिच्या मनात विचार आला, अप्पीच्या या मनोवृत्तीपुढे आपण डोके फोडून घ्यावे. तहमीना कपाटातून रंगीत दोऱ्याची रिळे काढीत होती. तिच्याकडे पाहून ती म्हणाली, "अरेरे! अप्पी, अग, तू चळवळीत सामील झाली होतीस ना! केवढी आवेशपूर्ण व्याख्यानं तू देत होतीस. चंपाताईसारख्या प्रतिगामी मुलीला पुरोगामी बनविण्यासाठी तू केवढा आटापिटा केलास. आणि आता तू 'स्त्री'चं लेबल लावून गप्प बसणार? अग,

लढायला तयार हो. काम कर. भैयासाहेब गेले म्हणून काय झालं? कोंबडा नसला म्हणून काय उजाडायचं थांबतं? शिवाय, त्यांच्याशी लग्न करायचं नाकारलंस तूच, आणि आता रडते आहेस तूच—हे गूढ मला उकलत नाही. खड्डयात गेले भैयासाहेब! अग, त्यांचं डोकंही तूच फिरवलंस. निर्मला म्हणते ते अगदी बरोबर आहे. पुरुषांना एवढं डोक्यावर चढवून ठेवता कामा नये. नाहीतर त्यांचं डोकं फिरायला वेळ लागत नाही. सतत सहा वर्षं तुझ्या नाकावर टिच्चून ते चंपाताईशी प्रेमाचे चाळे करीत होते. आणि आता ते गेले म्हणून तू मुसमुसून रडते आहेस. अग, एक चप्पल लगावली असतीस भैयासाहेबांच्या नाकावर..."

"तलअत, किती झालं तरी ते तुझे थोरले भाऊ आहेत. असा असभ्यपणा करू नकोस."

"छान! तू त्यांची बाजू घेऊन माझ्याशी भांडतेस. एवढीच कसर राहिली होती..."

बोलता बोलता रागाने व दुःखाने तलअत अगदी रडकुंडीस आली. भय्यासाहेबा-ऐवजी तिला अप्पीचाच राग येत होता. ती तिच्यापेक्षा वयाने मोठी नसती तर अशी काही खरडपट्टी काढली असती की सारी निष्ठा, प्रेम, आणि बूझर्वा रोमँटिकता कुठल्या कुठे पळून गेली असती. हाय! हाय! अखेर ती त्या खोलीतून उठून गेली; आणि सायकल घेऊन निर्मलेच्या घरी गेली. तेथे जाऊन तिने बीटरूटची भजी खाल्ली, पाणी प्यायली आणि निर्मला, मालती व हरिशंकर यांच्या बरोबर पत्त्याचे चार डाव खेळली. तेव्हा कुठे तिचा राग थोडा शांत झाला.

तलअत निघून गेल्यानंतर तहमीना मशीनवरून उठली आणि खिडकीशी जाऊन उभी राहिली. "पहिला अंक संपला—" ती मनाशी म्हणाली, "वातावरणात वादळाची चाहूल येऊ लागली आहे आणि 'गुलफिशाँ'चा पाया डळमळला आहे. आम्हां सर्वांची आपापली खासगी वादळे आहेत. हे नाटक लिहून काढले तर माझी भूमिका अशी राहील: 'नबाबजादी तहमीना बेगम, वय पंचवीस वर्षे. फर्स्टक्लास एम. ए., सावळी, किडकिडीत, सेंटिमेंटल. मनातल्या मनात कुढत असते. घरी हिला 'अप्पी' या नावाने संबोधतात. मनमिळाऊ, सौम्य स्वभावाची व घमेंडखोर.'—एवढा परिचय दिल्यानंतर आणखी सांगण्यासारखे काय उरते?"

"लाहौल विलाकुवत!..." ती व्हरांड्यात आली. पाऊस थांबला होता. ओट्यावर नात्यातली बरीचशी मुले 'कोडा जमालशाही'चा (कापडाचा पिळा मागे लपविण्याचा) खेळ खेळत होती.

कमालाने ओट्याच्या भिंतीवरून डोकावून पाहिले. तहमीनाने त्याच्याकडे खिडकीतून पाहिले. ही सारी नाटकातील पात्रे होती. स्वप्नात वावरत होती. रंगभूमीवर संधिप्रकाश पसरला होता. तीही बाहेर आली.

कमालाने मुलांबरोबर कोडा जमालशाही खेळण्यास सुरुवात केली.

"कोडा जमालशाही, पीछे देखा मार खायी...पीछे देखा (मागं पाहिलंस)...हॅलो अप्पी!" तो धावता धावता म्हणाला.

तहमीना ओसरीवरच्या खांबाला टेकून उभी राहिली आणि त्याच्याकडे पाहू लागली.

"कोडा जमालशाही...अप्पी! चंपाताई चालली...किंबहुना गेलीच म्हणायची... पीछे देखा मार खायी..."

"काय झालं?...कुठं?" तहमीनाने चमकून विचारले.

"फ्रान्सला...कोडा जमालशाही..." त्याने एका लहान मुलीला कापडाचा पिळा जोरात मारला. ती खदखदून हसली आणि त्याच्या मागे धावू लागली.

"ती कशी?" तहमीनाने विचारले.

"युनिव्हर्सिटीची स्कॉलरशिप मिळाली." कमाल म्हणाला. मुले भरभर उठून धावू लागली. अखेर कमाल कापडाचा पिळा हिरवळीवर टाकून पळून गेला.

रस्त्यावर जाऊन कमालाने 'गुलफिशाँ'वर एक दृष्टि टाकली आणि खिशात हात कोंबून तो सिंघाडेवाली कोठीकडे गेला.

* * *

यंदा ऑगस्ट महिन्यातला पाऊस इतका जोरदार झाला की जणू सारी पृथ्वी जलमय झाली. सिंघाडेवाली कोठीच्या व्हरांड्यात चटई अंथरून ती सर्वजण आकाशातील ढगांकडे पाहात बसली होती. वातावरण अनुकूल असल्याचे पाहून तलअतने पुनः तंबोरा लावून मल्हार गाण्याचा प्रयत्न केला; परंतु तिच्या कंठातून आवाजच फुटेना. जणू सारे स्वर बुडून गेले होते.

पावसाचे पाणी स्वच्छ व निर्मळ होते. श्रावणाची अद्भुत धूसरता सर्वत्र पसरली होती. परंतु तिच्यात रक्त मिसळले होते. रक्ताचा वर्षा ऋतु, रक्ताचा चिखल, रक्ताचा वर्षाव करणारे ढग. जिकडे तिकडे रक्तच रक्त पसरलेले पाहून तलअत बेजार झाली. गोमती नदी रक्ताळली होती. फुलांवर रक्ताचे डाग होते. माणसांच्या डोळ्यांत खून चढल्यामुळे ते रक्तासारखे लाल दिसत होते. तिने घाबरून निर्मला व हरिशंकर यांच्याकडे पाहिले.

## ३५

आणि जेव्हा दोन्ही भावांमध्ये गृह-युद्ध सुरू झाले तेव्हा अर्जुन आपले धनुष्य उचलून म्हणाला, "हे जनार्दना, माझा रथ दोन्ही सैन्यांच्या मधोमध नेऊन उभा कर; म्हणजे कोणत्या पक्षाकडून मला लढले पाहिजे ते समजेल."

आणि त्याप्रमाणे श्रीकृष्णाने रथ नेऊन तेथे उभा केला. तेव्हा अर्जुनाला असे दिसून आले की दोन्ही सैन्यांत एकमेकांचे वाडवडील, बाप, आजोबा, काका दोन्ही एकमेकांविरुद्ध मोर्चे बांधून उभे आहेत.

तेव्हा तो कुंतीचा पुत्र दुःखात बुडून म्हणाला, "हे कृष्णा, हे दृश्य पाहून माझे हात-पाय गळून गेले आहेत. माझ्या घशाला कोरड पडली आहे. माझे शरीर थरथरा कापत आहे. माझ्या डोकीचे केस ताठ उभे राहिले आहेत. माझे धनुष्य हातातून गळून पडत आहे. माझे अंग तापले आहे. हे केशवा, मी ताठ उभा राहू शकत नाही. माझे डोके गरगरत आहे. मला अपशकुन, दुश्चिन्हं दिसत आहेत. हे माधवा, मी आपल्याच कुटुंबियांना, मित्रांना आणि गुरुजनांना मारू इच्छीत नाही...

"कारण, कुलक्षयामुळे सनातन कुलधर्म लयाला जातात; आणि धर्मनाश झाला की कुटुंबाचाही नाश होतो. अधर्म माजला की कुलस्त्रिया भ्रष्ट होतात आणि पूर्वजांची प्रतिष्ठा धुळीला मिळते. तसे झाले म्हणजे त्यांचा आदर व अनुकरण करणारा कोणी शिल्लक उरत नाही.

"हे मधुसूदना, आम्हां दोघांपैकी कोण श्रेष्ठ आहे, मी की माझा शत्रू, हे मला कळत नाही. आम्ही त्यांचा पराभव केला पाहिजे की त्यांनी आम्हांला पराभूत केले पाहिजे, हेच मला समजेनासे झाले आहे. हे गोविंदा!"

## ३६

हिंदुस्तान : इसवी सन १९४७

## ३७

स्लिल डेरिक एडविन हॉवर्ड ॲश्लेने पुनः एकदा घड्याळावर नजर टाकली आणि पिकॅडलीच्या ट्यूब स्टेशनात साऱ्या जगाला वेळ दाखविणाऱ्या घड्याळाखाली येरझाऱ्या घालण्यास त्याने सुरुवात केली. तो अगदी त्रासून गेला होता. अशा प्रकारच्या 'रॉंदेवू'-(भेटी)चा त्याला नेहमी तिटकारा वाटे. परंतु त्याने चंपा अहमदला नाटकाला नेण्याचे वचन दिले होते; आणि दिलेले वचन पाळणे कोणत्याही परिस्थितीत आवश्यक होते. अखेर कंटाळून त्याने 'न्यू स्टेट्समन अँड नेशन' पत्र पुनः वाचण्यास सुरुवात केली. त्यामध्ये गौतम नीलांबर नावाच्या एका भारतीयाचे हिंदुस्तानची फाळणी आणि युद्ध व शांतता यासंबंधीचे एक पत्र प्रसिद्ध झाले होते. सुरेखा आहूजाच्या घरी जाऊन या विषयावर मित्रांशी चर्चा करण्यास स्लिल उतावीळ झाला होता.

स्लिल हा द्वितीय लॉर्ड बार्नफील्डचा धाकटा मुलगा. त्याचे आजोबा प्रथम लॉर्ड स्लिल डेरिक एडविन ॲश्ले यांनी या ॲरिस्टोक्रॅट घराण्याचा पाया घातला होता. स्लिलचे पणजोबा सर स्लिल हॉवर्ड ॲश्ले हे एका गरीब पाद्र्याचे चिरंजीव होते आणि अठराव्या शतकाच्या अखेरीस कारकून म्हणून बंगालला गेले होते. तेथे त्यांनी ईस्ट इंडिया कंपनीची नोकरी करीत असताना निळीच्या व्यापारात लाखो रुपये मिळविले होते. अवधच्या बादशाहाच्या दरबारातही त्यांनी खूप हात धुवून घेतले होते. मृत्यूपूर्वी ते कोणत्या तरी प्रांताचे अधिकारी बनले होते; आणि त्यांच्या एकुलत्या मुलाने तरुणपणी इंग्लंडात रबराचा व्यापार सुरू केला होता. त्याने गावे व महाल खरेदी केले. लॉर्ड ही पदवी मिळविली. पार्लमेंटमध्ये प्रवेश मिळविला आणि रीतसर ॲरिस्टॉक्रसीत शिरकाव करून घेतला. ते पहिले लॉर्ड बार्नफील्ड. त्यांचा मुलगा दुसरा लॉर्ड बार्नफील्ड ब्रिटिश साम्राज्याचा अधिकच गौरवशाली पुत्र ठरला. त्याने ब्रिटनच्या परराष्ट्रीय खात्यातील नोकरीत मोठमोठी कामे केली. तुर्कांचा व अफगाणांचा धुव्वा उडविला. भारतीय स्वातंत्र्य आंदोलनाविरुद्ध पार्लमेंटमध्ये कायदे केले. एक सच्चा 'टोरी' या नात्याने त्याला काळ्या लोकांचा—विशेषतः अर्धसंस्कृत भारतीयांचा—मनापासून तिटकारा वाटत असे. त्याचे आजोबा 'नबाब' स्लिल ॲश्ले खरोखरी मोठे रोमँटिक गृहस्थ असले पाहिजेत. कारण ते कोंबड्यांच्या झुंजी लावीत असत आणि हुक्का पीत असत. त्यांचे एक चित्र रॉयल ॲकॅडमीचे चित्रकार जूफनी यांनी काढले होते. त्या चित्रात ते प्रचंड लांब असलेल्या एका व्हरांड्यात आरामखुर्चीत पडल्यापडल्या गुडगुडी ओढत आहेत आणि एक काळाकुळकुळीत नेटिव्ह नोकर मागे उभा राहून मोरपिसांची

चवरी ढाळत आहे. हे चित्र 'मॅनोर'च्या मधल्या दिवाणखान्यात लावलेले होते.

दुसरे लॉर्ड बार्नफील्ड दुसऱ्या महायुद्धात जर्मनांच्या बॉंबहल्ल्याला बळी पडले. त्यांना दोन मुलगे होते. थोरला मुलगा तिसरा लॉर्ड बार्नफील्ड आता कौटुंबिक संपत्तीचा व व्यवसायाचा मालक होता. स्लिल हा धाकटा मुलगा.

बार्नफील्ड कुटुंबाला आता उतरती कळा लागली होती. मलायातील त्यांच्या रबराच्या मळ्यात कम्युनिस्टांनी आश्रय घेतला होता. कीनियामध्ये माओ-माओ संघटनेने धुमाकूळ घातला होता. भारताला स्वातंत्र्य मिळाले होते. या सर्व घटनांमुळे आलेल्या आर्थिक हलाखीला तोंड देण्याचा एक मार्ग म्हणून त्यांनी दर रविवारी आपल्या बार्नफील्ड हॉल या वडिलोपार्जित महालाचा उपयोग करून घेण्यास सुरुवात केली होती. तिकीट लावून ते हा वाडा लोकांना दाखवीत. या वाड्यात अनेक प्राचीन मौल्यवान वस्तू होत्या. त्याच्या सभोवती शेकडो एकरांची बाग होती. जमीनदारी व व्यापार यांतील कटकटी व आर्थिक अडचणी यांमुळे लॉर्ड बार्नफील्ड अवेळीच म्हातारे दिसू लागले होते.

परंतु स्लिल मात्र या साऱ्या भौतिक कटकटींपासून अलिप्त राहून केंब्रिजमध्ये तत्त्वज्ञानाचा अभ्यास करीत होता. तो धाकटा मुलगा असल्यामुळे काही झाले तरी त्याला स्वतःचे पोट स्वतः भरणे भागच होते. त्यात पुनः आणखी एक अडचण निर्माण झाली होती. त्याने रोजमेरीशी लग्न केल्यामुळे थोरले बंधू लॉर्ड बार्नफील्ड यांनी त्याच्याशी असलेला आपला संबंध तोडून टाकला होता. स्लिलचे लग्न लेडी सिंथियाशी करण्याची त्यांची इच्छा होती. तसे झाले असते तर राजघराण्यातील लोक लग्नाला आले असते. स्लिल एका ड्यूकचा जावई बनला असता. खरे म्हणजे, इंग्लंडच्या ॲरिस्टॉक्रसीतील उरल्यासुरल्या मंडळींनी अशा नाजुक काळात एकमेकांच्या बरोबर राहावयास हवे. परंतु स्लिलने, त्या माथेफिरू पोराने, सारा सत्यानाश करून टाकला. प्रारंभी त्यांना वाटत होते की हा पोरटा कम्युनिस्ट बनला असावा. परंतु नंतर तो समज चुकीचा असल्याचे आढळून आले. त्या पोराला राजकारणात मुळीच रस नव्हता. देवाच्या दयेने तो तत्त्वज्ञ होता. परंतु त्याची बायको रोजमेरी ही मध्यमवर्गीय तरुणी होती. कलावंतांच्या एका मेळाव्यात तिच्याशी त्याची भेट झाली होती. ती कलावंत मंडळी 'कलाकार रजनी' साजरी करण्यासाठी जमली होती. ती मुलगी सुंदर नव्हती. ती मूर्तिकार होती. बिचारी यशस्वी मूर्तिकारही नव्हती. आणि म्हणूनच ती स्लिलला एकदम पसंत पडली. आपल्या कलेत पूर्णत्व मिळविलेल्या मूर्तिकार मुली त्याला मुळीच पसंत नव्हत्या. ही मुलगी अगदीच अर्धवटची, अपूर्ण होती. "हिच्यामध्ये पूर्णत्व आणण्याची जरूर आहे—" स्लिलने विचार केला. आणि त्यासाठी त्याने तिच्याशी लग्न करून टाकले व लंडनहून फोननेच तसे आपल्या भावाला व वहिनीला कळवून टाकले.

रोजमेरी ही एक तर दरिद्री होती आणि तिचे नावगावही फारसे कोणाला माहीत नव्हते. त्यात पुनः ती रोमन कॅथॉलिक होती. त्यामुळे लॉर्ड बार्नफील्ड यांच्या तळपायाची आग मस्तकाला जाणे स्वाभाविकच होते. परंतु स्लिल्ने त्याची पर्वा केली नाही. तो आपला हेगेल आणि कांट यांच्या अभ्यासात गढून गेला.

स्लिल केंब्रिजमध्ये शिकत होता आणि त्याची पत्नी स्टॅफर्डशायरच्या चिनीमातीची भांडी व खेळणी तयार करणाऱ्या एका कारखान्यात नोकरी करीत होती. आपल्या बोटात लग्नाची अंगठी पाहून स्लिलला कधी-कधी मोठे आश्चर्य वाटे. परंतु लगेच आपण विवाहित असून आपल्याला एक बायकोही आहे व ती मोठी गोड छोकरी आहे, याची आठवण त्याला होई.

महिन्यातून एक-दोनदा त्याची रोजमेरीशी भेट होई.

एके दिवशी तो स्वतःच आपल्या मित्रांसह एक शिलिंगाचे तिकीट काढून आपले 'स्टेटली होम' पाहण्यासाठी गेला तेव्हा त्याला मोठी गंमत वाटली. त्याचा भाऊ व वहिनी दक्षिण फ्रान्समध्ये गेली होती. हाउसकीपर व इतर नोकर प्रेक्षकांबरोबर फिरून वाड्यातील वस्तू दाखवीत होते. हे नवीन लोक होते. त्यांच्यापैकी कोणी स्लिलला ओळखले नाही. तो सर्वत्र फिरला. आपण या वाड्यात जन्मलो ही केवढी विचित्र घटना आहे, असा विचार त्याच्या मनात घोळत राहिला.

स्लिल्चा हा वाडा शहराच्या एका टोकाला होता. चार-पाचशे वर्षांपूर्वी तो बांधण्यात आला होता. बागेत हौद होते, 'रॉक गार्डन' होती आणि डच पद्धतीची झाडांची मांडणी होती. इटालियन संगमरवरच्या मूर्ती फुलांच्या ताटव्यांमधून डोकावत होत्या. एके काळी तो या बागेत अस्सल 'कंट्री-एस्कायर'(जहागिरदाराच्या धाकट्या मुला)प्रमाणे ट्वीडचा सूट घालून शतपावली करीत असे; आणि फिरताफिरता वाड्याच्या पश्चिमेकडील भागाकडे जात असे. तेथे बाराव्या शतकातील दोन जोगिणींची थडगी होती. ती थडगी आता रिकामी पडली होती. त्यांतील शवपेटिकांच्या जागेवर एक भला मोठा खड्डा पडला होता. त्या खड्ड्यात बहुधा पावसाचे पाणी गोळा झालेले असे. या थडग्यांच्या शेजारी बसून स्लिल लहानपणी तासनतास जीवन व मृत्यू यांच्या कोड्यासंबंधी विचार करीत असे.

बाहेरच्या लोकांच्या दृष्टीने या वाड्याची इंच-इंच भूमी आख्यायिकांनी व दंतकथांनी भरलेली होती. परंतु स्लिलला मात्र त्यात काही तथ्य वाटत नव्हते. उलट श्रीमंत लोकांनी आपल्या ऐश्वर्याचा जो एवढा मोठा डोलारा उभा केला होता तो किती हास्यास्पद आहे, असाच विचार त्याच्या मनात येई. आपले पणजोबा 'नबाब' स्लिल हॉवर्ड ॲश्ले यांच्या व्यक्तित्वामध्येही त्याला काहीच रोमँटिक आढळत नव्हते. तो

मनाशी म्हणे, "किती गरीब भारतीयांचं रक्त शोषण करून त्यांनी ही सारी संपत्ती गोळा केली असेल, कोण जाणे!" अशा प्रकारचे विचार त्याच्या डोक्यात कम्युनिझमच्या प्रभावामुळे येत नव्हते तर तो काहीसा सूफी (आध्यात्मिक) वृत्तीचा असल्यामुळे येत असत. म्हणूनच, जेव्हा तो आपल्या स्वतःच्या वाड्यात अपरिचित प्रेक्षकाप्रमाणे हिंडू-फिरू लागला तेव्हा त्याला एक प्रकारची शांतता व समाधान वाटले. इतर आधुनिक 'इंटलेक्चुअल्स'प्रमाणे आपण रोमन कॅथॉलिक तर बनणार नाही ना, अशी भीती त्याला वाटत होती. परंतु तो कोणत्याही एका विचारप्रणालीत अडकून पडण्याऐवजी मुक्त राहू इच्छीत होता. अस्तित्ववादाच्या पुरस्कर्त्यांनी स्वातंत्र्याची जी व्याख्या केली होती तिच्यातून मोठमोठे गंभीर अर्थ काढता येत होते. तेथे पोचल्यानंतर उपनिषदांचे अर्थही लक्षात येत होते.

सिरिल ॲश्ले खऱ्या अर्थाने आधुनिक मानव होता. चालू युगाच्या साऱ्या मानसिक गुंतागुंती, आत्मिक अतृप्ती, भावनात्मक असंतोष व शंकाकुशंका यांना तो बळी पडलेला होता.

'रोरिंग ट्वेंटीज'चे युग हे त्याचे बालपण होते. १९३० ते १९३९ च्या युगात तो लहानाचा मोठा झाला. लंडनमधील त्याच्या 'टाउन हाउस'मध्ये नेहमी कलावंतांची वर्दळ चालू असे. हे कलावंत त्याची सावत्र आई लेडी एलन हिला भेटावयास येत असत. ही त्याची आई रूढिग्रस्त कुटुंबाशी विवाहबद्ध झालेली असताही सर्व आधुनिक आंदोलनांची पुरस्कर्त्री होती. हे मोठे विचित्र युग होते. 'डेली वर्कर' आणि वामपक्ष यांचे ते योग होते. ब्लूम्जबरीवाले फॅसिस्टविरोधी होते. ऑडेन, डेलुईस व स्पेंडर हे पुरोगाम्यांचे गुरू बनले होते. क्रिस्तोफर वुड, सॅड्रिक मॉरिस व बेन निकलसन यांच्या पेंटिंग्जचा तो जमाना होता. कला, साहित्य, नाटक, संगीत, बॅले, इंटारियर डेकोरेशन वगैरे प्रत्येक बाबतीत नवतेची आंदोलने चालविली जात होती. सिरिलला वेंचेस्टरहून (छेः छेः! मी ईटनला कधी गेलो नाही. वेंचेस्टरही तितकेच भयंकर होते!) केंब्रिजला धाडण्यात आले. तेथे सिडनी-ससेक्स कॉलेजात त्याला प्रवेश मिळाला. त्यानंतर सतत मनोरंजन, मानसिक शिस्त व कल्पनाविहार यांचा कालखंड सुरू झाला. परंतु लौकरच महायुद्ध सुरू झाले; आणि बॉंबफेक्या विमानाचा वैमानिक बनून त्याने अनेक सुंदर जर्मन शहरे उद्ध्वस्त केली. या शहरांतच त्याचे आवडते तत्त्वज्ञ कवी व संगीतकार जन्मले होते.

त्यानंतर तो पुनः कॉलेजात परत आला. आता ते युद्धोत्तर जग होते. कालचे शत्रू आजचे मित्र होते आणि कालचे सहकारी आज भयंकर शत्रू मानले जाऊ लागले होते. आशियाचा नकाशा झपाट्याने बदलत चालला होता. शांततेच्या घोषणा दिल्या जात होत्या. तिसऱ्या महायुद्धाची तयारी सुरू झाली होती. कालचे पुरोगामी आज कडवे

प्रतिगामी बनले होते. कोणत्याही मूल्याला स्थैर्य असे नव्हते. "काळ अवास्तविक आहे. संपूर्ण काळ अवास्तविक आहे."—केम नदीच्या काठाकाठाने फिरत असता त्याच्या मनात विचार येई. आता मानसिक विच्छिन्नतेचा (मेंटल डिसिपेशनचा) काळ पुनः सुरू झाला. युद्धाची विक्राळता आणि माणसाचा ढोंगीपणा पाहिल्यानंतर सिलमध्ये अधिक कटुता आली होती. मायकेल व डेनिस हे त्याचे दोस्त होते. मायकेल यहुदी (ज्यू) होता. डेनिसही मायकेलप्रमाणेच मध्यमवर्गीय होता. डेनिसला काव्याचाही नाद होता.

यांखेरीज इतरही अनेक मुले होती—काळे व गोरे तरुण आणि तरुणी.

सिलला त्याच्या स्वतःच्या देशातील मुलींविषयीं कधी फारसे आकर्षण वाटले नाही; कारण त्या सगळ्या एकसारख्याच दिसत. दुसऱ्या महायुद्धानंतरचे जग म्हणजे एक महान नवयुग होते. त्यामध्ये 'आंतरराष्ट्रीय मैत्री', 'बंधुभाव', आणि 'सांस्कृतिक समन्वय' (खरे म्हणजे हे सारे एक रुबाबदार 'फ्रॉड' होते!) यांचे वारे वाहू लागले होते. किती तऱ्हेतऱ्हेच्या मुली जगाच्या कोन्याकोपऱ्यांतून शिक्षण घेण्यासाठी इंग्लंडात येत होत्या—काळ्या, पिवळ्या (दूर पूर्वेतील) व निग्रो मुली!

त्याच्या स्वतःच्या देशातील मुलगी रोजमेरी ही होती. परंतु तिच्याशी सिलने लग्न केले होते.

आता वेगवेगळ्या राष्ट्रांच्या 'सांस्कृतिक संध्यां'(कल्चरल ईव्हिनिंग्ज)ची जणू साखळी सुरू झाली. त्या प्रसंगी वेगवेगळ्या आशियाई राष्ट्रांतील विद्यार्थी एकत्र जमून आपापली संस्कृती प्राचीन असल्याचे गोऱ्या विद्यार्थ्यांना पटवून देण्याचा प्रयत्न करीत. पौर्वात्य नृत्ये होत, कवितांचे वाचन व गायन होई, बेसूर वाद्ये वाजविली जात. अमेरिकेत हा सावळागोंधळ फार मोठ्या प्रमाणात चालू होता असे म्हणतात. दूर-पूर्वेतील व मध्यपूर्वेतील या तमाशाला सिलचे मन लौकरच कंटाळले. तो आपल्या खोलीत परत जाऊ लागला. तेथे जाऊन त्याला कोणी थायलंड अथवा इंडोनेशियाच्या सांस्कृतिक कार्यक्रमाला चलण्याचा आग्रह करू लागले की खिडकीतून उडी टाकून पोबारा करावा असा विचार त्याच्या मनात येई.

"आशियापासून स्वतःला वाचविण्यासाठी सिल एक वेगळाच उपाय अवलंबिणार आहे, म्हणे!" एके दिवशी डेनिसने महाभयंकर पद्धतीने गुपित फोडले.

एके दिवशी एक नवा ग्रूप केंब्रिजला आला. हे लोक भारतीय होते आणि लखनौहून आले होते. या नव्याने आलेल्या काळ्या आदमींशी बरेच दिवस त्याची गाठच पडली नाही. परंतु ही मंडळी चांगलीच वळवळीत आहेत, एवढे त्याला समजले होते.

तो वीक-एंडला लंडनला गेला होता. तेथे काही मित्रांबरोबर तो अशा एका जागी गेला जेथे कल्चरल ईव्हिनिंग चालली होती. हा कार्यक्रम भारतीयांनी योजिलेला होता.

ही मंडळीही पायांतील बूट काढून अत्यंत आदराने व सभ्यपणे जमिनीवर बसली. बहुधा टागोरजयंती साजरी केली जात असावी. डेनिस लगेच ध्यानमग्न झाला. उपस्थित मंडळींवर अत्यंत जोरदार आध्यात्मिकता पसरली होती. परंतु सिलला मात्र आपल्या पँटच्या इस्त्रीची काळजी लागून राहिली होती. मांडी घालून बसणे त्याला मुळीच जमत नव्हते. साधूंप्रमाणे आरामात जमिनीवर बसलेल्या इंग्रजांकडे त्याने उदासपणे पाहिले. "हे लोक बहुधा क्रेकर्स असावेत." — आळसावलेल्या मनाने तो स्वतःशी म्हणाला.

इतक्यात किरकोळ शरीरयष्टीची एक मुलगी स्टेजवर आली आणि तिने काही तरी अनाउन्स केले. सिलला काहीच समजले नाही, कारण लगेच जोरजोरात टाळ्या वाजल्या होत्या. हॉलमध्ये तिच्यासारख्याच अनेक मुली भरलेल्या होत्या; आणि तऱ्हेतऱ्हेचे तरुण एकमेकांचे कॉम्रेड असल्याप्रमाणे घरगुती पद्धतीने जमिनीवर बसल्या-बसल्या एकमेकांशी बोलत होते.

आता या मुलींविषयीही सिलच्या मनात काही कुतूहल उरले नव्हते. "या पोरी रोमला वगैरे जातील तर जास्त बरे. इटली आणि फ्रान्स या देशांत यांना जास्त संधी आहे." त्याच्या मनात सहज विचार येऊन गेला; कारण दुसरा कसलाच विचार त्याच्या मनात येत नव्हता. टागोरांविषयी काही विचार करण्याची त्याची तयारीच नव्हती. "रोमँटिक, मध्यमवर्गीय, भावनाप्रधान योगी—" त्याने खुशालचेंडूपणाने टागोरांवर शेरा मारला. (आजकाल तो पाश्चात्य खिस्ती धर्म आणि पाश्चात्य युरोपीय संस्कृती यांचा पुरस्कर्ता बनला होता.)

इतक्यात काळी साडी नेसलेली एक स्थूल स्त्री स्टेजवर आली.

त्या स्त्रीने मोठ्या मधुर आवाजात टागोरांचे एक गीत गाण्यास सुरुवात केली.

"या बाई कोण आहेत, तुला माहीत आहे?" डेनिसने मोठ्या रुबाबात सिलला विचारले.

"माहीत नसलं तरी काय बिघडतंय? भारतीय संस्कृतीच्या त्या प्रतिनिधी असणार. त्या असं सांगणार की ॲटॉमिक थियरी सर्वांत प्रथम शंकराचार्यांनी शोधून काढली होती." सिल तिरसटपणाने उत्तरला.

"या आहेत मिसेस सुजाता मुकर्जी!" डेनिसने एखादे रहस्य सांगावे त्या आवाजात सांगितले, "त्यांचा येथील पत्रकारांवर चांगलाच प्रभाव आहे. तुला 'ऑब्झर्व्हर' प्रतिनिधी म्हणून भारतात जायचं असेल तर या बाईशी घसट वाढव."

सिलच्या समोर जे अनेक प्रश्न होते त्यांत एक उपजीविकेसंबंधीचाही होता. शिक्षण संपल्यावर आपण काय करावयाचे? बी. बी. सी.? परंतु त्या संस्थेत त्याच्या-सारख्या इंग्रज बुद्धिमंतांची आधीच खूप गर्दी झालेली होती. एखाद्या फिल्म कंपनीत

स्क्रिप्ट-रायटिंगचे काम...त्याचीही शक्यता फार थोडी होती; कारण ब्रिटिश निर्माते अमेरिकन लोकांच्या सहकार्याने चित्रपट बनवीत होते. आणि स्रिलला प्रत्येक अस्सल इंग्रजाप्रमाणे अमेरिकन लोकांचा मनापासून तिटकारा होता. शिक्षण खाते? आपण कधीही कॉलेजच्या पोरांना शिकवणार नाही! वसाहतविभागातील नोकरी? नको. मुळीच नको! केवळ वृत्तपत्रव्यवसायच एक असा व्यवसाय होता की जेथे त्याचे मन रमू शकले असते. परंतु त्यातही फार चढाओढ होती.

कार्यक्रम संपल्यानंतर डेनिस उठून श्रीमती सुजातादेवींकडे गेला. त्या 'ऑब्झर्व्हर'चे स्तंभलेखक बिल क्रेग यांच्याशी बोलत होत्या.

"हॅलो डेनिस!" त्या हसत म्हणाल्या.

"मिसेस मुकर्जी, आम्हांला घरी नेऊन कॉफी नाही देणार तुम्ही?"

"अवश्य! सगळे चला."

त्यांच्याबरोबर जाण्यास एक भला मोठा घोळकाच तयार झाला. हे लोक काजी नजरूल इस्लामची जयंती साजरी करण्यासंबंधी चर्चा करीत होते. हा घोळका स्रिलला मोठा मजेदार वाटला. या लोकांनी आपले एक वेगळेच जग तयार केले होते. त्यांची स्वतःची एक 'गॉसिप' होती; त्यांच्या व्यग्रतेचे खास विषय होते. त्यांची आपसांत लफ़ीही होत असत. सारांश, या लंडन शहरात आणखी एक भारतीय लंडन अस्तित्वात आले होते.

"चला चला!" ते आरडाओरडा करीत बाहेर पडले.

श्रीमती मुकर्जींचा फ्लॅट चॅलसीच्या एका मोठ्या भव्य इमारतीत होता. सर्व मंडळी तेथे गेली. मुलींनी स्रिलशी मनमोकळेपणाने गप्पागोष्टी करण्यास सुरुवात केली. त्यांच्यापैकी एकीचे नाव तलअत व दुसरीचे नाव निर्मला असे होते. मुलांची नावे त्याच्या लक्षात राहिली नाहीत. या मुली यंदाच केंब्रिजमध्ये प्रविष्ट झाल्या आहेत, असे त्याला समजले.

श्रीमती मुकर्जी या पूर्व बंगालमधील फरीदपूरच्या राहाणाऱ्या होत्या. संस्कृती त्यांच्या घरी पाणी भरत होती. परंतु लग्नानंतर त्यांचे आपल्या नवऱ्याशी पटले नाही. हल्ली कित्येक वर्षांपासून श्रीमती मुकर्जी युरोपात व लंडनमध्ये राहात होत्या. त्यांचा मुलगा पॅरिसमध्ये चित्रकार होता.

पुढच्या खेपेला स्रिल लंडनला गेला असता श्रीमती मुकर्जींच्या इमारतीच्या रखवालदाराने त्याला सांगितले, "त्या जिनीव्हाला गेल्या आहेत." तो तेथून बाहेर पडत असताना त्याला जिन्यातच एक मुलगी भेटली. त्याला तिने ओळखले आणि किंचित हसून 'हॅलो' असे म्हटले.

स्रिलला आठवले, त्या दिवशी टागोरजयंतीच्या कार्यक्रमाच्या वेळी स्टेजवरून अनाउन्समेंट करणारी ती हीच मुलगी.

चंपाला आठवले, डेनिस सांगत होता तो कुणा लॉर्डाचा हाच मुलगा. "मीही मिसेस मुकर्जींना भेटायला आले होते. पण त्या जिनीव्हाला गेल्याहेत."

"तुम्ही इथंच शिकताहात?"

"जी नहीं! मी पॅरिसला असते. तुम्ही निर्मला श्रीवास्तवला ओळखता? ती गर्टन कॉलेजात असते."

"होय. मी मिस श्रीवास्तवना इथंच भेटलो होतो."

"आणि कमाल रजांना?"

"सुरेखादेवींकडून त्यांच्यासंबंधी ऐकलंय. परंतु भेटीचा योग अजून आला नाही." सुरुवातीची पंधरा-वीस मिनिटे नेहमीच अशा औपचारिक प्रश्नोत्तरांत जात असतात तुम्ही अमक्यातमक्याला ओळखता काय, वगैरे.

"तुम्ही नरगीश कावसजीला ओळखता?" चंपाने मोठ्याने विचारले.

"नाही बुवा! मी कुणालाच ओळखत नाही. म्हणजे काय की...माझ्या मित्रांचं वर्तुळ डेनिसच्या वर्तुळासारखं मोठं नाही."

चंपा खळखळून हसली. "तुम्ही कदाचित यंग आशुतोषला, मिसेस मुकर्जींच्या मुलाला, भेटला असाल, अशी माझी कल्पना होती."

चॅलसीचे भुयारी स्टेशन आले.

"अच्छा! तुम्ही कधी केंब्रिजला आलात तर तिथं आपली भेट होईलच." सिल ॲश्ले म्हणाला.

"गुड बाय!" ती भरभर पावले टाकीत एस्केलेटरवरून खाली उतरली.

आणि आता गेल्या अर्ध्या तासापासून तो पिकॅडिलीच्या भुयारी स्टेशनात चंपाची वाट पाहात येरझाऱ्या घालीत होता. गेल्या दोन वर्षांत त्याला अनेकदा चंपा भेटली होती. आज आपण पॅरिसहून आलो आहोत आणि सुरेखाच्या घरी सर्व लोक जमून जेवण करणार आहेत, असे तिने त्याला कळविले होते. सुरेखाच्या घरी जाऊन तिचा नवरा गुलशन याच्याशी चर्चा करण्यास तो फार उत्सुक होता. वृत्तपत्रातील पत्रलेखक गौतम नीलांबर याने भारताच्या फाळणीचा सारा दोष इंग्रजांवर टाकला होता. सुरेखा म्हणत होती की हा गौतम नीलांबर मोठा जळजळीत आहे. नुकताच मॉस्कोहून बदली होऊन येथे आला आहे. सुरेखाकडून त्याला समजले होते की गौतम नीलांबर आज लंडनमध्ये नव्हता, परगावी गेला होता. त्याच्याशी आपली भेट आज होणार नाही, याचे त्याला दुःख होत होते.

सिल 'इंटरनॅशनल टाइम'च्या खाली येरझाऱ्या घालत राहिला

# ३८

केंब्रिजमधील दुकानातून बाहेर पडून निर्मला फिट्‌जविल्यम लायब्ररीकडे चालली होती. इतक्यात तिला गौतम नीलांबर दिसला.

"निर्मला! अग, मी तर तुला सगळीकडे शोधत फिरतोय." गौतम घाईघाईने तिच्याकडे येत म्हणाला, "अखेर कमालानं मला सांगितलं की तू यावेळी लायब्ररीत असशील म्हणून. काय? कसं काय चाललंय?"

निर्मलेने डोळे मिटून घेतले. आपल्यासमोर उभा राहून घाईघाईने आपल्याशी बोलणारा हा गौतमच आहे ना?

"तू इथं कसा?"

"लंडनहून आलोय. तुम्हां लोकांना भेटायला."

"तू आता रीतसर फॉरेन सर्व्हिसमध्ये काम करू लागला आहेस, असं ऐकलं."

"ते खरं आहे."

"मजेत आहेस?"

"हो."

बोलणे संपले. निर्मला आता मोठी झाली आहे, गंभीर, रुबाबदार बनली आहे, असे गौतमाला आढळले.

"लायब्ररीला आज बुट्टी दे! कमाल आणि तलअत यांनी कोहेनूरमध्ये भेटण्याचा वायदा केलाय. चल तिकडे."

निर्मला निमूटपणे त्याच्याबरोबर चालू लागली. त्यांच्या शेजारून काळे गाऊन घातलेल्या विद्यार्थ्यांची टोळकी जातयेत होती. निर्मला गौतमाला सांगत होती, "तो स्रिल ॲश्ले. तो ऽ सोनेरी केसांचा पोरगा. मोठा मस्त माणूस आहे. तोही चंपाचा चेला बनलाय."

"अच्छा! तुम्हा मंडळींना चंपा भेटत असते म्हणायची!"

"पुष्कळ वेळा!"

"मजेत आहे?"

"कोण जाणे! मजेत असणं ही मोठी सापेक्ष गोष्ट आहे."

गौतम स्तब्ध राहिला. ती दोघे किंग्ज कॉलेजसमोरून चालली होती. पावसाची झिमझिम सुरू झाली होती.

"मला वाटतं," निर्मला सांगत होती, "चंपाताईची स्थिती काही वर्षांनंतर

श्रीमती सुजाता मुकर्जीसारखी होणार. किती दुःखाची गोष्ट ठरेल ती! मिसेस मुकर्जींना तू ओळखतोस?"

"हो!"

"काळ आघात करून हळूच पुढं निघून जातो. किती दुःखाची गोष्ट आहे!" निर्मला पुनः म्हणाली. तरीही गौतम गप्प राहिला.

"पंधरा-वीस वर्षांपूर्वी सुजातादेवींची काय स्थिती असेल? त्यांच्याशी दोन शब्द बोलायला मिळाले तर आपण किती भाग्यवान असं लोकांना वाटत असेल. आता बिचारी आपल्या मुलाच्या वयाची पोरं गोळा करून त्यांना आपल्या घरी कॉफी प्यायला घेऊन जाते! त्या पुस्तकं लिहितात. फ्लीट स्ट्रीटमध्ये चांगल्याच मशहूर आहेत. परंतु त्यांची पुस्तकं आणि त्यांची कीर्ती ही त्यांच्या जीवनातल्या खासगी, वैयक्तिक आनंदाची पोकळी भरून काढू शकत असतील? चंपाताईही अशाच बनणार. वस्तुतः यात त्यांचा काही दोष नाही. काळानं त्यांच्यावर आघात केला. परंतु त्यांनीही इतरांवर आघात करण्याचा प्रयत्न केलाच होता की!"

गौतम दचकला. त्याने निर्मलेकडे निरखून पाहिले.

निर्मलेच्या डोळ्यावर पाण्याचा थेंब पडला. तिने आपला चेहरा रुमालाने पुसला आणि ती पुढे बोलू लागली.

"आता सिलची चलती आहे; कारण तो लॉर्ड ॲश्लेचा मुलगा आहे—ज्याप्रमाणं तुम्ही सर दीपनारायणांचे चिरंजीव आहात आणि भैयासाहेब सर जकी रजाबहादुरांचे चिरंजीव आहेत."

"निर्मला, तू चंपावर फार मोठा अन्याय करते आहेस." गौतम हलक्या आवाजात म्हणाला.

"नाही गौतम, ही वस्तुस्थिती आहे. चंपाताई स्वतः निराश झाल्याच आहेत, पण त्यांनी आमचीही फार निराशा केलीय. काल कमाल म्हणत होता, 'चंपाताईची जादू हळूहळू पार नाहीशी झालीय, याचं काय कारण?' यावर तलअतनं दिलेलं उत्तर अगदी बरोबर होतं. ती म्हणाली, 'चंपाताई अजून त्याच आहेत. आपण मोठे झालो आहोत.'"

गौतमाने उदास नजरेने तिच्याकडे पाहिले.

निर्मला पुढे बोलू लागली. "त्या पॅरिसला होत्या. परंतु तिथलं काम अर्धवट सोडून आता इंग्लंडला आल्या आहेत. इंग्लंडमध्ये त्यांना कुठंतरी नोकरी मिळालीय म्हणे. आता त्या इथं केंब्रिजला प्रवेश मिळवणार आहेत. स्वतःच्या बाबतीत त्या काही निर्णयच करू शकत नाहीत. कमाल आहे! गौतम, काही लोकांना नेहमी कसला ना कसला सेंटिमेंटल (भावनाप्रधान) आधार हवा असतो. चंपाताई अशा लोकांपैकी आहेत."

जीझस लेनमधून ट्रंपेटचा आवाज ऐकू येऊ लागला. गौतम थबकला.

"कोण आहे, कोण जाणे! नेहमी करुण स्वर आळवीत असतो." निर्मला म्हणाली, "भैयासाहेबही लंडनलाच असतात. पाकिस्तानच्या दूतावासात काम करतात. म्हणून आम्हांला भेटत नाहीत."

एव्हाना ती दोघे कोहिनूरपर्यंत येऊन पोचली होती.

"गौतम!" निर्मलेने थोडा वेळ विचार करीत म्हटले, "माणसं इतकी फडतूस का असतात?"

तो गप्प राहिला. रस्त्याच्या कडेला असंख्य पिवळी फुले उमलली होती. पावसाचे थेंब केम नदीच्या पृष्ठभागावर जलतरंग वाजवीत होते.

"निर्मला!" गौतमाने थबकून म्हटले.

"फरमाइए! बोला, काय हुकूम आहे?"

"तू माझ्याशी लग्न करशील?"

"मुळीच नाही."

"का? का बरं?" अवरुद्ध स्वरात त्याने विचारले.

"अशासाठी की..." निर्मलेने अत्यंत स्वच्छ व स्पष्ट आवाजात उत्तर दिले, "तूही फडतूस आहेस. चल, ये आपण आत जाऊ. पावसात भिजू नकोस."

निर्मला खरोखरीच मोठी झाली होती.

ती दोघे त्या भोजनालयात शिरली.

## ३९

सकाळी सहा वाजता चंपा उठली. रात्री दोन वाजेपर्यंत ते लोक सुरेखाच्या घरी गप्पागोष्टी करीत होते...अखेर, माणसं इतकी बडबड का करीत असतात? बाथरूम-मधून जोन कार्टरने डोके बाहेर काढून म्हटले, "आज तुझ्या नोकरीचा पहिला दिवस आहे. लौकर तयार हो."

"मी वर्किंगक्लासमधली मुलगी आहे. मी कोणती साडी नेसू, सांग बरं!"

आणि न्याहारी उरकून ती बसमधून सेंट जॉन्सवुडला गेली. बिल क्रेगच्या फ्लॅटवर जाऊन तिने घंटी वाजविली.

"कम इन!" कोणीतरी आतून म्हटले. ती मनाचा हिय्या करून आत गेली.

खोलीमध्ये शेगडीजवळ एक अल्सेशियन कुत्रा निरिच्छपणे बसला होता. "हॅलो माय डियर!...काय घेणार?"

"काही नको. धन्यवाद!" चंपा म्हणाली.

"प्रुफं वाचता येतात तुला?" असे म्हणून बिलने बेपर्वाईने एक पुडके तिच्यासमोर टाकले आणि तो स्वयंपाकघरात जाऊन खुडबुड करू लागला.

शांता क्रेग काश्मिरी रेशमी साडी नेसून व लोकरीचे विणलेले जाकीट (कार्डिगन) घालून खोलीच्या एका कोपऱ्यात असलेल्या जिन्यावरून खाली उतरली. ती चटकन टाइपरायटरजवळ जाऊन बसली. चंपाने तिच्याकडे पाहिले. ती खूप सुंदर असल्याचे तिला मान्य करावे लागले..."आपल्या नवऱ्याशी काडीमोड घेतल्यानंतर गौतमाशी लग्न करण्याऐवजी हिनं बिलशी का लग्न केलं असावं, कळत नाही. जीवन म्हणजे एक मोठं कोडंच आहे." चंपा आश्चर्याने विचार करू लागली.

"गुड मॉर्निंग मिसेस क्रेग!" ती शिष्टाचारपूर्वक म्हणाली.

"गौतमाकडून मी तुझ्याविषयी पुष्कळ ऐकलंय. हे जग फारच लहान आहे नाही?" टाइप करता करता शांता म्हणाली.

बिल कॉफीचा ट्रे घेऊन आला. शांता पुष्कळच घमेंडखोर असावी आणि बिल तितकाच नम्र असावा, असे चंपाला वाटले.

"फ्रँक रॉसलाही तू खूप आवडली आहेस, हं." चंपाला तो म्हणाला.

"फ्रँक रॉस?" चंपाने विचारले. बिलने रुबाबात आपल्या अल्सेशियन कुत्र्याकडे बोट दाखविले. नंतर तो कागदांचे पुडके घेऊन छापखान्यात जाण्यास निघाला. बिलच्या प्रकाशन संस्थेतील चंपाच्या प्रूफ रीडर म्हणून सुरू झालेल्या नोकरीचा हा पहिला दिवस होता.

* * *

"तुझा काय कार्यक्रम आहे...आयुष्याचा?"

बिलने जेवणाच्या सुटीत तिला विचारले. तो माणसांचीही प्रुफे वाचत असे.

"हा तर फारच मोठा प्रश्न आहे."

"तू फार कन्‌फ्यूज्‌ड, गोंधळलेली आहेस काय?"

"होय."

"तूही जाळ्यात अडकली आहेस?"

"होय."

बिल हिरमुसला होऊन गप्प बसला. सगळेच जाळ्यात अडकलेले होते. तो स्वतः,

त्याची पत्नी शांता (पूर्वाश्रमीची सौ. शांता नीलांबर आणि इंग्रजीत व मराठीत कादंबऱ्या लिहिणारी लेखिका), ब्रिल ॲश्ले, सगळे लेखक व साहित्यिक, बुद्धिजीवी, सारे पाश्चात्य लोक व पश्चिमी युरोपची संस्कृती, ज्याचे प्रतिनिधी येथे विद्यमान होते तो 'नवा आशिया'—हे सारे वेगवेगळ्या नरकांमध्ये अधांत्री लटकत होते. पवित्र आत्म्यांना ज्या पुलावरून स्वर्गात जावयाचे असते त्या पुलावरून चालत जाण्याचा अर्थ काय, ते आता त्यांना कळले होते. त्यांच्या ख्रिस्ती, मुस्लिम, हिंदू व बौद्ध आत्म्यांना खूप कष्ट भोगावे लागणार होते. ज्यांच्याविषयी टॉयनबीने दहा ग्रंथ लिहिले होते आणि अजूनही तो कोणत्याही समाधानकारक निष्कर्षांवर पोचू शकला नव्हता असे हे लोक होते.

आणि नवा भारत आपले आध्यात्मिक श्रेष्ठत्व व आपले सांस्कृतिक उच्चत्व यांच्या बाबतीत दिवसेदिवस आक्रमक बनत होता. हे प्रचाराचे जग होते—वृत्तपत्रे, नियतकालिके, सांस्कृतिक प्रचाराच्या पुस्तिका व ग्रंथ यांमध्ये छापल्या जाणाऱ्या कोट्यवधी शब्दांचे जग! बिल हा तर शब्दांचा व्यापारी होता; आणि शब्दांचे सामर्थ्य व त्यांचा पोकळपणा यांवर त्याचा विश्वास होता. ते जगही जाळ्यात अडकले होते. या सर्वांचे खासगी नरक, वैयक्तिक तळघरे व स्वतःपुरती मर्यादित असणारी जगे यांतून बाहेर पडण्यास मार्ग नसल्यामुळे ती जास्तच यातनादायक होती.

एक मार्ग होता; परंतु तो फारच भयंकर होता. बिलने चंपाकडे पाहून विचारले, "तू कधी कम्युनिस्ट बनली नाहीस?"

ती निमूटपणे बटाटे खात राहिली.

"तू कथा लिहायला सुरुवात कर. मी तुला 'बिल्डअप' करीन. भारतासंबंधीच्या कादंबऱ्यांना सध्या खूप मागणी आहे. आर. के. नारायण आणि मुल्कराज आनंद यांचंच पाहा ना. खरंच, तूही लिहू लाग. काय?" त्याने जोर देऊन म्हटले.

"मला लिहिणं मुळीच जमत नाही."

"असं? हे कसं शक्य आहे? तुझ्या ग्रूपमध्ये तर एकापेक्षा एक लेखक आहेत."

"मला माझ्या ग्रूपसारखी समजू नका."

"अच्छा! म्हणजे आपण 'इंडिव्हिज्युॲलिस्ट' (व्यक्तिवादी) आहोत, असं फॅडही तुझ्या डोक्यात आहे म्हणायचं. छान आहे हे फॅड." बिलने उत्तर दिले.

ही 'कोंबडीची खाणावळ' होती. तेथे दुपारच्या जेवणासाठी एकमेकांना ओळखणारी बरीच मंडळी येत. जवळच बी. बी. सी. चे स्टूडियो होते. काही भारतीय मुली आत आल्या आणि तिच्याकडे न पाहता काउंटरकडे गेल्या.

"अशी आहे चंपा अहमद. इतरांच्या नियोजित वरांना आपल्या जाळ्यात अडकवणं हीच तिची 'करीयर' आहे. मी काहीतरी 'स्कॅंडलमॉंगरिंग' करते आहे असं तुला

वाटत असेल तर तू निर्मला श्रीवास्तवला जाऊन विचार. त्या बिचारीला टी. बी. झालाय." एका मुलीने काउंटरवरून ट्रे उचलून घेत उर्दूत म्हटले.

"निर्मलेला क्षय झालाय?" दुसरीने आश्चर्याने विचारले.

"हो ना! आणि आता ती लिडहर्स्ट सॅनिटोरियममध्ये जाणार आहे." पहिल्या मुलीने उत्तर दिले. दोघीही बोलत बोलत हॉलच्या दुसऱ्या टोकाला निघून गेल्या.

चंपाला वाटले, त्यांच्याकडे धावत जावे आणि त्यांना विचारावे, निर्मलेची तब्येत कशी आहे? तिला क्षय कसा झाला? परंतु ती सुन्न होऊन जागच्या जागीच खिळून राहिली. खिडकीच्या बाहेर रस्त्यावरून तऱ्हेतऱ्हेची माणसे जात होती. त्यांमध्ये तिला अनेक ओळखीचे चेहरे दिसू लागले—अनेक शुभ्र मुखवटे, ज्यांवर त्यांची नावे लिहिलेली होती : जरीना हुसैन, सुरेखा आहूजा, अमला रॉय, फीरोज जबीन...! थोड्या वेळाने आमिर रजा आले. आमिर रजांना चंपाने किती वर्षांनंतर आज पाहिले. त्यांनी पूर्वीपेक्षा अधिक भारी किमतीचा सूट चढविला होता आणि अधिक आत्मविश्वासाने पावले टाकीत होते. याखेरीज त्यांच्यात काही बदल झालेला नव्हता. त्यांनी चंपाकडे पाहिले. किंचित थबकून औपचारिकपणे 'आदाब अर्ज' (नमस्कार) केला आणि ते दूर कोपऱ्यात असलेल्या एका मेजाजवळ जाऊन बसले.

चंपाने घड्याळाकडे पाहिले आणि पर्स उचलून बिल क्रेगबरोबर ती कचेरीकडे निघून गेली.

## ४०

केंब्रिजमधील आपले शिक्षण पुरे केल्यानंतर तलअत फ्लीट स्ट्रीटवरील एका वृत्तपत्रात काम करीत होती. त्या दिवशी संध्याकाळी 'कॉपी' खाली पाठवून दिल्यावर ती व्हिक्टोरियाच्या बाजूला गेली. तेथील एका जुन्या आर्ट स्कूलमध्ये जाऊन ती अधून मधून मूर्तिकलेचे शिक्षण घेत असे. ती थंडगार काळोख्या खोल्यांतून डोळ्यांची उघडझाप करीत फिरली. लाइफ-क्लासमध्ये एका स्टुलावर एक उदास निग्रो मुलगी उदासपणाची पोज घेऊन नग्न बसली होती. तिच्याकडे कंटाळवाण्या दृष्टीने पाहात-पाहात विद्यार्थी आपल्या समोरच्या कागदांवर बेफिकीरपणे रेघोट्या ओढत होते. वरच्या पोर्ट्रेट क्लासमध्ये लाल नाकाचा एक म्हातारा बियरचा मग घेऊन स्टुलावर बसला होता. कोणीही स्मित करीत नव्हते. दक्षिण आफ्रिकेतील लाल दाढीवाला

आर्टिस्ट एका खोलीच्या कोपऱ्यात जमिनीवर बसून मॅंडोलिनच्या तारा छेडीत होता. त्याला तलअतविषयी भयंकर तिटकारा वाटत होता. त्याने रागारागाने तिला नमस्कार केला. तलअतने हसून त्याच्या नमस्काराचा स्वीकार केला आणि ती पुनः बाहेर आली.

तेही एक वेगळेच जग होते. व्हिक्टोरियाचे जुने आर्ट स्कूल...

त्यानंतर ती वेस्टएंडला गेली. हे मार्केटच्या जिन्याने वर जाऊन तिने 'रायटर्स अँड आर्टिस्ट्स क्लब'मध्ये डोकावून पाहिले. तेथे बिल क्रेग दिसला. तो आपले दुःख बियरच्या पेल्यात बुडवीत होता आणि अत्यंत उदासपणे एका फ्रेंच कादंबरीलेखिकेशी बोलण्यात मग्न होता. त्या स्त्रीच्या चेहऱ्यावरून अपरंपार सहानुभूती, मानसिक स्नेह व समजूतदारपणा पाझरत होता. याचा अर्थच असा की बिचारी शांता आपल्या पतीला समजू शकत नव्हती. हे मार्केटमधील हा 'रायटर्स अँड आर्टिस्टस क्लब' हीही एक आणखीच वेगळी दुनिया होती. ती पुनः तेथून झटकन खाली उतरली आणि रस्त्यावर आली.

* * *

तलअत व कमाल सेंट जॉन्सवुडमध्ये राहात होते. कमाल आता एका लॅबोरेटरीत काम करीत होता. या भागात आर्टिस्ट, नट, नाना प्रकारचे इंटलेक्चुअल्स खूप मोठ्या प्रमाणावर आढळत असत. छायादार रस्त्याच्या कोन्याकोपऱ्यांत जुनी, शेवाळलेली चर्चेस लपलेली होती. कोपऱ्यावर एक इटालियन रेस्टॉरंट होते. त्याच्या एका कोपऱ्यात नेहमी एक दरिद्री पोलिश यहुदी आर्टिस्ट बसलेला दिसे. लंच किंवा डिनर घेणाऱ्या लोकांची रेखाचित्रे तो अत्यंत तन्मयतेने रेखाटत असे आणि आपण रेखाटलेले चित्र कोणीतरी विकत घेईल म्हणून आशाळभूतपणे पाहात असे. परंतु त्याचे चित्र कोणीच विकत घेत नसे. सेंट जॉन्सवुडच्या या सुंदर घरांतून राहाणाऱ्या पाश्चात्य लोकांची जीवने मोठी वादळी होती. प्रीती, घटस्फोट, मानसिक गुंतागुंत व ब्लॅक कॉफी यांवर हे लोक जगत होते. त्यांचे दिवाणखाने कलापूर्ण रीतीने सजविलेले असत. मुली केसांना 'पॉनीटेल'चा आकार देऊन कानांत जिप्सी-रिंग्ज घालीत. त्या अरुंद घेराच्या काळ्या पाटलोणी घालीत आणि आपल्या आई-बापांचा तिटकारा करीत. त्या आपले मनोविश्लेषण करवून घेत. सतरा-अठरा वर्षांचे काही तरुण व तरुणी लैंगिक व मनोविकृतिविषयक कादंबऱ्या लिहीत होत्या. अनेक प्रख्यात बुद्धिवादी प्राचीन आशियाई व बायझंटाइन संस्कृती, रोमन कॅथॉलिक धर्म, वेदांत व जैन-बौद्ध मत यांसंबंधी तासनतास डोळे मिटून विचार करीत असत. सर्वजण अत्यंत कठोर युक्तिवादांकडून होणारे दुःख सहन करण्यात मग्न होते.

सुरेखा रस्त्याच्या पलीकडे राहात होती. तिचा नवरा गुलशन आहूजा लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समध्ये शिक्षण घेत होता. सुरेखाने भरतनाट्यममध्ये चांगलेच नाव कमावले होते आणि रॉयल अ‍ॅकॅडमी ऑफ ड्रामॅटिक आर्टमध्ये ती कॅरियोग्राफी शिकत होती. सुरेखा व गुलशन यांचे शेजारी चोपडा पतिपत्नी होती. आशा चोपडा मूर्ती बनवीत असे. सतीश चोपडा बी. बी. सी. च्या हिंदी विभागात काम करीत होता. शांता व विल्यम क्रेग येथून जवळच राहात होती.

अमला राय व नरगीश कावसजी चेलसीच्या एका आधुनिक व महाग ब्लॉकमध्ये राहात होत्या. अमला राय ही तलअत व निर्मला यांची बालमैत्रीण होती आणि तिचे घरही लखनौला 'सिंघाडेवाली कोठी' व गुलफिशाँ' यांच्या जवळच होते. ती आता इंडियन फॉरेन सर्व्हिसमध्ये काम करीत होती. फीरोज स्विस कॉटेजमध्ये राहात होती आणि उर्दूत पी एच. डी. करीत होती. जरीना युनिव्हर्सिटीत रशियन, फारसी व उर्दू या भाषांमध्ये बी. ए. ऑनर्ससाठी तयारी करीत होती.

या सर्वांची जीवने अत्यंत कार्यमग्न व धामधुमीची होती. परिषदा, नाटके, राजकीय सभा व मिरवणुकी यांनी ती भरलेली होती.

हेही एक वेगळेच जग होते—इंडो-पाकिस्तानी लंडन! त्या अँग्लो-सॅक्सन राजधानीच्या पोटात ते अनेक थरांवर वसलेले होते. या साऱ्या जगांना एकमेकांची मुळीच माहिती नव्हती; परंतु ती एका अधिक विशाल दुनियेत सामावलेली होती.

अवास्तविक नगरी...

## ४१

चंपाने नरगीशच्या खोलीत येऊन चोहोकडे नजर फिरविली. "माझ्यासाठी एक साडी काढून ठेव," नरगीशने स्नानगृहातून ओरडून सांगितले. दुसऱ्या खोलीत शांता एकच रेकॉर्ड पुनः पुनः वाजवीत होती. त्याच दिवशी तिचे एक नवीन पुस्तक प्रकाशित झाले होते. खाली अंगणात बिल गुलशनबरोबर फिरत होता. चंपाने कपाट उघडले—ईव्हिनिंग गाउन, साड्या, बूट व बॅगा. एका फळीवर हस्तिदंताचे एक लहानसे मंदिर होते. त्यात एक इवलीशी मूर्ती होती. फारसी लोक कुणाच्या मूर्तीची पूजा करतात?—ती विचार करू लागली. कदाचित झरतुष्ट्राची असेल. की आणखी कुणाची असेल? आपणा सर्वांच्याच तळघरांत एक लहानसे देऊळ असते. त्यात एक अज्ञात मूर्ती असते. त्या

मूर्तीचे नाव मला माहीत नाही—येशू, कृष्ण, झरतुष्ट्र. ही मूर्ती अखेरपर्यंत अज्ञातच राहाणार. शेवटी जेव्हा माणूस अखेरचे डोळे मिटू लागतो तेव्हा त्याला काय दिसत असेल कोण जाणे! ती अज्ञात मूर्ती त्यावेळी कोणते रूप धारण करीत असेल हे कोण सांगू शकेल?

शांताने आत येऊन नरगीशसाठी एक लाल साडी काढली.

"कपाट बंद कर...कपाट बंद कर!" चंपा ओरडून म्हणाली.

"अँ?..." शांताने आत येऊन विचारले. "कुणाला सांगते आहेस तू?"

"काही नाही. मी मनात विचार करीत होते. नरगीश दिवसातून हे कपाट कितीदा उघडत असते!"

"अँ?" शांताला काही अर्थबोध झाला नाही.

"आणि त्यातून रंगीबेरंगी कपडे बाहेर पडतात."

"हाँ! होय...मग?"

"आणि अत्तरं अन् पॅरिसच्या टोप्या!" चंपा बोलत राहिली, "तिची मूर्ती त्या कोपऱ्यातल्या 'श्राइन' मध्ये ठेवलेली असते. त्यानं हे कपाट बनवलं आणि आता तोच त्यात लपून बसलाय. तुझ्या कपाटातही एखादी मूर्ती आहे?"

"माझ्या कपाटात सांगाडे आहेत!" असे म्हणून शांता शेगडीजवळ जाऊन बसली आणि तिच्याकडे टक लावून पाहात म्हणाली, "तू...तू जरा वेडसर आहेस."

"होय! तू नाहीस?"

"तुझं बोलणं शुद्ध ज्ञानाच्या सीमांना स्पर्श करीत आहे. त्या बाजूला जाऊ नको. मोठी दुःखाची गोष्ट ठरेल." शांताने उत्तर दिले.

सुरेखा शुभ्र साडी नेसून, केस टॉवेलात गुंडाळून बाहेर आली; आणि खिडकीत उभी राहून टेरेस गार्डनकडे पाहू लागली.

"जीवन! जीवन!" सुरेखा आनंदातिशयाने आपले बाहू पसरून उद्गारली.

"माझ्या मते सुरेखा म्हणजे जीवनाचं प्रतीक आहे. आनंदी, हसणारे, बागडणारे जीवन!...प्रतीकांमध्ये गूढ रहस्यं असतात, हे तुला मान्य आहे?" चंपाने शांताकडे वळून तिला विचारले.

"जीवन माझ्यासमोर निःसंकोचपणे उभं आहे. शुभ्र साडी नेसून. हसत, गुणगुणत, घाबरलेलं, निर्भय, धाडसी, भित्रं...प्रत्येक शब्दाला दोन अर्थ आहेत. आणि ते दोन्ही एकमेकांविरुद्ध आहेत. जीवन!..." ती शांताकडे पाहून म्हणाली, "मी एकदा गौतमाला म्हटलं होतं, तू आणि मी नेहमीच वेगळे राहाणार!"

"गौतम अजून 'सर्क्युलेशन' मध्ये आहे...?" शांताने ओरडून विचारले.

"काय ?" चंपा दचकली.

"म्हणजे असं की..." शांताने सिगारेट पेटवीत अशा थाटात विचारले, जणू चंपा हे एक उघडे पुस्तक तिच्यासमोर होते आणि गेली काही मिनिटे ती ते पुस्तक वाचीत होती, "तो अजून 'सर्क्युलेशन'मध्ये आहे की त्याला लायब्ररीच्या बुकशेल्फवर परत ठेवून देण्यात आलं आहे ?"

"कोण जाणे !"

"तुझ्या मेंबरशिपची मुदत संपली ?"

शांता क्रेग घमेंडखोर तर होतीच पण नीचही होती.

"हाच प्रश्न मी तुलाही विचारू शकते." चंपा म्हणाली.

शांता उदासपणे हसली. तिचे गर्विष्ठ स्मित, तिचा नवरा, तिची वेशभूषा वगैरे गोष्टींचे किती बारकाईने चंपा आजकाल अनुकरण करू लागली होती. रूपवती, जीवनात यशस्वी, लोकप्रिय, करीअरवूमन ! "मलाही शांता नीलांबरसारखं का बनता येणार नाही ?"

शांताने आत्मविश्वासपूर्वक तिच्याकडे पाहात म्हटले, "त्याची इल्यूजन्स नाहीशी करण्याची माझी इच्छा नव्हती. खरी अडचण अशी आहे की तो कवी आहे."

"अय्या ! खरंच ? मला नव्हतं हे माहीत." चंपा उपरोधाने म्हणाली.

"तुला ते समजायचंही नाही. तू स्वतःच आपल्या कल्पनाविश्वात वाजवीपेक्षा जास्त बुडालेली असतेस. पुरुषांना बलिदान हवं असतं. स्वत:चा बळी दिल्याखेरीज तू त्यांना प्राप्त करू शकणार नाहीस. तू आपलं शैक्षणिक वर्ष अर्धवट सोडून पॅरिसहून इथं का आलीस ? तो इथं आहे म्हणून ?"

"काहीतरी बरळू नकोस. कुणी सांगितलं तुला हे ?" चंपाला भयंकर राग आला. ती आता याहून जास्त अपमान करून घ्यायला तयार नव्हती.

"परंतु हे म्हणजे जंगली बदकाच्या मागे धावण्यासारखं आहे." शांता आपल्या गोड आवाजात बोलत राहिली.

"तू कथा लिहितेस ना ? म्हणूनच माझ्यासंबंधीच्या आपल्या कल्पनेला तू असं बेफाम सोडून दिलं आहेस." चंपा म्हणाली.

"आता व्रिल तुला बिल्डअप करू इच्छितोय." शांताने आपल्या सुरेल आवाजात आपले म्हणणे संपविले आणि शेगडीच्या वरच्या बाजूस टांगलेल्या तसबिरींकडे ती निश्चितपणे पाहू लागली.

तहमीना रजा, निर्मला श्रीवास्तव, शांता क्रेग !

"अच्छा ! यह बात है !" चंपाने कोट व हातमोजे उचलून घेत म्हटले, "माझा तिटकारा करायला हवा, माझा तिटकारा करायला हवा ! बरं बाई. आता मी जाते.

नरगीश, सुरेखा, शांता, मी उद्या बहुधा ऑफिसला येणार नाही." दारापर्यंत गेल्यानंतर ती पुनः मागे वळून म्हणाली, "उद्याच काय पण बहुधा मी यापुढं कधीच तुमच्या ऑफिसात येणार नाही!"

बाहेर चेलसीच्या रस्त्यावर येऊन तिने पाहिले. घरांच्या खिडक्या पावसाच्या गोंडस धुक्यात लपल्या होत्या. कोपऱ्यावर फुले विकणारी म्हातारी पावसापासून स्वतःचा बचाव करण्यासाठी रेनकोट पांघरून, भिंतीकडे तोंड करून, खुर्चीवर बसल्या बसल्या काय विचार करत होती कोण जाणे! चंपा आपल्या घरी जाऊन पोचली. तिचे घर दूर उपनगरात होते. स्वतःच्या बिऱ्हाडाच्या दारात तिला स्लिटचे पत्र मिळाले. त्याने लिहिले होते : 'न्यू हॅममध्ये तुला प्रवेश मिळाला आहे. तुला सप्टेंबरात इथे यायचे आहे. उन्हाळ्याचे हे काही महिने तू एखाद्या उदास व रोमॅंटिक इटॅलियन किंवा स्पॅनिश शहरात घालव. मी उत्तर इंग्लंडकडे चाललोय. रोजमेरी आजारी आहे."

...रोजमेरी!!

# ४२

'कोहेनूर'च्या खिडकीजवळ मांडलेल्या एका टेबलाशी गौतम निर्मलेसमोर बसून बाहेर पडणाऱ्या पावसाकडे पाहात होता. कमाल 'माफ कर' असे सांगून दुसऱ्या एका मित्राशी बोलण्यासाठी दुसऱ्या टेबलाकडे गेला होता.

"तू चंपाविषयी जे काही सांगितलंस ते ऐकून फार वाईट वाटलं मला." गौतम म्हणाला. तो अजून चंपासंबंधीच विचार करीत होता. निर्मलेने आवंढा गिळण्याचा प्रयत्न केला. काही क्षणांपूर्वीच या गृहस्थाने तिला मागणी घातली होती. ती गप्प बसून राहिली.

"तुम्ही सर्वांनी, आपण सर्वांनी तिला योग्य न्याय दिला नाही. आपण तिच्या बाबतीत नेहमीच गैरसमज करून घेतला. उदाहरणार्थ..." गौतम आवेशाने म्हणाला आणि हातात काटा घेऊन निर्मलेला समजावून सांगू लागला, "मैयासाहेबांना अप्पीपासून हिरावून घ्यावं असं तिला कधीच वाटलं नव्हतं."

"ते कसंही असो. माझी आपली कल्पना आहे...पण आता चंपाताईसंबंधीची चर्चा आपण बंद करू." निर्मला म्हणाली आणि आपण कामात व्यग्र आहोत असे दाखविण्यासाठी ती आपल्या पर्समध्ये काहीतरी शोधू लागली. "तुझ्या मते चंपाताई

अगदी परफेक्ट आहे. पण तू विसरतोस की आम्ही चंपाताईला लहानपणापासून ओळखतो."

"लहानपणापासून ओळखण्याची ही दटावणी छान आहे." गौतम म्हणाला, "तुम्ही लोक दर खेपेला हे लहानपणाचं तुणतुणं कशाला वाजवता? जे लोक तुम्हांला किंवा चंपा अहमदला लहानपणापासून ओळखत नाहीत ते काय निव्वळ गद्धे आहेत?"

आता गौतमावर सर्व बाजूंनी प्रखर प्रकाश पडू लागला होता. ती स्वतःही गौतमासमोर प्रखर प्रकाशात होती. परंतु पाहा, काय झाले! गौतमाने हात पुढे करून अचानक स्विच ऑफ केला.

"मानवी चारित्र्याचा निष्ठुर टीकाकार, वेदांतातील गुरू असा हा गौतम, चंपासारख्या फ्रॉडला परफेक्ट समजतो आहे—देवा, तुझी लीला अगाध आहे!" निर्मला मनाशी म्हणाली. परंतु तो तिला म्हणत होता,

"निर्मला,...मी तुझा गैरसमज दूर करू इच्छितो. मला चंपाशी काय करायचंय? मी अगदीच फडतूस आहे, हे तुझं म्हणणं बरोबर आहे. तरीपण, तुझ्याशी लग्न करण्याची माझी इच्छा आहे."

"एका हरवलेल्या नगाच्या बदली दुसरा नग, असंच की नाही? नो! सॉरी, गौतम!"

"निर्मला...निर्मला, मला समजून घेण्याचा प्रयत्न कर. निर्मला..." आता तो पुनः अंधारात गेला. तो एखाद्या शाळकरी पोराप्रमाणे केविलवाणा दिसत होता. पुरुष शहाणे असतात, असं कोण म्हणतं? अरे, त्यांच्यापेक्षा मूर्ख कोण असू शकेल? ...मेजाजवळ बसल्या बसल्या निर्मला विचार करीत होती. आपण वेलीप्रमाणे, झाडाप्रमाणे, बॅरॉमीटर मधील पाऱ्याप्रमाणे उंच होत आहोत असा भास तिला झाला. तिच्यामध्ये ज्ञान येऊ लागले होते. आता कृत्रिम दिवे विझवून तीही सर्व अनुभूतींहून श्रेष्ठ असणाऱ्या अंधारात जाणार होती. तेथे बसून ती बाहेर डोकावून पाहाणार होती. लहानपणी 'गुलफिशाँ'च्या सर्व्हंट्स क्वार्टरमध्ये कदीर ड्रायव्हरकडून तिने ज्या जादूच्या सुलेमानी टोपीची कहाणी ऐकली होती ती टोपी आता ती घालणार होती.

ही सुलेमानी टोपी प्रत्येकाला थोडीच मिळत असते? श्री नीलांबर, मी तुमची आभारी आहे. कारण तुम्ही मला मोठं होण्यास मदत केली, आणि सुलेमानी टोपी घालण्याचा मार्ग दाखविला. अरेरे, मी तुमच्याशी लग्न करू शकले असते तर किती बरं झालं असतं! परंतु आता माझ्या ठिकाणी खूपच ज्ञानाचा उदय झालाय. गौतमजी, तुम्ही चंपा अहमदची पूजा करीत राहा. कदाचित त्यातूनच तुम्हांला मुक्तीचा मार्ग मिळेल.

त्याच दिवशी रात्री एक्सरे रिपोर्टावरून निर्मलेला फुप्फुसांचा क्षय झाला असल्याचे आढळून आले.

# ४३

ज्या वर्षी चंपा केंब्रिजमध्ये दाखल झाली त्याच वर्षी तलअत व निर्मला तेथून बाहेर पडल्या होत्या. आता ती उच्चवर्गीय इंग्रज मुलींच्या थाटात बोलू लागली होती. केंब्रिजचा घमेंडखोरपणाही तिने पुरेपूर आत्मसात केला होता. रात्री आरशासमोर उभी राहून ती अकस्मात विचार करू लागे, "कुठं गेली ती चंपा अहमद? चंपा अहमद ही आता हितोपदेशातील व पंचतंत्रातील कथा बनली आहे. बनारसच्या वसंत कॉलेजातली ती मुलगी कुठं आहे? किंवा आमिर रजाने 'गुलफिशाँ'च्या साइडरूममध्ये भाजी चिरताना जिला पाहिलं होतं ती मुलगी कुठं आहे?" आमिर रजाचा विचार तिला आता अगदीच हास्यास्पद वाटे.

* * *

एका सुटीच्या दिवशी चंपा इतर मुलां-मुलींबरोबर एका गावठी हॉटेलाच्या बागेत बसली होती. एंजेलो नावाचा एक इटॅलियन विद्यार्थी सफरचंदाच्या झाडाखाली बसून गिटार वाजवीत होता. जवळच्या आरामखुर्चीत बसलेला मायकेल अत्यंत उदासपणे सफरचंदाच्या कळ्यांचा वास घेण्यात तल्लीन झाला होता. आपण हा देश सोडून इस्राईलला जाणार असल्याचे त्या दिवशी त्याने जाहीर केले होते. बराच वेळपर्यंत राष्ट्रीयत्वाच्या प्रश्नावर वादविवाद करून थकून गेल्यामुळे ते आता गप्प बसून चहाची वाट पाहात होते. "मी या मोहक, हिरव्यागार, सुंदर इंग्लंड देशाचा निरोप घेऊन इस्राईलच्या वाळवंटात खडी फोडून रस्ते बनवायला जाईन." तो म्हणाला. सिलने त्याच्याकडे पाहून म्हटले, "होय! मायकेल, तू अवश्य असं करशील. मला माहीत आहे, युनिव्हर्सिटीतले कित्येक यहुदी प्राध्यापक, वैज्ञानिक, संगीतकार यावेळी इस्राईलमध्ये खडी फोडून रस्ते तयार करीत आहेत."

"व्हिजनमध्ये फार मोठं सामर्थ्य असतं." डेनिस म्हणाला, "कवींच्या काव्याचंच उदाहरण घ्या ना!"

"सामर्थ्यातून सर्वनाश येत असतो." सिल खिन्नपणे म्हणाला. इतक्यात हॉटेलच्या फाटकाजवळ समोरच एक गाडी येऊन थांबली. गौतम नीलांबर, कमाल, तलअत व आणखी काही मंडळी गाडीतून खाली उतरून हॉटेलात आली. त्यांनी बागेत बसलेल्या या लोकांना पाहिले नाही.

"नवीन विचारप्रणालींमध्ये शॉविनिझम (फाजील देशाभिमान) ही सर्वांत अधिक

भयंकर गोष्ट आहे." स्लिल मायकेलला म्हणाला, "तुमचा झायोनिझम (यहुदीवाद), पाकिस्तान्यांचा इस्लाम, भारतातील प्राचीन संस्कृतीचे पुनरुज्जीवन करणारे लोक..."

"आर्थिक उन्नतीशी धर्माचा काही संबंध नसतो, ही गोष्ट पाकिस्तान्यांना समजतच नाही." गुल्शन म्हणाला.

"द्वेषाची मनोवृत्ती!" डेनिस बोलू लागला, "आजचं जग द्वेषाच्या आधारावर जिवंत राहिलंय. प्रेम हा जगाचा आधार आहे, हे येशूचं विधान साफ चूक आहे. वस्तुस्थिती अशी आहे की आपण सारे जंगली श्वापदांप्रमाणं एकमेकांना खात आहोत."

"मी हिंस्र पशू आहे?" मायकेलने उदासपणे विचारले, "मी तर फक्त हैफाला जाऊन तिथं खडी फोडू इच्छितो."

"जगात फक्त एकच दिवस प्रचाराची यंत्रणा बंद राहील तर किती शांतता नांदेल." चंपा हलकेच म्हणाली.

"ते कसं शक्य आहे? आपण सर्वांनी सकाळ-संध्याकाळ गोबेल्सच्या तसबिरीला हार घातले पाहिजेत. तुम्ही गांधींचं नाव घेता? आमच्या युगाचा सर्वांत मोठा पैगंबर गोबेल्स होता. डॉक्टर गोबेल्स झिंदाबाद!" गुल्शन म्हणाला.

"खरं म्हणजे," डेनिस सांगू लागला, "आपण सारे आपल्या अंतर्मनात फॅसिस्ट आहोत. आपणा सर्वांना विनाश व मृत्यू हवा आहे. रोमान्सपूजकांच्या 'मृत्यूची आकांक्षा' या शब्दांचा अर्थ मला चांगला कळतो."

"ही एवढी सुंदर बाग नष्ट व्हावी असं मला वाटत नाही." चंपा घाबरून म्हणाली.

"आपण सारे छुपे फॅसिस्ट आहोत. आम्हां सर्वांच्या हातांत अदृश्य मशीनगन्स आहेत. त्यांची तोंडं आम्ही इतरांकडे वळविली आहेत—विचारांच्या मशीनगन्स! फक्त म्हाताऱ्या बायांना शांतता हवी आहे. पण जगाला म्हाताऱ्या बायांची मुळीच जरूर नाही." डेनिसने चंपाकडे पाहिले. त्याला ती एखाद्या म्हाताऱ्या दुःखी आईसारखी दिसली.

"माझा सतत नाश करण्यात आला आहे." मायकेलने मान वर करून म्हटले, "परंतु मी माझ्या बांधवांच्या प्रेताच्या ढिगाऱ्यावर बसून तुमच्यासाठी संगीतरचना केली आहे आणि विचारांचे दीप तेवत ठेवले. मी जंगली पशू आहे? मी तर फक्त..."

"खडी फोडू इच्छितोस?" डेनिसने त्याला मध्येच अडवून त्याचे वाक्य पुरे केले. "आम्ही तुला परवानगी देतो, मायकेल, तू आपल्या व्हिजनच्या मार्गाने जात राहा."

"इतरांच्या व्हिजनमध्ये अडथळा आणून ते नष्ट करण्याची इच्छा बाळगणं हे सर्वांत मोठं पाप आहे. मोझेसच्या दहा आदेशांमध्ये या पापाचा उल्लेख नाही. म्हणून मी तुला त्याची परवानगी देतो." स्लिल म्हणाला.

एंजेलोने गिटार बाजूला ठेवले व तो म्हणाला, "मायकेल, तू यहुदी आहेस; परंतु तू इंग्रजही आहेस. तू आपल्या बॉंबफेक्या विमानातून बॉंब टाकून माझ्या सुंदर शहरांचा विध्वंस केला आहेस. तरी मी तुला क्षमा करतो."

"मायकेल!" सुरेखा म्हणाली, "तू यहुदी आहेस, परंतु त्याचबरोबर तू इंग्रजही आहेस. म्हणून तू स्वतःला आमच्यापेक्षा श्रेष्ठ समजत आला आहेस. आता तू मोठ्या हौसेनं आणि उत्साहानं आशियाई बनायला निघाला आहेस. कारण तुला वाटतं की आपली मुलं पॅलेस्टाइनमध्ये आहेत. परंतु वस्तुतः तुझी मुलं हँपस्टेडमध्ये आहेत. तरी आम्ही तुला माफ करतो."

यानंतर एकप्रकारची उदास निःस्तब्धता पसरली. झाडीमध्ये फुलपाखरे उडत होती. समोरच्या नदीतून एक नाव तरंगत गेली. एंजेलोने पुनः गिटार वाजविण्यास सुरवात केली.

* * *

गौतम नीलांबर व त्याचे सहकारी गाडीतून उतरून हॉटेलात गेले. लाउंजमध्ये (पडवीत) बसून त्यांनी चहा मागविला; आणि गौतमाने काही पत्रे वेटरकडे पोस्टात टाकण्यासाठी दिली. ते लंडनहून आले होते आणि लिडहर्स्टला चालले होते. त्यांच्याबरोबर बिल, शांता, तलअत व नरगीश होती. ही मंडळीही कोणतातरी जागतिक प्रश्न सोडविण्यात मग्न होती. कमालाने खिडकीतून बाहेर पाहिले. तेथून बागेचे दृश्य दिसत होते. उतारावरून नदी वाहात होती. वेताच्या व प्रिमरोजच्या पानांतून एक पांढरी लॉंच दिसत होती.

"बाहेर चंपाताई, स्रिल वगैरे लोक बसलेत." तलअतने खिडकीजवळ जाऊन म्हटले.

ही मंडळी निर्मलेला भेटावयास चालली होती. तिचे सॅनिटोरियममधले हे तिसरे वर्ष होते. तिच्या एका फुफ्फुसाचे ऑपरेशन झाले होते आणि तिचे डॉक्टर रोनाल्ड ग्रे यांच्या मते आता ती पूर्ण बरी होणार होती. तिची मित्रमंडळी दर शनिवारी तिला भेटण्यास लंडनहून जात. गौतमालाही सवड असली म्हणजे तो कमाल व तलअत यांच्याबरोबर तिला भेटावयास जाई. तिच्या ऑपरेशनच्या वेळी हरिशंकरही वॉशिंग्टनहून तेथे आला होता. गौतम मनापासून निर्मलेची काळजी घेई. तो आणि निर्मला चुकूनही चंपाचा उल्लेख करीत नसत. जीवन इतके गुंतागुंतीचे, घाईगर्दीचे, चढउतारांचे, खडबडीत व विसंगतींनी भरलेले होते की माणसाला सर्व परिचितांशी संबंध व संपर्क ठेवणे शक्य होत नव्हते. तेवढा वेळही कोणाजवळ नव्हता.

गौतम आता खूपच प्रख्यात झाला होता. त्याने भारताचे परराष्ट्रीय धोरण व आर्थिक प्रश्न यांवर दोन ग्रंथ लिहिले होते. त्यांचा खूपच गाजावाजा झाला होता. आता तो एक 'सेलेब्रिटी' (प्रथितयश व्यक्ती) होता.

निर्मलेच्या आजाराने गौतमाच्या साऱ्या जीवनातच जणू एक क्रांती घडवून आणली होती. माणसाचा आत्मा असलेल्या वैयक्तिक नरकात कोणकोणती विले वसलेली आहेत व त्यांत कसले-कसले लोक राहातात, हे कोणालाच माहीत नव्हते. विश्वाच्या ज्या कोपऱ्यात 'गौतम नीलांबर' अशी पाटी लागलेली आहे तेथे केवढी वादळे उठत असतात, ज्या प्रकारचे घर प्रत्येक तरुणाच्या मनात असते त्या घरात कोणती मुलगी बसलेली आहे हे कोणालाच माहीत नव्हते. प्रत्येक तरुण फक्त एकदाच या घराची दारे उघडून फक्त एकाच मुलीच्या मांगात शेंदूर भरतो. परंतु ज्याचे नाव गौतम नीलांबर आहे त्या तरुणाचे रहस्य कोणाला माहीत आहे ? त्याच्या अंतःकरणात खरोखरी कोण आहे हे बहुधा त्यालाही माहीत नसावे. किंवा कदाचित माहीत असेलही ! इतर जाणणारे कोण होतात ?

आणि ज्याला जीवन असे म्हणतात त्या केसानेक्षाही बारीक पुलावर निर्मला उभी होती. जीवनाशी खेळ करिता येत नसतो. हृदय ही एक महान वस्तू आहे. तिच्याशी कोणी खेळू शकत नाही.

एका गोपीचे हृदय—जे साऱ्या विश्वाचे केंद्र आहे.

"चंपाताई बागेत बसलीय." तलअतने खिडकीजवळ जाऊन पुनः म्हटले, "चला, आपण तिला भेटू. कित्येक दिवसात तिची भेट झाली नाही."

गौतम घड्याळाकडे पाहून म्हणाला, "नको. इथून सरळ लिंडहर्स्टला चला. नाहीतर परत यायला उशीर होईल."

ती सर्वजण हॉटेलच्या लाउंजमधून बाहेर पडून गाडीत जाऊन बसली; आणि लिंडहर्स्टकडे रवाना झाली.

• •

त्यांची मोटार भर्रकन हॉटेलच्या फाटकातून बाहेर पडलेली चंपाने पाहिली. एंजेलो झाडाखाली बसून गिटार वाजवीत राहिला. रोशन, मायकेल, डेनिस, सुरेखा व गुलशन फिरत-फिरत नदीच्या बाजूला गेली होती. चंपाने आरामखुर्चीतून वाकून गवताचे एक पान खुडले.

"कसला विचार करते आहेस ?" सिरिलने विचारले. ऊन्ह लागू नये म्हणून एक मासिक आपल्या तोंडावर धरून तो समोरच्या खुर्चीत बसला होता.

"कुठं काय ? काही नाही."

"तुझे ते मित्र गेले मोटारीतून..."

"हं !"

"मी असं पाहिलंय की तू स्वतःला त्यांच्या गर्दीत मिसळूही इच्छीत नाहीस; परंतु तुला गर्दींचं आकर्षणही फार आहे. कारण तुझा आणि त्यांचा भूतकाळ एक होता. तू म्हणजे परस्परविरोधी गोष्टींचं गाठोडं आहेस." सिरिल दुःखपूर्ण आवाजात म्हणाला, "तुला पाहिलं की मला फार उदास वाटतं."

"इटालियनांसारखं बडबडू नकोस." चंपा म्हणाली.

"तुझ्या बाबतीत ही आणखी एक आफत आहे. वैयक्तिक पातळीवर येताच तू धाडकन दार बंद करून टाकतेस. म्याड कुठली! तुला स्वतःला आपल्या म्याडपणाची आणि दुर्बलतेची कल्पना आहे?" तो खुर्चीतून उठला आणि झाडाच्या खोडाला टेकून बसला. "तू पुष्कळदा खोटं बोलतेस. ईर्ष्या करतेस. इतरांच्या आनंदानं तुझा जळफळाट होतो. दुसऱ्यांवर छाप कशी पाडायची याच प्रयत्नात तू सारखी असतेस. इतरांनी आपल्यापेक्षा श्रेष्ठ, अधिक चांगल्या स्थितीत असावं, हे तुझ्यानं पाहावत नाही." तो पुढे बोलत राहिला, "चंपा, काळाचा सर्वांत मोठा नीचपणा हा आहे की आपण एखाद्या गोष्टीशी जुळतं घ्यायला तयार होतो न होतो तोच आपला जमाना निघून गेला आहे, असं आपल्याला आढळून येतं. चंपा, देव करो आणि तुझी स्थिती सुजाता मुकर्जींसारखी कधी न होवो. तुझं एका संस्थेत रूपांतर व्हावं, असं मला वाटत नाही. चंपा अहमद आजपासून दहा वर्षांनी चेलसीच्या एका स्टुडियो फ्लॅटमध्ये कलाकार आणि बुद्धिवानां यांची आश्रयदात्री नि गुरू झालेली असेल! माय गॉड! नुसत्या या कल्पनेनंच माझ्या अंगावर काटा उभा राहातो."

"मी इतकी दयनीय, कीव करण्यासारखी आहे?"

"छे:! आपण सगळेच दयनीय आहोत. इतके सारे दोष तुझ्यात असूनही तू मोठी गोड आहेस. तू निष्कपट, निरागस आहेस, ही फार मोठी गोष्ट आहे. आणि बहुधा इतरांना माफ करण्याची क्षमताही तुझ्या ठिकाणी असावी. होय की नाही!"

"होय...बहुधा!"

तो गप्प बसला. पावसाची झिमझिम सुरू झाली. ती उठून हॉटेलच्या लाउंजमध्ये गेली. मायकेल व त्यांचे इतर सहकारी दूर लॉनमध्ये बसलेले दिसत होते. लाउंजच्या एका सोफ्यावर काही कागद व वृत्तपत्रे पडली होती. गौतम नीलांबर ती तेथे विसरून गेला होता.

"तू मैत्री करू शकतेस." सिरिल म्हणत होता, "बाकी स्वतःचे तुकडे तुकडे करून सर्वत्र विखुरली आहेस—या कागदाच्या तुकड्यांसारखी!" त्याने सहजगत्या बसळ पडलेला एक रिकामा लिफाफा उचलून घेतला. त्यावर गौतमाचा पत्ता लिहिलेला होता. त्याने त्या लिफाफ्याचा चोळामोळा करून तो शेगडीत फेकून दिला.

"सिरिल, मी इतक्या प्रखर प्रकाशात आहे?"

"तुला हा प्रकाश फार प्रिय आहे, नाही ?"

एके काळी खुद्द गौतमाने तिला आमिर रजासंबंधी परीक्षा घेणारे प्रश्न विचारले होते.

"पण तो तुला भेटत का नाही ?" त्याने पुनः विचारले.

"कोण जाणे ! मला तरी त्याला भेटायला सवड कुठं आहे ?"

"तू पुनः खोटं बोलायला लागलीस."

ती एका उंच शिखरावर उभी होती आणि साऱ्या जगाला तिच्या अगदी बारीक-सारीक गोष्टी माहीत होत्या..."मी स्वतःला असं का विखरूं दिलं ? आता फार उशीर झालाय. आता...आता काय करता येणार ? सारा जमाना निघून गेलाय...सारा जमाना...!"

बाहेर पावसात काही मोटारी येऊन थांबल्या. काही मशहूर शेक्सपीरियन नट लाउंजमध्ये आले. त्यांच्यापैकी एक जण सिरिलला ओळखत होता. ते सगळे शेकोटीजवळ जाऊन बसले. दुसऱ्या गप्पा सुरू झाल्या.

• • •

लिंडहर्स्टचे भव्य सॅनिटोरियम शेकडो एकर भूमीवर पसरलेल्या सुगंधित वृक्षांच्या मध्यभागी शांतपणे पावसात भिजत होते. या मनोहर स्वर्गात लोक आरामात टेलिव्हिजन पाहात आपल्या अंतकाळाची प्रतीक्षा करीत किंवा एखाद्या दुसऱ्या प्रकारच्या समाप्ती-पर्यंत मधल्या काळात बाहेरच्या जगात परत जात. इमारतीच्या एका भागातील कोपऱ्यात निर्मलेची खोली होती. निर्मला तक्क्याला टेकून अर्धवट पहुडलेल्या स्थितीत प्रसन्न चित्ताने सर्वांकडे पाहात होती.

कमाल व बिल यांच्याबरोबर शांता निर्मलेच्या पलंगाच्या दुसऱ्या बाजूला बसली होती. गौतम फुलांच्या एका मोठ्या गुच्छाशेजारी कोपऱ्यात बसला होता.

"गौतमजी !" निर्मला त्याला उद्देशून म्हणाली, "आता ताज्या बातम्या सांगा ना !"

तो उठून तिच्या समोर खिडकीत जाऊन बसला.

"मजलिसच्या सम्मेलनाची तयारी जोरात चालू असेल, नाही ?" निर्मलेने तलअतला मोठ्या उत्सुकतेने विचारले.

"अगदी जोरात !" तलअत उत्तरली. पुन्हा एक क्षणभर ती सारी गप्प बसली. दर वर्षी निर्मला मजलिसच्या वार्षिक उत्सवाच्या तयारीत सर्वांच्या पुढे असे. सम्मेलनातील तिच्या गैरहजेरीचे हे तिसरे वर्ष होते. "बस्स ! फक्त यंदाच ऑगस्टमध्ये तू आमच्या बरोबर राहू शकली नाहीस." कमाल म्हणाला, "पुढच्या वर्षी, इन्शाअल्लाह (परमेश्वराची इच्छा असेल तर), तू पुनः सम्मेलनाच्या तयारीत पुढाकार घेशील."

"इन्शाअल्लाह !" निर्मला हसून उद्गारली.

"काल भैयासाहेब भेटले होते." गौतम म्हणाला, "आज बहुधा ते तुला भेटायला येतील."

"ते मला कितीदा तरी भेटून गेले आहेत, बिचारे!" निर्मला म्हणाली, "मुलींच्या बाबतीतल्या त्यांच्या हालचाली कशा काय चालल्या आहेत?"

"ठीक चालल्या आहेत." तलअतने उत्तर दिले.

"पुनः स्कॅंडलिंग सुरू झालं?" कमालने दटावले.

"छेः रे! मी आता यानंतर लगेच प्रोफेसर टॉयनबींचा मुद्दा काढणार होते." तलअत किंचित वरमून म्हणाली.

"तुम्ही त्यांना सम्मेलनाला बोलावलंय?" गौतमाने विचारले.

"होय! आम्ही तर स्टीफन स्पेंडरनाही बोलावलंय." तलअत गंभीरपणे म्हणाली.

"हे विकल्या गेलेल्या आणि विकत घेतलेल्या इंटलेक्चुअल्सचं (बुद्धिमंतांचं) युग आहे." गौतम म्हणाला, "या युगात आर्टिस्टांची फार मोठी किंमत निश्चित करण्यात आलेली आहे. कोण म्हणतो, आजच्या जगात कलावंताची कदर केली जात नाही? पाहा ना, आशियातले कलाकार कसे नाना प्रकारच्या शिष्यवृत्त्या मिळवून अमेरिकेला चालले आहेत. लोंढेच्या लोंढे लागलेत जणू!"

"आशियातल्या कलाकारांचे लोंढे सोव्हिएट यूनियन आणि चीन या देशांतही चालले आहेत." बिल म्हणाला. तो भयंकरच निष्पक्ष होता.

बाहेर देवदाराच्या वृक्षांवर संधिप्रकाशाची अरुणिमा पसरली होती.

"आता निघू या!" गौतम म्हणाला, "लंडनला पोचेपर्यंत बरीच रात्र होईल."

"तुम्ही सगळे चाललात?" निर्मलने अकस्मात घाबरून विचारले, "मी पुनः एकटीच राहाणार!"

"तू एकटी नाही आहेस, निर्मला!" कमाल तिच्या पलंगावर किंचित वाकून म्हणाला, "आम्ही सगळे सदैव तुझ्या जवळच आहोत."

"निर्मला, पुढच्या आठवड्यात मी कदाचित येऊ शकणार नाही. 'पंडितजी' एका परिषदेसाठी दिल्लीहून इकडे येणार आहेत."

गौतम मृदू स्वरात म्हणाला.

"ठीक आहे गौतम, तू माझ्यासाठी स्वतःच्या कामात हयगय होऊ देऊ नकोस." निर्मला हलक्या आवाजात म्हणाली.

ती सर्वजण गेलेल्या ओलांडून बाहेर आली. दूर विंगच्या प्रकाशपूर्ण खिडकीत उभी असलेली निर्मला त्यांच्याकडे पाहात होती. देवदारांच्या अंधारात ती लोकरच दृष्टिआड झाली.

पाऊस थांबल्यावर चंपा व सिल त्या गावठी हॉटेलातून बाहेर पडली. लॉंचमधून ती सगळी केंब्रिजला परतली. वाटेत नदी दाट वनातून वाहात होती. झाडांच्या फांद्यांनी पाण्यावर जणू छप्पर बनविले होते. उद्यापासून सुटी सुरू होणार! चंपाने सिलकडे पाहिले. सर्व काही बोलून झाले होते. आता बोलण्यासारखे काय राहिले होते? प्रत्येक गोष्टीत तोचतोपणा आला होता—सिल ॲश्लेमध्ये देखील! तो तिला इतका संपूर्णपणे ओळखत होता आणि ती त्याला जणू अंतर्बाह्य ओळखत होती. किती दुःखाची गोष्ट आहे! आता तिने कोणत्या जंगलात जाऊन लपावे? "अब वन-उपवनमें, चंचल मोरे मनमें, कुंज-कुंज फिरे श्याम!" ती रेलिंगवर वाकून एक खूप जुने गीत गुणगुणत होती.

दुसऱ्या दिवशी ती पुनः कॅम नदीच्या काठी लाकडी बोटहाउसखाली जाऊन बसली. सिलचे सोनेरी केस वाऱ्यावर उडत होते. तो चंपाला इतका सहज-परिचित वाटला, जणू तो तिचा नवराच असावा. तिचे अंग शहारले. तो तिचा नव्हे तर दुसऱ्या एका स्त्रीचा नवरा होता. त्या स्त्रीला चंपाने अजून पाहिलेही नव्हते. तिच्या नजरेसमोरच्या दृश्यांवर पुनः सावल्या तरळल्या. किनाऱ्याला नौका बांधलेल्या होत्या. गायींनी नदीकाठी येऊन आपली प्रतिबिंबे पाहिली व त्या खूष झाल्या.

"चंपा!" सिलने एका पालथ्या होडीवर बसून म्हटले, "तू आपल्या पार्श्वभूमीची माहिती मला सांग." दूर देशाहून आलेली ही तरुणी आपल्या आधाराने बसलेली त्याला दिसली. ती अत्यंत असुरक्षित होती. कदाचित ती स्वतःच्या भूतकाळात सुरक्षित राहू शकेल! परंतु त्याचे स्वतःचे जग कोणते होते कोण जाणे! जगे नेहमी बदलत असतात. ही मुलगी त्याला अत्यंत ओळखीची वाटली. रोजमेरी त्याच्या नजरेला अपरिचित दिसू लागली. तो एकाएकी खूप घाबरला. चंपा अहमद नावाच्या त्या पोरीशी आपण कोणत्या तरी अदृश्य बंधनाने बांधले गेलो आहोत, असा त्याला भास झाला त्याला त्या मुलीची व स्वतःचीही फार कीव आली.

"तूही माझ्यावर कादंबरी लिहिणार आहेस की काय?" चंपाने विचारले.

"छेः बुवा! दुसरा कुणी लिहिणार होता की काय?"

"बिल—विल्यम क्रेग!"

"अंहं! मी कादंबरी लिहू इच्छीत नाही."

"मी तुला फार विचित्र वाटते काय?"

"तू काही तशी मुलखावेगळी नाहीस. तुझ्यासारख्या असंख्य मुली जगात आहेत —समजूतदार, कोमल अंतःकरणाच्या, आकर्षक!"

"याचा अर्थ असा की या तीन शब्दांतून माझी सगळी माहिती मिळून जाते." चंपा मनाशी म्हणाली. ती डोळे मिटून आपली पार्श्वभूमी आठवू लागली : बनारसचा मोहल्ला, घर. आंगणात काथ्याच्या खाटा पडल्या आहेत. बाबा गुडगुडी ओढत आहेत आणि त्याच वेळी दाव्यांचे कागदपत्र पाहात आहेत. सिलला हे दृश्य दाखविणे तिला पसंत नव्हते. तेथून उडी मारून ती पुढे गेली. लखनौ, आय. टी. कॉलेज, कैलास हॉटेल, 'गुलफिशाँ'...परंतु 'गुलफिशाँ' हे काही तिचे घर नव्हते (होऊ शकले असते!)...

"हा पाहा कोण येतोय तुझ्या भूतकाळातून डोकं वर काढून!" सिल म्हणाला.

चंपाने मान वर करून पाहिले. किनाऱ्यावर दूरवर विखुरलेल्या, सुटी घालविण्यासाठी आलेल्या लोकांमधून बाहेर पडून कमाल बोटहाउसकडे येत होता.

"हॅलो चंपाताई! हॅलो सिल!" तो जवळ येऊन म्हणाला.

"हॅलो!"

"काल सकाळी आम्ही तुम्हांला एका रोड हाउसमध्ये पाहिलं होतं."

"अस्सं!"

"पण आम्ही जरा घाईत होतो..."

"ठीक आहे. त्यात काय एवढंसं? बस ना!"

तोही एका पालथ्या होडीवर बसला.

"मी सिलला लखनौसंबंधी सांगत होते." चंपा म्हणाली.

"खरंच?" कमालाने शिष्टाचार म्हणून उत्सुकता दाखवीत म्हटले..."या बाईसाहेब अजून तिथंच रेंगाळताहेत. जग कुठल्या कुठं निघून गेलंय..." कमाल खेदाने मनाशी म्हणाला.

कमालाच्या बोलण्याच्या ढंगावरून चंपाला त्याच्या मनाचा अंदाज लागला. "तू मला कधी समजू शकणार नाहीस, कमाल!" ती म्हणाली, "तू माझ्यावर नेहमीच वस्तूंची पूजा करण्याचा आरोप करीत आला आहेस. परंतु, उन्हाळ्यातील दुपारी येणारा भुशाच्या ढिगाचा वास, घोड्यांच्या खिंकाळण्याचा आवाज, आणि निःस्तब्ध रस्त्यांवरून जाणारी बैलगाडी...माझ्यामध्ये कदाचित खूप शहाणपण नसेल, परंतु मी या सर्व गोष्टींचा अनुभव घेऊ इच्छिते आणि त्या स्वतःजवळ बाळगू इच्छिते. मी खूप बुद्धिमान असते तर तुमच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास मी केला असता आणि मला समाधान लाभलं असतं.

"सिल! पाऊस पडून गेल्यानंतर 'चाँदबागे'तील कुंजावर पसरणारे रंग तू पाहिले

असतेस...किंवा रामनगरच्या धुळीने भरलेल्या रस्त्यावर दुपारच्या निःस्तब्धतेत, डोकीवर लांबलचक शेंडी असलेला एक लहानसा हिंदू मुलगा एका ओट्यावर एकटाच बसून पावकी-निमकीचा पाढा घोकत असलेला तू पाहिला असतास...छेः छेः! सिल, मी तुला माझी पार्श्वभूमी समजावून सांगू शकणार नाही. फार अवघड आहे ते; आणि तुला ते समजणारही नाही."

"मी तुला सांगतो!" कमालाने पुढे सरकून सांगण्यास सुरुवात केली. तो एकदम त्या दुनियेत जाऊन पोचला. ती दुनिया तेथून फार दूर होती; पण तिच्यावर तो मुग्ध होता. त्या दृश्यांचा आत्मा कमालाहून अधिक उत्तम प्रकारे जाणणे दुसऱ्या कोणाला शक्य होते? तो त्याचा लाडका हिंदुस्तान होता.

"ऐक! ज्ञानवती खांद्यांवर लांबसडक केस सोडून यमनचा ख्याल गात होती, 'आले नबी, औलादे नबी पर वारी-वारी जाऊँ! जहरा के फर्ज़ंद, हसन हुसैन!' आता याचं भाषांतर करून मी तुला कसं सांगू! आणि लग्नाच्या वेळी कल्याणपूरच्या दालनात पडदे खाली सोडून दिले जात आणि लाकडी चौरंगावर बसून कलावंतिणी गात, 'इस बन्नेपर साया अलीका! मोरा श्यामसुंदर बन्ना!' (या नवऱ्या मुलावर अलीचं कृपाछत्र असो. माझा श्यामसुंदर बन्ना!)'...कोणता पाश्चात्य समाजवादी या दृश्याचं सौंदर्य समजू शकेल? 'मोरा श्यामसुंदर बन्ना!'

"आणि," चंपा सांगू लागली, "माझ्या घरी आलेल्या कलावंतिणी गात होत्या, 'मंगल गाऊँ, चौके सजाऊँ, गजरा चमेलीका लाओ री.' चमेलीचा गजरा तू पाहिला आहेस, सिल? आणि, घाघरा नदीच्या काठी माझ्या गावचे शेतकरी बांधावर बसून चांदण्या रात्री आल्हा-ऊदलच्या ताना छेडीत असत, 'अली-अली करके सय्यद दौड़े, आल्हा खींच लीन्ह तल्वार!' आणि कदीरचा भाचा नौटंकीमध्ये (तमाशामध्ये) चेहऱ्याला पांढरा रंग फासून गात असे.

**खुदा का शुक्र है लैला, तिरे दरबार में आया।**
**कि जिस सरकारका था मैं उसी सरकार में आया॥**

लैला, खुदाची मेहेरबानी आहे की मी तुझ्या दरबारात आलो. ज्या सरकारचा मी होतो त्याच सरकारात आलो.]"

"चंपाताई!...ती नौटंकी तुला आठवते? आम्ही तुला नाताळाच्या सुटीत आमच्या गावी घेऊन गेलो होतो. रात्रभर घोंगडी पांघरून आपण 'लैलामजनूँ'चा खेळ पाहिला होता. आमच्या गावचे नट आपल्याला खूष करण्यासाठी आपलं सारं कौशल्य पणाला लावून कामं करीत होते."

"हो ना !" चंपा यावेळी लखनौहून पंचवीस मैल दूर असलेल्या कल्याणपुरात जाऊन पोचली होती. तिने तेथूनच उत्तर दिले. "खरं आहे ! मजनूँ हवेत हातवारे करीत गात होता,

तिरा चेहरा मिरा क़िब्ला, तीरी जुल्फें मिरा ईमाँ ।
तवाफे काबा करने को, तिरे दरबार में आया ॥

[तुझा चेहरा म्हणजे माझा 'काबा' (मक्केतील पवित्र मंदिर) आणि तुझ्या केसांच्या बटा हा माझा धर्म होता. काब्याची प्रदक्षिणा घडावी म्हणून मी तुझ्या दरबारात आलो.]"

"हो ना !" कमाल म्हणाला. तोही कल्याणपुरात बसला होता. ती सर्वजण नौटंकीच्या मांडवात शाली व घोंगडी पांघरून बसली होती. स्टेजवर फक्त एक गॅसची बत्तीजळत होती. कदीरचा भाचा 'मास्टर' फरीद याला गावचे लोक त्याच्या पल्लेदार आवाजामुळे 'झींगुरखा' म्हणजे रातकिडा असे म्हणत असत. तो 'लैला'समोर उभा राहून हरकाळ्या फोडत होता. गावचा ऑर्केस्ट्रा म्हणजे पेटीवादक व तबलजी जोरजोरात हार्मोनियम व तबला वाजविण्यात गुंग झाले होते. 'मास्टर' फरीद गात होता :—

जुलेखा की तरह, जब तिरा आसिक हुआ लैला ।
तो यूसुफ की तरह, बिकने तिरे बाज़ार में आया ।

[यूसुफ जसा जुलेखावर फिदा झाला होता तसा मी, हे लैला, तुझ्यावर फिदा झालो आणि यूसुफप्रमाणेच स्वतःला विकून घेण्यासाठी तुझ्या बाजारात आलो.]

जवळच्या मोढ्यावर गौतम नीलांबर बसला होता. त्याच्या शेजारी हरिशंकर आणि इतर बरोबरीच्या मुली होत्या. गौतम पुढे वाकून अत्यंत गंभीरपणे चंपाला लोक-संस्कृतीची माहिती करून देत होता. ती सर्वजण पहाटे चार वाजेपर्यंत नौटंकीच्या मंडपात बसून होती. त्यांनी मातीच्या कोऱ्या कुल्हडांतून (पेल्यांतून) उसाचा रस व आले घातलेला चहा घेतला होता. कमालाचे वडील नबाब तकी रजा बहादुर यांचे ते वतनदारीचे गाव होते.

ती सारी मोढ्यावर बसून नौटंकी पाहात राहिली. बाहेर आंब्याच्या वनात पौषातील चावरे वारे सूं सूं करीत वाहात होते. मंडपात बसून ती तबल्यावर केरवा ऐकत होती. इतक्यात एक मोटारलॉंच एक इंग्रजी रेकॉर्ड वाजवीत भरकन कॅम नदीच्या लाटांवरून तरंगत गेली. चंपा आणि कमाल केंब्रिजला परत आली.

"आमच्या गावच्या नौटंकीत 'नलदमयंती' व 'इंदरसभा' ही नाटकंही अगदी

फर्स्टक्लास होत असत." कमाल दुःखी व उदास आवाजात म्हणाला. तो पुढे वाकून सिलची सिगारेट पेटवीत होता.

"अन, तुला जूथिका रॉय आठवते, कमाल?" चंपा सावकाश म्हणाली, "आणि बसंती रागातलं ते गीत 'जोगन खोजन निकली है'?"

"हो ना!" कमालाने तिला साथ देत म्हटले, "आणि हिवाळ्यातील उन्हात बसून हरिशंकर गायचा :

**'अगर देनी थी हमको हूरो-जन्नत, तो यहाँ देते'**

[आम्हांला स्वर्ग आणि अप्सरा द्यायच्या होत्या तर त्या इथंच का दिल्या नाहीत?]

आणि 'पिया मिलन को जात थी मैं, सज-धज शीश गुँधाये। लोग कहत मैं बावरी, सब जग हँसी उडाये॥' तुला काय कल्पना—" तो सिलला उद्देशून रागारागाने म्हणाला, "की पंकज मलिक कोण आहे? पहाडी सान्याल आणि आरजू लखनवी, नारायणराव व्यास आणि काननदेवी या लोकांना आमच्या जीवनात केवढं स्थान आहे, ते तुला कसं ठाऊक असणार?"

चंपाने कमालाच्या रोषाचा धागा पकडून बोलण्यास सुरवात केली. ती म्हणाली, "तू मला माझी पार्श्वभूमी विचारतो आहेस. पण तुला काय माहीत की प्यारू कव्वाल, फैयाजखान आणि दीपाली तालुकेदार यांचं आम्हांला किती महत्त्व वाटतं ते?"

"आणि लखनौचे नि अलीगढचे मुशायरे म्हणजे काय चीज होती हे तुला कसं ठाऊक असणार? जिगर मुरादाबादी, फिराक गोरखपुरी आणि आनंद नारायण मुल्ला यांना आम्ही किती मानतो हे तुला कसं माहीत असणार?" कमाल म्हणाला.

"आणि जेव्हा कालिदास असंसांगतो की, 'निर्विंध्या आणि सिंधू या नद्यांवरून, बगळ्यांच्या बरोबर, तो मेघ संदेश घेऊन निघाला', तेव्हा त्या शब्दांचा अर्थ काय असतो, हे तुला कधीतरी कळणं शक्य आहे काय?" चंपा म्हणाली. आता तिच्या आवाजातील क्रोधाची जागा अपार व्यथेने घेतली.

"आणि 'अशोकवनातील सीता' हे हालदारचं चित्र आम्हांला इतकं सुंदर का वाटतं ते तुला कसं कळणार?" कमाल म्हणाला, "छेः छेः! सिल, तुला हे सारं समजावून सांगणं फार अवघड आहे." तो गडबडून उठला आणि बोट-हाउसच्या पायऱ्यांवर जाऊन उभा राहिला. तो नदीकडे पाहू लागला. आता कॅम नदीची गोमती झाली होती.

"कमाल, ऐक!" चंपा काही तरी आठवल्यासारखे सांगू लागली, "रात्रीची वेळ आहे. कुत्री भुंकताहेत. साऱ्या बाजारपेठेत सामसूम पसरली आहे. पशुपक्षीसुद्धा झोपी

गेले आहेत. शेतांमध्ये राखणदार खरबुजांची राखण करीत आहेत. गोंदणीच्या झाडांना बांधलेले डबे बागेतील माळी वाजवीत आहेत. थोड्याच वेळानं जात्यांची घरघर ऐकू येऊ लागेल...

"सरशारनं वर्णन केल्याप्रमाणं?"

"होय!" असे म्हणून चंपा पुनः विचारात गढून गेली.

"आम्ही लोक बहुधा हरिशंकराच्या खोलीवर जमत असू. त्याची खोली म्हणजे वस्तुतः एक बुरूजच होता." कमाल सावकाश सांगू लागला, "त्याच्या पायथ्याजवळून नदी वाहात होती. खोलीत बसून आम्ही जगाचे प्रश्न सोडवीत असू. ती खोली आणि तो ग्रूप सबंध जगभर विद्यमान आहे. जीवनाचा आराखडा अद्यापि चांगला स्पष्ट झालेला नव्हता. अनेक पडदे वर उचलले जात व खाली पडत. कधी प्रखर प्रकाश आत येई तर कधी अंधुकपणाचे सावट आत येई. या मानसिक ऊन-सावलीत वेळ निघून गेला. आम्हांला असं वाटे, जणू साऱ्या मानवतेच्या रक्तानं आमचे हात माखले आहेत. आपण हे रक्त धुतलं पाहिजे. आणि हे पाहा काय झालं..." त्याने आपले हात पुढे पसरले. "एके दिवशी सकाळी उठून पाहतो तो खरोखरीच आमचे हात रक्तानं माखलेले आम्हांला दिसले. क्लासिकल कल्चरचं तुणतुणं वाजविणारे सारे पोझियर (ढोंगी बगळे) आम्ही पाहिले तो तेही इतरांच्या रक्ताने न्हाऊन निघाले होते. परंतु आमच्यामध्ये असे अनेक लोक होते की जे या रक्तपाताचे प्रायश्चित्त घेण्यास तयार नव्हते. ते मानवतेच्या महान मूल्यांच्या आणि धर्मांच्या श्रेष्ठत्वाच्या गप्पा मारीत इकडे तिकडे पळून गेले.

"परंतु त्यांच्या व्यतिरिक्त इतर लोकही होते. खरे, सच्चे मानव..." त्याने चंपाकडे पाहिले.

"कदीर आणि कमरून...?" चंपा म्हणाली.

कमालाने क्षणभर मूक राहून त्यांचा उल्लेख करण्याची परवानगीच जणू तिच्याकडे मागितली. त्याला ती माणसे अत्यंत पवित्र वाटत होती

"होय! कदीर आणि कमरून, रामऔतार आणि रमदैया, आमच्या गावचे शेतकरी, एक्केवाले, तांबोळी, कशिदा काढता-काढता आंधळे होणारे कारागीर, आमच्या बागांचे माळी, पालख्या वाहाणारे भोई...हे सगळे आमच्या पृष्ठभूमीवर आहेत. त्यांची ओळख तुला कधीच पटणार नाही." एवढे बोलून त्याने आपले बोलणे संपविले.

चंपा अजून त्या काळातून परत आली नव्हती. ती सांगू लागली, "होय! आणि आमच्या नद्या? नदी हेही एक कायमचं पात्र होतं त्या नाटकातलं. त्यांची नावं... त्यांची नावं तरी ऐक. शरयू, शारदा, मंदाकिनी, मधुमती, गोमती..."

आता अकस्मात चंपाचा आवाज कमालाला कंटाळवाणा वाटू लागला. "मुलींच्या बाबतीत ही ब्याद नेहमीच असते," तो मनाशी म्हणाला, "आधीच त्यांना बडबडायची भारी हौस आणि त्यात पुन: आपण कलावंतही आहोत, असा गैरसमज त्यांनी करून घेतला की मग विचारायलाच नको."

ती त्या नदीचे वर्णन करू इच्छीत होती. आणि कमाल त्यातून निसटून पळून जाऊ इच्छीत होता. नदीचं 'कॅरेक्टर'? "ही गोष्ट माझ्यापेक्षा अधिक कुणाला माहीत असणं शक्य आहे?" तो मनाशी म्हणाला, "मला ती घरं आठवतात... ती झाडं ...चंपाताई, तू स्वतः..."

"आणि बागेत बहाव्याची झाडं होती." ती सांगू लागली. "आणि एक बेलाचंही! कमाल, गौतमाला विचार, तुला ती धपधप पडणारी बेलफळं आठवतात?" तिने न राहून प्रथमच उल्लेख केला.

कमाल विचारात गढून गेला. "आता मी हिला कसं सांगू की गौतम तुला विसरून गेलाय? परंतु विसरण्याला तरी काय अर्थ? ही त्याला अवश्य आठवत असणार— ज्याप्रमाणं त्याला नदीची, सिंघाडेवाली कोठीची, बहाव्याच्या झाडाची आटवण आहे त्याप्रमाणं! अजूनही गौतम भावनाप्रधान स्वरात या गोष्टींचा उल्लेख करीत असतो. काय आफत आहे!" कमालाने त्रासिकपणे चंपाकडे पाहिले. "या पोरी अशा जीव का टाकतात?...खरं म्हणजे..." त्याने आरामात पायावर पाय टाकून विचार करण्यास सुरुवात केली, "यांना हजारो वर्षांपासून या 'कॉम्प्लेक्स'मध्ये (गंडामध्ये) अडकवून टाकण्यात आलं आहे. असं सांगतात की ती एक सती (पार्वती) होती. नंतर सीता, त्यानंतर या गोपींचं 'फ्रॉड' सुरू झालं......यांना जगात दुसरं काही कामच नाही जणू. बस्स! एखाद्या भल्या माणसाला धरायचं आणि त्याची ही पूजा, ही पूजा करीत राहायचं. या साऱ्या ख्रिस्ती संतिणीही असाच विचार करीत असतील की येशू ख्रिस्त भेटला तर आपण त्याचे पायमोजे रफू करून देऊ." तो खड्या सुरात म्हणाला, "मी गौतमाला अवश्य विचारीन"......"आणि मला माझे मोजेही रफू करून घ्यायचे आहेत." आपल्या पावलांकडे पाहात तो त्याच दमात म्हणाला, "उद्या मी यूथ फेस्टिव्हलसाठी जर्मनीला चाललोय. आता रात्रीपर्यंत लंडनला जाऊन पोचलो तर तलअत माझ्या प्रवासाची सारी तयारी करून देईल."

"चल, आम्ही तुझ्याबरोबरच येतो." सिल उठत म्हणाला. ते शहराच्या दिशेने निघाले.

चंपाने केंब्रिजला परत आल्यानंतर आपल्या हॉस्टेलच्या खोलीत जाऊन खिडकी उघडली. खालच्या बाजूला दिव्याच्या निळ्या प्रकाशात निर्मनुष्य सडक निमूटपणे वाहात

होती. सेंट जॉनच्या घड्याळात अकराचे टोले पडले. दूर जीझस गल्लीत कोणीतरी ट्रंपेटवर आपले करुण गीत वाजविण्यास सुरुवात केली.

**बेला नाइ रे, जोल्दी जोल्दी !**
**ओ बेला शोनार कोन्नर ऑंचल धोइरा**
**जादुर काठी हाथे लोइया, माइलो रो जोतो बुझी,**
**बेला नाइ रे जोल्दी जोल्दी !**
**बेला नाइ...?**

[आता वेळ मुळीच नाही. घाई कर. सुवर्णकन्येचा पदर धरून, जादूची काठी हातात घेऊन दिवस निघून चालला आहे. आता मुळीच सवड नाही. घाई कर. घाई कर.]

वेळ नाही. घाई कर, घाई कर ! लोकांकडे पाहा, त्यांचे चेहरे किती किळसवाणे आहेत ! किती कुरूप आहेत ही माणसे ! त्यांच्यापासून दूर पळ. आता मी कोणत्या बाजूला जाऊ ? माझे शत्रू, माझे मित्र या सर्वांना मी रस्त्याच्या कोणत्या वळणावर कोणत्या अपरिचित सरहद्दींच्या पलीकडे अकस्मात सोडून दिले आहे ? ते लोक कुठल्या चौकात तर बसून नाही ना राहिले ? छतांच्या पलीकडे, नद्यांच्या पैलतीरांवर, दलदलींच्या पलीकडे काय आहे ? ही मी आहे. हा तू आहेस. बाकी सर्व माझं 'प्रॉजेक्शन' (प्रक्षेपण) आहे. हा कायमचा 'मी' ! समोर लाल छप्पर असलेलं चॅपल (ख्रिस्ती देऊळ) आहे. त्यातील घंटा वाजत आहेत. जंगलातील पायवाटेने जाताना मी 'एंजल्स'चा (देवदूतां)चा आवाज ऐकला. तो आवाज धुक्यातून तरंगत माझ्या दिशेने येत होता. थंड, अपरिचित पाण्याच्या प्रवाहात तरंगत असता मी तुझी आठवण काढली.

समोर लाल छप्पर असलेलं छत आहे. वसंत ऋतू आला. पायवाटा पहाटेच्या ताऱ्याच्या फुलांमध्ये पडल्या. ती दोघे अजून आली नाहीत—या लाल छपराच्या देवळात ज्यांचं लग्न व्हायचं आहे ती दोघे ! तळ्यावर पाऊस पडतो आहे. मी नेहमी, सदैव तुझ्याबरोबर राहीन !

*I loved my love with a platform ticket,*
*A jazz song.*
*A handbag, a pair of stockings of Paris Sand . . .*
*I loved her long.*

*I loved her between the lines and against the clock,*
*Not until death*
*But life did us part.*

*I loved her with peacock's eyes.*
*And the wares of Carthage,*
*With blasphemy, camaraderie,*
*and bravado and lots of other stuff.*

*I loved her with my office hours, with flowers and Sirens,*
*With my budget, my latchkey and my daily bread,*
*And so to London and down the ever-moving Stairs.*†

## ४५

**त्या** दिवशी चंपा हॉस्टेलमधून बाहेर पडली तेव्हा दुपारनंतरची निःस्तब्धता सर्वत्र पसरली होती. "उद्या कॉलेज बंद होणार! आता मी कुठं जाऊ? काय करू?" (ज़िन्दगी मुन्तज़िर है मुँह फाड़े – जीवन आ वासून वाट पाहात उभे आहे)! हा प्रयोगही बहुधा अयशस्वीच ठरला म्हणायचा. तिने मान वर करून दूरवर पसरलेल्या बागांवरून नजर फिरविली. केंब्रिजच्या हिरवळीवर निळे ढग पसरले होते. ती 'बॉक्स'-च्या बाजूने फिट्‌जविल्यम लायब्ररीकडे जाणाऱ्या रस्त्याच्या पुलावर आली. "शोलोम ओलेखुम!" एक यहुदी विद्यार्थी पुलावर बसलेल्या दुसऱ्या यहुदी विद्यार्थ्याला सलाम करीत सायकलवरून निघून गेला. "तुझ्यावर खुदाची कृपा राहो!"

"तुम्हां सर्वांवर खुदाची कृपा राहो!" चंपा मनातल्या मनात उद्गारली.

जीवनामध्ये मुळातच इतके दुःख आहे. त्यासाठी पुनः तत्त्वज्ञानाची काय जरूर आहे? माणसे सुखाच्या शोधात किती खालच्या पातळीवर उतरतात! पुलावर बसून रेखाचित्रे काढणारा तो यहुदी विद्यार्थी तिला पाहून अत्यंत आनंदित झाला. "बैस ना!" त्याने आर्जवी स्वरात चंपाला म्हटले, "मी तुझं स्केच काढतो." त्या विद्यार्थ्याला वाईट वाटू नये म्हणून ती बसली. "आजचा शेवटचा दिवस. उद्या तू कुठं जाशील, कोण जाणे! तुझं रेखाचित्र मी माझ्याजवळ ठेवीन." तो भरभर पेन्सिल चालवीत म्हणाला.

चंपाने डोकावून पाहिले. स्केच अगदीच रद्दी होते. परंतु ती मन मारून, शिष्टाचाराखातर बसून राहिली. ती मनात म्हणाली, "कदाचित हेच माझं खरं रूप असेल! हा अयशस्वी चित्रकारच बहुधा माझं चित्र रेखाटण्यात यशस्वी झाला असावा."

---

† Louis Mac Neice.

"आवडलं तुला चित्र?" यहुदी तरुणाने खुषीत येऊन विचारले, "तू खुष असावंस असं मला वाटतं. मी तुला कोणत्या मार्गानं खुष करू शकेन?" बिचारा भोळा असावा.

"तू मला खुष करू शकणार नाहीस." चंपा एकदम कर्कश स्वरात ओरडली. ("आम्ही सारेच हलकट आहोत. आनंदाच्या शोधात आम्ही किती बदमाषगिरी करतो."—ती मनात म्हणाली!)

"तो कोण आहे?" त्या मुलाने अचानक अत्यंत खिन्न होऊन विचारले, "तुला खुष करू शकेल असा कोण आहे?"

"हा अत्यंत निष्ठुर आणि नीचपणाचा प्रश्न आहे."

"माफ कर, हं!" तो तरुण उदासपणे म्हणाला.

"अच्छा! खुदा हाफिझ! शोलोम ओलेखुम!" चंपा हसून म्हणाली.

"शोलोम ओलेखुम!" त्या तरुणाने उत्तर दिले आणि ती नदीकडे जाऊ लागली तेव्हा तो तिच्याकडे पाहात राहिला. त्या बाजूला मायकेल व डेनिस उभे होते.

"स्लिल अजून सापडला नाही?" डेनिसने त्रासिक स्वरात ओरडून विचारले.

"नाही."

"कुठं गडप झाला हा स्लिल!" डेनिस उद्गारला. दोघांनी रागारागाने चंपाकडे पाहिले.

"मी स्लिलला जबाबदार नाही, डेनिस!" चंपा सावकाश म्हणाली.

"ओह! चंपा, मला माफ कर. मी तुझ्यावर ओरडलो काय?" मायकेल नम्रपणे म्हणाला, "चला, आज 'कोहेनूर'मध्ये शेवटचं जेवण घेऊ."

"आज...शेवटचं...!" सर्वांच्या ओठांवर हेच शब्द होते. त्या भावनाप्रधान वातावरणापासून तिला दूर राहायचे होते. परंतु केंब्रिजच्या विद्यार्थीजीवनातील शेवटचा दिवस होता, हेही खरेच होते.

* * *

हॉटेलात जाऊन बसल्यानंतर त्यांनी स्लिलचा विषय काढला नाही. "माणसं इतकी दयाळू का बनतात? एकमेकांविषयी इतकी सहानुभूती का बाळगतात? हे लोक माझेही भयंकर हितचिंतक आहेत. आता मी पुनः क्षुद्रपणाच्या पातळीवर उतरले आहे."

काही दिवसांपूर्वी तिने सहज बोलता बोलता रोजमेरीच्या खुशालीची चौकशी केली होती.

"बरी आहे!" स्लिल म्हणाला होता, "मला केंब्रिजचं माझं शिक्षण पुरं करता यावं म्हणून बिचारी आजारी असून नोकरी करते."

"आणि तुला दुसऱ्या पोरींशी इष्काचे चाळे करता यावेत म्हणून..." चंपा

बेसावधपणे बोलून गेली होती. ते ऐकताच स्रिल खिडकीतून उडी मारून पळून गेला होता. त्याचा चेहरा रागाने लाल झाला होता. त्या दिवसापासून स्रिलचा काही पत्ता नव्हता.

अचानक तो बाहेर पावसात भिजत असलेला त्यांच्या नजरेस पडला. डेनिस चटकन उठून त्याच्याकडे धावला. परंतु तो त्याचे काही ऐकायला तयार नव्हता.

अखेर चंपा उठून बाहेर गेली आणि त्याला दटावून म्हणाली, "आत चल! हा काय पोरकटपणा?"

"माझ्याजवळ पैसे नाहीत. मी कसा आत येऊ?" त्याने खालच्या आवाजात डेनिसला म्हटले.

चंपाचा गळा भरून आला. गेल्या आठवड्यात याच ठिकाणी ती स्रिलला म्हणाली होती, "तू इतर पोरींशी इष्कबाजी करीत फिरावंस म्हणूनच तुझी बायको नोकरी करत्येय."

आणि तो चंपाकडे वळून म्हणाला, "तुला हे ऐकून मोठा आनंद होईल की रोज-मेरीनं या आठवड्यात मला चेक पाठवला नाही; कारण मी तिला कळवलं होतं की मी तुला काडीमोड देणार आहे."

"तुझं...तुझं डोकंबिकं फिरलंय की काय?" चंपा गडबडून म्हणाली. त्याच क्षणी तिला असा भास झाला की मायकेल व डेनिस आपल्याकडे तिरस्काराने पाहात आहेत. हाच तिरस्कार तिने तहमीना, निर्मला व [illegible] क्रेग यांच्या दृष्टींतही पाहिला होता.

"होय!" स्रिल थंडपणे म्हणाला; आणि आपल्या रेनकोटाच्या खिशात हात घालून सिगारेट शोधू लागला.

डेनिस व मायकेल काही न बोलता हॉटेलात परत गेले. चंपा व स्रिल पावसात भिजत राहिली.

"चल, आपण दुसरीकडे [illegible]ऊ. पावसात भिजण्यामध्ये काय अर्थ आहे!"

"तसं पाहिलं तर कोणत्या [illegible]ष्टीत काय अर्थ आहे?" स्रिल त्याच स्वरात म्हणाला.

"तुझं डोकं फिरलंय, स्रिल!" चंपा पुनः म्हणाली.

"प्रत्येक घटना स्वतःपुरती एकटीच असते. ती पुनः घडत नसते. चंपा, क्षणांची पुनरावृत्ती होऊ शकेल असं तू समजू नकोस. तुझं जीवन...मी...या साऱ्या गोष्टी...! काळाच्या शोकांतिकेला तू हसू शकणार नाहीस."

"चल, मी तुझ्याबरोबर येते." ती हलक्या स्वरात म्हणाली.

ती फूटपाथवरून चालू लागली. जणू ती कबरस्तानाकडेच चालली असावीत, असा भास होत होता. ओळखीची मुले भेटली की स्रिल अत्यंत दुःखी आवाजात त्यांना 'हॅलो हॅलो' करीत होता.

"तू काय खरोखरी माझ्यामुळं...म्हणजे असं..." इतकी भयंकर गोष्ट तिच्या तोंडातून बाहेर पडू शकली नाही. "म्हणजे असं की...?" तिला मरगळलेल्या आवाजात जणू असे विचारावयाचे होते की, "तू एवढा मोठा निर्णय अखेर का घेतलास?" निर्णय आणि त्याचे कारण...या दोन गोष्टी आजपर्यंत तिला कधीच समजल्या नव्हत्या.

"अंऽहं!...तुझ्याच शब्दांत सांगायचं म्हणजे माझं डोकं फिरलं होतं." सिल थंडपणे उत्तरला. "कधी-कधी मला वेडाचे झटके येतात. डोकं फिरतं. म्हणून तर असं काहीतरी मी करून बसतो."

चौकापर्यंत गेल्यानंतर चंपा एकाएकी आपल्या हॉस्टेलच्या दिशेला वळली.

"तू तर आपला मौल्यवान सल्ला देण्यासाठी माझ्या हॉस्टेलकडे यायला निघाली होतीस ना?"

"मी तुझ्याशी एक शब्दही बोलू इच्छीत नाही, सिल! मी तुला काहीही मदत करू शकणार नाही."

"हे तुझं अगदी शेवटचं अन ठाम उत्तर आहे?" सिलने विचारले. त्याचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता.

"अगदी शेवटचं आणि ठाम! त्यात शंकेला मुळीच जागा नाही."

"तू गौतम नीलांबराचा पाठलाग कुठवर करीत राहाणार?"

"माझा अपमान करू नकोस, सिल!" चंपाच्या तळपायाची आग जणू मस्तकाला जाऊन पोचली होती.

"अच्छा! अच्छा!" सिल श्वास रोखून म्हणाला, "रस्त्यावर ओरडू नकोस. चंपा, मी तुझी क्षमा मागतो. चूक माझीच होती. खुदा हाफिज!" पावसाची एवढी जोरदार सर आली की दारां-खिडक्यांवरील पडदे फडफडले. वातावरणात थंड, ओलसर गुलाबांचा सुगंध भरला होता.

संध्याकाळी ती काही कागदपत्रे घेण्यासाठी सिलच्या सिडनी ससेक्स कॉलेजात गेली. रात्रीच्या गाडीने पुष्कळसे सहकारी आपापल्या देशांना परत जाणार होते. मुले व मुली पाऊस लागू नये म्हणून फाटकाच्या आतील बाजूस उभी होती. फाटकाचा तो अवाढव्य, पंधराव्या शतकातला लाकडी दरवाजा आज शेवटचा उघडून बंद होणार होता. यानंतर जेव्हा कधी ती येथे येतील तेव्हा सारे काही बदलून गेलेले असणार होते.

पावसाचा जोर जास्तच वाढला. ती चॅपेलमध्ये गेली. माळ्यांशी बोलली. एक खानसामा डॉइंगहॉलकडे घाईघाईने चालला होता, त्याला तिने प्रेमाने 'खुदा हाफिज' केले. जणू ती स्वतःच युद्धावर चालली होती आणि जगाचा अंत होणार होता.

सबंध कॉलेजवर संपूर्ण निःस्तब्धता पसरली होती. पावसाचा आवाज व पानांची

सळसळ यांनीच काय ती ती निःस्तब्धता भंग पावत होती. सिल ॲश्ले कॉमन्रूममध्ये खिडकीजवळच्या कातडी सोफयावर बसून एक शब्दकोडे सोडवीत होता. चंपा आत आली. तरीही तो शब्दकोडे सोडविण्यातच गढून राहिला. अखेर जेव्हा चंपा एका खुर्चीवर बसली तेव्हा त्याने मान वर करून तिच्याकडे पाहिले आणि एका शब्दासंबंधी तिचे मत विचारले. चंपाने विचार करून उत्तर सांगितले.

"ठीक आहे. तुझं उत्तर बरोबर असण्याची शक्यता आहे." त्याने खास ब्रिटिश ढंगात म्हटले.

ती चमकली. तिला अचानक असे दिसले की आपल्यासमोर एका ब्रिटिश लॉर्डचा, सोनेरी केसांचा मुलगा बसला आहे—रूढिवादी, घमेंडखोर, गंभीर! या मुलाबरोबर तिने या विद्यापीठात काही वर्षे काढली होती आणि वर्गमित्र या नात्याने त्याला 'खुदा हाफिझ' करण्यासाठी, त्याचा निरोप घेण्यासाठी ती आली होती. ज्याने तिच्याशी तासनतास वेड्याप्रमाणे वाद घातला होता, चर्चा केल्या होत्या, कॅम नदीत नौकाविहार केला होता, शेतातून धावत गाणी म्हटली होती, जो चंपाच्या मनाच्या व आत्म्याच्या भोवऱ्यात निर्भयपणे उडी घेण्यास तयार झाला होता आणि ज्याने सकाळी, पावसात भिजत असताना वेड्याप्रमाणे तिला लग्नाची मागणी घातली होती, तो हा मुलगा नव्हता. हा मुलगा तर लॉर्ड बार्नफील्डचा धाकटा मुलगा सिल डेरिक एडविन हॉवर्ड ॲश्ले होता. त्याने शब्दकोडे सोडविता सोडविता मोठ्या रुबाबात तिला विचारले, "तू अजून गेली नाहीस? कोणत्या गाडीनं जाणार आहेस?"

"साडेसहाच्या गाडीनं!" चंपाने घड्याळात पाहात म्हटले, "तू लंडनला केव्हा जाणार?"

"केव्हाही जाईन. परंतु मला वाटतं, आता तुझी-माझी भेट होणार नाही. मी तुला आयुष्यात पुनः कधी भेटू इच्छीत नाही."

ती गप्प राहिली. हवेतील दमटपणा खोलीत भरून गेला.

अचानक चंपा मोठ्या उल्हासाने बोलू लागली. युनिव्हर्सिटीतून बाहेर पडल्यानंतरचा जो कार्यक्रम तिच्या गटातील मंडळींनी ठरविला होता त्यासंबंधी बोलणे निघाले. ती म्हणाली, "मी यानंतर कायद्याचा अभ्यास करणार आहे."

"अभिनंदन! त्यानंतर काय करणार?"

"ज्योतिषविद्या मला अवगत नाही. त्यामुळं १९६२ साली मी काय करीन आणि ६५ साली माझे काय विचार असतील हे मी सांगू शकत नाही." तिने आपल्या स्वरात प्रफुल्लता कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत म्हटले.

"तेही बरोबरच आहे म्हणा!" असे म्हणून तो हातातील साप्ताहिकात डोकावू लागला.

"तू मात्र डॉक्टरेट मिळवल्यानंतर इथं टीकाशास्त्रावर मोठमोठे ग्रंथ लिहिशील. लोक तोंडांत बोटं घालतील."

"शक्य आहे!"

"किंवा मग डॉक्टरेटला वैतागून तू बँक ऑफ इंग्लंडमध्ये नोकरी करू लागशील."

"तेही शक्य आहे."

"अच्छा! आता निघायला पाहिजे." चंपा घड्याळात पाहून म्हणाली.

"मी तुझ्या जागी असतो तर इतकाही उशीर लावला नसता. गाडीची वेळ व्हायला आलीय." सिल म्हणाला आणि उठून उभा राहिला.

दरवाजा खूपच ठेंगणा होता. कित्येक शतकांपासून त्यावर जाईचा वेल चढलेला होता. अनेक शतकांपासून असंख्य विद्यार्थी या दरवाजातून असेच निरोप घेऊन बाहेर पडले होते—नव्हे, त्यांना बाहेरच्या जगात ढकलून देण्यात आले होते.

सिलने किंचित वाकून तिला जाण्यासाठी रस्ता दिला आणि हात पुढे केला. "इतके दिवस......" तो एक-एक शब्द थांबून-थांबून स्पष्ट व गंभीर आवाजात उच्चारीत म्हणाला, "तुझ्याशी ओळख होऊन परिचय वाढला, याचा मला अत्यंत आनंद होतो. खुदा हाफिझ!"

ती जाईच्या वेलाखालून वाकून बाहेर पडली.

"तू मला फाटकापर्यंत पोचवायला येणार नाहीस?" तिने अचानक आपल्या अटळ, अनंत एकाकीपणाची जाणीव झाल्यामुळे घाबरून त्याला विचारले.

"नाही." सिलने उत्तर दिले, "मला शब्दकोडं सोडवायचं आहे."

तो आत परत गेला.

सिलचे म्हणणे अगदी खरे ठरले. त्या दिवसानंतर सिल ॲश्लेशी चंपा अहमदची पुनः कधीच भेट झाली नाही.

## ४६

अंधारात दीपस्तंभ उभा असावा किंवा एखाद्या अज्ञात बाल्वीराने एखाद्या धोक्याच्या डोंगरावर खुणेची शेकोटी पेटवावी तसे ते टेकडीवरील सॅनिटोरियमचे दिवे दुरून दिसत होते. ज्याप्रमाणे जीवन प्रकाशमय बनते आणि विझते, त्याचप्रमाणे ते दिवे अंधारात लुकलुकत होते.

गौतम नीलांबर बसमधून उतरून झगमगणाऱ्या इमारतीच्या पायऱ्यांवर जाऊन पोचला. स्वच्छ सज्जे ओलांडून तो निर्मलेच्या खोलीत जाऊन प्रविष्ट झाला.

त्याला पाहून निर्मलेची कळी आनंदाने खुलली. तो येण्यापूर्वी ती भिंतीकडे तोंड करून झोपली होती आणि कोण जाणे कसला विचार करीत होती.

"बीबी!" गौतमाचा आवाज अचानक त्याच्या कंठातच अडला. बाहेरच्या कोलाहलपूर्ण स्वार्थी, दुःखी जगापासून दूर असलेली ही मुलगी शांतपणे कशाची प्रतीक्षा करीत होती?

त्याला पाहाताच ती उठून बसली. तिने घाईघाईने बोटांनी केस नीट केले. जवळपास आरसा नसल्यामुळे आपण आपला चेहरा पाहू शकत नाही, याचे तिला मनातल्या खूप वाईट वाटले.

"ओहो! आज तुझी तब्येत भलतीच छान दिसतेय. अगदी लालबुंद फरुखाबादी!"

"कशाला थापा मारतोस? जरा माझा टेंपरेचर-चार्ट बघ म्हणजे कळेल, बचमूजी! आजही माझा ताप एकशेएक होता. गेले कित्येक महिने तो असाच आहे." तिने जणू मोठ्या अभिमानाने सांगितले.

गौतम हताशपणे तिच्याजवळ जाऊन बसला. परंतु ती मात्र आपण खूप आनंदात असल्याचे दाखविण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत होती. तो मनाशी म्हणाला, "निर्मला, मी कधी तुझ्याकडे लक्ष दिलं नाही. पण आता मात्र तूच माझ्या अंतःकरणात भरून राहिली आहेस."

परंतु आपण एकाच वेळी दोन मुलींवर कसे काय प्रेम करू शकतो, हे त्याच्या लक्षात येईना...चंपा आणि ही तरुणी! हिच्यामध्ये चंपासारखे कोणतेच धोकादायक वैशिष्ट्य नव्हते—साधीसुधी, आनंदी, सुस्वभावी, निरागस पोरगी!

चंपा आता 'वुमन ऑफ दि वर्ल्ड' (जगाचा अनुभव घेतलेली, शहाणीसुरती स्त्री) झाली होती. ती स्वतःमधील भयंकर आकर्षणाने पुरुषांना नेहमीच भुलवीत आली होती. ती अनुभवी होती आणि बरेवाईट जग तिने पाहिले होते. परंतु तरी देखील ती असहाय होती आणि गौतमाची कृपादृष्टी आपल्याकडे वळावी म्हणून ती आतुरतेने वाट पाहात होती. इकडे घरगुती वातावरणात राहू इच्छिणारी, अननुभवी निर्मला होती. ती आता मृत्युशय्येवर होती. तिनेही त्याच्या प्राप्तीची अभिलाषा बाळगली होती. तो चंपाला पूर्णपणे विसरून जाणार होता. गेल्या पाच वर्षांत आटोकाट प्रयत्न केल्यानंतर तो चंपाला आपल्या मनःपटलावरून पुसून टाकू शकला होता! एका देशात आणि मित्रांच्या एकाच वर्तुळात राहूनही तो चंपाला टाळण्याच्या बाबतीत यशस्वी झाला होता. परंतु आता मात्र चंपाच्या हाकेला विरोध करणे त्याच्या स्वाधीन राहिले

नव्हते. तिची ही साद माद्रिद, रोम व व्हिएन्ना येथे वाजणाऱ्या ऑर्केस्ट्रांमध्ये ऐकू येत होती. पावसाची रिमझिम, बाजारातील व भोजनालयातील ल्गबगा, अटलांटिक महासागराच्या लाटांचा गंभीर निनाद आणि न्यूयॉर्कमधील कोलाहल, या सर्व ठिकाणी ही साद त्याचा पाठलाग करीत होती. आवाजांच्या अत्याचारांनी तो अगदी वैतागून गेला होता. कदाचित त्याच्या नशिबात निःस्तब्धता नसावी. चंपा आवाज होती, निर्मला निःस्तब्धता होती. चंपाने त्याच्याशी किती नाना प्रकारच्या गप्पागोष्टी केल्या होत्या. त्याला त्या साऱ्या आठवत होत्या. त्या सगळ्या संध्याकाळी, दुपारी, तास, क्षण, पळे ही सारी जणू सुरांची एक साखळी होती. ती अटळही होती व मजबूतही होती. कारण गाणे संपल्यानंतरही सूर वातावरणात विद्यमान राहातातच. निर्मला मूक होती. गोमती मूक होती. पाऊस पडून गेल्यानंतरची, पावसाळ्यातील दुपारची शांतता. धुक्याने झाकून गेलेल्या मोहरीच्या शेतांमधील सामसूम. निर्मला त्याच्याशी कधी वैयक्तिक बाबींसंबंधी बोलली नव्हती. चंपाच्या प्रत्येक शब्दातून, प्रत्येक हालचालीतून दुसऱ्या व्यक्तीशी एक अगोचर, अदृश्य नाते जोडले जाई.

"...आता मला जरा शांतता दे!" त्याने निर्मलेवर वाकून मनात म्हटले आणि तिच्या कपाळावर हात ठेवला.

"गौतम!"

"हाँ, बीबी?"

"सुरेखाचा नवा फ्लॅट कसा काय आहे?"

त्याने सुरेखाच्या घराचा भूगोल तिला तपशीलवारपणे समजावून सांगितला. "तू आता बरी झालीस म्हणजे स्वतःच येऊन पाहा ना!"

"अगदी बरोबर!" निर्मला मोठ्या उत्साहाने उद्गारली.

"आजकाल एक नवेच महाराज आले आहेत. त्यांचं नाव आहे 'तुग्यान' भागलपुरी."

"अय्या! किती मजेदार नाव आहे. चक्रम आहेत वाटतं?"

"मलतेच!"

"चंद्रा अजून आहे?"

"हो आहे ना!"

"आता खूप रात्र झालीय, गौतम मास्टर!" निर्मलेने आपल्या नेहमीच्या सवयीप्रमाणे कमाल व हरिशंकर यांच्या ढंगात म्हटले.

"हो ना!" असे म्हणून तो खुर्चीवरून उठला.

"अर्रर्र...एक गोष्ट विचारायची राहिलीच की." निर्मला एकदम मोठ्या उल्हासाने म्हणाली, "इतकी महत्त्वाची बातमी राहून जाणार होती."

"कसली?" गौतमाने हळूच विचारले.

"काल तलअत सांगत होती की चंपाताई आपली शेवटची परीक्षा देऊन केंब्रिजहून लंडनला आलीय. तुला माहीत नाही?"

"नाही!" गौतम उद्गारला; आणि त्याने मनातल्या मनात पुनः स्वतःला लाखोली वाहिली.

"असं!" निर्मला भाबडेपणाने म्हणाली, "मला वाटलं, कदाचित तलअतनं तुला सांगितलं असेल. तू तिला जरूर भेट हं! बिचारी!" आणि तिने आपले डोके उशीवर टेकविले.

"निर्मला, लोकांच्या सोशल गाठीभेटी घेत फिरण्याइतकी आजकाल मला सवडच कुठं आहे?" त्याने तिची नजर चुकवीत घाईघाईने सांगितले, "अच्छा बीबी, खुदा हाफिझ!" आणि तो झटकन दरवाजातून बाहेर पडला.

निर्मलेचे सहावे इंद्रिय (सिक्स्थ सेन्स) चांगले जागृत झाले होते. गौतम आपल्याशी खोटे बोलला आहे, हे तिने ओळखले. चंपाताई लंडनला आल्याचे त्याला माहीत आहे, आणि त्याच्या चेहऱ्यावरील बदललेल्या हावभावावरून तो चंपाताईला भेटल्याशिवाय राहाणार नाही, याविषयीही निर्मलेची पक्की खात्री झाली.

तिने हलकेच बेडस्विच दाबून दिवा मालवला आणि ती पुनः भिंतीकडे तोंड करून झोपली.

* * *

गौतम निर्मलेशी खरोखरीच खोटे बोलला होता. त्या दिवशी लिंडहर्स्टला जाण्याच्या थोडा वेळ आधी त्याचा फोन खणखणला होता. त्याने रिसीव्हर उचलला.

आवाज त्याच्या कानात पोचला.

"गौतम...हॅलो, अरे गौतम!"

तो गप्प राहिला.

"गौतम नीलांबर!" दुसऱ्या बाजूने चंपा जोरात ओरडून म्हणाली, "अरे, हे काय? माझा आवाज ऐकायला येतोय ना?"

"मी ऐकतोय."

"अरे, जरा लाज वाटू दे." चंपा नेहमीच्या स्वरात बोलत होती, "चाळणीत पाणी घेऊन जीव दे. म्हणजे कमालच झाली. मी इतकी वर्षे इथं आहे, पण तू कधी चुकूनही मला भेटायला आला नाहीस. मी काय तुला खाऊन टाकलं असतं?" इतके बोलून ती खदखदून हसली.

तरीही तो गप्पच राहिला.

एवढा मोठा मुत्सद्दी आणि हजरजबाबी माणूस, परंतु त्याला काही उत्तर सुचले नाही.

आणि मग चंपा म्हणाली होती, "मी केंब्रिजहून आलेय. जोन कार्टरकडे उतरलेय. एखाद्या दिवशी भेटायला ये ना."

"ठीक आहे चंपा, मी अवश्य येईन." गौतमाने गडबडून उत्तर दिले होते.

दुसऱ्या टोकाला असणारी चंपा आपला आवाज ऐकून साऱ्या जगाची संपत्ती मिळाल्यासारखी खूष झाली आहे याचा त्याला काय कल्पना ?

लिंडहर्स्टहून परत यायला रात्रीचे बारा वाजले. आपल्या बिऱ्हाडी गेल्यानंतर त्याने भीत-भीत फोन उचलला आणि जोन कार्टरचा नंबर फिरविला.

"हॅलो, कोण आहे ?" दुसऱ्या बाजूने जोनचा झोपेतून उठल्यासारखा आवाज आला.

"मिस अहमद आहे ?"

"आपण कोण ?"

"नीलांबर !"

"ओहो ! हॅलो मिस्टर नीलांबर ! मिस अहमद यावेळी कुठं तरी बाहेर गेलीय."

"अस्सं !"

"काही जरुरीचं काम आहे ?" गौतमाच्या स्वरातील व्यग्रता ओळखून जोनने विचारले. "फीरोज, सुरेखा, जरीना, अमला, तलअत या सर्वांकडे फोन करून बघा. कदाचित कुठं तरी सापडेल."

"खूप खूप धन्यवाद ! तसं काही खास काम नाही. गुडनाइट !" त्याला आपल्या मूर्खपणाची चीड आली. त्याने रिसीव्हर खाली ठेवला आणि सिगारेट पेटवून खिडकीशी जाऊन उभा राहिला.

## ४७

"मी एक पुस्तक लिहिणार आहे. त्याचं नाव असेल : 'पोर्ट्रेट ऑफ दि आर्टिस्ट ॲज ए डॉनजुॲन'!" कमाल गंभीरपणे म्हणाला.

ती सर्वजण सुरेखाच्या विशाल दिवाणखान्यात जमिनीवर पाय पसरून बसली होती. दिवाणखान्याचा मोठा दरवाजा बागेच्या बाजूला होता. वसंतऋतूतील स्वच्छ ऊन्ह पडले होते. सुरेखा दाराजवळ बसून मशीनवर परकराला आडवी फीत लावीत

होती. तलअत व फीरोज स्वयंपाकघरात स्वयंपाक करण्यात गढून गेल्या होत्या. हरिशंकरही वॉशिंग्टनहून आला होता आणि कैरोला चालला होता. "हरिशंकर आणि गौतम यांची अगदी चंगळ आहे बुवा! आजकाल अगदी इब्ने बतूता[1] बनले आहेत. सकाळीच गौतमाचा फोन आला होता. तो पुनः मॉस्कोला चाललाय." गुलशन म्हणाला.

"गौतम तर ह्युएनत्संगही आहे." कमाल म्हणाला, "तो चीनच्याही वाऱ्या करतो."

बागेत चंद्रा माथुरने आणखी एक गाणे सुरू केले. चंद्रा ही त्या सर्वांची जुनी मैत्रीण होती. ती न्यूयॉर्कहून दिल्लीला जाताना वाटेत लंडनला जरीनाच्या त्र्हिाडी उतरली होती. दिवाणखान्याच्या दुसऱ्या टोकाला तुग्यानसाहेब सुरेखाचे पती गुलशन आहूजा यांच्याशी गप्पा मारण्यात दंग होते.

रविवारचा तो दिवस मोटा रम्य व शांत होता. भल्या सकाळी चंपा जोन कार्टरच्या घरून सुरेखाकडे येण्यासाठी बसमध्ये बसली तेव्हा बसचा म्हातारा कंडक्टर तिला पाहून प्रसन्नपणे हसून म्हणाला होता, "माय डियर, तू फारच सुरेख दिसते आहेस. तुझा बॉय फ्रेंड तुला पाहिल्यानंतर बेहद्द खूप होईल."

ती अगदी खुषीत होती. काल तिने फोनवरून गौतमाशी गप्पा मारल्या होत्या. कित्येक वर्षांनंतर त्याचा आवाज तिला ऐकायला मिळाला होता.

ती सुरेखाच्या घरी पोचली तेव्हा येथे चांगलीच मैफल जमली होती. ती मोठ्या उल्हासाने सर्वांशी बोलू लागली.

"मियाँ हरिशंकर, ऐ भाई, हरिशंकर होत्!" तलअतने स्वयंपाकघरातून साद घातली.

बागेकडील दारात उभा असलेला हरिशंकर मागे वळून आत आला. "घे! या गरम गरम पुऱ्या. चंपाताई कुठं आहे? ही प्लेट तिला नेऊन दे."

तेच 'गुलफिशाँ'चे घरगुती वातावरण येथेही होते. घर! आपल्या नशिबात घर नाहीच...या कल्पनेने खिडकीत बसलेल्या चंपाचे अंग शहारले.

हरिशंकरने प्लेट हातात घेऊन दिवाणखान्यात सर्वत्र नजर फिरविली. चंपा दुसऱ्या टोकाला खिडकीत बसली होती. ते दृश्य पाहून तिला सारा भूतकाळ आठवत होता— बोहेमिया, एक आळशी मानसिक जीवन. त्यात तत्त्वज्ञाने होती आणि नवे फ्रेंच साहित्य. केंब्रिजचा क्वाड्रँगल आणि असेच काही बाही! चंपाताई, तू तर फार लौकर एकदम दुसऱ्या टोकाला जाऊन पोचलीस. आता तू मनमोकळेपणानं हसतेस तरी की नाही

१. प्रख्यात अरबी प्रवासी.

कोण जाणे. ज्या आंतरिक समतोलाचा शोध तू सदैव घेत होतीस तो समतोल तू स्वतःमध्ये कायम तरी ठेवला आहेस की नाही ? आता सुरेखा, तलअत, फीरोज, या मुलीच बघ ना, कशा समजूतदार आहेत. मुलींचं प्रकरण एकूण बरं अवघडच असतं. एका झटक्यात नाव पैलतीराला लागली तर लागली, नाहीतर जन्माचा खेळखंडोबा ! आमचं आपलं हे प्रामाणिक मत आहे, बुवा. "चंपाताई, ह्या घे पुऱ्या." तो मोठ्याने म्हणाला.

चंपाजवळ जाऊन तो गुडघे टेकून बसला.

"या सर्वांना झालंय तरी काय ? एकदम सगळे गप्प बसलेत." तुम्यानसाहेब बोलता-बोलता मध्येच थांबून हळूच गुलशनला म्हणाले.

"हे सगळे विचारात बुडून गेले आहेत." गुलशनने बेफिकीरपणे उत्तर दिले.

"किती रम्य वेळ आहे !" तुम्यानसाहेब म्हणाले, "सुरेखादेवींना कपडेही शिवता येतात, हे मला माहीत नव्हतं. कमालजी पुऱ्या खाताहेत. चंद्रादेवी बागेत कोंबड्यांना चारा घालताहेत. तलअतजी पुऱ्या तळताहेत. हे तर अगदी गुरुदेव टागोरांच्या कादंबरीतल्यासारखं वातावरण आहे—शांत, काव्यमय, मधुर !

"माहीत आहेत हो तुमच्या गुरुदेव टागोरांच्या कादंबऱ्या !" गुलशन चिडून म्हणाला, "तलअत, तू साऱ्या पुऱ्या करपून टाकल्यास...चहा दे पाठवून."

तुम्यानसाहेब पुनः ध्यानस्थ झाले.

"हॅलो हरिशंकर," चंपाने वर्तमानपत्र वाचता-वाचता मध्येच मान वर करून विचारले, "क्या बात है ?"

"आत्ता विचारतेय, 'क्या बात है ?' खुदाकी कसम, हिचं लक्षच नसतं कुठं." तो मनाशी म्हणाला.

"कुठं काय ? काही नाही. चंपाताई, चहा घेणार ?" त्याने तिला विचारले.

"बना दो !"

तिने चहाचा कप हातात घेतला, इतक्यात त्यातील चमचा खाली पडला.

आपण एकमेकांच्या जीवनांत घुसून जिवंत राहात आहोत आणि सतत एकमेकांना ठार मारत असतो आणि जिवंत करीत असतो. "चंपाताई," हरिशंकर म्हणाला, "तू आम्हां सर्वांमध्ये 'ग्रेट' आहेस; कारण तुझ्या हृदयात प्रेमाला अथांग, अपार स्थान आहे." आणि एकदम आवाज कमी करून तो म्हणाला, "हे पाहा, यूनोमध्ये एक फार चांगली जागा रिकामी झालीय—भारताच्या कोट्याची. त्या जागेसाठी मी तुझ्याकरिता खटपट करू ?"

"म्हणजे काय ? मी जन्मभर अशीच वणवण फिरत राहू की काय ?"

"नाहीतरी तुला काय करायचं आहे ?" हरिशंकर म्हणाला. अचानक त्याला आपली

असभ्य चूक कळून आली. परंतु ही स्त्री मोठी बहादुर आणि उदार अंतःकरणाची आहे! ही काय एवढ्यानं रागावेल? "म्हणजे असं की..." त्याने घाईघाईने आपली चूक सुधारण्यासाठी म्हटले, "तुझ्यामध्ये प्रचंड आत्मविश्वास आहे. इतर बायकांप्रमाणं तू थोडीच चूल आणि मूल करीत बसणार आहेस?" आणि त्याने स्वयंपाकघरात काम करणाऱ्या मुलीकडे दृष्टिक्षेप केला. "अग, मी तर म्हणेन की तू एव्हरेस्ट शिखरावरही चढून जाशील, दणादण पावलं टाकीत! तू खरीच 'ग्रेट' आहेस, चंपाताई!" आता त्याचा गळा भरून आला. त्याला अकस्मात चंपाची फार कीव येऊ लागली होती.

ती निमूटपणे बसून बागेकडे पाहात राहिली.

आता दालनाच्या दुसऱ्या टोकाला जोरजोराने गप्पागोष्टी सुरू झाल्या होत्या. दिवाणखान्यात आवाज घुमू लागला. बागेत हिंडणारी चंद्रा तिला फिरत्या आकाशदिव्या-सारखी दिसू लागली. दिवाणखान्यात बसलेले लोक कळसूत्री बाहुल्यांप्रमाणे विचित्र आवाज काढीत होते. तुग्यानसाहेब मंद्र स्वरात 'क्वॅक' 'क्वॅक' करणाऱ्या एखाद्या प्रचंड बदकासारखे तिला भासले. "मला वेड लागणार!" ती हलक्या स्वरात म्हणाली. तिचे डोळे भरून आले.

हरिशंकराने तिच्या डोळ्यांत यापूर्वी कधी अश्रू पाहिले नव्हते.

"चंपाताई!" तो म्हणाला, "कृपा करून प्रेमाचं रूपांतर भावविवशतेत करू नकोस. बॅलन्स, समतोल, संयम, प्रमाणबद्धता, क्लासिक ग्रीक आयडियल या खऱ्या, मूलभूत गोष्टी आहेत. म्हणजे असं की..."

"काय गवंड्या-सुनारासारखा बोलतो आहेस!" चंपाला एकदम हसू आले. "मी प्रेम करते आहे की एखाद्या इमारतीचा आराखडा तयार करायला बसले आहे?"

"चंपाताई," हरिशंकर त्याच सुरात विरोध करीत म्हणाला, "तुझे विचार 'गोथिक' आहेत. ते नेहमीच तसे होते. तुझ्या भावनांमध्ये वॅग्नरचं ओझं आहे. पूर्वीही होतंच, पण आता ते वाढलंय. सारांश काय की तू आपल्या आत्म्याचं पावित्र्य नष्ट करून राहिली आहेस. दहा वर्षे लोटली, पण तुझ्यात काहीच बदल झाला नाही."

"हरिशंकर," चंपा पुढे वाकून म्हणाली. "तू माझी कीव करू नकोस. आजपर्यंत केव्हाही पराभवाच्या भावनेनं मला स्पर्श केला नाही. किंबहुना, पराभव असतो तरी कसा, हेच मला जाणून घ्यायचंय!"

डायनिंग टेबलावरून तुग्यानसाहेबांनी घोषणा केली, "आपण सारे सावल्या आहोत! सावल्या!"

"खरं आहे!" गुलशनने वैतागून सिगारेट पेटवली आणि तो शून्य नजरेने चंपाकडे पाहू लागला.

"कम्युनिस्टांनी मार्क्सवादाचा बट्ट्याबोळ केलाय." तुग्यानसाहेबांनी जोन कार्टरकडे पाहात दुसरा विषय छेडला.

तुग्यानसाहेब जबर्दस्त सोशालिस्ट होते. सूफीइझम ही त्यांची साइडलाइन होती. त्यांनी हिंदीत अनेक कादंबऱ्या लिहिल्या होत्या. आता इंग्रजीत लिहिण्याचा विचार करीत होते. त्यांचे संपूर्ण नाव राय हरबंस राय 'तुग्यान'* भागलपुरी असे होते.

"माझ्या हजरतांनी (गुरूंनी) मला सांगितलं..." ते बोलू लागले.

"यांचे एक मुसलमान गुरू आहेत. ते श्रीनगरमध्ये राहतात." हरिशंकराने हळूच चंपाला माहिती दिली.

"माझ्या हजरतांनी मला सांगितलं, 'बच्चा, तू रशियाला जा.'"

"आणि त्या नास्तिकांना खऱ्या समाजवादाची मशाल दाखवून नीट मार्गावर आण." तलअतने स्वयंपाकघरातून त्यांचे वाक्य पूर्ण केले.

"अय्या, यांनी तर आपल्या गुरूलाही माणसाळवून टाकलंय की." चंद्रा बागेकडील दारात येऊन म्हणाली.

तुग्यानसाहेबानी दचकून तिच्याकडे पाहिले.

"या कोण देवीजी?" त्यांनी सुरेखाला विचारले.

"या बाईसाहेबही खूप प्रोग्रेसिव्ह विचाराच्या आहेत. परंतु डॉलर कमावण्यासाठी न्यूयॉर्कच्या आकाशवाणीवरून हिंदी बातम्या देत असतात. त्यांचं विमान नुकतंच इथं उतरलंय." कमालाने उत्तर दिले.

"असो. तर मी काय सांगत होतो? आपण सगळे बावळ्या आहोत. मी, तुम्ही, तुमचा गौतम नीलांबर, सारेजण. माझे हजरत म्हणाले होते..."

चहाची दुसरी फेरी सुरू झाली. सगळेजण ताजेतवाने झाले. एव्हाना चंपा तेथून उठून बागेत गेली होती.

"आता मीही एक बातमी सांगते. शांता आणि बिल यांच्यात खटके उडू लागलेत, आणि बिल तिला काडीमोड देणार, असं ऐकलंय." तलअतने खुषीत येऊन सांगितले.

"अधिकांश इंटलेक्चुअल पुरुष आपल्या बायकांना सोडून देत असतात—विशेषतः त्या बायकाही इंटलेक्चुअल असल्या म्हणजे असं घडतं." कमाल बेपर्वाईने म्हणाला.

* 'तुग्यान' या अरबी शब्दाचा अर्थ अवहेलना, बंडखोरी, पाप, अडाणीपणा, अत्याचार, अनीती असा आहे.

"आजकाल यांचं सूत कुठं जमलंय?" सुरेखाने हळूच विचारले.

"बरं का ग, काल मी पाहिलं तर तो स्रिल ॲश्ले सुजाता मुकर्जीच्या घरी ठाण मांडून बसला होता. तोही मनःशांतीसाठीच तिथं गेला असेल काय?..." तलअताने विचारले.

"प्रश्न असा आहे." फीरोज जमिनीवर बसत म्हणाली, "की मध्यम वर्गातल्या मुली इतक्या रोमान्सप्रिय का असत?"

"असत म्हणजे काय? अजूनही आहेत. तू तर अशा थाटात बोलते आहेस की जणू हा पोस्ट-रेव्होल्यूशन-पीरियड (क्रान्त्युत्तर काळ) आहे, आणि मागील काळासंबंधी आपण शुद्ध ऐतिहासिक दृष्टिकोणातून चर्चा करतो आहोत." तलअत म्हणाली.

"माझ्याही मनात हाच विचार घोळत होता." दिवाणखान्याच्या दुसऱ्या टोकास बसलेला हरिशंकर कमालाला म्हणाला, "या पोरींचं मन काही आपल्याला कळत नाही. यावेळी कशा गुंग होऊन गेल्या आहेत, पाहा ना. एकीनं नवा ब्लाउझ शिवलाय तर तेवढ्यानंच तिचा आनंद गगनात मावेनासा झालाय. दुसरी शिळोप्याच्या गप्पागोष्टी करण्यात खूष आहे. परंतु खरोखरी याना केवढी मोठी दुःखं सहन करावी लागताहेत. एका मुलाला जन्म दिला की जणू साऱ्या जगाची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडते. बिचाऱ्या स्वतःला दुसऱ्या एका मानवाच्या हवाली करून टाकतात. यांचं मन सांभाळणं किती सोपं असतं. किती लहान-लहान गोष्टींनी या खूष होत असतात. यांना देवता बनवून ठेवलं पाहिजे. यांचं मन दुखावणं हे सर्वांत मोठं पाप आहे."

तलअत हरिशंकरजवळ आली. हरिशंकर पुनः अतिशयोक्ती करू लागला होता. हीच अतिशयोक्ती तलअतला सगळीकडे दिसत होती. गौतम नीलांबराच्या वागणुकीत, चंपामध्ये, अप्पीमध्ये! हे लोक म्हणजे जणू माणसांच्या एनलार्ज्ड तसबिरी होत्या. म्हणून तर त्या कधी-कधी फोकसच्या बाहेर जात असत.

"बाबा रे, काय थापा मारतो आहेस!" ती गंभीरपणे म्हणाली. "असल्या थापा इथं नाही चालायच्या. कुठल्या देवता आणि कुठले देव! हे काव्य अडकवून ठेव खुंटीला. आर्थिक स्वातंत्र्य ही खरी मुद्द्याची बाब आहे."

"हेच तर तुम्हां लोकांना कळत नाही. आर्थिक स्वातंत्र्य ही मूलभूत बाब असली तर चंपा बेगम यावेळी बागेत फिरत राहिली नसती." हरिशंकरने उत्तर दिले.

"हुं:! तिचं डोकं फिरलंय." तलअत म्हणाली.

"छान! इतकी हुशार मुलगी, केंब्रिजमध्ये सर्वांवर छाप पाडून आली आहे, ज्या कुणाला भेटते तो भुईसपाट होतो. आणि तू म्हणतेस तिचं डोकं फिरलंय म्हणून..."

"क्यों भाई, कम्युनिस्ट लोक प्रेम करीत नाहीत?" तुग्यानसाहेबांनी गुलशनला प्रश्न केला.

"लाहौल विलाकुवत!" तलअत जळफळत परत फिरली.

"बीबी!" हरिशंकर मोठ्या प्रेमाने उद्गारला. त्याला ती निर्मलेच्या जागी होती. "तू अजून शीक. हातासरशी पीएच. डी. करून टाक. कोण लेकाचा म्हणतोय की आर्थिक स्वातंत्र्य आवश्यक नाही म्हणून? अशी निरुत्साहित होऊ नकोस."

"पीएच. डी. झाल्यानंतर असं काय मोठं घबाड मिळणार आहे? तीनशेची नोकरी मिळेल...फक्त तीनशे." तिने हरिशंकराच्या नाकासमोर तीन बोटे नाचवीत म्हटले.

"अग, पण पैसा म्हणजे काही सर्वस्व नव्हे. नवा भारत आहे. आपण सर्वांनी त्याच्यासाठी काम केलं पाहिजे."

चंपाने बागेत फिरता फिरता मध्येच एकदा आत डोकावून पाहिले. सर्वजण गप्पा-गोष्टी करण्यात दंग आहेत असे पाहून ती बागेतून रस्त्यावर गेली.

## ४८

बर्फवृष्टी जोराने होऊ लागली. सुजातादेवींनी खिडक्या बंद करून घेतल्या.

स्वामी देविकानंदांनी गीतेचे पान उलटून समोरच्या श्रोत्यांकडे पाहिले. कमाल व हरिशंकर यांचे इंग्रजीचे जे प्रोफेसर तेरा-चौदा वर्षांपूर्वी एके दिवशी लखनौच्या लामार्तिनेर कॉलेजातून अचानक बेपत्ता झाले होते आणि ज्यांना शोधण्यासाठी कमाल व हरिशंकर वणवण भटकले होते तेच हे गृहस्थ. आता ते भगवी वस्त्रे परिधान करून, दाढी वाढवून, युरोप-अमेरिकेत व्याख्याने देत फिरत होते. गौतमाने सुजाता मुकर्जींच्या बिऱ्हाडी जाऊन खिडकीतून डोकावून पाहिले तो इंग्रज मुलींच्या घोळक्यात बसलेले स्वामीजी त्याला दिसले. एकीकडे कीर्तन चालू होते आणि त्याच वेळी सुजाता मुकर्जी सर्वांना कॉफी देत होत्या.

गौतम त्याच दिवशी सकाळी कित्येक महिन्यांनंतर मॉस्कोहून परतला होता. कमालाने त्याच्यामार्फत हिंदुस्थानात वेगवेगळ्या नोकऱ्यांसाठी जे अर्ज पाठविले होते त्यांची उत्तरे असलेली अनेक पाकिटे इंडिया हाउसमधील गौतमाच्या मेजावर येऊन पडली होती. तो ती पत्रे न उघडताच आनंदातिशयाने कमालाला शोधत सगळीकडे हिंडत होता. सुरेखाच्या घरी त्याला समजले की कमाल व हरिशंकर आपल्या जुन्या प्रोफेसरांना भेटण्यासाठी सुजाता मुकर्जींच्या घरी गेले आहेत. परंतु ते इथेही नव्हते. गौतम आत जाऊन एका कोपऱ्यात मायकेलजवळ बसला.

"अरे, तुझे हे स्वामीजी म्हणजे अगदीच 'फ्रॉड' दिसताहेत." मायकेल म्हणाला, "मला असं समजलंय की, अमेरिकेकडून यांना धर्माचा प्रसार करण्यासाठी पैसा मिळतो; आणि काँग्रेस ऑफ कल्चरल फ्रीडमच्या वतीनं हे दौरे करतात."

"तू अजून इस्राईलला गेला नाहीस?" गौतमाने विचारले.

"बस्स, आता जायच्याच बेतात आहे."

"सगळेच चाललेत!" सुजातादेवी मायकेलचे शब्द ऐकून त्यांच्याजवळ आल्या आणि म्हणाल्या, "नोमोश्कार, मिस्टर नीलांबर!"

"नमस्कार सुजातादीदी!"

एवढ्यात खूपशी फुले घेऊन नरगीश खोलीत आली. "उजेडात येऊन बघितलं तर ही सारी लाल निघाली. माझी कल्पना होती, ही पिवळी असतील." तिने स्वामीजीं-समोर फुले ठेवीत म्हटले.

"नरगीश!" गौतम दुःखी स्वरात हळूच म्हणाला, "हे काय ढोंग चालवलं आहेस?"

"गौतम, कल्चर (संस्कृती)साठी! हे सारं कल्चरसाठी आहे." तिने प्रौढपणाचा आव आणीत उत्तर दिले.

"कमाल कुठं आहे?"

"ते लोक बहुधा लिडहर्स्टहून अजून परत आले नसावेत."

"लिडहर्स्ट?..." गौतमाच्या मेंदूवर जणू घणाघात झाला. "परंतु आज काही रविवार नाही."

"ते खरं, पण निर्मलेच्या दुसऱ्या फुफ्फुसाचं ऑपरेशन झालंय. तुला माहीत नाही? बाकी तू आजच आला आहेस म्हणा!"

"सगळे चाललेत! सर्वजण आपापल्या इस्राईलला चाललेत." सुजाता मुकर्जी आपल्या किलकिल्या नजरेने गौतमाकडे पाहात म्हणाल्या, "तुमच्या टोळीतले सारे जण हिंदुस्थानला परत चाललेत. नरगीशनं आज सांगितलं. मायकेलही निघालाय."

"सुजातादेवी, ही तर जगरहाटीच आहे." गौतम वैतागून म्हणाला, "माणसं येतजात राहाणारच!"

"माणसं येतजात असतात, नव्हे ती जातच असतात, कधीच परत येत नसतात, हे मला माहीत आहे." आता ही बाई गुरुदेव टागोरांचा आधार देणार! गौतम घाईघाईने उठला. "नरगीश!" तो वळून म्हणाला, "मला कमालाला ताबडतोब भेटायचंय. त्याची बरीच महत्त्वाची पत्रं येऊन पडली आहेत."

"बी. बी. सी. च्या कॅंटीनमध्ये बघ; किंवा कदाचित कोंबडीच्या खाणावळीत असतील ते. अरे, स्वामीजींना भेटून तरी जा."

गौतमाने पुनः वाकून सर्वांना नमस्कार केला आणि तो बाहेर पडला.

*    *    *

कोंबडीच्या खाणावळीत यावेळी सगळे सामसूम होते. फक्त एक मुलगी दाराकडे पाठ करून, उंच स्टुलावर बसून कॉफी पीत होती. बी. बी. सी. वाले एवढ्यात इथे येऊन गेले नाहीत ना, याची चौकशी करण्यासाठी गौतम काउंटरकडे चालला होता. स्टुलावर बसलेल्या मुलीने त्याच्याकडे वळून पाहिले. ती चंपा अहमद होती.

"हॅलो! तू इथं?" गौतमाने सहजपणे विचारले.

ती उंच स्टुलावरून खाली उतरून जवळच्या छोट्या स्टुलावर बसली. "तूच तर म्हणाला होतास की, जग फार छोटं आहे आणि आपण पुनः कुठं ना कुठंतरी अवश्य भेटू म्हणून!"

"याचा अर्थ ते इतकं लहान आहे, असा होत नाही." गौतम किंचित नाराज होऊन म्हणाला, "प्रत्येक गोष्ट शब्दशः खरी मानली पाहिजे असा काही कायदा नाही."

"शब्दशः खरं मानणारा तर तूच आहेस."

"ते कसं काय?" गौतमाने पुनः एकदा कमाल कोठे दिसतो काय ते पाहण्यासाठी सगळीकडे नजर फिरवीत विचारले.

"मी तुला एकदा म्हटलं होतं की तू मला फार आवडतोस. ते अगदीच 'ॲबस्ट्रॅक्ट' (अमूर्त) विधान होतं. परंतु तू ते शब्दशः खरं मानलंस. सगळी चूक तुझी आहे." तिने बोट हलवीत म्हटले.

"अमूर्तात शिरू नकोस." गौतम जास्तच चिडून म्हणाला, "मी आताच सुजातादेवींच्या बिऱ्हाडी स्वामी देविकानंदांना भेटून येतोय. तुला कमाल दिसला काय कुठं?"

"अंऽहं!" चंपाने मरगळलेल्या आवाजात उत्तर दिले. हा गृहस्थ कसा क्षणात रंग पालटतो. "त्या दिवशी तू मला फोन केला होतास ना, जोन कार्टरच्या घरी, युरोपला जायच्या आधी?"

"होय केला होता," तिने आपल्याला असे पकडावे, हे गौतमाला मुळीच आवडले नाही. "कारण तू मला केंब्रिजहून परत आल्यावर फोन केला होतास."

"गौतम! तू असा प्रत्येक बाबतीत चावा घ्यायचा का प्रयत्न करतो आहेस? पूर्वी तू असा नव्हतास. जवळ जवळ सात वर्षांनंतर मी तुला भेटते आहे. जरा तरी सभ्यपणा, शिष्टाचार पाळ."

"चंपा!" गौतम म्हणाला, "मी यावेळी भयंकर गडबडीत आहे. कमालाची

काही तातडीची पत्रं आली आहेत. कदाचित त्याला दोनतीन दिवसांत मुलाखतीसाठी दिल्लीला जावं लागेल. निर्मलेचं दुसरं ऑपरेशन झालंय. तू आपली अष्टौप्रहर स्वप्नांतच दंग असतेस. बाकीचं जग दर क्षणी तुझ्या स्वप्नांत सहभागी कसं होऊ शकेल?"

"अय्या!" ती लगेच उठली. "चल, आपण कमालला शोधू. मला हे काहीच माहीत नव्हतं." गौतमाने तिच्याकडे पाहिले. ही किती विचित्र आणि भुरळ पाडणारी स्त्री आहे!

ती खाणावळीतून बाहेर पडली. त्यांनी सुरेखाच्या घरी फोन केला. तिकडून गुलशनने उत्तर दिले, "कमालाचा काही पत्ता नाही. बहुधा सर रॉजर यांच्याकडे निर्मलेचा रिपोर्ट आणायला गेला असावा. सुरेखा अजून राडा (रॉयल ॲकॅडमी ऑफ ड्रामॅटिक आर्ट) मधून परत आलेली नाही. सर रॉजरांकडून कमाल आमच्याच घरी येणार होता. तू ये इकडे. मी कॉलेजात चाललोय. किल्ली शेजारी ठेवून देतो."

"लिडहर्स्टला कुणी गेलंय?" गौतमाने विचारले.

"तलअत आणि हरिशंकर गेले आहेत. तूही जाणार असशील तर आमच्या घरून एक पार्सल घेऊन जा. ते निर्मलेकडे पाठवायसाठी सुरेखानं डायनिंग टेबलावर ठेवलं होतं. पण तलअत ते न्यायला विसरली."

"अच्छा! मी येतोच तिकडे."

ती दोघे सेंट जॉन्सवुडकडे रवाना झाले. आशाच्या घरून किल्ली घेऊन ती सुरेखाच्या ड्रॉइंगरूममध्ये गेली. बागेच्या बाजूला असणारा, काचा लावलेला मोठा दरवाजा त्यांनी उघडला. यावेळी कोवळ्या उन्हात बर्फ पुनः चमकू लागले होते.

"किती आरामशीर घर आहे सुरेखा-गुलशनचं!" गौतम सोफ्यावर आडवा होत म्हणाला. बागेच्या तटाच्या पलीकडून संगीताचे सूर ऐकू येत होते. चंपानं शेगडी पेटविली.

खोलीमध्ये एका बाजूला पुस्तकांची कपाटे होती. हा दिवाणखाना म्हणजे मॉडर्न इंटीरियर डेकोरेशनचा एक उत्कृष्ट नमुना होता. हे एका कलाकार-नर्तकीचे घर आहे, याची कल्पना त्यावरून येत होती. कोपऱ्यात शिलाईचे यंत्र होते. त्याच्याजवळच भाजीची टोपली होती. गौतम हसला. ही खोली कलाकाराची होती; परंतु तेथे आरामात व निःसंकोचपणे राहाताही येत होते. जीवनातील साधेपणा व निःसंकोचपणा कोठे पाहावयास मिळतो काय, याचा शोध तो सर्वत्र घेत होता.

"या ठिकाणी मी अनेक आनंदाचे क्षण घालविले आहेत." तो म्हणाला, "मोठी लोभसवाणी माणसं आहेत ही नाही?" कोणत्याही खोलीतून त्या खोलीत राहाणाऱ्या लोकांचं व्यक्तिमत्त्व व्यक्त होत असतं. जरा विचार कर." तो उठून बसत म्हणाला,

"ऑस्टर्लीमधलं जरीनाचं बिऱ्हाडही एका कलावंताचं घर आहे. सेंट जॉन्स-वुडमधील तलअत आणि कमाल यांचं घर म्हणजे अगदी हुबेहूब 'गुलफिशाँ' चा एक भाग असल्यासारखं वाटतं. आणि सुजातादेवींचा दिवाणखाना! तिथली प्रत्येक वस्तू आमूलाग्र 'पोज' असल्याचा भास होत असतो."

"तू 'पोज' आणि 'बिनपोज' यातला फरक कसा ओळखतोस?" चंपाने त्याला अडवीत विचारले.

"तसं नाही चंपा," तो सांगू लागला, "आपण स्वतःला आपल्या पार्श्वभूमीपासून, वास्तविकतेपासून वेगळं करू शकत नाही." थोडा वेळ थांबून तो पुनः म्हणाला, "परंतु तुझी खरी पार्श्वभूमी मला आजपर्यंत कधीच पाहायला मिळाली नव्हती, ही किती विचित्र गोष्ट आहे, नाही? कोंबडीच्या खाणावळीत स्टूलावर बसलेली तू बनारसहून आली असशील असं मुळीच वाटत नव्हतं. आपण आपल्या पार्श्वभूमीशी प्रामाणिक राहिलं पाहिजे. तशी तू राहिली नसावीस असं वाटतंय."

"हे साफ खोटं आहे." चंपा रागाने लाल होत म्हणाली. "तुम्ही सगळे वेगवेगळे, दूर-दूर निघून गेला आहात. मी एकटीच इथं उभी आहे—नेहमीसारखी आजही! आणि तू तक्रार करतोस की मी प्रामाणिक राहिलेली नाही म्हणून."

"तुला आठवत असेल," गौतम म्हणाला, "गतवर्षी मी तुला अमेरिकेहून एक पत्र लिहिलं होतं. तिथल्या एका देवदारांच्या बनात बसून मी ते पत्र लिहिलं होतं. त्या दिवसात मी, कोण जाणे का, अत्यंत खुषीत होतो. अशी मधूनच मला आनंदित होण्याची लहर का येत असावी, याचं कारण अजून माझ्या लक्षात आलेलं नाही. ते कसंही असो. सांगायचं तात्पर्य काय की, मी तुला एक पत्र लिहिलं होतं. पण बहुधा ते तुला मिळालंच नसावं."

"मला आजपर्यंत तुझं एकही पत्र मिळालं नाही."

"आता तू पुनः रोमँटिक व्हायला लागलीस."

शेजारच्या आशाच्या बिऱ्हाडात कोणी तरी मोठ्याने गायला सुरुवात केली.

"गौतम, इतक्या खालच्या पातळीवर जाऊ नकोस." तिच्या डोळ्यांत अश्रू भरून आले.

"अशी रडू नकोस, बुवा! जीवनामध्ये अश्रूंना काही तुटवडा नाही. त्यात तू निष्कारण, बसल्या बसल्या रडून भर घालू नकोस. हसत राहा. भैय्यासाहेबांचंच उदाहरण पाहा ना. आज ते मला सल्फरजजमधून बाहेर पडताना दिसले. त्यांच्याबरोबर त्यांची पत्नी होती. इतके खुषीत होते की काय सांगू! हसतखेळत चालले होते. उत्कृष्ट मानसिक आरोग्य असणारे लोक असे भैयासाहेबांसारखे असतात."

"काहीतरी बरळू नकोस." चंपा म्हणाली, आणि ती शेगडीतील कोळसे सारखे करू लागली.

गाण्याचा आवाज आता जास्तच जवळ आला होता.

"खिडकी बंद कर." गौतम अचानक म्हणाला.

"होय!" चंपाने उत्तर दिले, "हा धांगडधिंगा रात्रभर चालू राहाणार! लंडन मजलिसच्या लोकांना याच्याखेरीज दुसरं काही कामच नसावं असं वाटतं."

"अरे हां!" गौतम दचकून म्हणाला, "तिथं कदाचित कमालही आला असेल. हे लोक जागरण कशासाठी करताहेत?"

"उद्या सकाळी ते सारे बुडापेस्टला जाणार आहेत, म्हणून."

"या गाण्यांनी माझं मन कसं तृप्त होणार, चंपाबेगम?"

"ओह! मी विसरलेच होते, कॉम्रेड गौतम!...परंतु, तूच तर खिडकी बंद करायला सांगितलं होतंस."

आता ते 'बोझ उठा लो—हैया! हैया!' हे गाणे गात होते. गौतमाने बाहेर जाऊन बागेच्या तटावरून डोकावून पाहिले आणि तो परत आला. "अंऽहं! कमाल नाही तिथं."

"गौतम मास्टर!"

"काय बुवा?"

"मी अगदीच खुळी आहे काय रे?"

"मुळीच नाही. परंतु फार शहाणीही नाहीस."

"बस्स! मला हेच जाणून घ्यायचं होतं. तू सांगितलंस हे बरं झालं. आता मला समाधान राहील."

"आपल्याला आता चहाची तलफ आलीय, बुवा." थोड्या वेळानंतर गौतमाने सुचविले. चंपा निमूटपणे उठून स्वयंपाकघरात गेली.

"चंपाराणी," गौतम स्वयंपाकघराच्या दारात येऊन उभा राहिला. "अशी तू सुस्तशी का दिसते आहेस?"

"मग काय करू? नाचू?"

"हे काही उत्तर नव्हे. एकेकाळी तू मोठी हजरजबाबी होतीस....अर्रर्र! तो पाहा टोस्ट जाळलास तू."

"तुला पक्वान्नं करून खाऊ घालायला तलअत इथं नाही, याचा मला खेद वाटतो."

"चंपा, असं वाह्यात बोलू नकोस."

"गौतम!" चंपाने किटली उचलीत हळुवारपणे म्हटले, "मी इथून निघून जावं असं तुला वाटत असेल तर मी आत्ताच्या आत्ता निघून जाईन; आणि यापुढं कधीही तुला भेटण्याचा प्रयत्न करणार नाही. इतक्या वर्षांनंतर तुला पुन: भेटायची इच्छा मी बाळगली, ही माझीच चूक होती."

"चंपाराणी!" गौतम स्वयंपाकघरात जाऊन एका स्टुलावर बसला. त्याने आपले डोके आपल्या तळहातावर टेकविले. "तुला वस्तुस्थिती जाणून घ्यायचीय? वस्तुस्थिती अशी आहे की मला माझीच भीती वाटते आहे. तुझ्याशी काय बोलावं, तू मला काय सांगू इच्छितेस आणि तुला काय सांगण्याची माझी इच्छा आहे हेच मला कळेनासं झाल्यं. इतका दीर्घ काळ लोटलाय आणि बाह्यत: तरी आपणा दोघांनाही ज्यात रस वाटेल असा बोलण्यासारखा एकही विषय आपल्याजवळ नाही."

ती चहा तयार करून ड्रॉइंगरूममध्ये घेऊन गेली.

"इकडे ये." तिने जरा कठोर आवाजात सांगितले. गौतम पुन: शेगडीजवळ जाऊन बसला.

केवळ बोलायला काहीतरी विषय हवा म्हणून गौतमने खुर्चीवर ठेवलेल्या एका बॅगेला स्पर्श करीत म्हटले, "किती छान आहे! हिच्यात मी माझे कागद ठेवू?"

"ठेव ना!"

त्याने आपल्याजवळची पाकिटे काळजीपूर्वक बॅगेत भरली.

आता पुन: बोलणे खुंटले.

"या बॅगेत," तो घसा साफ करून बोलू लागला, "तुझं सामान आहे ना? जाताना हे कागद मला काढून दे, नाहीतर सगळा गोंधळ होईल."

"ज्या बॅगेसंबंधी तू बोलतो आहेस," चंपा कडवटपणे म्हणाली, "ती माझी नसून सुरेखाची आहे. तिच्यात तू तुझं सामान ठेवू शकतोस, ती तू आपल्या घरी घेऊन जाऊ शकतोस. तुझी आणि माझी अशी कोणतीच समाईक वस्तू नाही—ही बॅग, कागदपत्रं, हे घर, इथल्या वस्तू, एवढंच काय पण आठवणी देखील! तुझ्याशी भागीदारी करिता येईल असं काहीही माझ्याजवळ नाही. फक्त दु:ख समाईक होऊ शकेल. परंतु तू आपली दु:खंही स्वत:साठीच जपून ठेवू इच्छितोस."

गौतम गप्प राहिला.

"गौतम नीलांबर, गेल्या सात वर्षांत मी जरी तुला पाहिलं नसलं तरी तू क्षणोक्षणी, उठता-बसता, प्रत्येक हालचालीतून आपल्या स्वत:विरुद्ध साक्ष देत असतोस, हे मला माहीत आहे, याची तुला कल्पना आहे काय?"

"ठीक आहे! मी ज्याच्याशी बोलतो तो माझा 'कन्फेसर' (ज्याच्याजवळ पापे

कबूल केली जातात तो पाद्री) आहे, असं मला वाटतं. माझं अस्तित्व हे माझं 'कन्फेशन' (कबुलीजबाब) आहे. मी किती कत्तली केल्या आहेत! मी तुला ठार मारलंय. मला स्वतःला ठार मारलंय. माझा अपराध तुझ्या अपराधाहून वेगळा आहे. तुझ्या ठिकाणी निरागसतेचा अपराध लपलेला आहे. तू मला एक सांग," तो क्षणभर थांबून म्हणाला, "तुझ्या मते पाप म्हणजे काय?"

"दुसऱ्याचं मन दुखावणं हे पाप आहे." चंपाने विचार करून उत्तर दिले.

"आणि?"

"पाखंड!"

"आणखी?"

"आणखी...आणखी...नीचपणा!"

"संडे स्कूलमध्ये पाठ केलेली उत्तरं!"

"अँ?" चंपाला त्याच्या वाक्याचा अर्थ नीट लागला नाही.

"मी मन दुखावलंय तुझ्या मते हे फार मोठं पाप आहे, नाही?"

"होय, फार मोठं!"

"परंतु, चंपाराणी, तुला लौकरच माहीत होईल की जीवनामध्ये कधी-कधी अशी वळणं, असे प्रसंग येतात की ज्यावेळी दुसऱ्याचं मन दुखावणं अत्यंत आवश्यक, नव्हे अपरिहार्य होऊन बसतं. त्याखेरीज दुसरा मार्गच नसतो.

"इतरांची कत्तल करणाराही कत्तल करताना असाच विचार करतो की ही हत्या अत्यंत आवश्यक आणि अपरिहार्य आहे; दुसरा मार्गच नाही. नाहीतर त्यानं कत्तल का केली असती?"

गौतम पुनः गप्प राहिला.

"सूर वर-खाली व्हायला लागलेत." थोड्या वेळानंतर तो बाहेरच्या आवाजांकडे कान देऊन म्हणाला. "परंतु ते हार्मनीच्या दिशेनं जाताजाता अचानक थांबलेत." असे म्हणत तो पियानोजवळ गेला आणि त्याच्या पडद्यांवरून त्याने बोटे फिरविली.

"त्याची एक तार कुठं तरी तुटलीय." चंपा म्हणाली.

"मला माहीत आहे. पियानोमध्ये पुष्कळदा उंदीर आपली घरं करतात. बहराइचला माझ्या पियानोत नेहमी मध्यरात्रीच्या सुमारास एक गुबगुबीत, गोजिरवाणा उंदीर आतल्या तारांवर नाचून सिम्फनी वाजवायचा."

"तू आजवर माझ्याशी बहराइचसंबंधी कधीच काही बोलला नाहीस."

"मोठं छान स्थान आहे: कारण ती माझी जन्मभूमी आहे."

"आपण सारे एकमेकांच्या दयेवर आणि कृपेवर जगत असतो. काळाच्या कारागृहात

एकमेकांसह अडकून पडलो आहोत. ही अगदी असह्य परिस्थिती आहे." थोड्या वेळानंतर तोच वैतागून म्हणाला.

वस्तुतः ही अगदीच अवेळ होती. खोलीतील प्रत्येक वस्तू अगदी प्रकाशमान आणि स्पष्ट दिसत होती. बागेतील फुलांवरील बर्फ वितळू लागले होते.

"हा बूट पाहा." गौतमाने सहज पाय पुढे करून गंभीर स्वरात म्हटले, "या बुटाप्रमाणं आयुष्य 'फिट' बसत नाही." नंतर त्याने खिडकीत येऊन बसलेल्या मांजरीकडे टोस्टचा एक तुकडा फेकला. मांजरीने तो हुंगला आणि सोडून दिला.

"ही मांजरीही बोहेमियन आहे. टोस्ट खात नाही. हिच्यासाठी लॉन्स्टर (झिंगा मासळी) आणि शँपेन हवीय." नंतर तो चंपाकडे वळून म्हणाला, "चंपा, तू इतके दिवस उगीचच माझी वाट पाहिलीस. मी अगदी 'बोगस' आहे." शेगडीजवळ बसलेली तीही त्याला अत्यंत अनावश्यक वाटली. अनावश्यक, कठोर व मूर्ख! माझ्यासारख्या लबाड माणसाची आशा उराशी बाळगून इतक्या गुणवान मुलीनं बसावं, याला काही अर्थ आहे काय? कमाल आहे! अगदी खुळी आणि तितकीच भोळी पोरगी आहे. बूर्ज्वा फिलॉसॉफर बिचारी! निर्बुद्ध बिचारी! हिचा मेंदू आतून खरवडला तर त्यातुन किती तरी फालतू, अनावश्यक माती सापडेल. हजारो वर्षांपूर्वीची माती. टेराकोटा (भाजलेली माती)! "तलअतनं इतक्या प्रख्यात लोकांची मस्तकं बनवली आहेत," तो मोठ्याने म्हणाला, "तू कधी तिच्याकडून स्वतःचं डोकं तयार करवून घेतलं नाहीस! अजून वेळ गेली नाही. घे बनवून. तू सध्या कुठं जाणार नाहीस ना?" त्याने आशापूर्ण स्वरात विचारले.

"सध्या तरी नाही. आपण एका दारानं आत आलो होतो. परंतु बाहेर जाण्याचे सगळे दरवाजे बंद झाले आहेत."

"तुझा हा एवढा भोळेपणाही चुकीचा आहे. अगदी व्यर्थ! कारण दर खेपेला तू पकडली जाशील. तुला वाटतं, आपण निर्णय घेतलाय, तेव्हा आता प्रत्येक गोष्ट अगदी सोपी आहे. परंतु हे इतकं सोपं काम नाही. तुझ्यावर अजून कितीतरी आपत्ती कोसळायच्या आहेत."

तो खिडकीत जाऊन उभा राहिला. क्षण फिरत, चकरा मारीत, नाचत राहिला. क्षणाचा भोवरा दूरदूरपर्यंत पसरला, समाप्त झाला. बाकी राहिला. चमकणाऱ्या बर्फावरून घरंगळणारा प्रकाश खोलीत पसरला. 'पॅटर्न' पूर्ण झाला. ती मूकपणे, स्तब्धपणे शेकोटी-जवळ बसून राहिली. खोलीतील त्या प्रयोगात मांजरीही सामील होती. वाऱ्यालाही माहीत होते. दूरवरच्या रस्त्यावरील मोटारी, वाटसरू, दुकाने या सर्वांना कळले होते.

"आता सारं अस्तित्व हे एक पुस्तक आहे. ते मी वाचलंय; आणि शेवटच्या

क्षणापर्यंत अनेकदा वाचीन." चंपा स्वतःशी उद्गारली.

"माझ्याबरोबर दोन जगं सतत असतात. एका जगात ही सारी मंडळी आहेत." गौतमाने खोलीकडे बोट दाखवून म्हटले. "आणि दुसऱ्या जगात फक्त मी आणि तूच आहोत. आपणां दोघांमध्ये एक पूल आहे. ज्या दिवशी हा पूल मोडून पडेल, त्या दिवशी काय होईल?"

"तो पूल तू स्वतःच मोडून टाकशील."

"नाही! लोकांनी सर्व बाजूंनी मशीनगन्स रोखल्या आहेत. झाडीत तोफ लपलेली आहे. वर ढग गडगडताहेत. मला वाटतं, एके दिवशी लोकाचं जग पाताळात कोसळून गडप होईल. मी बाहेरच्या बाजूला हातपाय मारीत राहीन. हा विचार मनात आला की फार उदास वाटतं."

"तू आपला स्पॉटलाइट घेऊन छताच्या तुळयांमध्ये लपून बसला आहेस. जे दुर्दैवी पात्र स्टेजवर येतं त्याच्यावर तू अत्यंत नीचपणानं अकस्मात प्रकाशझोत टाकतोस. ते पात्र मग एकदम झगझगीत प्रकाशात येतं."

"मी स्वतःही सतत त्या प्रकाशझोतात आहे."

"अंऽहं! तू पडद्याच्या मागं लपून राहातोस. एखाद्या दिवशी तुझ्यावर प्रकाशझोत पडला तर काय होईल? त्या दिवशी तू वरच्या मजल्यावरून उडी मारून धूम पळून जाशील. तुला खिडक्यांत लोक दिसतील. स्टोव्हच्या भोवती कोंडाळं करून, गप्पा मारीत, स्वयंपाक करीत, जेवण करीत ते बसलेले असतील. तू एखाद्या उडाणटप्पू बोक्यासारखा चंद्राच्या प्रकाशात छताच्या टाइल्सवरून पाय न वाजविता येशील. तुझा चेहरा आम्हांला खिडकीच्या काचांमधून दिसेल...बोगीमॅन (भुतासारखा)!"

"आणि त्यावेळी मी तुम्हा लोकांबरोबर तिथंच असेन—शेगडीच्या भोवती, चर्चा करीत, स्वयंपाक करीत, जेवण करीत. आणि मी तुला खिडकीतून डोकावून पाहात असलेला दिसेन. ...बोगीवूमन (हडळ)!"

ती दोघेही गप्प राहिली.

तो टाचा वर करून भिंतींवरील चित्रे पाहात राहिला. नंतर तो खिडकीकडे गेला.

"आज खूपच बर्फ पडलंय." खिडकीशी उभ्या उभ्या गौतमाने एक सर्वसामान्य विधान केले.

"अजून, यानंतरही बाकी आहे. यानंतर तो मृत्यूपर्यंत, अनंत काळपर्यंत, चालत राहील, विद्यमान राहील." चंपा स्वतःशीच म्हणाली.

"सुरेखाची बाग किती छान आहे." गौतमाने खोलीकडे पाठ केल्या केल्या आणखी एक वक्तव्य केले.

"मला काही नशीबच नाही. लोकांना नशिबं असतात, असं ऐकलंय." चंपा स्वतःशीच उद्गारली.

तो एकदम दचकला आणि मागे वळला. त्याचा चेहरा धुतलेल्या कापडासारखा पांढरा फटफटीत पडू लागला. सगळा दिवस निघून गेला. दिवस मावळला. संध्याकाळ झाली. "मी अजून इथंच आहे. मी इथं काय करतो आहे? किती वेळ वाया घालवला मी! इतका अमूल्य वेळ..." तो स्वतःशी पुटपुटला आणि तीरासारखा गॅलरीकडे धावला. डायनिंग टेबलावर ठेवलेल्या पार्सलाकडे त्याची नजर गेली. त्याने मागे वळून चंपाकडे पाहिलेही नाही. पार्सल धसमकन ओढून घेऊन तो सोसाटयाच्या वावटळी-सारखा बाहेर पडला आणि मोटारीत बसून लिडहर्स्टला रवाना झाला.

तो गेल्यानंतर चंपाने खाली वाकून बँगेतून कमालाच्या नावे आलेले ते लांबलचक सरकारी लिफाफे बाहेर काढले. गौतम ते येथं विसरून गेला होता. तिने ते लिफाफे उघडले.

टाइप केलेल्या त्या पत्रांपैकी प्रत्येक पत्रामध्ये कमालाने नोकरीसाठी पाठविलेले अर्ज नामंजूर करण्यात आले होते.

## ४९

"तलअत, चहा!" चंद्राने टेबलाशी बसत म्हटले.

तलअतने कपात चहा ओतला.

सुरेखा रेडियो टयून करण्यात तल्लीन झालेली होती. जरीनाने बागेच्या बाजूला असलेल्या दारात पसरलेल्या उन्हात 'ईझल' (चित्रफलक ठेवण्याची घोडी) ठेवून नव्या चित्राच्या रेखाटनास प्रारंभ केला. शेजारणीने कुंपणावरून मान उंचावून थोडीशी साखर मागितली.

जगाचा कारभार शांतपणे चालू होता. किंबहुना निर्मलेच्या निधनानंतर जगाचे रहाटगाडगे पूर्वीपेक्षाही अधिक शांतपणे चालले होते. सर्वजण आपापल्या कामांमध्ये अशी काही गढून गेली होती की जणू आपली काय कर्तव्ये आहेत याची यापूर्वी त्यांना कल्पनाच नव्हती. या पराकाष्ठेच्या ममतेमुळे ती एकमेकांशी बोलतही नव्हती. तलअत वृत्तपत्रात बातम्यांचे संपादन करीत होती, फीरोज पुस्तके घेऊन रोज युनिव्हर्सिटीत जात होती. कमाल सुरेखाच्या दिवाणखान्यातील शेगडीसमोर आरामात बसून अर्ज खरडत

असे. हरिशंकराने एक नवीन काम सुरू केले होते....तो पक्ष्यांची पिसे गोळा करीत होता.

निर्मलेच्या निधनाचा आज दहावा दिवस होता. परंतु असे वाटत होते, जणू या लोकांचा तिने निरोप घेतल्याला शेकडो वर्षे होऊन गेली असावीत. काळ रबरासारखा पसरत चालला होता.

ज्या दिवशी एका झटक्यासरशी हे ताणलेले रबर तुटून जाईल, त्या दिवशी काय होईल ?

"आता आपल्याला निर्मलेच्या तेराव्याचा विचार करायला हवा." हरिशंकराने पक्ष्यांच्या पिसावरून बोट फिरवीत म्हटले. त्याच्या बोलण्याचा ढंग असा होता जणू पूर्वीप्रमाणे तो असेच म्हणत होता, "आता आपल्याला निर्मलेच्या लग्नाचा विचार करायला हवा, नाही ?"

"होय, बहुधा !"

"इथं कुणी भटजीही नाही. नाहीतर आपण त्याला विचारलं असतं की तेराव्याला काय करावं लागतं म्हणून." तलअतही हरिशंकराप्रमाणेच मोठ्या व्यावहारिक सुरात म्हणाली. जीवनाचा बरा-वाईट कारभार आवरून निर्मला निघून गेली होती. परंतु तिच्या मृत्यूनंतरची सारी कामे तर अजून बाकीच होती.

फोनची घंटी वाजली.

सुजातादेवी फोनवरून सांगत होत्या, "तुम्ही मंडळींनी तेराव्याची काही व्यवस्था केली नसेल तर काळजी करू नका. स्वामी देविकानंदजी म्हणताहेत की त्यांच्या सेंटरमध्ये..."

"जी ! जी हाँ... ! जी, बहुत अच्छा. धन्यवाद !" कमालाने रिसीव्हर खाली ठेवला.

मृत्यूसुद्धा स्वामी देविकानंदांसारखं एक फ्रॉड आहे.

आता ती पुन: सगळीजण आपापली बहादुरी सिद्ध करण्यासाठी आपापल्या मोर्चावर जाऊन बसली. तलअतने एक लेख टाइप करण्यास सुरुवात केली. सुरेखा गॅलरीत जाऊन नृत्याचा अभ्यास करू लागली. हरिशंकराने पंखांचा अल्बम हातात घेतला.

काळाची सामसूम असंख्य तोफांच्या गडगडाटासारखी गर्जू लागली. घड्याळात तिनाचे ठोके पडले. कमालाने डोळ्यांच्या खुणांनीच हरिशंकराला सुचविले, "सर रॉजरकडून डेथ सर्टिफिकेट (मृत्यूचा दाखला) आणायला जायचं आहे." कारण अशा प्रकारचे अंगावर काटा आणणारे वाक्य उघडपणे उच्चारता येणे शक्य नव्हते.

"घेऊन ये." हरिशंकराने तसेच मूकपणे उत्तर दिले.

"लिडहर्स्टहून निर्मलेचं सामानही आणायचं आहे." तलअतने आपले मूक शब्दही त्या निःस्तब्धतेत ओतले.

"परंतु आपण लिडहर्स्टला कसे जाणार?" कमालाने त्याच पद्धतीने आपला विरोध व्यक्त केला.

हरिशंकराने त्याच्या शब्दांचे रूपांतर केले. ते डी-कोड केले. "खरं आहे. पण आपण खूप शूर आहोत. आपण अवश्य जाऊ. चला, उठा. आपापली कवचकुंडलं धारण करा. लेफ्टराइट मार्च करा. आपली जुनी, वापरून पाहिलेली हत्यारं उचला. चला. आपण तिथं जाऊन निर्मलेची कवचकुंडलं आणि हत्यारं परत घेऊन येऊ. त्यांची आता तिला काही आवश्यकता उरलेली नाही."

त्यांचे हे मूकनाट्य (पँटोमाइम) इतरांनीच काय पण खुद्द त्यांनीही पाहिले नाही. त्यानंतर ती सर्वजण बाहेर पडली; आणि मोटारीत बसून सॅनिटोरियमकडे रवाना झाली.

आता ती लिडहर्स्टहून शेवटची परत येत होती.

सेंट जॉन्सवुडमधील आपल्या बिऱ्हाडी पोचल्यानंतर कमालाने ते सारे सामान गेस्टरूममध्ये ठेवून दिले. त्या खोलीतच हरिशंकर उतरला होता.

जेव्हा सगळीजण आपापल्या मोर्चावर परत गेली तेव्हा तलअतने इतरांची नजर चुकवून हळूच आपला मोर्चा सोडला आणि आपली कवचकुंडले काढून ठेवून ती गेस्टरूममध्ये गेली.

हरिशंकर पिसांचा अल्बम टेबलावर टाकून कमालाबरोबर बाहेर गेला होता. खोलीतील प्रत्येक वस्तू प्रकाशमध्ये अत्यंत स्पष्ट दिसत होती—शिसवीचे फर्निचर, व्हिक्टोरियन पद्धतीचा उंच साइनबोर्ड, शंभर वर्षांपूर्वीची एक जुनी तांब्याची मूर्ती (ही मूर्ती तलअतने कॅमडनटाउनमधील एका जुन्या वस्तू विकणाऱ्या कबाड्याकडून फक्त काही शिलिंगांना विकत घेतली होती.), जुनी वृत्तपत्रे आणि साप्ताहिके-मासिके! जुनाट सोफा.

या सर्व वस्तूंमध्ये जेव्हा निर्मलेचे सामान तिला आपल्या पायाजवळ पडलेले दिसले तेव्हा आपले जीवन, संपूर्ण जीवन हे कबाड्याचे एक रुबाबदार दुकान आहे, असा तिला भास झाला. हे सारे सामान निरुपयोगी आहे. या साऱ्या वस्तू जरा विकून तर पाहा. आपले जीवन जरा या कबाडीमार्केटात ठेवून बघा. त्याची किमत आहे मृत्यू!

मृत्यू!

अचानक पुनः तिच्या कानांत एक तोफ डागली गेली. मृत्यू!

समोर साइनबोर्डाच्या कोपऱ्यात ती छोटीशी बरणी होती. तिच्यात निर्मला श्रीवास्तवची राख होती. हरिशंकर ती बरणी गंगेत प्रवाहित करण्यासाठी आपल्याबरोबर मातृभूमीला परत घेऊन जाईल. तो यावेळी कमालाबरोबर याच मृत्यूच्या संदर्भात

उरलेल्या शेवटच्या गोष्टींची व्यवस्था करण्यासाठी गेला होता. डेथ सर्टिफिकेट, गीतेचा पाठ, विमानाचे तिकीट.

प्रत्येक वस्तूमध्ये मोठी वास्तविकता होती. ही खुर्ची, हा सोफा, ही जेवणाची भांडी यांच्याप्रमाणेच तो रक्षाकलश हीही एक भरीव वास्तविकता होती.

कोण वेडा म्हणतो की मृत्यूचे एक दुसरे जग असते म्हणून ?

मृत्यूपेक्षा अधिक फडतूस, रुकंडरेट गोष्ट दुसरी कोणती असेल ?

म्हणजे असे की दुसऱ्याच्या मृत्यूमुळे माणसे ओक्साबोशी रडतात आणि मग स्वतःच मरून जातात. विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

अहो, मी म्हणते, रडण्याची काय जरुरी आहे ? एक अत्यंत वेडपट मुलगी होती. ती येथून निघून गेली. अशी काय मोठी अलौकिक स्त्री लागून गेली होती. खरी गोष्ट अशी आहे की, 'सब ठाठ पड़ा रह जायेगा, जब लाद चलेगा बनजारा।' (जेव्हा वंजारी आपले सामान बैलावर लादून निघून जाईल तेव्हा सारा थाटमाट तसाच पडून राहील.) तसे पाहिले तर तिचे आयुष्य तरी केवढे होते ? एवढेसे आयुष्य परिश्रम करण्यात, कार्यक्रम आखण्यातच निघून गेले. पहिला वर्ग मिळावा म्हणून रात्रीच्या रात्री जागून अभ्यास केला. त्यात पुनः देशासाठी, राष्ट्रासाठी प्राण अर्पण करायला तयार ! प्रत्येक चर्चेत उडी घेतलीच म्हणून समजावे. पुढे जेव्हा पहिला वर्ग मिळाला तेव्हा केंब्रिजला येण्यासाठी आकाश-पाताळ एक करून सोडले. तिच्या वडिलांनी खूप धावपळ करून कशीबशी पैशाची जोडणी केली आणि तिला विलायतेला धाडले. इथे तिचा आनंद गगनात मावत नव्हता. कित्येक दिवसपर्यंत, आपण खरोखरी केंब्रिजमध्ये आहोत, हे तिला खरेच वाटत नव्हते. नंतर कार्यक्रम आखण्यात येऊ लागले. येथील शिक्षण पूर्ण झाल्यानंतर खूप मोठी नोकरी मिळेल. वडिलांना जे कर्ज झाले आहे ते आपण फेडून टाकू. भैयासाठी चांगली वधू शोधून काढू. नंतर पुनः जरा पैसे जमले की औटर मंगोलिया आणि मेक्सिकोला जाऊन यावयाचे. (औटर मंगोलियाला जाण्याचा हा एवढा षोक का होता कोण जाणे !) आपले स्वतःचे एक घर कधीकाळी बांधता येईल, अशीही पुसटशी उमेद बाळगली होती. त्या घराभोवती एक बऱ्यापैकी बाग असेल. भविष्यकाळाची एवढी मोठी योजना आखलेली होती. त्यात पुनः मांजरे, कुत्री, कबुतरे, गायी-म्हशी पाळण्याचा षोकही होता. आणि साड्यांसाठी तर जणू जीव देत होती.

परंतु मग केंब्रिजमध्ये असतानाच ताप येऊ लागला. तिला इस्पितळात ठेवण्यात आले. तेथे अनेक वर्षे पलंगावर पडून एके दिवशी आपले शरीर इथेच ठेवून ती परमात्म्याच्या घरी निघून गेली.

तेव्हा अशा मृत्यूबद्दल तत्त्वतः शोक केलाच पाहिजे काय? मुळीच नाही. ही तर अत्यंत हास्यास्पद अशी गोष्ट आहे. खरे म्हणजे तलअतला कित्येक दिवसांत यापेक्षा अधिक विनोदी गोष्ट ऐकायला मिळाली नव्हती.

तिने खोलीत फेरी मारली. सबंध फ्लॅटमध्ये फिरून आली. बागेच्या कडेला स्वयंपाकघरात दिवा दिसत होता. चंद्रा व सुरेखा यांच्या पडछाया खिडकीतून दिसत होत्या. इकडे-तिकडे फिरून ती पुनः हरिशंकराच्या खोलीत आली. जमिनीवर बसून तिने निर्मलेचे सामान एकत्र गोळा केले. अन्यमनस्कपणे तिने सामान वरखाली केले. पुस्तकांच्या पेटीतील गीतेवर तिची नजर पडली. ती घेऊन ती दिवाणखान्यात आली.

दिवा लावून ती अत्यंत मनःपूर्वक गीता वाचू लागली.

"ती धैर्याने सहन कर...!"

"शरीर नश्वर आहे; परंतु त्या शरीरातील आत्मा अमर आहे. म्हणून युद्ध कर. हे भारताच्या सुपुत्रा, आत्मा कोणाला ठार मारीत नाही अथवा स्वतःही कोणाकडून मारला जात नाही. शस्त्रे त्याला जखमी करू शकत नाहीत, अग्नी त्याला जाळू शकत नाही, पाणी त्याला भिजवू शकत नाही, वारा त्याला वाळविण्यास असमर्थ आहे. जो जन्मला त्याचा मृत्यू अटळ आहे. जो मेला त्याचा जन्म निश्चित आहे. यात दुःख करण्यासारखे काय आहे?

"दुःख आणि सुख, लाभ व हानी, जय-पराजय ही सर्व समान आहेत असे समजून तू युद्ध कर!"

"ओ अर्जुनके बच्चे...ईडियट!"

(हात् लेका अर्जुना...मूर्खा!)

ती फाडकन् पुस्तक बंद करून उठली. पुनः गेस्टरूममध्ये गेली. जमिनीवर बसून तिने पुनः एकदा निर्मलेच्या वस्तू नीट लावण्याचा प्रयत्न केला. साड्या, चपला, बूट, बांगड्या, प्रसाधनांच्या पेट्या, हँडबॅग,—मुलींच्याच पर्समध्ये आढळणाऱ्या नाना प्रकारच्या वस्तू त्या हँडबॅगमध्ये भरलेल्या होत्या—बसची तिकिटे, धोब्याच्या पावत्या, वापरून बाद झालेल्या ओष्ठशलाका, कानांतील डूल, पिना, पैसे आणि अशाच इतर सटरफटर वस्तू! त्या सर्व वस्तूंवर चार वर्षांपूर्वीच्या तारखा होत्या. नंतर ती निर्मलेच्या पुस्तकांचे गठ्ठे बांधू लागली. एका पुस्तकातून एक छायाचित्र पटकन् खाली पडले. तलअतने खाली वाकून ते उचलले.

ते गौतम नीलांबराचे छायाचित्र होते. ते दहा वर्षांपूर्वी वरपरीक्षेसाठी बहराइचहून सिंघाडेवाली कोठीकडे पाठविण्यात आलेले चित्र होते. तलअतने शून्य नजरेने त्या छायाचित्राकडे पाहिले आणि ते परत पुस्तकात ठेवून दिले.

दिवाणखान्यात पावले वाजली. कमाल वगैरे परत आले होते.

त्या दिवशी रात्री हरिशंकर झोपी गेल्यानंतर तलअत पाय न वाजवता हलकेच त्याच्या खोलीत गेली आणि त्या पुस्तकातून गौतमाचे छायाचित्र बाहेर काढून ते घेऊन आपल्या खोलीत आली. तिने त्या छायाचित्राला पायातील चपलेने चांगले बदडून काढले. तेव्हा कुठे तिच्या मनाला समाधान झाले; आणि जमिनीवर बसून ती स्फुंदून स्फुंदून रडू लागली.

## ५०

साऱ्या जगाने शुभ्र बर्फाचे कफन (प्रेतवस्त्र) पांघरून घेतले. रस्त्यांच्या कडेला उभे असणारे वृक्ष असे दिसत होते जणू एखाद्या चित्रकाराने कॅनव्हासवर पसरलेल्या चायनाव्हाइटवर काळ्या रंगाने आडव्यातिडव्या रेघोट्या मारल्या असाव्यात. त्यांच्या मागील बाजूस असलेल्या घरांतून लुकलुकणाऱ्या उदास पिवळसर प्रकाशाचे डाग सर्वत्र पसरले होते. अत्यंत कडाक्याची थंडी पडली होती. त्या विशाल कॅनव्हासाच्या कोपऱ्यात एक सुंदर दुमजली बंगली होती. समोरच्या बाजूस इवलासा व्हरांडा होता. त्याच्या लाल विटांच्या भिंतीवर तांब्याचा कंदील लावलेला होता. हिवाळ्यामध्ये जरीना डोकीला स्कार्फ गुंडाळून, पाटलोण घालून बाहेरच्या सर्पणाच्या कोठीतून लाकडे घेऊन सूं-सूं करीत घरात येई आणि मग ड्रॉइंगरूममधील शेकोटी चांगली पेटू लागे. त्यावेळी सारे जग एकदम सुरक्षित वाटू लागे.

जरीना हुसैन तेथे आपली आई आणि धाकटी भावंडे यांच्यासह राहात होती. तिने स्लीड्समधून आर्टचा डिप्लोमा घेतला होता. तिची तरुण आई शुद्ध इंग्रज होती. परंतु ती लखनौची अस्सल उर्दू बोले आणि खास वाक्प्रचाराचा वापर करण्यात ती मोठी निपुण होती. मोठी प्रेमळ बाई होती. जरीनाच्या मित्रांना तिच्या घरात नेहमीच आश्रय मिळे आणि ती त्यांच्याशी थोरल्या बहिणीसारखी वागे. जरीनाचे वडील लखनौला बॅरिस्टर होते आणि त्यांची ही इंग्रज पत्नी मुलांच्या शिक्षणासाठी काही वर्षांपासून लंडनमध्ये राहात होती.

या वेळी जरीना बैठकीच्या खोलीतील एका मेजाजवळ बसून एक रशियन मासिक वाचीत होती.

इतक्यात गॅलरीतील घंटी वाजली. जरीनाने उठून खिडकीतून डोकावून पाहिले

ओव्हरकोटाच्या कॉलरने आपला चेहरा झाकून गौतम उभा होता. त्याचे बूट बर्फाने भरले होते. जरीना त्याच्याकडे बघत राहिली.

तो हातात ॲटॅचीकेस घेऊन पायऱ्या चढून व्हरांड्यात आला.

"हे पाचवं शहर आहे. इथंही दिवे जळताहेत. मला वाटलं होतं की हे स्थान इतर स्थानांसारखं नसेल."

"परंतु खेदाची गोष्ट अशी की तुझी कल्पना चुकीची ठरली. आत ये ना!" जरीनाने उत्तर दिले.

"माझ्याबरोबर बाहेर बरेच लोक उभे आहेत."

"त्यांनाही बोलाव ना आत."

"कसं बोलावू? या प्रकाशात तुला त्यांचे चेहरे दिसू शकणार नाहीत."

"असे कोण लोक आहेत ते?"

"पुष्कळशी भुतं-खेतं, प्रेतं, पिशाच्च योनीतले आत्मे! ते सगळे माझे मित्र आहेत; आणि बाहेर अंधारात दात विचकून उभे आहेत. त्यांची मिरवणूक माझ्याबरोबर असते."

"मला त्यांची भीती वाटणार नाही."

"तुला त्यांची भीती वाटताही कामा नये; कारण आपण सारे खुद्द सतत त्या प्रेतांची रूपे धारण करीत असतो. परंतु..." तो हात लावून म्हणाला, "माझी अशी कल्पना होती की ही जागा इतर ठिकाणांसारखी नसेल, इथं अंधार असेल. पण तू इथंही दिवाळी साजरी केली आहेस. प्रकाशामध्ये तू काय पाहाण्याचा प्रयत्न करीत असतेस, बुवा?"

तो वैतागून आपल्या ॲटॅचीकेसवर बसला. जरीनाने गॅलरीचा दरवाजा उघडला.

"वेलकम् गौतम! माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की कुठंही गेला असलास तरी तू परत आलास ही स्वागतार्ह गोष्ट आहे. खरं म्हणजे आम्ही सगळे तुझी भयंकर काळजी करीत होतो."

"मी तुम्हा सर्वांचा आभारी आहे."

"माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की, वेलकम् होम! 'होम' (घर) कुठं का असेना, प्रत्येक प्रवासानंतरचा एक मुक्काम."

"ठीक आहे." तो बेपर्वाईने रुबाबात हात हलवून म्हणाला, "मी तुझं स्वागत स्वीकारलं." नंतर त्याने चोहोंकडे दृष्टी फिरवून म्हटले, "तू पूर्वी राहात होतीस ते हे घर दिसत नाही. आर्टिस्टचं घर नव्हे हे."

"तेच आहे."

"अच्छा!" त्याने अविश्वासदर्शक स्वरात म्हटले, "तू म्हणतेस तर तसंच असेल. जरीना, मी वेडपटासारखा दिसतोय काय ग?"

"छेः छेः!" ती घाबरून म्हणाली, "तू फक्त जास्त थकल्यासारखा दिसतो आहेस."

"सतत धावपळ करावी लागली की माणूस थकून जातोय की. मी आतापर्यंत किती लाखो, कोट्यवधी मैल चाललो असेन, कोण जाणे!"

"तू होतास तरी कुठं?"

"मी? ...ते का सांगन मी?" त्याने लहान मुलांसारखे फुरंगटून उत्तर दिले, "कित्येक रात्री मी शेतांत काढल्या. भुशाच्या ढिगांवर झोपलो. नद्यांवरील होड्यांत घुसून बसलो. स्टेशनांतील वेटिंगरूम्समध्ये लपत-छपत वावरलो. पोलिसांची नजर चुकवीत इकडे-तिकडे भटकलो. अखेर आज मी मनाशी विचार केला, एखाद्या सज्जन बहादुर पुरुषाप्रमाणं लोकांसमोर जाऊन आपण आपला गुन्हा का कबूल करू नये?"

"पोलीस?"

"हो ना, तुला माहीत नाही?"

"छेः रे! काय झालं?"

"जरीना बेगम, मी..." त्याने मोठ्या रुबाबात पायांवर पाय ठेवून सांगण्यास सुरुवात केली, "मी दोन खून केले. तेव्हापासून मी असा वणवण भटकतोय—कुठंतरी तोंड लपवायला जागा मिळेल या आशेनं! परत येऊन सर्व दोस्तांचे दरवाजे ठोठावले. सगळे दरवाजे बंद होते आणि आत प्रखर दिवे जळत होते. नंतर या बाजूनं जात असता माझ्या मनात विचार आला, चला, तुझीही परीक्षा घेऊन पाहावी."

"आत ये, गौतम! इथं भयंकर गार वारं आहे."

"परंतु तू पोलिसांना कळवणार तर नाहीस ना?" त्याने घाबरून विचारले.

"कधीच नाही."

"पण नको. मी इथंच बसतो. घरांच्या छतांची माझ्या दृष्टीनं काहीच किमत नाही."

जरीनाने स्कार्फ डोकीवरून घट्ट आवळून घेतला. वाऱ्याच्या झोतापासून स्वतःचे रक्षण करण्याची तिची धडपड चालू होती. सगळीकडे बर्फाचे पुंजके विखुरले.

"ऐक, जरीना बेगम!" त्याने ॲटचीकेसवर बसल्याबसल्याच मान वर करून तिला म्हटले, "मी दोन खून केले आहेत, हे मी कबूल करू इच्छितो. परंतु गंमत अशी की," तो हसून म्हणाला "मी इतका लबाड माणूस आहे की ज्यांचे हे खून झाले आहेत त्या दोन्ही व्यक्तींना मी त्यांचा निकाल लावलाय हे कळलं सुद्धा नाही." आता त्याचा आवाज अकस्मात नॉर्मल झाला. "त्या दिवशी सुरेखाच्या घरून ते पार्सल

घेऊन मी धावत-पळत इस्पितळात गेलो तो निर्मलेनं मला ओळखलंच नाही, कारण ती मरून गेली होती. आणि त्याच दिवशी रात्री तिथून परत येऊन मी शहरात वणवण भटकत होतो तेव्हा चेलसीच्या एका मद्यपानगृहात मला चंपा अहमद दिसली. परंतु तिनंही मला ओळखलं नाही; कारण ती फारच प्याली होती. सारांश काय की," तो मोठ्या अभिमानाने म्हणाला, "मी या कलेत कसा पटाईत आहे, किती बदमाश आहे, हे तुझ्या लक्षात आलं असेलच."

बर्फाचे वादळ वाढतच चालले होते. अगदी याच वेळी बर्फाचा चिखल उडवीत एक मोटार दारासमोर येऊन थांबली. तिच्यातून कमाल व हरिशंकर खाली उतरले.

"जरीना !" त्यांनी ओरडून विचारले, "गौतम इथं तर आलेला नाही ?"

ते दोघे बर्फातून वाट काढीत पायऱ्या चढून वर आले.

"स्वामीजींच्या सेंटरमध्ये नुकतंच समजलं की गौतम बहुधा ऑरटर्लीकडे आला असावा," कमाल सांगत होता.

थोड्या वेळानंतर ते दोघे बेशुद्ध गौतम नीलांबराला मोटारीत घालून आपल्या बिऱ्हाडी घेऊन गेले.

# ५१

"कुणीच आलं नाही." सुजातादेवींनी दारात येऊन म्हटले, "तिघेही नास्तिक आहेत—दिवंगत निर्मलेच्या घरचे लोक. स्वामीजींनी सगळी व्यवस्था केली होती. फुलं आणवून घेतली होती. एक भजनमंडळीही स्विसकॉटेजमधून आली होती. परंतु त्या लोकांना शांततेचा मार्ग शोधण्याची इच्छाच नाही."

"आणि ते लोक सध्या काय करतात, ठाऊक आहे तुम्हांला ? स्वतःच्या घरी किंवा इंडियन डान्सरच्या बिऱ्हाडी गोळा होऊन ते सारे सकाळपासून संध्याकाळपर्यंत पत्ते कुटत बसलेले असतात. कमाल आहे !" एक अत्यंत अध्यात्मप्रिय ब्रिटिश म्हातारी खिडकीतून डोके बाहेर काढीत म्हणाली.

चंपा पायऱ्यावरून परत फिरली.

"तू कुणाला तरी शोधते आहेस, असं दिसतंय." दुसरी एक वेदांतभक्त अमेरिकन म्हातारी खिडकीतून डोके बाहेर काढीत म्हणाली, "तो पाहा, तो इथं आहे. तुला, मला, आपणा सर्वांना तो बोलावतो आहे." एवढेच बोलून तिने सेंटरच्या

हॉलमध्ये असलेल्या कृष्णाच्या मोठ्या तसबिरीकडे बोट दाखविले. "याला पाहाण्यासाठी तिसरा डोळा हवा. तुम्ही हिंदी लोक तिसरा डोळा गमावून बसला आहात, ही खेदाची गोष्ट आहे."

चंपा घाबरून धावतच खाली उतरली. रस्त्यावर जाऊन पोचल्यावर तिने आपल्या कपाळावरून हात फिरविला. रस्त्याने जाणाऱ्या सर्व माणसांच्या कपाळावर तिसरा डोळा असून तो डोळा आपल्याकडे रोखून पाहातो आहे, असा तिला भास झाला.

ती धावत जाऊन ७३ नंबरच्या बसमध्ये चढली.

सेंटरमध्ये स्वामी देविकानंदांनी आपले व्याख्यान श्रोत्यांच्या कानात कोंबण्यास सुरवात केली होती. योगावरील त्यांचे भाषण ऐकल्यानंतर त्यांच्या अध्यात्मवादी म्हाताऱ्या श्रोत्या आपापल्या घरी जाऊन 'सिंक'(मोरी)मध्ये पडलेली सकाळची भांडी धुतील, मोजे रफू करतील आणि गॅसच्या बिलाची काळजी करीत बसतील. त्यावेळी 'लॉर्ड क्रिश्ना' कितपत उपयोगी पडतील ?

बसमधून उतरून ती हिंदी विद्यार्थ्यांच्या केंद्राकडे गेली.

दिवाणखान्यात विद्यार्थ्यांची एक अगदीच नवी तुकडी गप्पागोष्टी करण्यात दंग झालेली होती.

"मी चंपा अहमद !" तिने दारात जाऊन सांगितले.

"यस ?" एका मद्रासी विद्यार्थ्याने येऊन विचारले.

तिचा फारच विरस झाला. तिचे नाव किती महत्त्वहीन होते ! तिला कोणीच ओळखत नव्हते. कुणालाच तिची जरूर नव्हती.

"सहज तुम्हां लोकांचं केंद्र पाहायला आले होते."

काही मुलांनी तिच्याकडे संशयाने पाहिले.

ती परतपावली रस्त्यावर आली.

स्ट्रँडमध्ये जाऊन ती इंडिया हाउसमध्ये गेली. तेथील कँटीनमध्ये नेहमीप्रमाणे खूप आरडाओरडा चालू होता.

तेथून ती 'कोंबडीच्या खाणावळी'त जाऊन पोचली. तेथे तिला कमाल भेटला. तो काउंटरजवळ उभा राहून कोणाला तरी फोन करीत होता. तिच्याशी दोनचार वाक्ये बोलून तो घाईघाईने बाहेर निघून गेला. ती काचेच्या दाराजवळ उभी राहून त्याला गर्दीत मिसळून जाताना पाहात राहिली. नंतर बाहेर येऊन तिने बी. बी. सी. च्या कँटीनमध्ये डोकावून पाहिले. टेबलाजवळ बसलेल्या लोकांना "मी चंपा अहमद आहे", असे सांगावे अशी इच्छा तिला झाली, परंतु ती तशीच परत फिरली.

समोरच भुयारी रेल्वेचे स्टेशन होते. पायऱ्या उतरून तिने निरुद्देश्यपणे मेडावेलचे

तिकीट काढले. काही मिनिटांतच ती मेडावेलच्या प्रशस्त रस्त्यावर जाऊन पोचली. ती एका झाडाला टेकून उभी राहिली आणि चोहोकडे पाहू लागली. समोर थोड्याच अंतरावर सुरेखा व आशा यांची बिऱ्हाडे होती. कुंपणाच्या पलीकडे काही पावलांवर तलअत व कमाल यांचा फ्लॅट होता. स्टेशनसमोरच्या आधुनिक ब्लॉकमध्ये शांता व विल्यम फ्रेंग राहात होती.

अगदी याच वेळी किराणामालाच्या दुकानातून भाजीची पिशवी हातात घेऊन सुरेखा बाहेर आली. "अय्या, हॅलो, चंपा!" ती ओरडून म्हणाली, "तिथं का उभी आहेस? ये! ये ना इकडे!"

ती निमूटपणे सुरेखाबरोबर चालू लागली.

थोड्याच वेळात त्या दोघी घरात जाऊन पोचल्या.

दिवाणखान्याच्या मोठ्या दरवाजाबाहेर अजून दिवसाचा उजेड रेंगाळत होता. बरीचशी लाल पाने सावकाश तरंगत तरंगत खाली येऊन विखुरली—पोर्चच्या पायऱ्यांवर, आवारातील रस्त्यावर. चार-पाच पाने खिडकीच्या बाहेर ठेवलेल्या वेताच्या खुर्च्यांखाली वाऱ्यावर थरथरत राहिली. उन्हाच्या सोनेरी किरणांनी गवतावर एक गोल वर्तुळ बनविले.

माणसाला खरोखरी काय हवं असतं, कोण जाणे!

"अग चंपा, इथं या सोफ्यावर बैस ना आरामात!" सुरेखाने भाजी थाळीत ओतीत म्हटले.

"या सोफ्यावर बसल्यानं ही खोली त्या दिवशीसारखी तर बनणार नाही ना!" चंपा जणू स्वतःशीच म्हणाली.

"त्या दिवशी? कोणत्या दिवशी?...कशी होती?" सुरेखाने विचारले.

"कोण जाणे!"

आता बाहेर नेहमीचा अस्सल मोसम वातावरणात पसरला होता. शुद्ध थंडी, स्वच्छ, निर्मळ बर्फ. सारे अस्तित्व अत्यंत हलके-फुलके व निर्मळ असल्याचा भास होत होता.

"उद्या..." सुरेखाने बादलीतील कोळसे खाली ओतत सांगितले, "अनेकजण घरी परत चाललेत."

"घरी?" चंपाने दचकून विचारले.

"होय! हिंदुस्तानला." सुरेखा राख उकरू लागली.

"कोणकोण?" चंपाने तटस्थपणे विचारले. आता तिला कुणाशी काय करायचे होते? ती या शुद्ध मोसमाप्रमाणे सर्वत्र व्याप्त झालेली होती. तिला विशिष्ट व्यक्तींशी काय करायचे होते? तिचा कुणाशी कसलाही संबंध नव्हता.

सुरेखा पदर खोचून भाजी चिरायला बसली.

"सगळे!" ती उत्तरली. "हरिशंकर विमानानं जाणार, कमाल परवाच्या दिवशी बोटीनं जाणार, गौतम तर आज सकाळीच न्यूयॉर्कला परत गेला."

बाहेरच्या बाजूस घरांच्या पलीकडे सूर्य एकदम मावळला. बाहेर अंधार पसरला. हिवाळ्यातील रात्रीचा अंधार. हा अंधार अचानक येऊन जगावर झडप घालतो. ती सुरेखाला मदत करण्यासाठी स्वयंपाकघरात गेली. नंतर तिने खिडकीतून डोकावून आत पाहिले. संध्याकाळचा प्रभाव दिवाणखान्यात उरला नव्हता. तिची जागा रात्रीने घेतली होती. ती पुनः दिवाणखान्यात गेली. परंतु तेथे काहीच नव्हते. पडछाया दुसऱ्याच होत्या....रंग....वातावरणाचे सूर....काळही खिडकीवाटे बाहेर निघून गेला होता. त्याचा एवढासा तुकडाही मागे पडलेला मिळाला नाही.

सुरेखाच्या घरून बाहेर पडल्यानंतर तिला कमालाच्या घरातील दिवे दिसले.

"मला सोडून जाऊ नका....मला सोडून जाऊ नका....मला सोडून..." असे ओरडून सांगण्याची इच्छा तिला झाली. परंतु ती निमूटपणे झपाझप पावले टाकीत स्टेशनकडे निघाली.

ती जोन कार्टरच्या गल्लीत जाऊन पोचली. तबेल्याच्या दारात जाऊन दिवा लावण्यासाठी तिने हात पुढे केला.

परंतु एकाएकी काळोखाने समोर येऊन तिला 'सुस्वागतम्' म्हटले. ती खिडकीत ठेवलेल्या जिरेनियमच्या झाडांवर वाकली. "आतापर्यंत रात्र माझी वैरीण होती," ती मनाशी म्हणाली, "परंतु आता कदाचित् ती माझी मैत्रीण बनेल. उंच हवेल्यांवरून वाहात येणारा वारा, पानांची सळसळ, गवतावर साचलेले बर्फ! जमिनीवरून रात्रीच्या लाटा वाहात चालल्या आहेत; आणि आता प्रवाह वेगवेगळे झाले आहेत. आता मी खरीखुरी स्वतंत्र झाले आहे." ती हसली. "खाली खूप कडक जमीन आहे आणि या जमिनीवरून मला मरेपर्यंत चालत राहायचं आहे. हे पाय मला कुठं कुठं घेऊन जाणार आहेत कोण जाणे! (तिने आपल्या पावलांकडे अशा नजरेने पाहिले जणू आजवर ते तिला कधी दिसलेले नव्हते.) रात्र माझ्या मुठीत आहे आणि त्याच्याही हातात आहे. रात्रीची दोरी घट्ट पकडून मी दिवसापर्यंत जाऊन पोचेन. अग रात्री, सखे, कसं काय चाललंय तुझं? मी तर तुला कधीपासून ओळखते. पावसाळ्यात, वसंतऋतूत, पौर्णिमेच्या दिवशी, परीक्षांसाठी अभ्यास करीत होते तेव्हा, अपरिचित देशांमध्ये आगगाडीत प्रवास करीत असताना,...मी तुझा प्रत्येक रंग पाहिलाय. मी आणि तू, आपण दोघींनी एकत्र वेळ घालवलाय. एके दिवशी तूच जिंकणार!"

"आणि तू...गौतम नीलांबर!" तिने दुसरा विषय सुरू केला, "मी तुला तुझ्या

स्वप्नांच्या जगात सोडून देते. बहुधा मी एक वस्तुस्थिती होते आणि तू स्वप्नरंजना-तून कधीच बाहेर पडणार नाहीस!"

रात्रीचा काळोख वाढत चालला. थंडी वाटली. मौनाच्या लाटा जुनाट भिंतींवर आदळत राहिल्या. काळ म्हणाला, "मला ओळख. मी तुझी पाठ कधी सोडणार नाही. तुला वाटलं होतं की क्षण-पळे आपापल्या जागी कायम राहातील. परंतु तुझी ती कल्पना चूक होती. मला पाहा आणि ओळख. मी चाललो...पळ-पळ, क्षण-क्षण! पडद्यांच्या मागे, थराथरांतून, काळोखात गडप होत चालले आहे. मी अखेरची सीमा आहे. त्या सीमेच्या पुढे तू जाऊ शकत नाहीस. आता परत चल. तू सरहद्दीपर्यंत येऊन पोचली आहेस. समोर फाटक आहे. आता दुसरा देश सुरू होत आहे. आता तुला पुढच्या प्रवासासाठी नवीन प्रमाणपत्रांची व्यवस्था करावी लागेल. नव्याने रकाने भरून सह्या कराव्या लागतील. कारण आता नवी सरहद्द सुरू होत आहे. मी आतापर्यंत कितीतरी जादू-टोणे निष्प्रभ करून टाकले आहेत. तुझ्या जादूला तर त्या मानानं काहीच महत्त्व नव्हतं.

"मला ओळख! मी सतत तुझ्याबरोबर चालत राहीन. तू निदान माझ्यापासून तरी दूर पळून जाऊ शकणार नाहीस. लोक तुला सोडून निघून जातील...मी तुला कधीही सोडणार नाही. पाहिलंस, तू सरहद्दीवर किती लौकर येऊन पोचलीस? तुला निर्णय घेण्यात किती अडचण येत होती! मी साऱ्या प्रश्नाचा झटपट निकाल लावून टाकतो. सारे निर्णय, सारे इरादे, माझ्यामुळे आपोआप पुरे होत जातात.

"अजून तुझ्यावर आणखी संकटं येतील. परंतु त्या संकटांना कसं तोंड द्यायचं ते मी तुला शिकवीन. आता माझ्याशी तह कर. मी अजूनही इथं आहे."

वाऱ्याच्या एका मोठ्या झोतामुळे खिडकीवरील पडदा फडफडू लागला. खोली धुक्याने भरून गेली. तेव्हा अकस्मात तिच्या लक्षात आले की आपण थंडीने थरथरा कापत आहोत. तिने चटकन खिडकी बंद केली आणि ती आपल्या खोलीत निघून गेली.

## ५२

"अप्पीच्या लग्नात नेसण्यासाठी मी अत्यंत सुंदर साडी तयार करवून घेईन—भरतकाम केलेली." निर्मला सांगत होती:

"मी गप्प राहिले.

"'मला तर या नव्या फॅशनच्या किनारीच्या साड्या मुळीच आवडत नाहीत.'

मालतीनं खालचा ओठ पुढे काढून म्हाताऱ्या बाईप्रमाणं म्हटलं. मालती रायजादा सोळा वर्षांची होती. निर्मला तिच्यापेक्षा एका वर्षानं लहान होती. मी निर्मलेपेक्षा एक वर्षानं लहान. त्या दोघींनी मोठेपणाचा आव आणून कपड्यांविषयीची आपली माहिती सांगून माझ्यावर इंप्रेशन मारायला सुरुवात केली."

आणि अकस्मात तलअत गप्प बसली. "बरं का," ती कमालाला म्हणाली, "आज माझ्या लक्षात आलं की माझा भूतकाळ हा फक्त माझ्या दृष्टीनंच महत्त्वाचा आहे. इतरांच्या, जगाच्या दृष्टीनं त्याला काही अर्थ नाही. त्यांना त्यात काय रस वाटणार?"

"माझा भूतकाळ! माझा भूतकाळ हा फक्त माझा आहे." कमालाने तलअतच्या वाक्याचा पुनरुच्चार केला.

"आणि जगाला फक्त 'आज' मध्ये इंटरेस्ट आहे." हरिशंकराचा आवाज घुमला.

"परंतु काल हाच आज आहे. आज भूतकाळात समाविष्ट आहे आणि भविष्य-काळातही. काळाच्या या कोड्यानं मला अगदी गोंधळात टाकलंय." तलअत उदासपणे म्हणाली, "काळानं मला अगदी हैराण करून सोडलंय. तुमच्यापैकी कुणी मला मदत का करीत नाही?"

"तुला मदत करणं, तलअत बेगम, कदाचित् आइन्स्टाइनलाही शक्य होणार नाही." हरिशंकर म्हणाला.

"काळ सतत विद्यमान आहे. काळ हा सदैव 'आज' असतो." तलअत म्हणाली.

ही मंडळी सेंट जॉन्सवुडमध्ये बसल्या-बसल्या १५ डिसेंबर १९५४ रोजी तिसऱ्या प्रहरी ही चर्चा करीत होती. त्यांच्या पडछायांमुळे खिडक्यांच्या काचांवर चित्रविचित्र आकृती निर्माण होत होत्या. बाहेर सोसाट्याचा वारा सुटला होता. रस्त्यांतून मोटारींची ये-जा चालू होती. रेडियोतून कोणत्या तरी गाण्याचे सूर ऐकू येत होते. काळाचा अफाट काळोख, उंच भिंती, सडका, गल्ल्या व आवाजांचा चक्रव्यूह यात अडकून पडलेले ते तिघे तेथे बसले होते.

काळाच्या याच अंधारात १९४० च्या जुलै महिन्यात सिंघाडेवाली कोठीच्या व्हरांड्यात बसलेली तलअत, निर्मला व मालती यांच्याशी गप्पागोष्टी करीत होती. ही तलअत आणि ती तलअत यांच्यात काही फरक नव्हता. परंतु ती दोन विभिन्न अस्तित्वे होती. शाक्यमुनी महात्मा बुद्ध म्हणाले होते की, "माणूस क्षणोक्षणी बदलत असतो. माणूस बाळपणी एक प्रकारचा असतो तर तरुणपणी व म्हातारपणी अगदीच वेगळ्या प्रकारचा असतो. तुम्ही या क्षणाच्या पूर्वी विद्यमान नव्हता. केवळ निरंतरता बाकी उरते." दूर पर्वतांवरून हिमनद्या खंडित होऊन खाली कोसळत होत्या. वारे... काळोख...प्रवाही असणारा काळ...बर्फात गोठलेला काळ!

"आपण आपली हकीगत पुनःपुनः सांगून स्वतःचं समाधान करू पाहातो;" हरिशंकर म्हणाला, "कारण आपल्याला भय वाटत असतं."

"आपण काळाला आणि काळोखाला घाबरतो; कारण काळ एके दिवशी आपल्याला मारून टाकणार आहे; आणि काळोख हे आपलं शेवटचं आश्रयस्थान असेल." तलअत म्हणाली.

"आणि गौतम नीलांबर सुद्धा किती भ्याड निघाला." कमाल म्हणाला.

"गौतम नीलांबराचं यावेळी नाव काढू नकोस. त्यामुळं तू मूळ विषयापासून दूर निघून जाशील. आपल्याला हे ठरवायचं आहे की जीवनात मूलभूत गोष्ट कोणती असते." हरिशंकर म्हणाला, "मी चौदा वर्षांपूर्वीही विद्यमान होतो; आणि जगलो वाचलो तर चौदा वर्षांनंतरही मला हरिशंकरच समजण्यात येईल. तेव्हा काळाचे सारे प्रयोग आपण आपल्यावर करून घेऊ. त्यावेळी लहानलहान गिनीपिग (छोटी डुकरे) असणारे आपण लोकही खतम होऊन जाऊ. त्याखेरीज ज्यांचा या कथेत उल्लेख आला आहे ते सगळेही नाहीसे होतील."

काळाच्या पॅटर्नमध्ये जी तलअत जेथे बसली होती तीच तलअत त्याच पॅटर्नमध्ये (साच्यात) आणखी एका जागी बसली होती. त्या दोन बिंदूंमध्ये कित्येक वर्षांचे अंतर होते. या अंतरावरून माणूस फक्त पुढे जाऊ शकत होता...पुढे...आणखी पुढे. अगणित स्थानी मागे जाणे अशक्य होते. यद्यपि हजारो तलअती असंख्य तुकड्यांमध्ये विखुरलेल्या विद्यमान होत्या—ज्याप्रमाणे आरशाच्या फुटलेल्या तुकड्यांमध्ये एकाच चेहऱ्याची वेगवेगळी प्रतिबिंबे दिसत असतात त्याप्रमाणे—तरीही मागे जाता येणे शक्य नव्हते.

कमाल जणू रंगभूमीवर चालत असल्याप्रमाणे मध्यभागी असलेल्या मेजावर येऊन बसला. माशीच्या डोळ्यांनी त्याने सर्वांकडे पाहिले. मायकेल, बिल क्रेग, जरीना. ती सारी गौतम नीलांबराला विमानतळावर पोचवून परत आली होती आणि कमालाच्या खोलीत हरिशंकर व कमाल यांच्या बांधून ठेवलेल्या सामानावर बसली होती.

जरीनाच्या घरून कमालाच्या घरी आल्यानंतर गौतम पंधरा दिवस आजारी होता. त्यावेळी ते दिवसभर पत्ते खेळत किंवा भेंड्या लावीत बसत. गौतमाची तब्बेत अजून पूर्ण बरी झाली नव्हती. परंतु काश्मीर प्रकरणाची चर्चा निघणार असल्यामुळे त्याला पुनः न्यूयॉर्कला परत जाण्यास कळविण्यात आल्याने तो तिकडे निघून गेला. कमाल व हरिशंकर यांचा लंडनमधील हा शेवटचा दिवस होता. हरी रात्री एयरइंडियाच्या विमानाने जाणार होता. कमालाला उद्या सकाळच्या आगबोटीने निघावयाचे होते. मायकेलही चालला होता.

तलअतने पुन: कॅलेंडरवर नजर टाकली: २५ डिसेंबर १९५४! तिचे अंग शहारले. ती म्हणाली, "मायकेल, दार बंद कर."

मायकेलने उठून दार लावून घेतले. समोरची माणसे यांत्रिक खेळण्यांसारखी असल्याचा भास तलअतला झाला – ज्याच्या हातात बंदूक होती असा शिपाई (मायकेल), मुंडके हलविणारा, पांढरी शुभ्र दाढी असणारा चिनी तत्त्वज्ञ (हरिशंकर), महाराजा चंद्रगुप्ताच्या दरबारातील नर्तकी (सुरेखा), जोरजोराने आक्रोश करीत, छाती बडवून घेत, आपल्या जीवनाच्या ताबुता (शवपेटी)बरोबर, अनवाणी चाललेले, गोलगंजचे, कमरेत वाकलेले नवाब कम्मन साहेब (कमाल)... दिवाळीतील खेळण्यांसारखे ते सारे नटूनथटून तिच्यासमोर बसले होते. मूर्ती...लखनौच्या कुंभारांनी बनविलेल्या मूर्ती! (यांतील एक मूर्ती खाली पडून फुटून गेली होती!) आता मिस्त्री येईल, पाणी शिंपडील, सिंहासन मांडण्यात येईल, त्यावर राजा बसेल. आणि मग हे सगळे पुन: आपापल्या कोनाड्यांत जाऊन बसतील.

"मी अगदी ठीक होते." ती पुढे बोलू लागली, "परंतु मग एकदम वेगवेगळ्या गोष्टींनी मला भीती दाखवायला सुरुवात केली."

कमालाने जणू तिच्याकडून 'क्यू' (सूत्र) घेऊन म्हटले,

"नवी गोष्ट ही समजली की जगात भलताच गोंधळ आहे."

"आणि मला कळण्यापूर्वी मी शब्दाच्या समुद्रातून तरंगत जाऊन विचारांच्या भयंकर रस्त्यावर जाऊन उभी राहिले.

"शब्द काय होते? वस्तुस्थिती काय होती? ग्रंथांनी सांगून ठेवलंय की, शब्द चूक आहे. वस्तुस्थिती या नावाची काही चीजच नाही. सबंध ही एक पोकळी आहे. प्रत्येक वस्तू निरर्थक आहे. कधी मी असं पाहिलं की, बृहस्पती राक्षसांना आपली विद्या शिकवतो आहे. कधीतर मी स्वत:च एक भयंकर राक्षसीण असल्याचा मला भास होई; किंवा आपल्या ज्ञानाच्या केरसुणीवर बसून अंधाराने भरलेल्या शून्यात तुफान वेगाने फिरणारी परिकथेतील एखादी हडळच मी आहे, असे मला वाटे.

"त्या काळोखानं भरलेल्या पोकळ्यांमध्ये अनेक केरसुण्या सण्ण करून जवळून निघून जात. त्या केरसुण्यांवर हजारो मुली स्वार झालेल्या होत्या—तहमीना, निर्मला, जोन कार्टर, फीरोज, चंपा, जरीना आणि अशाच कितीतरी! या केरसुण्या आता इतक्या उंच गेल्या होत्या की त्या खाली परत येणे अवघड होते. खरं म्हणजे साऱ्या जगाची आकाशं या केरसुण्यांनी भरून गेली होती.

"त्या सर्वांमध्ये चंपाचा खास उल्लेख करायला हवा. तिच्याकडून ही चूक झाली की ती स्वप्न पाहू लागली.

"आता तुम्ही एका केरसुणीवर बसला असताना डुलकी लागली तर तुम्ही वाट चुकून भलतीकडे जाणार हे ठरलेलेच. आणि तुमची केरसुणी टक्कर झाल्यामुळं खाली येणारच.

"आपल्या स्वप्नांच्या दुनियेत ती मध्ययुगातील भक्ताप्रमाणं गात हिंडली. चर्चमध्ये गेली. तेथील संन्यासिनी किती सुखी असतात, ते तिनं पाहिलं. आपला स्वतःचा जिवंत परमेश्वर आणि आपल्या जीवनातील प्रतीकात्मक परमेश्वर या दोन कल्पनांचं मिश्रण करण्यात तिला बहुधा मोठं सुख वाटलं. त्या सुखाचं मोजमाप तुम्ही करू शकणार नाही. तिथं श्रद्धा आणि देवाच्या अस्तित्वावरला विश्वास यांचा प्रश्नही सुटला. फक्त थोडीबहुत सूफी भावना हवी होती. भल्या पहाटे उठून भैरवी आळवा की ती आपोआप उत्पन्न होते... गौतम नीलांबराप्रमाणं तिला प्रत्येक घटनेत, प्रत्येक गोष्टीत एखादं रहस्य लपलेलं दिसत असे."

ती सर्वजण खोलीतून बाहेर पडून खाली सडकेवर आली. कमालाने नाक फेंदारून धुके हुंगले.

"प्रत्येक गोष्टीत काहीतरी रहस्य लपलेलं असतं याची मलाही कल्पना आहे. त्यामुळे मला फार दुःख सहन करावं लागलं आहे." मायकेल हवेत हात पसरून म्हणाला.

"होय." तलअत उत्तरली. ती सर्वजण माना खाली घालून जमिनीकडे पाहात चालू लागली.

संध्याकाळच्या पंचरंगी प्रकाशात ती हीथच्या दिशेने जाऊ लागली. घराच्या परसातील छोट्या बागा, खिडक्यांतून डोकावणारी माणसे, अरुंद बोळ, आणि त्यांच्या टोकाला असलेली काहीशी अंधारी कॉफीगृहे! मुली कचेऱ्यांतून परत येत होत्या.

टेकडीवर गेल्यानंतर ती चित्रकारांची चित्रे पाहात फिरली आणि त्याने जास्तच 'बोर' झाली.

खालच्या बाजूला जत्रा भरली होती. जिप्सी बाया हात पाहून भविष्य सांगत होत्या. मुले शेंगदाणे व आइस्क्रीम खात होती.

"सर्वांत मोठा मूर्खपणा म्हणजे आपण इतरांना आपल्या स्वप्नांत ओढण्याचा प्रयत्न करीत असतो." मायकेल म्हणाला.

"होय!" तलअतने पुनरुच्चार करीत म्हटले, "माझा भूतकाळ, माझा काळ, माझी स्वप्नं, ही फक्त माझी आहेत. ती इतर कुणाची होऊ शकत नाहीत. मात्र लक्षात ठेवा की..." ती घाईघाईने म्हणाली, "मी एका व्यक्तीसंबंधी हे बोलते आहे. भविष्यकाळ तर आपणा सर्वांचा एक, समान आहे."

मायकेलने एक खडा उचलून रागाने तो तिला मारीत म्हटले, "मेहेरबानी करून या मुद्द्यावर आल्यानंतरही आपली पार्टीलाइन चालवू नकोस. भावी युग सर्वांचं एक

समान मुळीच नाही. भविष्यकाळ या टेकडीच्या पलीकडे आपणा सर्वांसाठी वेगवेगळ्या प्रकारे आ वासून उभा आहे."

"ओ मायकेल!" तलअत लहान मुलाप्रमाणे ओरडली, "मी फार भीत आले आहे, रे!"

"अस्सं!"

"मला भीती दाखवायला काय कमी गोष्टी होत्या? सुंदर दृश्यं, आरामशीर घर. बॅग उघडली की तिच्यातून नाना प्रकारची कागदपत्रं निघत. बँकांची पत्रं, शेअर्सचे कागद, जॉइंट स्टॉक कंपन्यांचे अहवाल,—त्यांवर नावं असत : लार्ड सिन्हा, सर बीरेन मुकर्जी, श्री थापर! या सर्व नावांच्या मागे आणखी एक जग होतं. उंच भक्कम इमारती, रुपये, आर्थिक समस्या, संप, उपासमार, बेकारी, मजुरांच्या वस्त्या, झोपडपट्ट्या, सिटी ऑफ लंडन, क्लाइव्हरोड, कलकत्ता, चौरंगी, टाटानगर, अँड्र्यू यूल, कलकत्ता.

"मी भीत-भीत त्या कागदपत्रांवर सह्या करी. ती कागदपत्रं जणू माझ्या जीवनाच्या हमी होत्या, समाजातील माझ्या उच्च, श्रीमंत स्थानाचे ते साक्षीदार होते. हे सारं का आहे? मला त्याचा काय फायदा? मी काही असं म्हटलं नव्हतं की रजा घराण्यात जन्म घेऊन या साऱ्या कटकटीचा वारसा मला मिळावा म्हणून! कागदाचे कपटे...पैसा, पैसा, पैसा! अकस्मात पैशाचं महत्त्व माझ्या अंतःकरणातून पूर्णपणे नाहीसं झालं. लोक म्हणाले, 'जन्मजात श्रीमंत असेच बेपर्वा असतात, वगैरे.' ते ऐकून मला अगदी हसू यायचं."

ती सगळी दगडांवर बसली. खालच्या खोऱ्यातील सरोवराच्या पाण्यावर मावळत्या सूर्याचे किरण नृत्य करीत होते. मुक्तिसेने(साल्व्हेशन आर्मी)च्या लोकांची एक तुकडी बँड वाजवीत समोरून निघून गेली.

कमाल तळ्याच्या काठी एकटाच उभा होता आणि इतक्या उंचीवरून तो फारच लहान दिसत होता..

एकाएकी तलअत जोरजोराने खदखदून हसू लागली.

"मी एकदा निर्मलेला विचारलं होतं, 'राणी बेबी, तुला भय कसलं वाटतं?' यावर निर्मला उत्तरली होती, 'मी माझी स्वप्नं त्याच्यापासून सुरक्षित ठेवू इच्छिते. त्याला माझी स्वप्नं माहीत आहेत.' किती हास्यास्पद गोष्ट आहे! निर्मलेची स्वप्नं आता तिच्याजवळ कायमची सुरक्षित राहातील. गौतम अखेर अजाणच राहिला.

"आपण अज्ञानातच जन्म घेतो, अज्ञानात जगतो आणि अज्ञानातच मरून जातो. हाच मूलभूत सिद्धांत आहे."

कमाल त्यांच्या दिशेने येत असलेला दिसला. मायकेलने खाली वाकून एक पान तोडले. जत्रेतील संगीत आता थांबले होते. थंडी वाढली होती.

एक जेट विमान त्यांच्या डोकीवरून उडत उडत अंधारात गडप झाले. ती माना वर करून त्याच्याकडे पाहात राहिली.

"अज्ञानाचं जे नगर आपण वसविलं होतं त्याच्या भिंती आपण तत्त्वज्ञानाच्या विटांनी रचल्या होत्या." तलअत आपले बोलणे पुढे चालू ठेवीत म्हणाली, "एके दिवशी त्या भिंतींत भगदाड पाडून मृत्यू आमच्या नगरात घुसला.

"एकदा फॉरिनबराच्या एअर-फेस्टिवलच्या प्रसंगी जेव्हा बिचाऱ्या जॉन डेरीनं आवाजाची मर्यादा ओलांडून स्वतःचा जीव दिला होता त्यावेळी त्याचं विमान आकाशात उद्ध्वस्त होऊन जत्रेला जमलेल्या लोकांवर कोसळलं होतं. कितीतरी माणसं ठार झाली होती. त्यावेळी विमान, पेटलेल्या प्रचंड निखाऱ्यासारखं, आवाजाहून अधिक वेगानं माझ्या दिशेनं येत होतं. त्या क्षणी मला हे कळत होतं की हा साक्षात मृत्यू असून मी बघता बघता जळून खाक होईन. परंतु, तुम्हांला माहीत नाही, त्यावेळी जमिनीवर पालथं पडण्याऐवजी मी विमानाच्या तुकड्यांच्या वर्षावात चंद्रा आणि जरीना यांनाच हाका मारीत धावू लागले. माझ्या स्वतःपेक्षा मला त्यांचीच काळजी जास्त वाटत होती. त्या मेल्या तर नसतील ना, या विचारानं मी बेभान झाले होते. माझ्या स्वतःच्या जिवाचा विचारही त्यावेळी माझ्या मनात आला नाही.

"म्हणूनच, निर्मलेनं मृत्यूला तोंड दिलं तेव्हा मला वाटलं की तिलाही भय वाटलं नसावं...खरं म्हणजे हाच एक अनुभव असा असतो की माणूस दुसऱ्या कुणाला त्यात सहभागी करून घेऊ शकत नाही. म्हणूनच आम्ही तिला हा अनुभव घेण्यासाठी एकाकी सोडून दिली. बिचारी हातपाय मारीत नदीच्या काळोख्या प्रवाहात वाहून गेली.

"वेदान्तामध्ये अस्तित्वाच्या चार अवस्थांचा उल्लेख आहे : जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि मृत्यू!"

खालच्या दरीत कमाल गात फिरत होता. त्याचा आवाज वाऱ्यावर तरंगत त्या लोकांच्या कानांपर्यंत येऊन पोचला. चंद्र झाडांच्या शेंड्यांमागून डोकावू लागला होता.

"विचारांचा आणि आत्म्याचा प्रवास एक आहे." शंकर म्हणाला.

"मृत्यू मला नष्ट करून टाकील. मृत्यूचा नाश कोण करणार? वारा माझा श्वासोच्छ्वास पळवून नेईल. सूर्य माझ्या डोळ्यांच्या दृष्टीवर पडदा टाकील. चंद्र माझ्या मेंदूला झोपवील. आत्मा वातावरणात विरून जाईल. माझ्या शरीरावरील केस झाडाझुडपांचं रूप धारण करताहेत. डोकीवरील केसांतून वृक्ष उगवत आहेत." तलअत दगडावर उभी राहून उद्गारली.

"गाढ झोप, खोल पाणी, गडद स्वप्न!" शंकर म्हणाला, "पंचमहाभूतं विचारात गढून गेली आहेत, पंचेंद्रियं झोपी गेली आहेत. फक्त मृत्यू बाकी आहे."

"शरीर विचार करतं आणि अनुभव घेतं. ते नष्ट झालं की सगळं काही संपलं म्हणून समजा. धडधडणारा अग्नी, थंड पाणी, गार वारे सर्व काही आपल्या प्रकृतीतून आपोआप निर्माण झाले आहेत. गौतम चंपाला म्हणाला होता, 'तुझं शरीर तुझ्या बुद्धीहून एखादी वेगळी वस्तू असेल तर ती दूर कर आणि फक्त तू माझ्याजवळ ये...परंतु तुला तसं करता यायचं नाही.' वास्तववादी गुल्शन म्हणाला.

"अजून पुष्कळांना मरायचं आहे. मी त्यांच्या आधी चाललोय. अनेक मरताहेत. मी त्यांच्याबरोबर चाललोय. मागे वळून मी पाहातो की जे मरून गेलेत त्यांचं काय झालं ? पुढं पाहातो की माझ्यानंतर जे मरतील त्यांचं काय होईल ?" हरिशंकर म्हणाला.

"चिउँटी चढ़ी पहाड पर, कानों में हाथी लटकाये।
एक अचंभा हमने देखा, नैया बिच नदिया डूबी जाये।"

[मुंगी पहाडावर चढली. तिने आपल्या कानात हत्ती अडकविले आहेत.
आम्ही एक आश्चर्य पाहिले की नावेत नदी बुडते आहे.]

—दरीतून कमालाच्या गाण्याचे शब्द कानी आले.

"माझं मूल्य काय ? मी आतापर्यंत काय केलंय ?" सुरेखा म्हणाली.

"मी जे काही करतो त्याचा, माझ्या प्रत्येक कृतीचा सृष्टीच्या चक्राशी प्रत्यक्ष संबंध आहे, असं वाटतं. ही महत्त्वाची गोष्ट लपवण्यासाठी मी हसतो. तरीपण मी तुम्हांला सांगून ठेवतो," मायकेल बोट वर करून म्हणाला, "आपला शेवट फार वाईट होणार आहे."

"काय करणार ? काय करणार ? काय करणार ?" एखाद्या भयंकर कोरसाप्रमाणे त्यांचे आवाज डोंगरात घुमले.

"समोर भावी काळाचा तट आहे; आणि मायकेलप्रमाणं मी त्याच्यासमोर उभी राहून आक्रोश करते आहे. यातना सहन करीत राहाणं हा अपराधाचा पुरावा आहे काय ?" तलअतने विचारले.

"एखाद्या अमेरिकन निग्रोला बोलवा, एखाद्या जर्मन यहुद्याला घेऊन या, कुणाही अरब निर्वासिताला आमच्यासमोर हजर करा, एखाद्या पाकिस्तानी आणि हिंदू निर्वासिताला बोलावून घ्या आणि त्या सर्वांना विचारा की तुमचा अपराध काय होता की ज्याच्यासाठी तुम्हांला ही शिक्षा मिळालीय ?" गुल्शन म्हणाला.

"मी तुमच्यासमोर हजर आहे. मला काय शिक्षा मिळाली पाहिजे, सांगा." मायकेल म्हणाला.

"इस्राईलच्या नव्या गायका, आम्ही तुझ्याकडून फक्त डीबोराचं गाणं ऐकू इच्छीत होतो." तलअत म्हणाली, "पण तू हातात बंदूक घेतलीस !"

"आम्ही हजारो वर्षे रडत राहिलो. वाळवंटांची भूक, क्रोध, असहायता! आम्ही जोरजोरानं आक्रोश करून यहोवाकडे तक्रार केली. दाऊदच्या गीतकारांची यातना, असहायता, स्वप्न! मी तलअतच्या प्रश्नाचा पुनरुच्चार करतो, यातना सहन करीत राहाणं हा अपराधाचा पुरावा आहे काय?" मायकेल म्हणाला.

"अरण्यामध्ये एक हजार बैरागी बसून भजन करीत होते. मी त्यांचा आवाज ऐकला." हरिशंकर म्हणाला.

"मी पॅलेस्टाइनच्या हिरव्यागार मैदानातून गात फिरत होतो." मायकेल म्हणाला.

"मी तुझा आवाजही ऐकला होता." तलअत म्हणाली.

"इतिहासाची सजीव अनुभूती माझ्या शिरावर नंग्या तलवारीसारखी टांगलेली आहे. मी स्वतःपासून माझी सुटका करून घेऊ शकत नाही." मायकेल म्हणाला.

"काय करणार? काय करणार? काय करणार?" सामुदायिक उद्गार बाहेर पडले.

"आतापर्यंत हजारो लोकांनी वाचलेलीच पुस्तकं होती. नवी पुस्तकं छापली जात होती. लेख लिहिले जात होते. नव्या कथा तयार होत होत्या. रोज सकाळी डोंगरांवर प्रकाश पसरत होता. प्रार्थनामंदिरांमध्ये दाऊदची गीतं गायिली जात होती. माझ्या परमेश्वरानं सांगितलं, 'माणसानं शनिवारी (सबतच्या) रात्री पाणी पिता कामा नये; जर कुणी पाणी पिईल तर त्याचं स्वतःचं रक्त त्याच्या शिरावर राहील.'...परंतु, माणूस तहानलेला आहे. तर त्यानं काय करावं? त्याला म्हणावं, माणसाला म्हणावं, दाऊद-बरोबर सात आवाजांचा पुनरुच्चार कर. ईश्वराचा आवाज पाण्याच्या वर आहे. या आवाजानं लेबॅनॉनच्या देवदाराचे तुकडे-तुकडे होऊन जातात. या आवाजानं आगीच्या ज्वाळा भडकतात. या आवाजानं रानावनांचा थरकाप उडतो. अरण्यं ओस पडतात. आणि त्याच्या विराटतेचे पुजारी उद्गारतात, 'तू श्रेष्ठ आहेस', 'तू श्रेष्ठ आहेस', तू श्रेष्ठ 'आहेस'. परंतु तरीही तुम्ही म्हणता, 'मी तहानलेला आहे', 'मी तहानलेला आहे.'" मायकेल म्हणाला.

"भुकेतून माणूस उत्पन्न होतो. जन्मभर भूक त्याला सतावत असते—प्रेमाची, भाकरीची, शांततेची भूक!" वास्तववादी गुलशन म्हणाला, "भूक आणि तहान ही आमची सर्वांत मोठी भुतं आहेत. मी सर्वांत आधी या भुतांपासून सुटका करून घेऊ इच्छितो. दुसरी मुक्ती मला आपोआप मिळून जाईल."

कमाल गात-गात टेकडीवर आला.

"माणसांना पापाची जाणीव एकत्र करते. परंतु आपल्यामध्ये निष्पापतेची, निरागसतेचीच जाणीव प्रबळ असल्यामुळं आमचे असे तीनतेरा वाजले आहेत. आम्ही एखादं लहानसं का होईना, पाप केलं असतं तर किती बरं झालं असतं! या निरागसतेच्या

जाणिवेच्या दोऱ्यांनी आपण सारे एकमेकांशी बांधले गेले आहोत. एखाद्या दिवशी आपल्यापैकी कुणी तरी ही दोरी तोडली तर आपण सारे कायमचे विखुरले जाऊ." हरिशंकर म्हणाला.

"असं कधीच होणार नाही." तलअत उत्तरली, "आमची संस्कृती, आमची पार्श्वभूमी, आमची उच्च नैतिक पातळी आम्हांला विखुरण्यापासून अडवील."

"तसं नव्हे, तलअत बेगम!" हरिशंकर म्हणाला, "आपल्या संस्कृतीची दोरी तर कधीच तुटून गेलीय. तिच्या एका टोकाला तू आणि दुसऱ्या टोकाला मी असे हवेत निराधार लोंबकळत आहोत."

"आपल्या भुतांना विसरून जा! आपल्या भुतांना विसरून जा." गुलशन म्हणाला.

"आणि मग काचेचा मोठा दरवाजा उघडला. त्यातून जे लोक आत येत होते त्यांत चंपाही होती. 'हॅलो,' ती म्हणाली आणि माझ्याकडे वळली. ही कोंबडीची खाणावळ आहे आणि मी जहाजकंपनीच्या कचेरीला फोन करतो आहे. यावेळी मी अगदी सुरक्षित आहे. माझ्या सभोवती शहरातील दगडी इमारती उभ्या आहेत. माझ्या पायाखाली भक्कम जमीन आहे. परंतु मला भयंकर भीती वाटली. चंपाताई माझ्यासमोर उभी आहे. काळाची भट्टी पेटली आहे; आणि त्यात ती अगदी खुलून दिसते आहे. मला पाहून तिला आनंद, दुःख अथवा त्रागा वाटला असावा असं दिसत नाही. उलट मला मात्र असं वाटलं की आपण इथून शक्य तितक्या लौकर आरडत पळून जावं. तू चंपा आहेस, त्याला मी काय करणार?

"मला वाटलं, ती मला काहीतरी महत्त्वाची गोष्ट सांगू इच्छिते. परंतु ती गप्प राहिली. जे लोक सिनेमा पाहून बाहेर पडत होते त्यांचे चेहरे उदास होते. प्रकाश दुःखी होता. संगीत रुदन करीत होतं. काळ फरफटत चालला होता. ती काचेच्या मोठ्या भिंतीला नाक लावून उभी राहिली आणि बाहेरची रहदारी पाहू लागली. मी घाईघाईनं तिला 'खुदा हाफिझ' करून बाहेर पडलो.

"आता मी तिला खूप मागे सोडून दिलंय. मी घराकडे चाल्लोय. मी इतका का थकलोय? मला स्वस्थ बसू द्या." कमाल जवळच्या एका दगडावर बसून म्हणाला.

"चोरांच्याप्रमाणं आम्हीही आपापल्या देवांना आळवलं. पण पाहा, काय झालं? देव आमच्या हातावर तुरी देऊन निघून गेले." तलअत म्हणाली.

हिरव्या रंगाचे धुके आता सर्वत्र पसरले आहे. सर्वजण या धुक्यातून वाहात चालले आहेत. "अंधाराच्या काठी मी प्रकाश आणि भय यांच्या संगमावर उभी राहून सोन्याचा रंग असणाऱ्या भगवान प्रजापतीप्रमाणं पुनः वस्तूंना नावं देते आहे." तलअत म्हणाली.

"पाहा!" ती खडकावर उभी राहून क्षितिजाकडे बोट दाखवून म्हणाली, "मायकेल त्या तिकडे तुझं जेरुशलेम आहे. आपणा सर्वांचं जेरुशलेम!"

"आणि जेरुशलेमचीही फाळणी झालीय." हरिशंकराने तिला आठवण करून दिली.

"आणि डोंगरावर हजरत दाऊदचे गीतकार कण्हत फिरत आहेत. सूर संपले आहेत. क्रूसांवर येशूबरोबर आम्हांलाही टांगण्यात आलं आहे. येशूच्या ऐवजी आम्ही सुळावर चढतो, कारण आम्ही सर्वांत मोठे चोर होतो. आम्ही ईश्वराच्या खजिन्यातून सुख चोरायचा प्रयत्न केला होता." तलअत म्हणाली.

"आता मला काही आठवत नाही. भूतकाळात जमा होणारी वर्षं माझ्या भोवती बगळ्यांप्रमाणं घिरट्या घालताहेत. झोपी गेलेल्या घरांच्या धुराड्यांवरून गडगडत चंद्र समुद्राकडे चालला आहे. ईस्ट-अँग्लियाच्या जंगलांत सोसाट्याचा वारा वाहात आहे. निर्जन बंदरांतील काळ्या पाण्यावर रात्रीचे पक्षी घिरट्या घालीत आहेत.

"माझ्या समोरून माणसांच्या झुंडी चालल्या आहेत. तलावात होड्या तरंगत आहेत. मी किनाऱ्यावर आहे. आता मला माझ्या जहाजाचा शोध करायचा आहे. ज्या जहाजावरील दिवे मालवले आहेत आणि जे हळूच समुद्राच्या काळोखात प्रविष्ट होईल, असं जहाज मला हवं आहे. जिथं कुणी 'ये, तुझं स्वागत असो' असं म्हणणारी व्यक्ती असणार नाही अशाच दिशेला जाणारं जहाज मला पाहिजे." कमाल म्हणाला.

आता धुके जास्तच दाट झाले होते.

"रूप आणि नाव!" हरिशंकर उद्गारला.

"विद्या आणि अविद्या!" तलअत उद्गारली.

"आता आम्हांला समजलं आहे." सर्वजण एका सुरात उद्गारले.

"कारण, भावना आणि विचार यांच्या सर्वोच्च शिखरावर सदैव तोच एकटा उभा असतो. एकटा, अनादिकाळापासून अनंतकाळापर्यंत राहणारा, ज्याचं नाव गौतम, मायकेल, हरी, स्रिल, कमाल रजा आहे...त्याचा एकाकीपणा वज्रलेप आहे."

थंड, काळोख्या वातावरणात त्यांचे आवाज बुडून गेले आणि हिरव्या धुक्याने त्यांना झाकून टाकले.

आगबोटीच्या डेकवरील ऑर्केस्ट्राच्या निरोप-संगीताचे सूर आकाशाला भिडले. एकाएकी कमालाचे अंतःकरण भरून आले. तो कटड्यावर रेलून खाली पाहू लागला. लंडनमध्ये त्याला बोटट्रेनवर निरोप देण्यासाठी कितीतरी लोक आले होते. परंतु पोर्टस्मथ बंदरात तो एकटाच होता. अपरिचित बंदर, अनोळखी प्रवासी. जगाचा अनोळखीपणा त्याला येथूनच अनुभवास येऊ लागला होता. आपल्या डोळ्यांतून बाहेर पडू पाहाणारे अश्रू त्याने कसेबसे आवरले. जवळच दोन म्हातारे उभे होते. त्यांच्यापैकी एकाने मोठ्या वात्सल्याने त्याच्या खांद्यावर हात ठेवला. कमालाने कृतज्ञतेने त्याच्याकडे पाहिले. म्हातारा शून्य नजरेने बंदराकडे पाहात होता. जहाजाने नांगर उचलला आणि तो आपल्या केबिनमध्ये गेला.

दुसऱ्या दिवशी त्याने साऱ्या जहाजाचे निरीक्षण केले. हिंदी व पाकिस्तानी फॉरिन-सर्व्हिसचे काही वरिष्ठ अधिकारी व त्यांची कुटुंबीय मंडळी, लष्करी अधिकारी, विद्यार्थी, इंग्रज, अमेरिकन आणि टूरिस्ट क्लासचे प्रवासी विशेष लक्ष वेधून घेणारे होते. गरीब विद्यार्थी, अशिक्षित शीख व्यापारी, मिशनरी, कॅथॉलिक संन्यासिणी, फ्रेंच भिक्षू आणि 'पंडितजी'. हे पंडितजी ओरिएंटल स्कूलमध्ये शिकवीत होते. ते सुटीसाठी घरी चालले होते. कमाल त्यांना लंडनमध्येही ओळखत होता. ते शुद्ध हिंदी बोलत. मेरटचे राहाणारे होते. लांब, कुरळे केस, मोहक बायकी चेहरा, सडपातळ, नाजुक. महात्मा गांधींचे शिष्य, अत्यंत विनम्र कडाक्याच्या थंडीतही लंडनमध्ये धोतर व चप्पल घालून राहात. ब्रज लोकगीतासंबंधी संशोधन करीत होते. मायकेलही टूरिस्ट क्लासमध्ये होता. तो जिब्राल्टरपर्यंत जाणार होता.

एके दिवशी कमाल डेकवर आरामखुर्चीत बसून समुद्राच्या लाटा मोजत होता. इतक्यात मागून कोणीतरी विचारले, "मी इथं बसू शकतो ?"

"अवश्य !" असे म्हणून त्याने मागे वळून पाहिले. पहिल्या दिवशी कमालाला ज्याने धीर दिला होता तोच म्हातारा स्मित करीत उभा होता. तो लगेच उठला आणि त्याने म्हाताऱ्यासाठी दुसरी आरामखुर्ची पुढे ओढली.

"फ्रेड, पॉल ! तुम्हीही इकडेच या."

थोड्या वेळाने आणखी दोन युरोपियन तेथे येऊन बसले.

"माझं नाव डॉक्टर हॅन्स क्रॅमर. मी ऑस्ट्रियन आहे. मी आणि माझे मित्र, आम्ही इतिहासाचे प्राध्यापक आहोत. आम्ही भारताला चाललो आहोत. तू भारतीय आहेस ?"

"होय."

"आधी विचारून खात्री करून घ्यावी म्हटलं. कारण काल मी त्या समोरच्या मुलीला 'इंडियन' म्हटलं तर अशी रागावली ती! ती पाकिस्तानी आहे." तिघेही पोकळपणे हसले.

कमाल गप्प राहिला.

"तू इंडियातच राहतोस?"

"होय."

"मी बूडा जयंतीसाठी चाललोय." डॉक्टर क्रेमर म्हणाले.

"अस्सं?...हं...हं...बुद्ध जयंती!"

"बूडा (बुद्ध) हा इतिहासातला सर्वांत थोर पुरुष होता." पॉलने विचार व्यक्त केला. "तू हिंदू आहेस ना?"

"नाही."

"ओह! माफ कर. पुन्हा चूक झाली माझ्याकडून. तर मग तू मुसलमान आहेस?"

"होय."

"तर मग इंडियात कसा काय राहातोस?"

"हाई डॉक!" अमेरिकन मोठ्या खुशीत जवळ येऊन म्हणाला. "हाई!" त्याने निःसंकोचपणे कमालाला उद्देशून उद्गार काढला.

"हाई!"

"माझं नाव टॉमस जेरल्ड ॲटकिन्स. परंतु तू मला टॉम म्हणत जा."

"इतर पत्रकार कुठं आहेत?" फ्रेडने विचारले.

ते लोकही आले. त्यांच्यापैकी एकजण फ्रेंच होता. मॉरिस. तो इंडोचायनाला चालला होता. दुसरा एक प्रसिद्ध इंग्रज कवी होता. तो बी. बी. सी. चा प्रतिनिधी म्हणून बुद्धाच्या पंचवीसशेव्या पुण्यतिथीच्या कार्यक्रमात सामील होण्यासाठी भारताला चालला होता. काही श्रीमंत अमेरिकन स्त्रिया होत्या. त्याही याच निमित्ताने अमेरिकेहून भारताला चालल्या होत्या. एक फ्रेंच भिक्षू भगवी वस्त्रे परिधान करून सर्वांपासून दूर एका कोपऱ्यात बसून राही. तोही गयेला व बनारसला चालला होता. तो 'टूरिस्ट' वर्गाचा प्रवासी होता.

संध्याकाळी कमालाने या सर्व मंडळींशी मायकेलची ओळख करून दिली. पंडितजीही या गटात सामील झाले. ते सर्व एकमेकांशी खेळीमेळीने वागत होते. एक महाराष्ट्रीय मुलगी फार छान गात असे. पंडितजी कीर्तन करीत. रात्री बॉलरूममध्ये नृत्य होई. सिनेमा पाहाण्याचा कार्यक्रम होई. प्रवासाचे दिवस भरभर चालले होते.

उद्या सकाळी जहाज जिब्राल्टरला पोचणार होते. कमाल वेगवेगळ्या गटांत बसून, त्यांच्या गप्पा ऐकून, पत्ते खेळून, पोहून आणि ग्रंथालयातील नियतकालिके वाचून आता अगदी पूर्ण कंटाळला होता. पुनः एकदा सबंध जहाजावर फेरी मारून अखेर शेवटी तो सर्वांत वरच्या डेकवर जाऊन उभा राहिला.

मागल्या बाजूने जोरजोरात बोलण्याचा आवाज ऐकू आला. त्याने वळून पाहिले. दूर होड्यांजवळ डॉक्टर क्रॅमर आपल्या मित्रांसह बसले होते. मायकेल कठड्याला टेकून उभा राहून त्यांना काही सांगत होता. ती अमेरिकन प्रोफेसर मुलगी सतरंजी अंथरून, हाताचे उसे करून पहुडली होती. कोणीतरी गिटार वाजविण्यास सुरवात केली होती.

"लिही!" मायकेल म्हणाला.

"काय लिहू?" टॉमने विचारले.

"मी जे बोलतोय त्याचा चुकीचा, खोटा अहवाल तयार कर. कारण परमेश्वरानं तुझ्यासाठी नेमून दिलेली भाकरी तू असंच खोटं-नाटं लिहून मिळवत असतोस." मायकेल ओरडला.

"बापरे!" कमाल स्वतःशी उद्गारला. मायकेल आणि टॉम यांच्यात पुनः जुंपलेली दिसते.

"तो पाहा, कमाल रजा येतोय. त्याचं काय म्हणणं आहे तेही लक्षपूर्वक ऐक; आणि परत गेल्यावर जे पुस्तक लिहिशील त्यात असं नमूद कर की आगबोटीवर तुला एक भारतीय मुसलमान भेटला होता, तो पाकिस्तानचा कट्टा विरोधक होता, परंतु १९५९ च्या भारतातही त्याचं दुःख समजणारं कुणी नव्हतं."

"अहाहा!" पंडितजी आपले केस पिंजारून शुद्ध हिंदीत म्हणाले, "या रजा-जी! मायकेल आणखी एक व्याख्यान देतोय."

"हाय, पंडितजी! मायकेलच्या कटुतेच्या विषावर माझ्याजवळही उतारा नाही." कमालने हसून तितक्याच शुद्ध हिंदीत उत्तर दिले.

इंग्रज कवी त्या दोघांकडे टक लावून पाहात राहिला.

"अडचण ही आहे," टॉम कमालाला म्हणाला, "की जो कुणी परदेशी माणूस तुमच्या देशासंबंधी लिहितो त्याचं मोजमाप तुम्ही ई. एम. फॉस्टरच्या फूटपट्टीनं करता. तो बिचारा स्वतः आदर्शवादी होता. खुज्या लोकांत राहाणारा धिप्पाड पुरुष."

"फॉस्टरनं आपली कादंबरी १९२४ साली लिहिली होती. त्यावेळी त्यानं डॉक्टर अजीज हे पात्र भारताचं प्रातिनिधिक पात्र म्हणून रंगवलं." इंग्रज कवी म्हणाला, "आज फॉस्टरनं दुसरी 'पॅसेज टु इंडिया' कादंबरी लिहिली तर त्याला आपलं हे पात्र बदलावं लागेल. आता डॉक्टर अजीज हिंदुस्थानचा प्रतिनिधी राहिलेला नाही. आता

प्रत्येक मुसलमान पाकिस्तानी समजला जाईल. फक्त हिंदूच भारताचा खरा प्रतिनिधी समजला जातो."

"होय!" कमालाने उत्तर दिले.

"कमाल, तू खूप दुःख सहन केलं आहेस?" कवीने विचारले.

"होय; परंतु मी पीडित व्यक्तीच्या रूपात स्वतःला जगापुढं ठेवू इच्छीत नाही. हिंदुस्तानचा सदैव दुःख सहन करणारा आत्मा! हे समाधान, ही ग्रेस, ही दुःखं सहन करण्याची प्रवृत्ती, तुम्हां लोकांना, मुसियो पॉल वलॅप्रमाणं धोतर नेसून तुम्ही सोवळ्यानं जेवू लागलात तरी, कळायची नाही."

"संट ऑगस्टीन हे काही बनारसला जन्मले नव्हते." मॉरिस म्हणाला.

"कॅथॉलिक जीवनदर्शन हा एक खास संप्रदाय होता. त्यानं संपूर्ण जीवन व्यापून टाकलं नव्हतं. नाहीतर तू आज कॅथॉलिक असूनही इंडोचायनात लढायला निघाला नसतास." कमाल चिडून उत्तरला.

"ऑब्झर्व्हर (प्रेक्षक) आणि कॉम्बॅटंट (लढणारा) यांत काय फरक आहे?" मॉरिसने विचारले.

"ते तू स्वतःला विचार. इतरांनी लढायचं आणि तू पाहात राहायचं. एवढ्यानं अपराधाची जाणीव कमी होते काय?" कमालानं विचारलं.

"तू तर मला क्वेकर्ससारखा धंदेवाईक शांततावादी दिसतोस." टॉम म्हणाला.

'भोर भये गैयनके पाछे मधुबन मांहि पठायो'—डेकच्या एका टोकाला लीला भास्कर गाऊ लागली. कमाल टॉमच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून गाण्याकडे ओढला गेला. पंडितजी ताल देऊ लागले. थोड्याच वेळाच ते दोघे लीला भास्करकडे गेले.

"प्रत्येक संस्कृतीची एक गूढ भाषा असते. फक्त त्याच संस्कृतीला कळते." इंग्रज कवी म्हणाला.

"पुनः स्पेंग्लर!" टॉम म्हणाला, "पंडित आणि कमाल यांची संस्कृती कुठं एक आहे?"

"बाकी तुला तर मायकेलची गूढ भाषाही कळायची नाही म्हणा!" इंग्रज कवी हसून म्हणाला.

मायकेलवर ड्रायमार्टिनी मद्याचा अंमल होता. तो कोपऱ्यात गप्प बसला होता. आपले नाव ऐकून तो दचकला. यांत्रिकपणे मागे वळून त्याने ज्या ठिकाणी आपला मुद्दा सोडला होता तेथूनच पुढे बोलण्यास सुरुवात केली.

"लिही!" तो ओरडून म्हणाला, "घे लिहून! जगातल्या राष्ट्रांचा इतिहास म्हणजे विजय, राज्यविस्तार आणि देशांची निर्मिती हा आहे. माझ्या बाबतीत इतिहास ही

भयंकर अत्याचारांची आणि यातनांची कहाणी आहे. तेराव्या शतकात मला इंग्लंड-मधून हाकलून देण्यात आलं. चौदाव्या शतकात फ्रान्समधून. पंधराव्या शतकात स्पेननं माझ्यावर अत्याचार केले. परंतु घरादाराला पारखा झालेला मी जगाच्या लाथा खात, भटकत राहिलो; आणि पूर्वेला तसंच पश्चिमेला, दोन्हीकडे मी अश्रूंचा दिवा पाजळून, ज्ञानाचा प्रकाश पसरविला. मी बू–अलीसीना, इब्ने खुल्दून, इमाम गझाली अलफाराबी आणि ख्वारजमी यांचं तत्त्वज्ञान युरोपात नेऊन रूढ केलं. मी...''

लीला भास्कर गात राहिली. कमाल खालच्या डेकवर गेला. आणि पायऱ्या उतरून टूरिस्ट क्लासमधून चक्कर मारू लागला. मायकेलच्या केबिनसमोर जातात त्याच्या एकदम लक्षात आले की उद्या सकाळी मायकेल जिब्राल्टरला उतरणार. त्यानंतर मग जन्मभर, मरेपर्यंत त्याची पुनः भेट होणार नाही, अशी दाट शक्यता आहे. किती विचित्र गोष्ट आहे! तो मायकेलच्या कॅबिनसमोरच्या कठड्याला टेकून उभा राहिला. समोर पौर्णिमेचा चंद्र क्षितिजावर उगवत होता. समुद्र कमालीचा शांत होता. जहाज लाटा कापीत रुबाबात पुढे चालले होते. डेकच्या या भागात पूर्ण एकांत होता. फक्त फ्रेंच भिक्षू एका टोकाला कमालाकडे पाठ करून बसलेला होता.

कमालाचे अंतःकरण धडधडू लागले. निःस्तब्धता इतक्या प्रचंड आवाजात गरजली की आपल्या कानाचे पडदे फाटून जातील असे त्याला वाटले. त्याला टॉम व इंग्रज कवी यांचे बोलणे आठवले. तो खिन्न होऊ लागला. कठड्याला घट्ट धरून तो उभा राहिला.

''मी स्टेटलेस आहे! मला माझा देश नाही.'' तो प्रथमच स्वतःशी उद्गारला.

समुद्राच्या लाटांचा शुभ्र फेस चांदण्यात चमकत होता. जगाच्या कोन्या-कोपऱ्यात, दूर कोठेतरी, चांदण्याच्या या विशाल निळ्या चादरीवरून प्रवाशांनी भरलेली जहाजे चालली होती....व्यापारी व लष्करी जहाजे. दूरदूरच्या देशांचे लोक त्यांत बसलेले होते. यूरोपचे विद्वान, इटलीचे धर्मोपदेशक, अमेरिकेचे हौशी प्रवासी, मेक्सिकोचे चित्रकार, भारताचे नर्तक. दुनियेत अजून शांतता होती. दिल्लीत पंडित नेहरूंचे राज्य होते. जीवनात खूप चैतन्य होते.

''मोठे नशीबवान आहेत ते लोक ज्यांना मनःशांती लाभलेली आहे. बाबा रे, मला शांतता हवी.'' कमाल हळूच म्हणाला.

फ्रेंच भिक्षूने मान वर करून त्याच्याकडे पाहिले. त्याच्या चेहऱ्यावर पूर्ण शांतता व शाश्वत प्रसन्नता होती. अशाच एका पौर्णिमेच्या रात्री, अडीच हजार वर्षांपूर्वी, साता समुद्रांपलीकडच्या एका देशात शाक्यमुनींनी जन्म घेतला होता. चतुर्दशीचा चंद्र समुद्राच्या लाटांवर इकडे-तिकडे तरंगत राहिला. त्याचे प्रखर व शीतल किरण कमाल व भिक्षू यांच्या चेहऱ्यांवर पडत होते.

"मला माझ्या विचारांपासून सोडवा!" कमाल म्हणाला.

भिक्षू आपल्या रहस्यपूर्ण निळ्या डोळ्यांनी त्याच्याकडे पाहात राहिला. "विचार... विचार स्वतःला जाणू शकत नाही. विचार स्वतःच्या बाहेर जाऊ शकत नाही. सृष्टीच्या बाहेर कुणी ईश्वर नाही आणि ईश्वराच्या बाहेर एखादी सृष्टी नाही. सत्य आणि असत्य यांत काही अंतर नाही. परंतु त्या सर्वांच्या वर एक परमतत्त्व आहे. ते शून्य आहे." तो फ्रेंच भाषेत म्हणाला.

"मला या शून्याची, या निःस्तब्धतेची फार भीती वाटते." कमाल म्हणाला.

"शून्य!...निःस्तब्धता! शून्यता! ते अंतिम तत्त्व आहे. तीच शून्याची संकल्पना आहे."

"मला त्या संकल्पनेचंही भय वाटतं." कमाल म्हणाला, "या निःस्तब्धतेत मी एकटा कुठं जाऊ? तूही माझी सोबत करू शकत नाहीस." त्याने त्या महायान पंथाच्या फ्रेंच भिक्षूकडे साशंक नजरेने पाहिले.

"मी स्टेटलेस आहे; आणि ही तुझी 'सुखवती' (बुद्ध अमिताभाचा स्वर्ग) नाही!" तो मनाशी म्हणाला आणि जड पावलांनी आपल्या डेकवर परत गेला.

## ५४

भारताचा समुद्रकिनारा.

मुंबई! घर! घर!

कमाल लखनौला पोचला. 'गुलफिशाँ'च्या फाटकात जाऊन दाखल झाला. त्याला जग बदलल्याचे आढळून आले. बागेतील झाडे जळून गेली होती. लहान रोपे वाळून गेली होती. हिरवळीच्या जागी रान वाढले होते. गॅरेज व तबेला यांचे गोदामांत रूपांतर झाले होते. ("जे कुणी नातेवाईक पाकिस्तानला हिजरत करून जातात ते सगळे आपलं सामान इथं 'डंप' करून टाकतात."—खाला बेगम म्हणाल्या.) नोकरांचे निवासस्थान ओस पडले होते. त्याचे डोळे गंगादीनला शोधू लागले. कदीर व कमरूनला शोधू लागले. हुसैनची बीबी आणि रामभौतार व छुटकी यांना त्याने साद घातली.

अखेर शेवटी आपल्या खोलीत जाऊन त्याने धाडदिशी पलंगावर अंग टाकले आणि हलक्या आवाजात तो रडू लागला. जग तेच होते—'गुलफिशाँ', लखनौ, नातेवाईक—सगळे काही तेच होते. तर मग काय तो स्वतःच बदलला होता? आपल्या वडिलांची

निर्धन अवस्था पाहून तो भावुकतेने व्याकुळ झाला होता काय?—ज्याचे आजवरचे सारे आयुष्य जमीनदारांच्या विरुद्ध घोषणा करण्यात गेले होते तो स्वतःच्या वडिलांची दुर्दशा पाहून असा भावविवश झाला होता?

"मोठमोठी संस्थानं खलास झाली. तिथं आपला काय पाड?" संध्याकाळी अप्पी त्याला म्हणाली. ती त्याला भेटण्यासाठी झाशीहून आली होती. "नानपाराचा क्रोकरीचा कारखाना विक्रीला निघालाय. राजा सूरजसिंहांकडे एक पैसा उरलेला नाही. अम्मीनं आपले अर्धे दागिने विकून टाकले."

"आता तुम्ही काय ठरवलंय?" कमालाने आपल्या वडिलांना विचारले, "कर्बल्याला जाणार की पाकिस्तानला?"

"इथंच राहाणार!" त्यांनी दृढपणे उत्तर दिले, "आम्ही पळपुटे थोडेच आहोत?"

कमाल थक्क झाला. "परंतु बाबा, तुम्ही तर मोठ्या थाटात मुस्लिम लीगमध्ये सामील झाला होता."

"होय, झालो होतो. म्हणून काय झालं? पाकिस्तान निर्माण झालं. ठीक झालं. आता त्याचा असा अर्थ थोडाच आहे की आम्हीही इथून पळून जावं म्हणून?"

"तुम्ही पाकिस्तानला आपली खरी मातृभूमी समजत असूनही इथून तिकडे जाऊ इच्छीत नाही, याचं कारण या म्हातारपणात कुठं वणवण भटकत फिरायचं असं तुम्हांला वाटतं की भारतालाच तुम्ही आपली मातृभूमी समजता आणि तिच्या प्रेमामुळं तिचा त्याग करू इच्छीत नाही?"

"तुझ्याशी कुणी वाद घालायचा बाबा? तुझं डोकं नेहमीच उलटं चालतं." नबाबसाहेबांनी उत्तर दिले.

"आता मी कराचीला जाऊन आमिर भैयाच्या बायकोच्या दारात थोडीच पडणार आहे? इथं निदान आपलं हक्काचं घर तरी आहे. ते कुणी काढून घेत नाही ना? तरीपण आता इथं मन लागत नाही, हे मात्र खरं." अम्माबेगम म्हणाली.

काही दिवसांनंतर त्याने कंबर कसून नोकरी शोधण्यास सुरुवात केली. त्याच्याजवळ अनेक पदव्या होत्या. केंब्रिजच्या ट्रिनिटी कॉलेजात त्याचे शिक्षण झाले होते. शिवाय इंग्लंडच्या एका प्रख्यात लॅबोरेटरीत त्याने अनेक वर्षे नोकरी केली होती. ब्रिटनमधील नोकरी सोडून तो देशसेवेच्या भावनेने परत आला होता.

सहा महिने निघून गेले. दिल्लीच्या वाऱ्या करून तो अगदी वैतागला.

"बाबा रे, एखाद्या मंत्र्याचा वशिला लाव." नबाबसाहेब म्हणाले.

"काय वाटेल ते झालं तरी मी कुणाचा वशिला लावणार नाही. इतरांकडून वशिला लावून घ्यायला माझ्याजवळ काय क्वालिफिकेशन्स नाहीत?"

आता तो दिवसभर 'गुलफिशाँ'मध्ये गप्प पडून राही. अधून-मधून तलअतला पत्रे लिही. "काही झालं तरी तू आता हिंदुस्थानात येऊ नकोस. शक्य तर तिथंच राहा. इथं आलीस तर माझी जी दुर्दशा झालीय तीच तुझी होईल."

"तुला झालंय तरी काय?" तलअत त्याला लिही, "संघर्ष करण्याची हिम्मत तुझ्या ठिकाणी उरली नाही? हाच तर कसोटीचा काळ आहे. मजुरी कर, नांगर चालव. क्रांतीचा मार्ग यालाच म्हणतात ना? परंतु तुला ऐषआरामाची स्वप्नं पडू लागली आहेत काय? तसं असेल तर पाकिस्तानला जा. पण तसं करशील तर मी तुझ्याशी जन्मभर बोलणार नाही."

"मुलींमध्ये जास्त हिम्मत असते काय?"...तो मनाशी विचार करी, "की त्या पराकोटीच्या आदर्शवादी असतात?" तरीपण तलअतच्या पत्रांनी त्याला मोठा आधार वाटे.

गौतमाने न्यूयॉर्कहून त्याला अनेक पत्रे लिहिली. परंतु त्याने त्याच्या एकाही पत्राला उत्तर पाठविले नाही. लिहिणार तरी काय? हरिशंकर अमेरिकेहून परत आला होता आणि बंगलोरला त्याची नेमणूक झाली होती. कमालाने त्यालाही पत्र लिहिले नाही.

भैयासाहेबांनी कराचीहून पत्रांचा जणू भडिमार सुरू केला: "ताबडतोब इकडे ये. इथं एकाहून एक वरचढ नोकऱ्या तयार आहेत. फक्त तुझ्या येण्याचाच अवकाश. हट्ट सोड."

त्यांचा आग्रह इतका पराकोटीला गेला की अखेर कमालाने त्यांची पत्रे उघडून पाहाण्याचेच सोडून दिले. काही दिवसांनंतर त्याला बाराबंकीच्या कॉलेजात नोकरी मिळाली. परंतु भैयासाहेब पाकिस्तानी होते आणि 'गुलफिशाँ' व दुसरी वडिलार्जित संपत्ती यांमध्ये त्यांचाही वाटा होता. यामुळे कस्टोडियनची कटकट सुरू झाली. नबाबसाहेबांनी कस्टोडियनच्या निर्णयाविरुद्ध कोर्टात दावा दाखल केला. आता कमालाला त्या कामासाठी दिवसभर वणवण भटकणे भाग पडले. आता त्याच्या स्वरात कटुता आली. तो क्वचितच हसताना दिसे. त्याचा उत्साह तर कधीच मावळला होता.

"हे महाशय बूर्झ्वा क्रांतिकारक होते. जेव्हा वस्तुस्थितीला तोंड द्यायची पाळी आली तेव्हा बोबडी वळली." कॉफीहाउसमधील कॉमरेड्स म्हणाले.

हुसैनी व त्याची बायको भैयासाहेबांच्या पत्नीबरोबर कराचीला गेली होती. कदीर व कमरून खूप दिवसांपूर्वी मोटार विकली गेल्यानंतर, मिर्जापूरला परत गेली होती.

* * *

एके दिवशी तो नेहमीप्रमाणे दिल्लीत लाजवतीच्या घरी बेलारोडवर उतरला आणि एक अर्ज लिहून तो मेडन्स हॉटेलच्या पोस्टात टाकण्यासाठी चालला होता. इतक्यात

त्याला रस्त्यात टॉमस ॲटकिन्स भेटला. हा टॉमस इंग्लंडहून येताना बोटीवर त्याचा सहप्रवासी होता.

"हॅलो! तू इथं कुठं?" कमालाने विचारले.

"मी सबंध देशभर भटकतो आहे. दक्षिण भारत, बंगाल, आसाम, उडीसा...आणि आता राजस्थानात जायचा विचार आहे."

"तू दिल्ली पाहिलीस?"

"अजून नाही."

"तू आमचं राष्ट्रपतिभवन पाहिलंस?" कमालाने अभिमानाने विचारले. "आणि नव्या दिल्लीतल्या नव्या इमारती—नव्या भारताची प्रतीकं...आणि राजघाट...आणि... आणि" अकस्मात् तो पूर्वीचा कमाल बनला—पोटापाण्याच्या काळजीपासून मुक्त, भारताचा तेजस्वी सुपुत्र! तो दिल्लीतील बारीक-सारीक गोष्टी टॉमला दाखवीत फिरला.

"आजकाल तू काय करतो आहेस?" 'आल्प्स'मध्ये बसून कॉफी पिता पिता टॉमने विचारले.

"काही नाही. नोकरी शोधतो आहे." त्याने थंडपणे उत्तर दिले.

"बेकारी ही या देशापुढली फार मोठी समस्या आहे." टॉम म्हणाला.

"ती सर्वांसमोरच आहे. मी काही एकटाच बेकार नाही. जेव्हा समृद्धी होईल तेव्हा ती सबंध देशात येईल. ती काही हे हिंदूचं दार आहे आणि हे मुसलमानाचं आहे, असं पाहात फिरणार नाही. आम्ही सारे एकत्र तरू किंवा एकत्र बुडू."

"परंतु तू नवाबजादा (नबाबपुत्र) आहेस. तू मजुरी करू शकणार नाहीस." गुलशन म्हणाला. त्याला त्यांनी ब्रॉडकास्टिंग हाउसमधून आपल्याबरोबर घेतले होते. "तू स्वतःला डी-क्लास करू शकणार नाहीस."

"साफ चूक!"

"असं? तर मग चल माझ्याबरोबर. चालव ट्रॅक्टर!"

"मी ट्रॅक्टर चालवण्याचं शिक्षण घेतलं असतं तर अवश्य चालवला असता. परंतु खेदाची गोष्ट अशी की मी आठ वर्षे न्यूक्लिअर फिजिक्सचं शिक्षण घेण्यात वाया घालवून आलोय."

"पाकिस्तानात शास्त्रज्ञांना खूप मागणी आहे म्हणे. तिकडे जा. इथं कशाला झक मारीत राहिला आहेस?" गुलशनने सल्ला दिला.

"तूही असंच म्हणतो आहेस?" कमालाने आश्चर्याने विचारले.

"अगदी बरोबर." गुलशन थंडपणे म्हणाला.

अखेर तो दिवसही उजाडला. कमालाने दिल्लीला जाऊन व्हिसा मिळविण्यासाठी

अर्ज केला. या निर्णयावर त्याने कित्येक रात्री जागून काढल्या होत्या. तो इतरांच्या नजरा चुकवून फिरला होता. ओसाड पडलेल्या 'गुलफिशाँ'मध्ये फक्त सावल्या फिरताना त्याला दिसत होत्या. दारे बंद होती. रिकाम्या खोल्यांतील दारांवरील पडदे वाऱ्याने फडफडत होते. आतील झोपण्याच्या खोलीतून म्हाताऱ्या नबाबसाहेबांच्या खोकण्याचा आवाज येई. अम्मी बेगम मागील व्हरांड्यात बसून नवसावर नवस करीत होती, "या मौला, कम्मन भैयाला नोकरी मिळू दे! या मौला, कम्मन भैयाला मदत कर." (बाराबंकीची हंगामी लेक्चररशिप संपली होती!) तो सारखा स्वतःला उद्देशून म्हणत होता, "तू भित्रा आहेस! नीच! भ्याड! तुझी ती सारी राष्ट्रीय वृत्ती कुठं गेली? तलअतचं म्हणणं बरोबर आहे : गवत काप, नांगर धर. थूः तुझ्या जिंदगीवर. संधिसाधू, बेइमानी, ढिसाळ!" अलीगड युनिव्हर्सिटीचा एकमेव आधार उरला होता. परंतु सध्या तेथेही त्याच्या योग्य जागा रिकामी नव्हती. त्याने मनाशी निश्चय केला होता की उपाशी मरेन पण देश सोडून जाणार नाही.

परंतु एवढ्यात एके दिवशी न्यायालयाने निर्णय दिला. 'गुलफिशाँ' बंगला सर जकी रजा यांच्या नावावर नोंदलेला होता. त्यांचा एकुलता एक मुलगा आमिर रजा हा त्याचा वारस असून तो पाकिस्तानी होता. त्यामुळे 'गुलफिशाँ' ही निर्वासित मालमत्ता ठरली होती. दुसऱ्या दिवशी सकाळी कमाल जागा झाला तेव्हा लखनौमध्ये आपण निर्वासित असल्याचे त्याला आढळून आले. तिसऱ्या दिवशी पोलिस अधिकारी त्या बंगल्याला टाळे लावण्यासाठी आले. चौथ्या दिवशी कमाल रजा आपल्या म्हाताऱ्या आईबापांना घेऊन आगगाडीत बसला. पाचव्या दिवशी आगगाडीने सरहद्द ओलांडली. सातव्या दिवशी कमाल रजा कराचीत, पाकिस्तानात होता.

## ५५

कराची!

आज १९५६ साली, जगातील सर्वांत मोठ्या इस्लामी राष्ट्राची आणि जगातील पाचव्या मोठ्या देशाची ही राजधानी आहे. येथे नवश्रीमंत मध्यमवर्गाचे राज्य आहे. कराची अत्याधुनिक शहर आहे. येथे रोज रात्री उच्च श्रेणीच्या हॉटेलांतून आणि क्लबांतून एक लखलखती दुनिया अस्तित्वात येत असते. या नवीन सामाजिक जीवनाचा आधार पैसा आहे. दुसरे वैशिष्ट्य म्हणजे भयंकर वैफल्याची भावना. आपल्याला

याहून अधिक काळाबाजार करता येत नाही म्हणून काळाबाजारवाला वैफल्यग्रस्त— फ्रस्ट्रेटेड आहे. वामपक्षीय इंटलेक्चुअल रडतो आहे की आता क्रांतीची काही आशा नाही. जमाते इस्लामीवाला शंख करतो आहे की मुस्लिम बायका पडदा पाळत नाहीत, बुरखा न घेता रस्त्यातून हिंडतात, बॉलरूममध्ये नाचतात. मध्यम वर्गाला त्याच्या स्वतःच्या असंख्य काळज्या आहेत.

त्यावर पुनः बंगाली व पंजाबी, निर्वासित व स्थानिक लोक यांची भांडणे आहेतच.

देशाची फाळणी करण्यात चूक झाली आणि देश खरोखरी एकच आहे, हे सिद्ध करण्याचा आटोकाट प्रयत्न हिंदुस्थानने चालविला आहे; तर पाकिस्तान हे सिद्ध करू पाहात आहे की फाळणी केली हे अगदी योग्यच झाले. कारण येथील संस्कृती पूर्णपणे भिन्न आहे आणि या भिन्न राष्ट्रीयत्वाच्या आधारावरच हा देश मिळविण्यात आला आहे.

तिकडे हिंदुस्थान सांगतो आहे की साऱ्या पौर्वात्य संस्कृतीचा उगम आरत्याच संस्कृतीतून झालेला आहे. तिकडे गुप्त साम्राज्याच्या सुवर्णयुगावर प्रकाशझोत टाकण्यात येत आहे तर इकडे खिलाफते राशिदा (मुहम्मद पैगंबरानंतर आलेल्या चार खलिफांची राजवट) आणि अब्बासी व मुगल यांच्या कारकीर्दीचे गुणगान चालले आहे. या दोन्ही देशांचा प्रचार धूमधडाक्याने चालू आहे आणि या सगळ्या माऱ्याचा रोख पाश्चात्त्य देशांवर आहे.

साऱ्या जगाच्या वतीने इस्लामचा मक्ता सध्या पाकिस्तान सरकारने घेतला आहे. कधीकाळी इस्लाम एका विशाल नदीप्रमाणे असंख्य लहानमोठ्या नदीनाल्यांना आपल्या पात्रात सामावून घेऊन मोठ्या डौलात वाहात होता; तोच आता संकुचित होत होत एखाद्या गढूळ नाल्यात रूपांतरित केला जात आहे.

गंमत अशी की 'इस्लाम'चा उदो उदो करणाऱ्यांचा धर्माच्या तत्त्वज्ञानाशी काडीचाही संबंध नाही. त्यांना फक्त एवढेच माहीत आहे की मुसलमानांनी आठशे वर्षे ख्रिस्ती स्पेनवर राज्य केले, एक हजार वर्षे हिंदू भारतावर हुकमत गाजविली आणि चारशे वर्षे पूर्व युरोपवर अंमल गाजविला. याखेरीज इस्लामच्या मानवप्रेमाच्या ज्या महान परंपरा आहेत त्यांचे स्मरण कोणालाच नाही. अरब तत्त्वज्ञ, इराणी कवी व भारतीय सूफींची उदारता यांचा उल्लेख करण्याची गरज कोणालाच वाटत नाही. अली व हुसैन यांच्या तत्त्वज्ञानाची पर्वा कोणाला नाही. इस्लाम हा एक आक्रमक धर्म व जीवनदर्शन आहे, असेच जगासमोर मांडले जात आहे.

समाधान वाटण्यासारख्याही अनेक गोष्टी आहेत. देश झपाट्याने औद्योगिक प्रगती करीत आहे, अनेक मुली डॉक्टर, नर्स व प्राध्यापक होत आहेत, नोकऱ्या करीत

आहेत. पाकिस्तानी स्त्रियांनी खरोखरीच खूप प्रगती केली आहे. हे एक फार चांगले लक्षण आहे.

रात्र वाढत चालली आहे. माझ्या मनात उठणारे विचार मी लिहीत जातो आहे. त्यामुळे तुला हे पत्र काहीसे असंबद्ध वाटेल. परंतु तुला इतक्या गोष्टी सांगायच्या आहेत! तू माझ्या डोळ्यांनी माझ्या या नव्या देशाकडे पाहावेस अशी माझी इच्छा आहे. या देशासाठी मी माझ्या कुवतीप्रमाणे काहीतरी बरेवाईट कार्य करावे, यासाठी तू मला प्रोत्साहन दे.

हे पाहा बिटिया, थोडक्यात सांगायचे म्हणजे भारतातील मध्यमवर्गीय मुसलमानांचा धीर खचला आहे. सांस्कृतिक व आर्थिक सुरक्षितता लाभेल या आशेने भारतीय मुसलमान येथे येत आहे.

भारतीय विद्यापीठांतून बाहेर पडणारे मुसल्मान तरुण म्हणतात, "आमच्या देशनिष्ठेविषयी संशय बाळगला जातो आणि म्हणून आम्ही सैन्यात जात नाही." सगळ्या कुटुंबांची फाळणी झाली आहे. एक भाऊ पाकिस्तानच्या सैन्यात आहे तर दुसरा पाकिस्तानी आरमारात. तिसरा आझाद काश्मीरच्या रेडियोत नोकरी करतो आहे. चौथा भाऊ अजून पाटण्याला बी. एससी. च्या वर्गात शिकतो आहे. भारतीय विमानदलात आपल्याला प्रवेश मिळू शकेल अशी कल्पनाही तो करू शकत नाही. म्हणून तो येथे येऊन जेट-पायलट बनतो. तो पाटण्यात राहिला असता तर कदाचित कारकूनही बनू शकला नसता. दुसरी गोष्ट अशी की आपण स्पर्धात्मक परीक्षांना बसलो तरी अधिक असणाऱ्या परिश्रमी हिंदू मुलांवर विजय मिळवू शकणार नाही आणि यदाकदाचित आपण विजयी झालो तरी जातीय दृष्टिकोणामुळे आपली निवड केली जाणार नाही, याची त्याला कल्पना असते.

एकोणिसाव्या शतकातील आर्थिक दुर्दशेमुळे हे आपसातील वैमनस्य निर्माण झाले. बहुसंख्य हिंदूंकडून आपल्याला मार खावा लागेल अशा प्रकारचा जो भयगंड मुसलमानांमध्ये निर्माण झाला होता त्याचा उल्लेख पंडित नेहरू आणि सरदार पणिक्कर या दोघांनीही केला आहे. हा प्रश्न म्हणजे इतिहासातील फार मोठा 'जर' आहे. मुसलमानांतील हा भयगंड दूर करता आला असता—ते कार्य काँग्रेस करू शकली असती—तर आज कशी परिस्थिती असती ही आता नुसती कल्पनेतीलच गोष्ट राहिली आहे.

भाषेचा प्रश्न हे आमचे एक फार मोठे दुर्दैव आहे. भारतीय मुसलमानांचा धीर खचण्याचे हेही एक कारण आहे. आज भारतात उर्दू ही फक्त मुसलमानांची भाषा आहे असे समजण्यात येते. वस्तुतः उर्दू ही हिंदू व मुसलमान या दोन्ही जमातींची सांस्कृतिक व व्यावहारिक भाषा होती.

असो. आता मी पुनः येथील परिस्थितीकडे वळतो. आज गुरुवार आहे. मी एका इंटलेक्चुअल मंडळींच्या बैठकीहून परत आलो आहे. त्या ठिकाणी गटागटांनी बसून पाश्चात्य साहित्य व जागतिक राजकारण यांचा कीस काढणाऱ्या तरुण मुलांमुलींकडे पाहून माझ्या मनात असा विचार आला की, यांच्या या बुद्धिमत्तापूर्ण व मजेदार गप्पा ऐकण्यास तू हवी होतीस.

आज संध्याकाळी त्या ठिकाणी एकीकडे कॅथॉलिक संप्रदायावर चर्चा चालू होती. तर दुसरीकडे पाश्चात्य देशांतील प्रतिक्रियावादी साहित्यिकांवर तोंडसुख घेतले जात होते. एका फ्रेंच गृहस्थाला अल्जीरियाच्या संबंधात लाखोली वाहिली जात होती आणि अमेरिकन मदतीच्या बाबतीत मेरी रिचर्डला लोक रळो की पळो करून सोडत होते.

मी दुसरीकडे वळलो. गालिचाच्या एका टोकाला एक टोळके एका फ्रेंच इंटलेक्चुअलशी वाद घालीत होते.

"फ्रान्सच्या सध्याच्या, रोज रंग बदलणाऱ्या परिस्थितीमुळं पाश्चात्य बुद्धिवाद्यांची स्थिती मोठी केविलवाणी झाली आहे. फ्रान्स हे युरोपीय संस्कृतीचं प्रतीक आहे. त्याच्या सध्याच्या स्थितीमुळं पाश्चात्य बुद्धिवादी पार गडबडले आहेत. खरोखरी, पश्चिमेचा आता अधःपात झाला आहे. तिच्याजवळ स्वतःचा बचाव करता येईल असा काही युक्तिवादच उरलेला नाही." तन्वीर जोरजोरात बोलत होता, "उद्या सार्त्रनं पुनः प्रायश्चित्त घेतलं तर मला आश्चर्य वाटायचं नाही. पाश्चात्य संस्कृतीच्या प्रतिनिधींच्या पायाखालची वाळू निसटून चाललीय...."

"इंग्रज बुद्धिजीवी अमेरिकेकडून पैसा खाताहेत..."

मी तेथून उठून अमेरिकन लोकांमध्ये जाऊन बसलो.

या गटात अमेरिकेचे एक प्रख्यात इतिहासकार बसले होते.

"अमेरिकेतील गृहयुद्धानंतर तो देश दोन भागांत विभागला गेला असता तर आम्हां लोकांची आजपर्यंत काय दुर्दशा झाली असती कोण जाणे!" अमेरिकन इतिहासकार म्हणाले, "फाळणीचं कारण आर्थिक होतं, हा आपला सिद्धांत तू मला सांगू नकोस." त्यांनी माझ्याकडे पाहून हात हलवीत म्हटले, "त्याच्याखेरीज दुसरी काय कारणं होती, ते मला जाणून घ्यायचंय."

"पूर्वेच्या पतनाचं खरं कारण काय ते मी जाणू इच्छिते." हमीदा म्हणाली, "मी टॉयनबीनाही हाच प्रश्न विचारला होता. परंतु त्यांना उत्तर सापडत नाही. अठराव्या शतकात हिंदुस्थानचं पतन का झालं?"

"हिंदुस्थानातील पाटबंधाऱ्यांची स्थिती अत्यंत शोचनीय होती." जेकब मॉरिसन या अमेरिकन बुद्धिवाद्याने उत्तर दिले, "ही समस्या निव्वळ ॲग्रोनॉमिकल आहे."

दीड वाजण्याच्या सुमारास आम्ही तिथून उठलो. घरी पोचलो तेव्हा थकून चूर झालो होतो.

तलअत, माझ्या लाडक्या बहिणी, आजची सर्वांत मोठी घटना म्हणजे मला—लखनौचा क्रांतिकारक, काँग्रेसचा उत्साही कार्यकर्ता, संयुक्त (अखंड) भारताच्या श्रेष्ठत्वाचे गुणगान करणारा, अशा मला—आज सकाळी दरमहा बाराशे रुपये पगारावर एका मोठ्या हुद्द्यावर नेमण्यात आले. एक संपूर्ण लॅबोरेटरी मला उभारावयाची आहे. तिच्यासाठी सामान विकत घेण्याकरिता मला बहुधा लौकरच अमेरिकेला पाठविण्यात येईल. याच कामाच्या संदर्भात मी पुढील आठवड्यात पूर्व पाकिस्तानला जाणार आहे. यानंतरचे पत्र मी तुला ढाक्याहून लिहीन.

आता पहाट होऊ लागली आहे. सबंध रात्र मी तुला पत्र लिहिण्यात घालविली. नुकतेच मी खिडक्यांवरील पडदे बाजूला सारून बाहेर डोकावून पाहिले. कराची जागी झाली आहे. कराची आपल्या कामावर चालली आहे. शेकडो-हजारो माणसे कारखान्यांच्या आणि कचेऱ्यांच्या दिशेने चालली आहेत. ज्यांना सामान्यतः 'जनता' असे म्हटले जाते, तेच हे लोक आहेत. तलअत, या लोकांनी तर काही गुन्हा केलेला नाही. यांना शिक्षण देण्यात आले नाही, यांना उपाशी ठेवण्यात आले. मुकी बिचारी कुणी हाका अशी ही मेंढरे आहेत. या सर्वांना शांततेने जगण्याचा, पोटभर भाकरी खाण्याचा आणि निवांतपणे झोपण्याचा अधिकार आहे. तलअत, भल्या सकाळी जेव्हा हजारो मजुरांचा लोंढा पी. आय. डी. सी. च्या नवीन डॉकयार्डसकडे वाहू लागतो तेव्हा, खुदाची कसम, ते दृश्य पाहाण्यासारखे असते. मला पाकिस्तानच्या भवितव्याबद्दल आशा वाटू लागते.

ही अत्यंत निरागस माणसे आहेत. काल रात्री त्या बैठकीत चाललेल्या वादविवादांशी, इतिहासाच्या व्याख्यांशी, निरर्थक काथ्याकूट करणाऱ्यांशी त्यांना काही कर्तव्य नाही. वस्तुस्थिती अशी आहे की सिंध इंडस्ट्रियल इस्टेटच्या आवारात कारखाने निघाले आहेत आणि त्यांची यंत्रे हे लोक चालवीत आहेत; आणि ज्या देशात ते राहात आहेत त्याचे नाव पाकिस्तान आहे. आता होऊन गेलेल्या गोष्टींबद्दल रडत बसणे आणि भूतकाळातील चुकांबद्दल पस्तावणे चूक आहे. कारण भविष्यकाळ अजून बाकी आहे. दोन्ही देश पुनः एक होतील असे समजणे मूर्खपणाचे आहे. प्रत्येक महायुद्धानंतर जगाचा नकाशा बदलत असतो. १९४५ नंतरही बदलला. देशाच्या फाळणीसंबंधी जेव्हा मी विचार करतो तेव्हा माझ्या अंतःकरणाला घरे पडतात. पण हे दुःख कुठवर करीत राहायचे? आयुष्य निम्मेशिम्मे सपले. थोडेबहुत उरले आहे. या उरलेल्या आयुष्याचा सदुपयोग करण्याची अजूनही संधी गेलेली नाही.

या देशाने मला संरक्षण दिले आहे, आधार दिला आहे. त्याचे बरेवाईट करणे आता माझ्या हातात आहे. ज्याने जन्मभर विध्वंसाऐवजी निर्मितीची स्वप्ने पाहिली आहेत तो मी या ठिकाणी स्वतःला हरवून बसेन, असे तुला वाटते काय? नाही, तलअत, मी तसे होऊ देणार नाही.

मी निर्मिती करीन.

ता. क.

निर्मितीवरून मला आठवले. भैयासाहेबांच्या ज्या बंगल्यात मी सध्या राहात आहे तो मोठा छान आहे. एका इटालियन आर्किटेक्टने तो बांधला आहे. भैयासाहेबांच्या पत्नींची कराचीतील प्रख्यात सोसायटी लेडीजमध्ये गणना होते. या वहिनीसाहेब या ठिकाणी माझे बस्तान नीट बसावे म्हणून खूप धडपड करीत आहेत. नुकतीच त्यांनी माझ्यासाठी एक हजार चौरस यार्ड जमीन मिळविली आहे. काल जेव्हा त्याचा इटालियन आर्किटेक्ट घराचा आराखडा घेऊन माझ्याकडे आला तेव्हा मला रडू कोसळले.

तुझा

कम्मन

# ५६

मध्ययुगातील भारत!

त्याच्या भिंतींवर गवत वाढले आहे. जुनी दिल्ली, बंगाल, माळवा, अहमदाबाद, जौनपूर, बहामनी बादशाहांच्या इमारती, बेदर, गुलबर्गा, दख्खन!

उत्तर प्रदेशातील ललितपूर व काल्पी, शिकोहाबाद, बदायून व जौनपूर—मुगलांच्या आधीचा हिंदुस्थान.

ओडीसा, मद्रास, कर्नाटक, अजिंठा, वेरूळ—खिल इकडे-तिकडे भटकून पुनः मध्ययुगीन इमारतींकडेच जाऊन पोचे. असंख्य नावे, असंख्य कालखंडांचे, युगांचे, काळांचे आकृतिबंध. तो युरोपातील प्राचीन कॅथेड्रलांच्या महिरपींखाली भटकत होता तो आता जिप्सींप्रमाणे साऱ्या भारतात भटकंती करीत होता. या इमारतींच्या दगडांवर तो हात फिरवी. कमळाची फुले, हत्ती, गंधर्व, हौद, पायऱ्या, मनोरे, कोनाडे. एखाद्या काळोख्या, निर्जन कमानीखालून एखादी खेडूत मुलगी शेळ्या हाकत जाई. एखादा तरुण पिंपळाच्या

फांदीवरून खालच्या विहिरीत उडी मारी. एखादा आंधळा भिकारी रस्ता चाचपडत महालाच्या भग्नावशेषांखाली बसून चिलीम पेटवू लागे. वरच्या फुटक्या घुमटांवर झुकलेले निळे आकाश सूं सूं करीत राही. ढग पश्चिम घाटाकडून डुलत-डुलत वर चढत आणि चितोडवर पसरत. बंगालच्या उपसागरावरून येणारे मेघ राजशाही व गौड या प्रदेशांवर जलवृष्टी करीत. मध्ययुगातील उदास, मूक, वैराण हिंदुस्थान जलधारांनी न्हाऊन निघे. गवताची पाती वाऱ्यावर डोलत.

हे दगड भूतकाळातही होते आणि वर्तमानकाळातही होते. सिलच्या मेंदूवर त्यांचा वर्षाव इतक्या जोराने होऊ लागे की तो घाबरून वर्तमानकाळात आसरा घेई.

सबंध हिंदुस्थानात वणवण भटकल्यानंतर ('मी कुणाला शोधतो आहे?'—त्याने अनेकदा त्रासून स्वतःलाच प्रश्न विचारला.) तो पुन्हा कलकत्त्याला येई. तेथून विमानात बसून पूर्व पाकिस्तानच्या सुंदर भूमीवर उतरे आणि ढाका क्लबाच्या बारमध्ये अखंड बियर-पान केल्यानंतर पुनः सिल्हटला जाणाऱ्या आगगाडीने आपल्या मुक्कामाकडे रवाना होई.

अखेरचे मुक्कामाचे ठिकाण हे होते.

एका लहानशा स्टेशनावर एक आचका देऊन आगगाडी थांबली. नाना प्रकारचे आवाज झोपेत तरंगत त्याच्यापर्यंत येऊन पोचले : 'डीम बॉइल्ड !' (उकडलेली अंडी), 'बॉइल्ड डीम!', 'चा-गरम!' (चाय गरम), 'चा-गरम!', 'चा-गरम!', 'डीम बॉइल्ड!' त्याने खिडकीचे दार वर करून बाहेर डोकावून पाहिले. बाहेरच्या वातावरणात फुलांचा सुगंध दरवळला होता. सभोवतालच्या हिरव्यागार शेतांवरून तो तरंगत आला होता. एक जख्ख म्हातारा हिंदू बंगाली बोचकी घेऊन, कमरेत वाकून, भरभर पावले टाकीत चालला होता. सिल बराच वेळपर्यंत त्या म्हाताऱ्याकडे पाहात राहिला. अखेर तो स्टेशनवरील गर्दीत दिसेनासा झाला. बापरे! काय ही लोकसंख्या! कपाळावर लाल-भडक कुंकवाचे टिळे आणि भांगात शेंदूर असलेल्या बायका, मुली, चौकड्यांच्या लुंग्या नेसलेले मुसलमान, अँग्लोइंडियन गार्ड, पालखी उचलणारे भोई (येथे अजून पालखी चालू होती)...आगगाडी पुढे निघाली. बंगाली आवाज अंधारात बुडून गेले. आगगाडी पुनः तळ्यांच्या काठाकाठाने चालू लागली. तळ्यांतील कमळे उमलली होती. फुलांच्या वेलींनी आच्छादलेल्या एखाद्या झोपडीच्या दारात तपकिरी रंगाची साडी नेसलेली एखादी स्त्री उभी असलेली दिसे. काही बायका घुंघट घेऊन (डोकीवरील पदराने चेहरा झाकून) बांबूच्या वनातून चालल्या होत्या. त्यांची नावे काय असतात? आमना, सकीना, रेवा, राधा! त्यांच्या जीवनकथा काय असतील बरे? त्यांचे जीवनदर्शन... जन्मल्यापासून मरेपर्यंतची कहाणी...यातना, दारिद्र्य, दुष्काळ...दुष्काळ...दुष्काळ! त्याने डोळे मिटून घेतले.

"अल्ला, कापडे दे, पानी दे, भात दे रे! अल्ला, भात दे...!" त्याने ढाक्याच्या एका सभेत विद्यार्थ्यांकडून ऐकलेल्या समूहगीताचे शब्द त्याच्या कानात घुमू लागले "अल्ला भात दे! अल्ला भात दे!!" त्याच्या मनात विचार आला, हे इथले राष्ट्रगीत असले पाहिजे. बंगालविषयी त्याने आपल्या मनात नेहमीच किती रोमँटिक कल्पना बाळगल्या होत्या. सुजातादेवींनी त्याला टागोरांविषयी केवढी मोठी व्याख्याने सुनावली होती. जसमुद्दीन व लीला राय...लोकगीत गोळा करणाऱ्यांचे समूह, साहित्यिक परिषदा, कलकत्त्याची रंगभूमी व सांस्कृतिक हालचाली, बेल्वेडियरचे जुने गव्हर्नमेंट हाउस– जेथे कधीकाळी लॉर्ड कॉर्नवालिस विराजमान होता, अठराव्या व एकोणिसाव्या शतकाची पार्श्वभूमी असलेला क्लाइव्ह रोड – ज्याला आता नेताजी सुभाष बोस मार्ग असे नाव देण्यात आले होते, अलीपूर, धरमतल्ला, गार्डन रीच! गाडी आणखी एका स्टेशनावर थांबली.

त्याच्या डब्याचा दरवाजा उघडला आणि डायनिंगकारच्या वेटरचा पांढरा शुभ्र साफा आत आला.

"डिनर साऽब?"

"हाँ!"

त्याने पायांवरून ब्लँकेट पांघरून घेतले आणि तो पुनः आरामात लवंडला.

सिल्हटच्या चहाच्या मळ्यांत शेकडो पुरभैय्ये मजूर काम करीत होते. रामदेई, राम-औतार, लछमन, सीता, गेंदा, चंबेलिया! पुरभैय्यांमध्ये राम आणि सीता ही दोन नावे फार लोकप्रिय होती. भारताचा भूतकाळ, सुवर्णयुग...पाटलीपुत्र, इन्द्रप्रस्थ, अयोध्या, लक्ष्मणवती (लखनौ), श्रावस्ती,...दिग्विजयी श्रीरामचंद्र आणि मिथिलेची जनककुमारी सीता...अरे वाह रे इतिहासकारांनो!

"डिनर साऽब!...कॉफी आणू?" वेटरने ट्रे समोर ठेवला आणि हलक्या आवाजात त्याला अशा ढंगात विचारले, जणू तो देवच होता.

तो पुनः वर्तमानकाळात परत आला. त्याला णिठवले, अजून आपल्याला श्रीमंगलला पोचायचे आहे. रांगामाटी आणि बंदरबन. आपल्याला अजून पैसा कमवायचा आहे.

दुसऱ्या दिवशी गाडी सिल्हटला पोचली. स्टेशनवर त्याचा मॅनेजर पीटर जॅक्सन नेहमीप्रमाणे मोटार घेऊन त्याच्या स्वागतासाठी हजर होता. ते शहरातून बाहेर पडून श्रीमंगलकडे रवाना झाले.

सुर्मा नदीच्या काठी पोचल्यावर त्याने मोटार थांबविली. आता संध्याकाळचा अंधार पसरू लागला होता. कंदील घेऊन म्हातारे स्त्रीपुरुष नावेत चढत होते किंवा नावेतून उतरत होते. मोटारबोट धाडधाड करीत पलिकडच्या काठावरून परत आली होती. एक म्हातारा फकीर कुराणातील दोहा म्हणत भिक्षा मागत होता.

मोटारबोटीला फळ्या लावून त्याची गाडी नावेवर चढविण्यात आली. उतारूंनी नाव भरून गेली.

"अगदीच गलिच्छ गर्दी आहे. चला, आपण होडीतून जाऊ." पीटर म्हणाला. त्याने विरोध केला नाही. तो स्वतःच नौकेप्रमाणे पृष्ठभागावर तरंगत चालला होता.

ते दोघे उड्या मारून एका होडीत बसले. होडी मोटारबोटीच्या मागोमाग चालू लागली. किनारा दूर राहिला. तेथे रॉकेलचे दिवे मिणमिणत होते. तेथील झोपड्यांवर विड्याच्या पानांच्या वेली पसरल्या होत्या. एका हॉटेलसमोर लोक कंदिलासमोर वाकून वर्तमानपत्र वाचीत होते. नदीत नावा चालल्या होत्या. क्षितिजावर पोफळीची झाडे वाऱ्यावर डोलत होती. किती शांतता होती! अनंत शांती!

एकाएकी जोराचा वारा सुटला. होडी डचमळू लागली.

म्हातारा नावाडी आपली सारी शक्ती पणाला लावून होडी वल्हवीत होता. थोड्या वेळाने तो गाण्यात तल्लीन झाला.

त्याने पाहिले की, आपल्या म्हाताऱ्या नावाड्याची होडी लाटावर डुलत चालली आहे. समोर मिट्ट काळोख आहे, वातावरणात वादळे घोंगावत आहेत, अंधाऱ्या प्रवाहांमध्ये भयंकर मगरी-सुसरी आ वासून बसल्या आहेत. वारा खूप सोसाट्याचा सुटला आहे. परंतु या म्हाताऱ्या, उपासमारीने खंगलेल्या नावाड्याची होडी मजेत वादळाला तोंड देत आहे. कारण पंचमहाभूतांची निर्दयता, मृत्यू व धोका यांच्याशी त्याची फार जुनी दोस्ती आहे.

अखेर जेव्हा वाऱ्याचा जोर खूप वाढला आणि होडी पुनःपुनः झोकांड्या खाऊ लागली तेव्हा स्लिनने कंदील वर उचलून, घाबरून चोहोंकडे नजर फिरविली. "पीटर, आपण वादळात सापडलो की काय?" त्याने घाबरून विचारले.

"छेः रे! हा तर नेहमीचा वारा आहे. घाबरू नकोस." पीटरने उत्तर दिले, "परंतु त्या काळ्या डुकराला सांग की आपलं ते भिकार गाणं भसाड्या आवाजात गाण्याऐवजी सुकाणूकडे लक्ष दे म्हणून. नाहीतर या गतीनं आपण सकाळपर्यंतही पलीकडच्या घाटाला लागणार नाही."

"बिचारा म्हातारा!" स्लिनने चटईच्या छपरावरून पलीकडे डोकावून पाहात म्हटले. नावाड्याने मान वर करून त्याच्याकडे पाहिले आणि तो शांतपणे वल्ही चालवीत राहिला.

"हे लोक अत्यंत नीच, सुस्त आहेत. घाई कशी ती यांना माहीतच नाही." पीटर म्हणाला.

स्लिनने छपरावर वाकून मोठ्याने विचारले,

"ए म्हाताऱ्या, नाव काय तुझं?"

"अबुल मोन्शूर, साहेब."

"अबुल मोन्शूर," स्मिल्ने विचारले. "मी तुला मदत करू?"

"नको साहेब!" आणि तो पुनः आपल्या सुकाणूवर वाकला. आता होडी झपाट्याने दुसऱ्या काठाकडे चालली होती.

स्मिलने होडीत डोकावून पाहिले. आतल्या बाजूस मोन्शूरचा मातीचा दिवा, चटई, नमाज पढण्याची सतरंजी आणि दोन-तीन काशाची भांडी होती. भिंतीवर करवंटीचा हुक्का टांगून ठेवलेला होता. या जख्ख म्हाताऱ्या, शुभ्र दाढीच्या नावाड्याची हीच सारी मालमत्ता होती. नदीच्या वादळी लाटांवर ती हेलकावत होती. अचानक स्मिलला अगदी चमत्कारिक वाटले. त्याने डोळे चोळून स्वतःची खात्री करून घेतली की आपण सत्यसृष्टीतच वावरत आहोत. देवाच्या एका विचित्र लीलेने आपल्याला केंब्रिजच्या आवारातून बाहेर काढून या होडीत आणून सोडले आहे—या अद्भुत व मनोहर भूमीवर, जिला पूर्व बंगाल म्हणतात, पूर्व पाकिस्तान म्हणतात!

कंदील वर उचलून त्याने पुनः सभोवार नजर फिरविली. दिव्याच्या प्रकाशामुळे लाटांवर एक रस्ता तयार झाला. जवळून झर्रकन एक गलबत निघून गेले. वेताच्या बनामागून चंद्र हळू हळू आळसावल्यासारखा वर येत होता.

## ५७

भूतकाळातील वर्षे बियरच्या पेल्यांत बुडबुड्यांसारखी तरंगत राहिली. आणखी अर्धा तास निघून गेला. स्मिल निमूटपणे निळ्या डोंगरांकडे पाहात राहिला. त्या डोंगरांच्या पलीकडे ब्रह्मदेश होता.

"काय रे कसला विचार करतो आहेस?" कमालने उदासपणे विचारले.

"काही नाही! मी विचार करीत होतो की इथून ब्रह्मदेशाला पायी चालत गेलो तर...किती दूर असेल?"

"बस्स, हाच विचार करीत होतास?"

एक बेवारशी, उपाशी कुत्रा खालून उडी मारून व्हरांड्यात आला.

"हा पाहा, हाही ब्रह्मदेशाहून आलाय."

"की ब्रह्मदेशाला जाऊ इच्छितोय?" कमाल कुत्सितपणे म्हणाला.

कुत्रा शेपूट हलवीत राहिला.

"हॅलो...हॅलो...घे, हे बिस्किट खा!" स्मिल्ने कुत्र्याचे स्वागत केले.

"अरे, हा तर लाल चीनहून पळून आलाय!" कमालने त्याच्याकडे निरखून पाहात गंभीरपणे म्हटले, "अँटीकम्युनिस्ट कुत्रा आहे. स्वातंत्र्याच्या शोधात इथपर्यंत येऊन पोचलाय."

स्मिलने गाल फुगवून कमालाकडे पाहात म्हटले, "यार, तू तर अजून कॉलेजातल्या दिवसांसारखं बोलतो आहेस."

"'अजून...' या शब्दाचा अर्थ काय?" टेबलावर चहाचे साहित्य ठेवलेले होते. कमालाने एक सँडविच कुत्र्यासमोर फेकले आणि तो म्हणाला, "नाही, स्मिल! आता मी 'इस्लामी' राज्याचा निष्ठावान सेवक बनलोय. हा पाहा माझा पासपोर्ट!" त्याने खिशातून हिरव्या रंगाचा नवा कोरा पासपोर्ट काढून त्याला दाखविला.

"मी तर तुला यापेक्षा चांगली नोकरी रॅले ब्रदर्समध्ये मिळवून दिली असती." स्मिल म्हणाला, "करनाफुली मिलच्या प्लॅनिंगसाठी तू आला आहेस वाटतं? इथं येणारे बहुतेक लोक याच कामासाठी येत असतात."

"मी झक मारायला आलोय. तुला त्याच्याशी काय करायचंय? तू बंगाली मजुरांचं रक्तशोषण करायला इथं आलेला नाहीस? हे म्हणजे बाजारबसवीनं छिनाल बाईला पातिव्रत्याचा उपदेश करण्यासारखं आहे...होय, मी आहे इरसाल पळपुटा...अट्टल रीॲक्शनरी..." कमाल म्हणाला.

"आता याला पुन: 'कॉन्शन्स'(सदसद्विवेका)चा झटका येणार...!" स्मिलने अत्यंत दु:खाने तोंड फिरविले.

स्मिल हॉवर्ड ॲश्ले नद्या, डोंगर व दाट अरण्ये ओलांडून काल सकाळीच येथे पोचला होता. तो श्रीमंगलहून व्यवसायाच्या निमित्ताने चाटगावला आला होता. चाटगावहून त्याचा चहा निर्यात केला जात असे.

येथे पुन: मन अस्वस्थ झाले आणि पीटरवर कामाच्या देखरेखीची जबाबदारी सोपवून तो डोंगरदऱ्यातून भटकू लागला. दोहजारी, बंदरबन व चंद्रगोना यांच्या जंगलांतून तो वणवण फिरला आणि रांगामाटीच्या टपालकचेरीत जाऊन त्याने आपल्या भावाला आज्ञाधारकपणे आपल्या खुशालीचे पत्रही लिहून टाकले. पत्रामध्ये सिल्हट व चाटगाव येथील सृष्टिसौंदर्याचे वर्णन करून त्याने लिहिले होते, "पुढचा नाताळ तुम्ही माझ्या-बरोबर सिल्हटमध्ये साजरा कराल अशी आशा मी बाळगतो."

स्मिलने रोजमेरीला घटस्फोट दिला (याचे कारण कोणालाच माहीत नव्हते) हे समजताच त्याचे थोरले बंधू लॉर्ड बार्नफील्ड यांच्या मनावरील एक फार मोठे ओझे उतरले. त्यांना असे वाटू लागले की आपला धाकटा भाऊ आता कल्पनाविश्वातून

बाहेर पडून आपल्या नेहमीच्या जगात वावरू लागेल. लॉर्डसाहेबांनी एव्हाना पूर्व पाकिस्तानात फार मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतविले होते. तेथे त्यांचे चहाचे मळेही होते. यावेळी सिरिल केंब्रिजमधून बाहेर पडून उपजीविकेचे साधन शोधण्यासाठी लंडनमध्ये वणवण भटकत होता. त्याला त्यांनी एके दिवशी आपल्या क्लबमध्ये बोलावून घेतले आणि काहीही प्रास्ताविक न करिता त्याला सांगितले, "मी तुला पाकिस्तानला पाठविणार आहे."

"फार छान!" सिरिलने त्याच थाटात उत्तर दिले. आता जीवनात आणखी मांडत बसायची सोय नव्हती.

आणि गेल्या सहा महिन्यांपासून तो पाकिस्तानात होता. लंडन सोडावे लागल्याबद्दल त्याला फारसे दुःख झाले नाही. गौतम नीलांबर, हरिशंकर, कमाल, मायकेल, सुरेखा ही सगळी यापूर्वीच इंग्लंडमधून निघून गेली होती.

आता तो श्रीमंगलमध्ये एका अत्यंत सुंदर बंगल्यात राहात होता; आणि कामातून सवड मिळताच बाहेर चक्कर मारून येत होता—कलकत्ता, ढाका, जुन्या इमारती, भग्नावशेष, त्याला नानाप्रकारच्या कथा ऐकवीत.

काल संध्याकाळी एका पॅगोड्याच्या बागेत तासभर निवांतपणे बसून तो सर्किट हाउसवर परतला तेव्हा एका तरुणाची पाठ त्याला दिसली. तो तरुण मागील व्हरांड्यात कठड्यावर वाकून करनाफुली नदीकडे टक लावून पाहात होता.

त्याची चाहूल कानी पडताच त्या तरुणाने मागे वळून त्याच्याकडे पाहिले.

तो तरुण कमाल रजा होता.

कमालाने त्याला आपली हकीगत सांगितली आणि आपण एक प्रयोगशाळा स्थापन करण्यासाठी कराचीहून इकडे आलो असून सबंध प्रांताचा दौरा करीत हिंडत असल्याची माहिती दिली.

आता ते सकाळपासून व्हरांड्यात बसले होते आणि जीवनातील दुःख त्यांचे तुकडे-तुकडे करीत होते.

संध्याकाळचा अंधार पसरला. नोकरांनी सर्किट हाउसमधील दिवे लावले.

काही दिवसांपूर्वी या भागातील खेदा (हत्ती पकडण्याचा कार्यक्रम) संपला होता. शेजारच्या खोलीत हत्तींचा ठेकेदार असलेला एक अँग्लोइंडियन उतरला होता. तो दारू प्याल्यानंतर मोठ्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी बोलू लागे.

रात्री पश्चिम पाकिस्तानातील तरुण सिव्हिलियन अधिकाऱ्यांचे एक टोळके आरडा-ओरडा करीत तेथे आले. कमालाचे त्यांच्याशी नमस्कार-चमत्कार झाले. जेवणाच्या टेबलावर बसून ते पूर्वबंगालच्या प्रश्नासंबंधी चर्चा करू लागले.

"इथं सगळा पैसा कलकत्याच्या कम्युनिस्ट पार्टीकडून येतोय." त्या लोकांनी सांगितले.

"बंगालची समस्याच फार नाजूक आहे." त्यांच्यापैकीच कोणीतरी मत व्यक्त केले.

कमाल गप्प बसून त्यांच्याकडे पाहात राहिला.

जेवण झाल्यानंतर ते सर्वजण आपापल्या खोल्यांत निघून गेले. त्रिल आणि कमाल पुन: मागील व्हरांड्यात जाऊन बसले. व्हरांड्यावर नारिंगी फुलांची एक वेल पसरली होती. चोहोंकडे सामसूम होती. नदीच्या वळणाजवळ टेकडीवर पॉवर हाउस होते. रात्रीच्या नि:स्तब्धतेत त्याचा धडधडाट स्पष्ट ऐकू येत होता. त्याच्याजवळ बांबूचे सिनेमा थिएटर होते. त्यातून 'बैजू बावरा'ची गाणी ऐकू येत होती. लताचा आवाज नदीच्या पृष्ठभागावरून तरंगत सर्किट हाउसपर्यंत येत होता. कमाल कठड्यावर डोके टेकून तो आवाज ऐकत होता. तो मनाशी म्हणाला, "लताचा आवाज म्हणजे एक मक्कम पूल आहे. त्यानं दोन शत्रुदेशांना एकमेकांशी जोडलं आहे."

"तू लताचं गाणं ऐकलं आहेस?" त्याने मोठ्या आवाजात त्रिलला विचारले.

"ती कोण आहे?" त्रिलने दचकून विचारले.

कमाल वैतागाच्या समुद्रात गटंगळ्या खाऊ लागला. खानसामा कॉफीचा ट्रे घेऊन समोर येऊन उभा राहिला.

या खानसाम्याशी कमालची बरीच दोस्ती झाली होती. कित्येकदा ते दोघे अनेक विषयांवर विचारविनिमय करीत असत.

"काय खानसामाजी, काय हालहवाल आहे?" कमालने विचारले.

"मेहेरबानी है हुजूर! आपल्यासारखी मंडळी आली म्हणजे इथं चैतन्य संचारतं. नाहीतर या जंगलात काय आहे?" खानसामा खाली वाकून कॉफी तयार करू लागला.

गव्हर्नर जनरल इस्कंदर मिर्झा आणि त्यांचा लवाजमा खेदा झाल्यानंतर बंदरवनातून परत येऊन कराचीला रवाना झाला होता. त्यांच्यासाठी बांबूचे हे सर्किट हाउस खास सजविण्यात आले होते. गव्हर्नर जनरलचा रुबाब आणि भपका पाहून खानसाम्याला बंगालचे गव्हर्नर सर फ्रेडरिक यांचा काळ आठवला होता. ते शिकारीला आले म्हणजेही असेच 'जंगल में मंगल' होऊन जाई; आणि खूप इनाम मिळे.

"गेल्या काही दिवसांत इथं खूप धामधूम असेल नाही?" कमालाने विचारले.

"जी हुजूर! तुम्ही त्या दिवसांत यायला पाहिजे होतं. किती लांबलांबचे साहेब आले होते. आता बडे लाटसाहेब इंग्रजांऐवजी मुसलमान आहेत, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. परंतु त्यांच्या रुबाबात काही उणीव आलेली नाही. आणि म्हणूनच काही लोकांचा जळफळाट होतोय."

"कोण जळफळतात?" कमालाने विचारले.

"अहो साहेब," त्याने चोहोकडे सावधपणे नजर फिरवून हलकेच सांगितले, "इथं खूप उपद्रवी लोक आहेत."

"इथं कुठं?" त्याच्या त्या रहस्यपूर्ण स्वरावरून कमालाची अशी समजूत झाली की जवळपासच्या जंगलातून मोठमोठ्या धाडसी कम्युनिस्टांचे अड्डे असावेत. त्यांच्या गनिमी तुकड्या एवढ्यात काळोखातून येऊन सर्किट हाउसवर हल्ला करणार आणि तो बिचारा आपले कर्तव्यपालन करीत असता हुतात्मा होणार, असे त्याला वाटले.

सिरिल कपडे बदलण्यासाठी आपल्या खोलीत गेला. खानसाम्याने कॉफीचे साहित्य उचलून नेले. पुनः सामसूम पसरली.

थोड्या वेळाने एक अमेरिकन गृहस्थ ड्रॉइंगरूममधून बाहेर पडून लांब टांगा टाकीत निःसंकोचपणे येऊन कमालाजवळ बसला.

"हाउ डी...!" तो हसून म्हणाला.

"अर्रर्र! हाउ डू यू डू?" कमालाने हस्तांदोलन केले.

"माझं नाव जॉन टायटस फ्रेजर ज्यूनिअर, मला जॉनी म्हण."

"हॅलो जॉनी! इथं कसं काय येणं झालं?" कमालाने विचारले. परंतु त्याचबरोबर हा एक अत्यंत निरर्थक प्रश्न असल्याचेही त्याच्या लक्षात आले.

"मी चकमा जमातीसंबंधी एक डॉक्युमेंटरी फिल्म तयार करतोय."

"ओ...हाउ एक्सायटिंग!" कमाल पाय लांब करून आरामखुर्चीत पसरला.

"सिगरेट?"

"थँक्स!"

दुसऱ्या क्षणी जॉनीही वातावरणातील त्या जादूने भारला गेला. तो कठड्यावर कोपर टेकवून नदीकडे पाहात राहिला. नदीतून नावा ये-जा करीत होत्या. मधूनच एखाद्या नावाड्याच्या गाण्याचे सूर कानी येत. समोरच्या खोऱ्यात एव्हाना गडद काळोख पसरला होता.

थोड्या वेळानंतर जॉनीने कमालाशी सलगीने व निरागसपणे गप्पा मारण्यास सुरुवात केली. कमाल हां हूं करीत राहिला. सिरिलने ड्रेसिंग गाउन घातल्यानंतर आपल्या खोलीच्या खिडकीतून कमालाकडे पाहिले; आणि तो अमेरिकन गृहस्थाशी बोलत असल्याचे पाहून तो निमूटपणे बाथरूमच्या बाजूने बाहेर पडून जवळच्या व्हरांड्याच्या पायऱ्यांवर जाऊन बसला. त्याच्या समोरही नदी वळणे घेत वाहात होती. सर्वत्र काळोख पसरला होता.

इतक्यात आणखी दोन अमेरिकन दिवाणखान्यातून बाहेर पडून व्हरांड्यात आले.

ते ढाक्याच्या यूसिसचे अधिकारी होते. आणि या जॉनबरोबरच रांगामाटीला आले होते. 'लोकेशन' शोधण्यासाठी ते सबंध दिवसभर चकमा लोकांच्या खेड्यातून भटकले होते.

"रेड चायना इथून किती जवळ आहे, तुला माहीत आहे? हे डोंगर ओलांडले की थोड्याच अंतरावर लाल चीनची हद्द सुरू होते." जॉनीने आणखी एक रहस्योद्‌घाटन केले.

सर्किट हाउसच्या नोकराने येऊन स्नानासाठी पाणी काढले असल्याची वर्दी दिली त्याबरोबर ते सगळे गप्पागोष्टी करीत तेथून आत निघून गेले.

स्मिथने पुनः खिडकीतून डोकावून पाहात विचारले,

"गेले तुझे दोस्त?"

"होय. ये. आता मैदान साफ आहे." कमाल उत्तरला.

स्मिथ बाहेर येऊन आपल्या आरामखुर्चीवर पसरला. ते दोघे पुनः आपापल्या विचारात गढून गेले.

* * *

कमाल आणि स्मिथ त्या ठिकाणी पाचसहा दिवस राहिले.

सर्किट हाउसच्या खालच्या बाजूला करनाफुली नदीच्या प्रवाहातून लाकडाचे मोठमोठे ओंडके चंद्रगोनाकडे वाहात नेले जात होते. जवळच डेप्युटी कमिशनराचा बंगला होता. नागमोडी रस्त्यांनी मंगोलियन चेहऱ्यांचे पहाडी लोक पाठीवर ओझी घेऊन जात असलेले दिसत. सरकारी जीप गाड्या भर्रकन निघून जात. सकाळ-संध्याकाळ देवळांतून घंटानाद ऐकू येई. खोऱ्यातून येणाऱ्या वस्तूंची विक्री बाजारात होई. लांब-लांब पाइप (चिलमी) ओढणाऱ्या हसतमुख पहाडी बाया दुकाने मांडून बसत. हिंदू, मुसल्मान, बौद्ध सर्वजण शांततेने व समाधानाने आपापल्या कामात गढून गेलेले होते. ते अननसांच्या बागांमध्ये कापणी करीत होते. भातशेती करीत होते. दाट, भीषण अरण्यांतून बांबू कापून खाली आणीत होते. एखाद्या अत्यंत निर्जन, डोंगरी पायवाटेवर कमालाला अनेकदा एक म्हातारा भेटे. कमरेला लुंगी गुंडाळून, डोकीवर बांबूंचा मोठा भारा घेऊन तो येत असलेला त्याला दिसे. हा भारा विकल्यावर याला चार-आठ आणे मिळतील. शतकानुशतके तो हेच करीत आला आहे. आजही त्याच्या परिस्थितीत मुळीच फरक पडलेला नव्हता. अरण्यामध्ये चकमा, माघ व मोंग या आदिवासी जमातींचे लोक आपल्या बांबूच्या झोपड्यातून जीवन घालवीत होते. या मनोहर व शांततापूर्ण भागाला जंगली लोकांचा प्रदेश असे म्हणत असत. पहाडी स्त्रिया रेघारेघांचे काळे परकर नेसून, डोकीवर घागरी घेऊन या जंगलातून जात-येत

असलेल्या दिसत. मधूनच बौद्ध भिक्षूंची भगवी वस्त्रे दृष्टीस पडत. बंदरबनात जाऊन कमाल व सिल मोघ राजाला भेटले आणि जेथे हत्तींचे कळप होते अशी दाट अरण्ये पाहून आले.

"यंदा आसामात महापूर आल्यामुळं असंख्य हत्ती आपली जंगलं सोडून इथं आले. बाकी एरव्ही देखील या अरण्यांच्या सीमा नक्की करणं मोठं अवघड आहे." एका अधिकाऱ्याने कमालाला सांगितले.

"म्हणजे असं म्हणा ना की ज्या पाकिस्तानी हत्तींचा खेदा झाला त्यात निर्वासित हत्तीही सामील होते?" कमालानं गंभीरपणे विचारले.

त्यांनी बंदरबनाच्या सर्व भागांतून सहल काढली.

त्या जंगलांमध्ये छान-छान जनावरे धावताना दिसत. चित्ते, त्रिबळे, सांबरे. ते एक वेगळेच निर्मळ, पवित्र जग होते.

एके दिवशी संध्याकाळी ते रांगामाटीहून करनाफुलीच्या पलीकडे असलेल्या राजबाडीला गेले. तेथे चकमा राजा राहात होता. त्या ठिकाणी देशी संस्थानांच्या शेवटच्या जीवित अवस्थेचे मोठे परिणामकारक दृश्य कमालाला पाहावयास मिळाले. बागेत एक लहानशी तोफ ठेवलेली होती. एक मंदिर होते. आंब्यांच्या झाडांवर सायंकाळच्या उदास वातावरणात कोकिळ कूजन करीत होते. समोरच्या सामान्य दर्जाच्या महालात मंद बल्ब मिणमिणत होते, कारण रांगामाटीचे विजलीघर फारच कमजोर होते.

दिवाणखान्यात राजाच्या पूर्वजांची मोठमोठी तैलचित्रे टांगलेली होती. "या पूर्वजांमध्ये बंगाल आणि आसामचे मुगल गव्हर्नरही दिसताहेत." सिलने ताबडतोब त्या प्रदेशाच्या इतिहासाचे आधार देऊन सांगितले. सर्किट हाउसच्या ड्रॉइंगरूममध्ये वाळवी लागलेले जे इतिहासाचे पुस्तक होते त्यात ही हकीगत होती. "याचा अर्थ असा की हा राजा धर्मानं हिंदू-बुद्धिस्ट आणि वंशानं ब्राह्मण-मुगल-मंगोल आहे. भारतीय इतिहासातील या भूलभुलैयांनी माझ्या नाकी नऊ आणलेत. तुमच्या इथं हा एवढा मोठा इतिहास का आहे?" त्याने कमालाला रागाने विचारले.

इंग्लंडात शिकून आलेला तरुण राजा आणि त्याची आई यांनी सिल व कमाल यांचे स्वागत केले.

दिवाणखान्यात पियानोवर एक सुप्रसिद्ध भारतीय नर्तकी व चित्रपट-अभिनेता यांचे छायाचित्र होते. ही नर्तकी राजमातेची बहीण होती. केशवचंद्र सेन आणि गेल्या शतकातील दुसरे प्रसिद्ध ब्राह्मसमाजी नेते बाबू जी. एन. दत्त यांची छायाचित्रे शेगडीच्या वरच्या बाजूला होती. राजमाता ही बाबू जी. एन. दत्त यांची पणती आणि डॉक्टर मनोरंजन दत्त यांची नात होती.

"मी बाबू जी. एन. दत्तांचं चरित्रही वाचलंय." सिल्ने हलक्या आवाजात सांगितले.

"तुम्ही पाकिस्तानातून आलात?" राजमातेने विचारले.

कमाल एक क्षणभर गडबडला. हेही पाकिस्तानच आहे की! दुसऱ्याच क्षणी भानावर येऊन तो वस्तुस्थितीचा विचार करू लागला. हे पाकिस्तान नाही काय? एखाद्या देशाची मूलभूत कल्पना म्हणजे काय? हे राजबाडी संस्थान आता कोणत्या देशात समाविष्ट आहे? केशवचंद्र सेन आणि बाबू जी. एन. दत्त यांचे स्थान आता कोठे आहे?

राजा चांगलाच देखणा होता. तो ऑक्सफोर्डच्या उच्चारांत सिल्ला म्हणाला, "सरकार करनाफुलीवर धरण बांधून सबंध प्रांतासाठी, येथील कारखान्यांसाठी जलविद्युत् केंद्र स्थापन करणार आहे. माझ्या जमातीच्या लोकांचा प्रदेशही धरणाखाली बुडणार आहे. सरकार त्यांना नुकसानभरपाई देऊन त्यांचं अन्यत्र पुनर्वसन करील. हा माझा राजवाडाही रांगामाटीसह पाण्याखाली जाणार आहे."

"परिवर्तनाखेरीज प्रगती नाही." कमाल सावकाश म्हणाला.

"खरं आहे!" राजा उद्गारला.

राजमाता कलकत्त्यासंबंधी बोलू लागली. तिचे पणजोबा प्रसिद्ध ब्राह्मसमाजी बाबू जी. एन. दत्त यांचा 'दत्त हाउस' हा वाडा कमालाचे पणजोबा मटियाबुरुजाचे नबाब अली रजा बहादुर यांनी गेल्या शतकात विकत घेतला होता. त्याचाही उल्लेख बोलण्यात आला.

कमाल आणि सिल यांनी थोड्या वेळानंतर त्यांचा निरोप घेतला. राजा आणि राजमाता त्यांना दरवाजापर्यंत पोचवावयास आली.

ते बाहेर आले. राजबाडीतील दिवे मिणमिणत राहिले. करनाफुलीवरील नौकांची वाहतूक कमी होऊ लागली होती. रात्र वाढत होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी ते रांगामाटीचा निरोप घेऊन खालच्या मैदानी प्रदेशात आले. चाटगावाहून ते आगगाडीने सीताकुंडाकडे रवाना झाले.

कमाल व सिल स्टेशनवर उतरले. संध्याकाळ होऊ लागली होती.

"आम्हांला सीतेच्या मंदिराकडे जायचं आहे." कमालाने एका गृहस्थाला सांगितले.

"आत्ता, यावेळी जाऊ नका. डोंगराची चढण खूप अवघड आणि उंच आहे. परत येताना रात्र होईल." स्टेशनमास्तराने पुढे होऊन सांगितले.

थोड्याच वेळात दहापंधरा माणसे चिचकत, दबकत त्यांच्या भोवती गोळा झाली. ते जणू एक मोठे कुटुंबच होते. स्टेशनवरील कर्मचारी, पोलिसकॉन्स्टेबल, चहाचा

स्टॉलवाला, गावकरी मंडळी, मंदिरातील साधू. त्यांच्या त्या अत्यंत शांततापूर्ण जगात हे दोन अनोळखी, विचित्र प्राणी कुठून आले होते !

लागलीच गावात बातमी पसरली. दोन यात्रेकरू आले आहेत. त्यांच्यापैकी एकजण गोरा साहेब आहे. (गोरा साहेबही यात्रेकरूच असणार. नाहीतर आपला जीव धोक्यात घालून इतक्या दूर सीताजीच्या पवित्र अग्नीच्या दर्शनासाठी यायला त्याचं काय डोकं फिरलंय ? )

एक पालखी येऊन प्लॅटफॉर्मवर उतरली. तिचे पडदे बाजूला सारून आपल्या डोकी-वरील पदरातून हळूच डोकावून एका तरुणीनेही त्या दोघांकडे आश्चर्याने पाहिले.

स्मिल पालखीकडे शून्य नजरेने पाहात राहिला.

"ही आमच्या बड्या मौलवीसाहेबांची मुलगी आहे. सासरी परत चाललीय." सांधा बदलणाऱ्याने माहिती दिली.

पोलीस पुढे झाला आणि म्हणाला, "चला, मी तुम्हांला गावापर्यंत पोचवितो." रस्त्याने चालता चालता त्यानेही राजकारणाची चर्चा सुरू केली. महागाई, मुस्लिम-लीगचे धोरण, कृत्रिम दुष्काळ, अवामी लीग, ए. के. फजलुल हक. या प्रांतातील लहान लहान मुलांनाही राजकारणात रस वाटतो. गावच्या बाजारपेठेत गेल्यावर एक मुलगा कमालाच्या मागून चालू लागला. तो पोलीस शिपायाला चाटगावच्या स्थानिक भाषेत काही सांगत होता.

"प्रफुल्ला म्हणतोय की तो तुम्हांला कुंडापर्यंत घेऊन जाईल." कॉन्स्टेबलने खुलासा केला.

"हॅलो प्रफुल्ला !" स्मिलने त्याच्याशी हस्तांदोलन केले.

"शाळेत जातोस ?"

"नाही. शेती करतो."

"इथं तू आरामात राहतोस ?"

"आरामात न राहायला काय झालं ?" प्रफुल्लाने आश्चर्याने विचारले.

बाजारपेठेतील कच्च्या रस्त्यावर नुकताच शिडकाव झाला होता. लहान-लहान दुकानांत लोक गोळा झाले होते. सर्वांची नजर या दोघांवर होती. गोऱ्या दैत्यासारखा स्मिल लहानशा बाजारपेठेत प्रवेश करीत होता. कमाल एका हॉटेलासमोर थांबला. बांबूच्या तट्टयांनी बनविलेल्या त्या स्वच्छ, निर्मळ हॉटेलात काही लोक अंगाभोवती उपरणी गुंडाळून, बाकावर बसून बंगाली वृत्तपत्रे वाचीत होते. कोपऱ्यात ग्रामोफोन वाजत होता. भिंतीवर कलकत्त्यात तयार झालेल्या बंगाली चित्रपटांच्या जाहिराती लावलेल्या होत्या.

लोक आपापल्या घरून केळी आणि फळे घेऊन पाहुण्यांच्या स्वागतासाठी आले.

"आपण यात्रेकरू आहात. खूप लांबून आला आहात. तुमची सेवा करणं हे आमचं कर्तव्य आहे." एक दाढीवाला मुसलमान म्हणाला.

कमाल आश्चर्यचकित होऊन ते सारे पाहातच राहिला. याच लोकांनी नोआखालीत आणि बिहारमध्ये एकमेकांचे प्राण घेतले होते काय?

प्रफुल्लाच्या मार्गदर्शनाखाली ते दोघे टेकडीच्या दिशेने चालू लागले. वाटेत टुमदार झोपड्या आणि हिरव्यागार बागा होत्या. जागजागी सरस्वतीपूजेची तयारी चालली होती. गवतावर आणि घरांसमोर सरस्वतीच्या सुंदर व नाजूक मूर्ती दिसत होत्या. कुंभारांनी त्या सुकण्यासाठी तेथे ठेवल्या होत्या. कमाल एका मूर्तीजवळ जाऊन जमिनीवर बसला. सिलही हिरवळीवर गुडघे टेकून बसला.

"तुमच्या गावातील कुंभार किती कुशल मूर्तिकार आहेत!" सिल मूर्तीकडे निरखून पाहात म्हणाला.

"होय!" कमाल अभिमानाने म्हणाला.

नंतर ते बांबूच्या बनातून निघून डोंगराकडे चालू लागले. समोर लाल दगडांनी बांधलेला तलाव होता. तलावाच्या सभोवती लाल देवळे होती आणि लाल दगडांच्या रुंद पायऱ्यांवर वडाच्या फांद्या लोंबलेल्या होत्या. सर्वत्र निःस्तब्धता पसरली होती.

तलावाला वळसा घालून ते आणखी एका कुंजात गेले. तेथे लहानलहान तळ्यांच्या काठी मुली बसल्या होत्या. झोपड्यांवर व घरांवर जांभळी व पिवळी फुले यांनी झाकून गेलेल्या वेली होत्या. झाडांवरून सुगंधी फुले खाली पडत होती.

"दोस्त, हा तर अगदी एखाद्या पुरोगामी बंगाली चित्रपटाचा सेट असावा असं वाटतंय." कमाल म्हणाला, "पूर्व बंगालमधील खेड्यांपेक्षा अधिक सुंदर दृश्यं दुसरीकडे कुठं पाहायला मिळणार?"

ते डोंगराच्या पायऱ्या चढू लागले. आता त्यांच्या दोन्ही बाजूंना अत्यंत दाट ट्रॉपिकल जंगले होती. त्यांतच मोठमोठ्या गुंफा, खंदक व शेकडो वर्षांपूर्वीचे जुने मठ लपलेले होते. तपकिरी रंगाची प्रचंड देवळे होती. त्यांतील कुलुपे घातलेल्या खोल्यांमध्ये महंतांच्या समाध्या होत्या. सर्वत्र निःस्तब्धता पसरली होती. हजारो नादुरुस्त पायऱ्या घोस्याच्या वळणांनी डोंगरमाथ्यापर्यंत गेल्या होत्या. वरती गंधकाच्या कुंडात आग पेटलेली होती.

"महाराणी सीतेला रावणानं लंकेहून आणून इथं सोडून दिलं होतं." प्रफुल्ला अत्यंत आत्मविश्वासाने व श्रद्धेने सांगत होता. ती जणू काल घडलेली घटना असावी, अशा थाटात, मॅटर ऑफ फॅक्ट वर्णन करीत असल्याप्रमाणे तो बोलत होता.

काही साधू उतारावरील देवळांच्या समुदायाकडे जात असलेले दिसले. वर जाऊन सिल एका झाडाला टेकून बसला.

अंधार दाटून आला. मोडकळीस आलेल्या पायऱ्यांच्या खालच्या बाजूस एक धबधबा वाहात होता. संध्याकाळच्या सखोल निःस्तब्धतेत पक्ष्यांची किलबिल, पानांची सळसळ, पाण्याचा खळखळाट आणि आगीच्या ज्वाळांचा आवाज हे सारे पुजाऱ्यांच्या मंत्रोच्चाराच्या सौम्य सुरांत मिसळून गेले होते.

एव्हाना सूर्यास्त झाला होता. त्याचे जे किरण आतापर्यंत डोंगरातील जंगलावर नाना प्रकारचे रंग विखुरत होते ते आता अंधारात गडप झाले होते. "चल, आता परत जाऊ. आपल्याला दहा वाजताची गाडी पकडायची आहे." कमालाने आठवण करून दिली.

ते डोंगरावरून खाली उतरू लागले.

गावच्या हॉटेलात लोक त्यांची वाट पाहात होते. ते आत जाऊन बाकावर बसले. त्यांच्या समोर चहा आणि दोन-दोन पैशाची बिस्किटे ठेवण्यात आली. यजमान मंडळी काहीशी लाजून, संकोचून, भिऊन पाहुण्यांपासून दोन हात दूर उभी होती.

नंतर ते बाहेर पडले. बरेचसे लोक त्यांना स्टेशनापर्यंत पोचवायला आले. प्रफुल्ला जुन्या मित्राप्रमाणे निमूटपणे त्यांच्याबरोबर चालत राहिला. गावच्या मुलांनी त्यांच्याकडून बक्षिशीची अपेक्षा बाळगली नाही. प्रफुल्लानेही त्यांच्याकडून इनाम घेण्याचे नाकारले. कमालाने त्याला बक्षिशी देऊ करून जणू त्याचे मन दुखावले होते, असे वाटत होते.

"मी भिकाऱ्यांच्या जगात वावरणारा भिकारी आहे. अशा स्थितीत एखाद्यानं भीक लाथाडली तर मला आश्चर्य वाटायला हवं, नाही?" कमाल म्हणाला.

"खरं आहे!" सिल उद्गारला.

ते स्टेशनवर पोचले. गाडी आली. ते चाटगावला परत गेले. त्या ठिकाणी झगमगणाऱ्या क्लबात पीटर जॅक्सन बाररूममध्ये त्यांची वाट पाहात होता.

"तुम्ही सीताकुंडाला जाऊन आलात?" पीटरने विचारले. तो भीतीने जणू पांढरा फटफटीत पडला. "कमालच आहे. तुम्हांला माहीत आहे? त्या डोंगरावर साप, चित्ते आणि भयंकर विषारी विंचू यांचा अगदी सुळसुळाट आहे. तिथं तर शहाणी माणसं दिवसासुद्धा बंदूक घेतल्याशिवाय जात नाहीत."

"पण तिथं इतकी माणसं राहतात ती?" कमालाने विचारले.

"अहो, त्यांतली कितीतरी माणसं नेहमी साप-विंचू चावल्यामुळं मरत असतात. अन् शिवाय त्या लोकांचं काय घेऊन बसलात? किती झालं तरी बंगली माणसं ती!"

दुसऱ्या दिवशी ते सिल्हटला रवाना झाले. बागबागी शी जुनी देवळे, मठ, मशिदी

व दर्गे होते त्यांच्याविषयी स्रिल एखाद्या तज्ज्ञ पुराणवस्तुसंशोधकाप्रमाणे कमालाला माहिती देत होता.

"तू हा पुराणवस्तुसंशोधक कधीपासून बनलास?" एके दिवशी बारीसालला जाताना कमालाने त्याला विचारले.

"मी या निर्णयावर येऊन पोचलो आहे," स्टीमरच्या कठड्यावर वाकून नदीच्या पाण्याकडे पाहात स्रिलने उत्तर दिले, "की माझ्याजवळ भूतकाळ ही एकच सहीसलामत राहिलेली गोष्ट आहे. त्याला इतर कोणी धक्का लावू शकत नाही. ती काळाच्या आवाक्याबाहेरची वस्तू आहे. मी स्वतःच एक भूतकाळ आहे. तुझ्याप्रमाणेच हिंद आणि पाकिस्तान यांचे हे जुने भग्नावशेषच माझे मित्र आहेत. मला त्यांची भाषा कळते. या माथेफिरू महाद्वीपात फक्त त्यांनाच माझं रहस्य माहीत आहे. इतिहासकारापेक्षा अगदी वेगळ्या पद्धतीनं ते आपली व्यथा मला एकांतात सांगतात. मी त्यांचा एकटाच श्रोता-प्रेक्षक आहे. हे फत्तर माझे मित्र आहेत आणि ते सदैव तसे राहातील. कमाल, मेहेरबानी करून असं समजू नकोस की मी म्हणजे आणखी एक पश्चिमयुरोपीय 'डिकेडंट इंटलेक्चुअल' (बुरसटलेला बुद्धिवादी) आहे. मला आता या लेबलांची पर्वा नाही. माणसं रोम आणि बायझंटियममध्ये आधार का शोधताहेत याची कल्पना मला आता आली आहे. मी जगाशी हे जे नवं नातं जोडल आहे ते आपल्या कडवट भावनांनी तोडण्याचा प्रयत्न करू नकोस."

एके दिवशी ते सिल्हटजवळच्या निसर्गरम्य, नागमोडी, डोंगरी रस्त्याने सरहद्दीपर्यंत गेले. समोर एक भले मोठे लाकडी फाटक होते. त्याच्या अलीकडच्या बाजूस पाकिस्तानी शिपाई दक्षपणे उभा होता. फाटकाच्या पलीकडे काही आसामी आळसात पान चघळत होते. थोड्याच अंतरावर आसामचे डोंगर होते. कमाल लाकडाच्या वाशावर कोपर टेकून बराच वेळपर्यंत मूकपणे उभा राहिला. इतक्या अकस्मातपणे भारताचे ओझरते दर्शन घेण्यास बहुधा त्याचे मन तयार नसावे. परंतु त्याच्यापासून काही पावलांवर हिंदुस्थान त्याला स्पष्ट दिसत होता.

दुसऱ्या दिवशी ते सिल्हटहून श्रीमंगलला रवाना झाले. हा खूप लांबचा प्रवास होता. नद्या, दाट अरण्ये व मौलवी बाजाराचा सृष्टिसौंदर्याने नटलेला प्रदेश ओलांडून ते स्रिलच्या निवासस्थानी जाऊन पोचले. एका लहानशा टेकडीवर स्रिलचा बंगला होता. त्याचे दिवे दुरून दिसत होते. आता रात्र झाली होती.

कमालाला अचानक असा भास झाला की आपल्या दाट परिचयाच्या स्रिलचे बघता-बघता कोणत्या तरी गूढ पद्धतीने 'बड्या साहेबा'मध्ये रूपांतर झाले आहे. गाडी थांबवून स्रिल ताठ मानेने समोर पाहात पोर्चच्या पायऱ्या चढून वर गेला. त्याच्या

नोकरांचा तांडा त्याच्या स्वागतासाठी पुढे धावला. व्हरांड्याच्या खाली उभ्या असलेल्या मजुरांनी कमरेत वाकून त्याला कुर्निसात केला. त्याने हुकूम सोडला. "अब्दुर्रहमान, आंघोळीचं पाणी काढ." आणि तो कमालाला घेऊन गेस्टरूमकडे गेला.

"ही तुझी खोली." तो म्हणाला.

हा बंगला वाघांची कातडी, चित्रे व सांबरे यांची मुंडकी आणि सागवानाचे मौल्यवान फर्निचर यांनी सजविलेला होता. कमालाला वाटले, आपण १९२८ सालच्या हिंदुस्थानात जाऊन पोचलो आहोत. त्याला 'गुलफिशाँ' आणि देहरादूनचा आपला दुसरा बंगला 'खयाबाँ' यांची अत्यंत तीव्रतेने आठवण आली. सिरिलने ड्रायव्हरला हाक मारली तेव्हा कमालाला असा भास झाला की आता मियाँ कदीर लगबगीने समोर येऊन उभा राहाणार.

बंगाली मुंशीबाबू मजुरांच्या हिशोबाच्या वह्या काखोटीला मारून व्हरांड्यात येरझाऱ्या घालीत होते. ट्रेड युनियनचा एक कार्यकर्ता सिरिलची वाट पाहात केव्हापासून पोर्चच्या पायऱ्यांवर बसला होता. युरेशियन कारकून राल्फ जोसेफ कागदपत्रे घेऊन व्हरांड्यात उभा होता. एकटा सिरिल, पण त्याच्या वैयक्तिक दिमतीला केवढा मोठा नोकरवर्ग हजर होता—माळी, गवत कापणारा, भिस्ती, चौकीदार. नदीवर त्याची स्वतःची मोटारलाँच होती. श्रीमंगलपासून दूरवर पसरलेल्या या राज्याचा सिरिल हा आपले थोरले बंधू लॉर्ड बार्नफील्ड यांच्या भागीदारीत मालक होता. त्याने मनात आणले असते तर त्या सर्वांना उलटे टांगून तो फटके मारू शकला असता. काही दिवसांपूर्वी जो केंब्रिजमध्ये बॉदलेयर व इलियटची पुस्तके घेऊन फिरत होता आणि 'कोहेनूर'मध्ये मायकेलबरोबर बसून बटाटे खात होता, तोच हा सिरिल.

सकाळी सात वाजता चौकीदाराने बंगल्याच्या दिवाणखान्याचा दरवाजा उघडला. झाळ्यांतून सूर्यप्रकाश आत येऊ लागला तसा सिरिल आपल्या मच्छरदाणीतून बाहेर आला. कमाल आपल्या खोलीतून बाहेर आला होता. ड्रेसिंग गाऊन घालून तो व्हरांड्यात उभा राहून सिगारेट ओढत होता. "यादे-सुबहे-वतन दे रही थी हवा। दागे-दिल फूल बन-बनके खिलने लगे। मेरी पल्कों पै बदरे-कमाल आ गया।" (मातृभूमीतील प्रभातकाळाची आठवण सकाळचा वारा करून देत होता. हृदयाच्या जखमा फुले बनून उमलू लागल्या. माझ्या पापण्यांवर पूर्णचंद्र उगवला.) तो स्वतःशी गुणगुणला आणि एक दीर्घ उसासा टाकून ड्रॉइंगरूममध्ये गेला. दिवाणखान्याच्या भिंती पूर्व पाकिस्तानच्या चित्रकारांच्या चित्रांनी सजविलेल्या होत्या. कपाटांमध्ये पुस्तके नीटसपणे लावून ठेवलेली होती. न्याहारीनंतर तो सिरिलबरोबर बाहेर पडला. सिरिलने गवताची टोपी (सोलाहॅट) घातली होती. ते दोघे गाडीत बसले. पीटर बॅक्सन व

राल्फ जोसेफ यांच्या नेतृत्वाने मुन्शी व कारकून यांचा तांडा जीपगाड्यांतून मागोमाग चालू लागला. स्रिलने कमालाला आपली फॅक्टरी दाखविली. तेथे चहाच्या पानांवर प्रक्रिया केली जात होती.

दुपारच्या जेवणासाठी ते क्लबात गेले. काही सहकारी मळेवाल्यांशी स्रिलने नारायण-गंजच्या शेअरमार्केटसंबंधी विचारविनिमय केला. 'स्टेट्समन', 'अमृतबाजार पत्रिका' आणि ढाक्याचा 'मॉर्निंग न्यूज' यांवरून त्याने नजर फिरविली. भोजनापूर्वीचे बियरपान अजून चालूच होते. इतक्यात कमाल कुठे तरी गडप झाला.

"मिस्टर रजा कुठं गेले?" स्रिलने व्हरांड्यात जाऊन पीटरला विचारले.

"काही कल्पना नाही. नुकतेच नूरुल इस्लाम चौधरीबरोबर ते मळ्याकडे जात असलेले मी पाहिले."

नूरुल इस्लाम चौधरी? स्रिल गप्प राहिला. नूरुल इस्लाम चौधरी मजुरांचा प्रतिनिधी होता. रात्री स्रिलला भेटायला आला होता. परंतु स्रिलने त्याची भेट घेण्याचे नाकारले होते आणि सकाळी कचेरीत यायला सांगितले होते.

स्रिल गाडीत बसून कमालाला शोधावयास निघाला. आपल्या चहाच्या मळ्यांत जाऊन तो निर्जन, सावलीदार रस्त्यांवरून फिरत राहिला. परंतु कमालाचा काही पत्ता नव्हता. अखेर वैतागून त्याने एके ठिकाणी गाडी थांबविली आणि अन्यमनस्कपणे तो मळ्यातून चालू लागला. हवा फारच सुरेख होती. झाडांवर पक्षी किलबिल करीत होते. फांद्यांतून डोकावणाऱ्या उन्हाच्या कवडशांनी चहाच्या झुडुपांवर चित्रविचित्र आकार बनविले होते. इतक्यात बांगड्या किणकिणल्या. त्याने मान वर करून समोर पाहिले. एक पूर्वी (उत्तरप्रदेशाच्या पूर्व भागातील) मुलगी मोठ्या सफाईदारपणे चहाची पाने खुडत होती. बडा साहेब समोर दिसताच तिने झटकन तोंडावर पदर ओढून घेतला. स्रिल हसला. विचारप्रवाहात वाहात असता तो क्षणभर काठावर आला आणि त्याने तिला विचारले, "तुझं नाव काय?"

"माझं नाव?...चंपा!"

"चंपा!" तो अशा ढंगात उद्गारला, जणू ते नाव तो आज प्रथम ऐकत होता. "चंपा...छान नाव आहे." असे म्हणून तो झपझप पावले टाकीत गाडीकडे परत फिरला.

ती मुलगी जरा आश्चर्याने त्याच्याकडे पाहात राहिली. तो थोड्याच वेळात झाडांच्या ऊन-सावलीत दिसेनासा झाला. ती मुलगी आणि तिचे पूर्वज नाना प्रकारच्या इंग्रजांना पाहात आले होते—विक्षिप्त, रागीट, वाह्यात, भयंकर दारुडे!

हा बडा साहेब विक्षिप्त होता.

क्लबात परत येऊन त्याने धाडकन एका आरामखुर्चीत अंग झोकून दिले. समोरच्या भिंतीवर एलिझाबेथ राणीचे चित्र टांगलेले होते. दुसऱ्या एका चित्रात वाघाच्या शिकारीचे दृश्य होते. एक मडुम पांढरी हॅट डोकीला घालून हौद्यात (अंबारीत) बसली होती. तिच्या शेजारी कुचबिहारचे महाराज बसलेले होते. त्या मडमेच्या जागी त्याला आपली आजी लेडी बार्नेफील्ड दिसू लागली. त्याची आजी पन्नास वर्षांपूर्वी नेहमी हिंदुस्तानात येऊन संस्थानिकांबरोबर वाघांची शिकार करीत असे. "गुड मॉर्निंग ग्रॅनी, आजची सकाळ कशी काय गेली?" तिला उद्देशून तो म्हणाला; आणि पुन: विचारात गढून गेला की, कमाल यावेळी कुठे असेल?

कमालाच्या स्वागतार्थ सिरिलने रात्री एक खास मेजवानी आयोजित केली होती. परंतु मग त्याच्या गैरहजेरीतच सिरिलने मळेवाल्या पाहुण्यांना मेजवानी दिली आणि तो त्यांच्याशी ब्रिज खेळत बसला.

खूप रात्र झाल्यानंतर कमाल सिरिलच्या बंगल्यावर परत गेला. सिरिल त्याची वाट पाहात दिवाणखान्यात एक पुस्तक वाचीत बसला होता.

"कुठं गेला होता महाराज आपण?"

"कुठं नाही बुवा. इकडे-तिकडे भटकत होतो."

"मजुरांच्या वस्तीत गेला होतास ना?"

"होय!"

"मला वाटलंच होतं."

"रागावलास?"

"छे: बुवा! या समाजव्यवस्थेत जितक्या प्रमाणात मी गुंतलो आहे तितक्याच प्रमाणात तूही सामील आहेस. तेव्हा रागावण्याचा प्रश्नच कुठं येतो?"

"इथं मजुरांना दिवसाला फक्त सव्वा रुपया मजुरी मिळते, नाही?"

"होय."

"एखादी ट्रेड युनियन नाही इथं?"

"नाही."

"कम्युनिस्ट एलिमेंट?"

"माहीत नाही."

"थापा मारू नकोस. तुला सगळं माहीत आहे."

"कमाल, जगाच्या जबाबदारीचं ओझं मी खूप दिवस वाहिलं. अखेर ते काढून फेकून दिलं. तूही ते ओझं फेकून दिलं आहेस. तेव्हा आता या हट्टीपणात काय अर्थ आहे? या मार्गानं आपण अपराधी नाही असं तू स्वतःच्या मनाचं समाधान करू

इच्छितोस काय ? तू फार मोठा गुन्हेगार आहेस, कमाल रजा, माझ्यापेक्षाही जास्त मोठा गुन्हेगार आहेस."

कमाल गप्प राहिला. क्रिल्ने उठून त्याच्यासाठी व्हिस्की आणि प्याला काढला.

"शिवाय मी तुझ्यासारख्याच एका अत्यंत मूर्ख माणसाला भेटलो. तेही तुझ्या-सारखेच चहा मळेवाले आहेत. श्री नीहाररंजन दासगुप्ता!" कमाल म्हणाला.

"दासगुप्ता ? तुला कुठं भेटला तो ? तू क्लबात परत गेला होतास ?"

"अंऽहं ! मी पायीच वाटेनं येत होतो. माझा सूटबूट पाहून त्यांनी मला लिफ्ट देण्यासाठी आपली गाडी थांबविली. तेच मला तुझ्या बंगल्यापर्यंत पोचवून गेले. तेही तुझ्यासारखेच खानदानी श्रीमंत असल्याचं समजलं."

क्रिलने दोन प्याल्यांत व्हिस्की ओतली. कमाल सांगत होता, "मी त्यांना विचारलं, 'तुम्ही पाकिस्तान सोडून जायचा विचार करीत नाही ?' त्यावर ते खळखळून हसले आणि म्हणाले, 'तुम्ही तर कमालच करता ! भारत सरकार प्रत्येक गोष्टीचं राष्ट्रीयीकरण करण्याच्या मागं हात धुवून लागलंय. कदाचित तिथं लौकरच खरंखुरं समाजवादी सरकार स्थापन होईल. अशा स्थितीत पाकिस्तान सोडून जायला मला काय वेड लागलंय ?' त्यांचा हा स्पष्टवक्तेपणा मोठा स्तुत्य होता."

क्रिल गप्प राहिला. थोड्या वेळाने तो म्हणाला, "मी तुला पुनः सल्ला देतो. बाबा रे, जगातल्या प्रत्येक गोष्टीत कडमडायची ही आपली सवय तू सोडून दे. नाहीतर मोठी आफत होईल तुझी."

कमाल व्हिस्कीच्या बुडबुड्यांकडे पाहात राहिला.

दुसऱ्या दिवशी सकाळी ते राजशाहीकडे रवाना झाले. वाटेत एका संथाळांच्या गावात ते गेले. संथाळांनी कमालला अधिकच उदास बनविले.

"या बिचाऱ्यांसंबंधी तर मी मनाशी किती रोमँटिक कल्पना बाळगल्या होत्या ! लोक-नृत्यं आणि जैनुल आबिदीनचं ते प्रख्यात जलरंगांतलं चित्र आणि अशाच इतर गोष्टी."

"परंतु प्रत्यक्षात मात्र हे लोक पराकोटीच्या दारिद्र्यामुळं कंदमुळं खाऊन जगतात, असंच की नाही ?" क्रिल्ने जीप चालविताना वळून म्हटले, "सुरुवातीला माझाही असाच हिरमोड होत असे."

संथाळांशीही त्या दोघांची चांगलीच दोस्ती जमली. ज्या दिवशी ते तिकडून परत येत होते त्या दिवशी एका गावातील सगळे संथाळ त्यांचा रस्ता अडवून उभे राहिले. एका काळ्यासावळ्या परंतु अत्यंत मोहक तरुणीने पुढे येऊन त्यांच्या गळ्यांत झेंडूच्या फुलांचे हार घातले व त्यांना वाकून नमस्कार केला. त्यांचा लंगडा पुढारी त्यांच्या स्वागतासाठी फाटून चिंध्या झालेला आपला एकुलता एक सदरा घालून आला होता.

त्याचा एक पाय तुटला होता आणि त्याच्या आधारासाठी त्याने एक काठी पायाला बांधली होती. त्यांना पोचविण्यासाठी तो गावाच्या वळणापर्यंत आला. एका तरुणाने तळ्यातून लाल कमळे आणून ती सिलला दिली.

रात्री ते राजशाहीच्या सर्किट हाउसमध्ये परत आले.

जवळून गंगा वाहात होती. दुसऱ्या काठावर मुर्शिदाबाद शहर होते. मुर्शिदाबाद !... सिराजउद्दौला ! कर्नल क्लाइव्ह ! कसल्या निरर्थक गोष्टी घेऊन बसलात राव ! ती पाहा, ऐका. सूंऽऽ करून एक गोळी उडाली. आणखी एक स्मगलर मारला गेला. ते दोघे दाट काळोखात गंगेच्या काठाने, निर्जन रस्त्यावरून फिरत होते. पुढच्या बाजूस जिल्ह्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचे बंगले होते. त्याच्यापुढे बाजारपेठ...लहानलहान चौक...गल्ल्या... अठराव्या व एकोणिसाव्या शतकांतील उदास घरे.

"घरं कसल्या-कसल्या कथा सांगतात." सिल पुनः म्हणाला.

छायादार वृक्षराजीत मोठमोठ्या हिंदू जमीनदारांच्या हवेल्या व बंगले होते. त्यांच्यापैकी बहुतेक निर्मनुष्य होते.

"इथं जमीनदारीचं उच्चाटण करण्यात आलंय म्हणे." कमाल म्हणाला.

ढाक्याला परत येताना पुनः आगगाडी नदीच्या घाटापर्यंत येऊन थांबली. प्रवासी गाडीतून उतरून स्टीमरमध्ये बसले. गाडीतील व्यापारी माल स्टीमरवर चढविण्यात आला. तेथे याऱ्या (क्रेन्स) नव्हत्या. शेकडो मजूर एकमेकांच्या सुरात सूर मिसळून सामान चढवू लागले. अशा प्रकारचे सूर आणि शब्द कमालाने इप्टावाल्यांबरोबर कोरसमध्ये स्वतः काढले होते.

काही दाढीवाले म्हातारे आणि बुरखाधारी बायका स्टीमरमधील तिसऱ्या वर्गाच्या जमिनीवर बसल्या. म्हातारे हिंदू व मुसल्मान अंगावर उपरणी घेऊन आणि त्यांच्या मुली व सुना लहान मुलांना कडेवर घेऊन गँगवेमधील दुसऱ्या वर्गात दाटीवाटीने बसल्या.

"इथं हे किती म्हातारे हिंदू दिसताहेत !" कमालाने अस्वस्थपणे विचारले, "हिंदू तरुण कुठं गेले ?"

"हिंदू तरुण नोकऱ्यांच्या शोधात कलकत्त्याला गेलेत." सिलने रूक्षपणे उत्तर दिले.

आता पहिल्या वर्गातील लोक येऊ लागले. ते केबिनमध्ये गेले. डेकवर विखुरले. काही अमेरिकन एका तरुण विद्यार्थ्याशी गप्पागोष्टी करण्यात गढून गेले. एकीकडे दोन बंगाली मौलाना अवामी लीगच्या धोरणासंबंधी विचारविनिमय करीत होते.

कमाल कठड्याला टेकून क्षितिजाकडे पाहात राहिला. तेथे पाणीच पाणी होते. महान नदी, महान देश, महान मानव ! गवांच्या आतल्या बाजूस कोंबड्यांप्रमाणे कोंबलेले हे सारे मानव महान नाहीत काय ? एका मोठ्या अधिकाऱ्याची पत्नी व मेहुणी डोळ्यांना

गॉगल्स लावून आरामखुर्च्यांवर उन्हाकडे तोंड करून बसल्या होत्या. स्लिल समोरच्या कठड्यावर वाकला होता. त्याचे सोनेरी केस सूर्यकिरणांमध्ये सोन्याप्रमाणे चमकत होते. त्यायोगे तो अप्रतिम सुंदर दिसत होता.

जिन्याच्या दुसऱ्या बाजूला सेकंड क्लासचा डेक होता. एक काळी अँग्लोइंडियन छोकरी बाळीला टेकून 'ट्रू स्टोरी मॅगझिन' वाचण्यात गढून गेली होती. मुखपृष्ठावरील हीरोकडे पाहाता पाहाता तिची दृष्टी फिरून त्या देखण्या इंग्रजाकडे वळली. जाळीच्या त्या बाजूला कठड्याला टेकून उभा असलेला तो इंग्रज अगदी मार्लिन ब्रँडोसारखा दिसत होता. त्या मुलीने एक उसासा सोडला आणि ती पुनः वाचण्यात गढून गेली.

त्या काळ्यासावळ्या मुलीचे संपूर्ण नाव मिस मार्गारेट इझाबेल ख्रिस्तीना टीजडेल असे होते. मॅगीचे नाव इतके लांबलचक असण्याचे कारण असे की तिची पणजी मार्गारेट इझाबेल ही सर स्लिल ॲश्ले यांच्या आणखी एका नेटिव्ह हिंदू बाईची मुलगी होती. सर स्लिल ॲश्ले हे गेल्या शतकातील बंगालमधील एक प्रख्यात गृहस्थ होते. दुष्काळाच्या दिवसांत तिची आई ढाक्याहून कलकत्त्याला येऊन नबाब ॲश्ले यांच्या जनानखान्यात दाखल झाली होती. मार्गारेट इझाबेल मोठी झाल्यानंतर तिने कानपूरच्या छावणीतील सार्जंट टीजडेल याच्याशी लग्न केले. हा टीजडेल शुद्ध गोरा होता आणि अमर्याद मद्यपानामुळे तारुण्यातच देवाघरी गेला होता. तेव्हा मग मार्गारेट इझाबेल आपल्या मुलांना घेऊन पुनः कलकत्त्याला परत गेली आणि तिचे कुटुंब कलकत्त्यातील कनिष्ठवर्गाच्या अँग्लोइंडियन समाजात मिसळून गेले.

मॅगी टीजडेलचे आई-वडील दोघेही निधन पावले होते. ती ग्रेट ईस्टर्न हॉटेलात टेलिफोन ऑपरेटर होती. सध्या ती रजा घेऊन आपल्या आजारी मावशीला भेटण्यासाठी इकडे आली होती. मावशी पिक्सीत राहात होती आता मॅगी पिक्सीहून कलकत्त्याला परत चालली होती.

स्टीमरची शिटी वाजली आणि ती दचकली. तिने मान वर करून पाहिले. घाट जवळ येत होता. उतारू आपापले सामान आवरीत होते. फर्स्टक्लासच्या डेकवर उभा असलेला हीरोही गर्दीत गडप झाला होता. ती उदास झाली. तिने खाली वाकून आपल्या सँडलचे बंद बांधले, आपल्या रंगीत, फुलांची नक्षी असलेल्या स्कर्टच्या सुरकुत्या नीट केल्या, छोट्या आरशात बघून केसांच्या कुरळ्या बटा व्यवस्थित केल्या आणि बॅग उचलून ती उभी राहिली.

स्लिल आणि कमाल जहाजातून उतरून काठावर गेले. उतारू व हमाल यांचा लोंढा आगगाडीकडे निघाला. आगगाडी घाटापासून बरीच दूर होती. घाटावर हिंदू स्त्रिया स्नान, पूजा वगैरे करण्यात निमग्न होत्या. सर्वत्र हिंदूच हिंदू दिसत होते. मध्यम

वर्गातील सुखवस्तू हिंदू पुरुष व स्त्रिया. कनिष्ठ वर्गातील दरिद्री हिंदू स्त्रीपुरुष. कमाल ॲटची केस हातात घेऊन सिलबरोबर फूटपाथवरून चालू लागला. "या जिल्ह्यांमध्ये हिंदूंची वस्ती जास्त आहे." सिलने सांगितले.

"इथं किती शांतता आहे!" कमाल उद्गारला, "खरं म्हणजे माझी मनोवृत्ती इतकी विकृत झालीय, माझ्या मनाला आणि बुद्धीला हिंदूमुस्लिम प्रश्नाची इतकी सखोल टोचणी लागून राहिलीय की जेव्हा या दोन जमातींना शांतपणे एकत्र वावरताना मी पाहातो तेव्हा माझा त्या गोष्टीवर विश्वासच बसत नाही. यावेळी मला प्रश्न पडलाय की इथं हिंदूमुसलमानांचा दंगा का होत नाही!"

ती काळी ॲंग्लो-इंडियन मुलगी चढणीवरून मान खाली घालून त्यांच्या पुढेच चालली होती. आगगाडीजवळ जाऊन पोचल्यावर तिने आपली बॅग जमिनीवर ठेवली आणि ती रुमालाने चेहरा पुसू लागली. तिच्याजवळून जाणाऱ्या सिलने उडतउडत तिच्याकडे पाहिले आणि तो आपल्या डब्याकडे गेला.

ढाक्याला पोचल्यानंतर कमाल व सिल आपापल्या कामाला लागले. रोज संध्याकाळी ते क्लबात एकमेकांना भेटत आणि दोघे मिळून आपल्या मुक्कामाच्या ठिकाणी परत जात. काम संपल्यानंतर सिल ढाक्याच्या गल्लीबोळांतून आणि कोन्याकोपऱ्यातून भटकत फिरे. अरुंद काळोख्या गल्ल्यांतून जाणाऱ्या जाळीच्या बंद घोडागाड्या पाहिल्या की त्याला टागोर आणि सीतादेवी यांच्या कादंबऱ्यांचे स्मरण होई.

एके दिवशी कमाल सिलबरोबर लॅांचमधून बूढी गंगा पार करून सरकारी कामासाठी दुसऱ्या एका जिल्ह्यात चालला होता. सिल खुर्चीवर बसून वृत्तपत्र वाचीत होता. अकस्मात मागे वळून त्याने कमालाला विचारले, "ती समोर दाट झाडी दिसते ना?"

"हो!"

"ते विक्रमपूर आहे. तिथं सरोजिनी नायडू, बी. सी. रॉय वगैरे लोकांची गार्डन हाउसेस आहेत. आता ही गावं ओस पडली आहेत. तिथले लोक पश्चिम बंगालला हिजरत करून गेलेत...चलतोस बघायला?"

"मी कबरस्तानांना भेटी देऊन देऊन अगदी कंटाळलोय. तू मला जगू देणार नाहीस काय?"

"नाही." सिल उत्तरला.

"मी आता तुझ्या रडकथा मुळीच ऐकणार नाही." कमाल हट्टाने म्हणाला.

"ते दुमजली गार्डन हाउस दिसतंय ना?" सिल किनाऱ्याकडे बोट दाखवून म्हणाला, "त्यात रवीन्द्रनाथ टागोर राहात असत."

"चल, मी तुला आजचं दृश्य दाखवतो." लॅांचने पाण्यावर एक वळण घेतले

आणि ती नारायणगंजकडे वळली, तेव्हा कठड्याला टेकून उभा असलेला कमाल सिल्ला म्हणाला.

"आपण आदमजी जूट मिल्स पाहायला चाललो आहोत." त्याने विजयी स्वरात सिल्ला सांगितले.

"आणि तिथं गेल्यानंतर तू मॅनेजरबरोबर लंच घेण्याऐवजी मजुरांच्या उत्पन्नाचे आकडे गोळा करायला जाणार! उपद्रवी लेकाचा!" सिल उद्गारला.

कमाल हसला.

ते तागाच्या गिरणीत गेले. त्या प्रचंड कारखान्यांत बिहारी स्त्रिया आणि बंगाली मजूर काम करीत होते. मोठमोठी यंत्रे धाडधाड वाजत होती. कमाल आश्चर्यचकित होऊन यंत्रांकडे पाहात राहिला.

नंतर ते लॉंचमधून परत फिरले.

लॉंच नदीच्या विशाल पात्रातून चालू लागली. आकाशातील तपकिरी ढगांमधून सूर्य लाल टिळ्यासारखा चमकत होता. नदीच्या लाटा सूर्यकिरणांमुळे सोन्याच्या लडींसारख्या लकाकू लागल्या. हजारो नौका नदीच्या पृष्ठभागावर तरंगत होत्या. एक म्हातारी स्त्री आपली होडी वल्हवीत भर्रकन लॉंचजवळून पसार झाली. नदीच्या पृष्ठभागावर जणू एक वेगळेच रुबाबदार व सामर्थ्यशाली जग वसलेले होते.

सूर्यास्ताची वेळ झाली. नावांतून दिवे लागले. पाण्यावर दिवाळीची शोभा दिसू लागली. नावाडी आपापल्या नावांमध्ये नमाज पढू लागले. वारा वाहू लागला आणि प्रकाशाच्या विरुद्ध दिशेने जाणाऱ्या गलबतांची शिडे शुभ्र बगळ्याच्या पंखांप्रमाणे फडफडू लागली.

ते संपूर्ण दृश्य म्हणजे एक महान सिंफनी होती. मोठा गंभीर राग होता. सारा बंगाल संगीताच्या सुरांत बुडून गेला होता. ते संगीत होते दुःखाच्या रागातील, जीवनाच्या रागातील!

रात्री रमनाच्या रस्त्यांवर अंधुक दिवे मिणमिणत होते. दूरच्या एका मंदिरातून वैष्णवभजनाचे सूर ऐकू येत होते. सिल आणि कमाल व्हरांड्यात बसले होते. श्रावणातील ढग आकाशात भरून आले होते.

सिलने पुनः पुस्तक उघडले. "तळ्याच्या सभोवती चाफ्याची फुले उमलली आहेत. आकाशात काळे ढग गडगडत आहेत. ऑगस्ट महिन्यात नदीला पूर येतो तशा माझ्या मनातील भावना उचंबळून येत आहेत. हे नदी, आपण कुठे चाललो आहोत हे तुला माहीत नाही. मग इतक्या वेगाने का वाहाते आहेस? हे घागरी, तू पाण्यात थेंबाप्रमाणे बुडून जा. मीही तुझ्याप्रमाणे अथांग समुद्रात बुडून गेले आहे."

मध्ययुगातील बंगाली लोकगीताच्या त्या पुस्तकावर दृष्टी एकाग्र करून सिरिल बसला होता. बाहेर अंधार होता. असा अंधार फक्त बंगालच्या ओलसर वातावरणात, रात्रीच्या वेळी घनदाट बागांवरच पसरलेला पाहावयास मिळतो. दिव्याचा पिवळसर आजारी प्रकाश व्हरांड्यात पसरला होता. अकस्मात वीज चमकली, आकाश ढगांनी भरून गेले आणि सोसाट्याचा वारा सुरू झाला.

"मी उद्या सकाळी भारताच्या मार्गानं कराचीला जाणार." कमाल सांगत होता. सिरिल दचकला.

"माहीत आहे."

"तुझी भेट अधूनमधून होत राहीलच."

"हूं !"

वाऱ्याचा जोर वाढला. व्हरांड्याच्या खालच्या बाजूस असलेल्या अशोकाच्या फांद्या सळसळल्या.

"अशोकवृक्ष !" सिरिल जणू कमालाला उद्देशून म्हणाला, "एखाद्या सुंदर तरुणीनं याला स्पर्श केला की हा फुलानं बहरून येतो."

कमालाने पावसाच्या शिंतोड्यांचा मारा चुकविण्यासाठी आपली खुर्ची आतल्या बाजूला सरकविली.

"कावळा काळा आहे." सिरिल वाचू लागला, "कोकिळा त्याच्याहून काळी आहे, संजाखाली नदीचे पाणी त्याहूनही काळे आहे. पण तिचे केस त्या सर्वांपेक्षाही काळे होते."

पावसाच्या थेंबांनी बाहेरच्या तलावात जलतरंग वाजविण्यास सुरुवात केली. वीज चमकली. एक क्षणभर बागेतील पान न् पान त्या प्रकाशात उजळून निघाले.

"चाफ्याच्या वृक्षांच्या पलीकडे बूढी गंगा वाहाते आहे. तिच्या लाटांनी व्यर्थ आरडाओरडा चालविला आहे." सिरिल म्हणाला, "त्यांना म्हणावं, मी तुमचा आवाज ऐकायचा नाही, असा निश्चय केलाय. मी माझी नाव केव्हाच काठाला बांधून टाकलीय."

"ठीक आहे. मी सांगेन त्यांना." कमाल हलकेच उत्तरला.

* * *

दुसऱ्या दिवशी सकाळी सिरिल ॲश्लेला ढाक्यात सोडून कमाल विमानाने कलकत्त्याला आला. आपले दिवंगत मामा नबाब अब्बास रजा बहादुर यांच्या कुटुंबियांना भेटण्यासाठी आपण दत्तहाउसमध्ये जाऊन यावे असा विचार त्याच्या मनात येऊन गेला. परंतु त्याने तो विचार सोडून दिला आणि आगगाडीत बसून तो लखनौला निघाला.

हावडा स्टेशनवर एक पोलिस अधिकारी आपल्याकडे येत असलेला पाहून तो गडबडला. त्याने खिशात हात घालून आपला व्हिसा व पासपोर्ट चाचपून पाहिला आणि आपण बेकायदेशीरपणे भारतात प्रवेश केलेला नाही, याविषयी स्वतःची खात्री करून घेतली. गाडी चालू लागली. बर्दवान, आसनसोल, दुर्गापूर, अलाहाबाद. आगगाडी एका अपरिचित भूमीवरून चालली होती. एका वर्षापूर्वी हा त्याचा देश होता; परंतु आता तो एक परदेशी म्हणून प्रवास करीत होता. लोक आपल्याकडे संशयाने पाहात आहेत, असा त्याला भास झाला. सर्वांचे डोळे आपल्याकडे लागले आहेत—तू पाकिस्तानी आहेस. चल पोलिसचौकीवर!...तू पाकिस्तानी आहेस...मुसल्मान... हेर...मुसलमान हेर?—आगगाडीच्या चाकांतून हाच आवाज ऐकू येत होता.... देशद्रोही...हेर...देशद्रोही...हेर! त्याने गडबडून डोळे चोळले. आगगाडी चारबाग जंक्शनमध्ये प्रवेश करीत होती. त्याचे अंतःकरण धडधडू लागले.

चारबाग...लखनौ...लखनौ!

तो दोन दिवस आपल्या नातेवाइकांकडे राहिला. आता त्याला 'खयाबाँ' या आपल्या बंगल्याच्या क्लेमच्या संबंधातील आवश्यक कागदपत्रे मिळविण्यासाठी देहरादूनला जावयाचे होते. तिसऱ्या दिवशी तो लखनौहून निघाला. गाडी मुरादाबादला पोचली तेव्हा त्याला अचानक आठवले की चंपा विलायतेहून परत आली असून ती मुरादाबादला आपल्या काकांकडे उतरली आहे. ही माहिती त्याला लखनौमध्येच समजल्यामुळे त्याने आपल्या व्हिसावर मुरादाबादचे नावही नोंदवून घेतले होते.

गाडी फलाटाला लागली. तो आपले सामान घेऊन खाली उतरला. स्टेशनातून बाहेर पडून त्याने टांगा केला आणि पत्ता पाहाण्यासाठी खिशातून नोटबुक काढले.

टांगा बाजारपेठेतून निघून पुढे चालला. रस्त्यावरून हातगाड्या, पडदानशीन पालख्या, एक्के यांची वाहतूक चालू होती. मुले-मुली, बुरखाधारी स्त्रिया स्लीपर फरफरत गल्ली-बोळातून फिरत होत्या. टांगा एका मोहल्ल्यात जाऊन दाखल झाला. कमालाला बहुधा तेथेच जावयाचे होते. दारांसमोर मोडकळीस आलेले ओटे होते आणि मशिदीच्या गच्चीवर एक घार घिरट्या घालीत होती. हा चंपाताईचा मोहल्ला होता.

तो टांग्यातून उतरला. समोर एक मोठे जुनाट फाटक होते. फाटकाच्या दरवाजाला एक दिंडी दरवाजा होता. आतल्या बाजूस ओल होती आणि भुशाचा ढीग पडलेला होता. दोन-तीन खाटा पडल्या होत्या. आतील बाजूस एक काळोखाने भरलेला जिना होता. हा जिना बहुधा अठराव्या शतकात बांधलेला असावा. फाटकातून आत येऊन तो हाका मारीत सगळीकडे फिरला. जेव्हा त्याला कोणीच प्रतिसाद दिला नाही तेव्हा तो धाडस करून स्वतःच जिन्यावरून वर गेला. दुसऱ्या मजल्यावर लहानसे आंगण

होते. तेथे चिनीमातीच्या कुंड्या ठेवलेल्या होत्या. समोर वरांडा होता. त्याला लागूनच एक प्रशस्त दालन होते. हे दालन म्हणजे या वाड्यातील बैठकीची खोली असावी. त्यात फक्त एक खुर्ची पडलेली होती आणि मच्छरदाणी लावलेला एक पलंग होता. एका कपाटात 'खुदाई फौजदार' व 'अवधपंच' या जुन्या काळच्या नियतकालिकांच्या फायली होत्या. दरवाजांना तपकिरी, हिरव्या, नारिंगी, लाल, पिवळ्या काचा लावलेल्या होत्या. बाहेरच्या बाजूला सज्जा होता. हा सज्जा फाटकावरील दर्शनी माडीसारखा दिसत होता. तेथे उभे राहून त्याने पश्चिमेकडे नजर टाकली. विटांची फरशी केलेली पायवाट अत्यंत स्वच्छ होती. त्याने लक्षपूर्वक पाहिले. खालच्या मशिदीत पेशइमाम नमाज पढत होते. त्यांच्या नमाज पढण्याच्या सतरंजीसमोर सिद्धगाह(शिया लोक नमाज पढताना जिच्यावर डोके टेकतात, ती लाकडी किंवा मातीची गोल चकती) जवळ नक्षीकाम केलेल्या तांब्याच्या बशीत काहीतरी ठेवले होते आणि मोहल्ल्यातील तीनचार पोरे 'बटकलेजी', 'बटकलेजी' असे ओरडून त्यांना चिडवीत होती. इमाम-साहेब नमाज संपवून घाईघाईने उठले. त्यांनी त्या पोरांना दगड मारून हाकून लावले आणि ते पुनः नमाज पढण्याच्या सतरंजीवर येऊन बसले. जगातील या अप्रसिद्ध व महत्त्वहीन कोपऱ्यातही जीवन किती शांतपणे व समाधानाने, आपल्या गतीने चालले आहे, हे पाहून त्याचे अंग थरारले.

तो जिन्यावरून खाली उतरून पुनः पायवाटेवर आला. या घरात राहाणारी माणसे कोठे गेली असावीत याचा तो आश्चर्याने विचार करू लागला. सगळीकडे अगदी सामसूम होती. वाड्याच्या उजव्या बाजूला हिरव्यागार उंचवट्यावर कब्रस्तान होते. त्याच्या अंगावर काटा उभा राहिला. जिवंत आत्मे, मृत आत्मे! येथे किती अमंगळ वातावरण आहे. मृतांचे शहर. चंपाताई, तू इथं कुठे आहेस? कबरस्तानाच्या माथ्यावर एक छपरी होती. तिच्या शेजारी एक कडुलिंबाचे झाड होते. त्याच्या खाली एक शेळी बांधलेली होती. छपरीच्या खिडकीतून एक मुलगी डोकावून पाहात होती. कमाल आपल्याकडे पाहात आहे, असे बघून तिने चटकन खिडकी लावून घेतली.

तो जिन्यावरून खाली येऊन दुसऱ्या फाटकासमोर गेला. तेही त्याच नमुन्याचे फाटक होते. रंगीबेरंगी काचा लावलेला सज्जा, खाली दरवानांना उभे राहाण्यासाठी मोठे कोनाडे, मोडून पडलेला ओटा. त्याने फाटकाची कडी वाजविली.

"कोण आहे?" आतून आवाज आला.

निराशा व खिन्नता यांमुळे कमालाच्या गळ्यातून आवाजच बाहेर पडला नाही.

"कोण आहे?" रेघारेघांच्या काळ्या दोऱ्याची बुरखा घातलेल्या एका म्हातारीने आतून बाहेर डोकावून पाहात विचारले.

"मी आहे !"

"हे काय उत्तर झालं? अरे भैया, आपलं नाव तरी सांग."

"मी आहे कमाल रजा. पाकिस्तानातून आलोय."

थोड्या वेळाने परत येऊन म्हातारीने दिंडी उघडली. "ये! आत ये, मियाँ!" ती म्हणाली.

तो आत गेला. अंगणात विटांची फरशी होती, भिंतीला लागून असलेल्या ताटव्यांमध्ये कधीकाळी झाडे लावलेली असावीत. सध्या ते ओस पडले होते. स्वयंपाकघरासमोर कोंबड्यांचे खुराडे होते. कोंबड्यांची पिसे इकडे तिकडे उडत होती. समोर मोठे दालन होते. त्या दालनात एक लाकडी दिवाण होता. त्यावर चंपा बसली होती.

"अय्या, हॅलो! कमाल!...भई हद हो गयी!"

"चंपाताई!"

"तू! गुड गॉड!" ती सावकाश उठली आणि क्षमायाचना करीत असल्याप्रमाणे घाईघाईने दिवाण ठीक करू लागली.

"मी तर समोरच्या वाड्यात शिरलो होतो." कमाल सांगू लागला.

"माझ्या घरची सगळी मंडळी काकांच्या घरी गेली आहेत. तिथंच चल. म्हणजे निवांतपण गप्पागोष्टी करता येतील."

तिने दांडीवरून दुलई ओढून घेतली आणि आपले सारे शरीर झाकले जाईल अशा प्रकारे ती अंगाभोवती गुंडाळून घेतली. नंतर डोकीवरून पदर पुढे ओढून ती कमालाबरोबर गल्लीत आली. "आमच्या इथं बुरख्याची प्रथा नाही. अजूनपर्यंत दुलया आणि शालीच गुंडाळून घेतल्या जातात." तिने जणू खुलासा केला. त्या प्राचीन मशिदीजवळ गेल्यानंतर ती दुसऱ्या एका बोळात वळली. हा बोळ कबरस्तानाच्या उताराच्या समांतर जात होता. हा बोळही खूपच स्वच्छ होता. दोन्ही बाजूंच्या भिंतींमध्ये गवत व पिंपळाची झाडे उगवली होती.

"हे...?" कमालने कबरस्तानाकडे बोट दाखवून विचारले.

"आम्हीच लोक आहोत." चंपाने त्याच्याबरोबर चालत उत्तर दिले. "आम्ही इथंच जगतो आहोत आणि इथंच मरणार आहोत." तिने जरा थांबून सांगितले.

थोडेसे चालून गेल्यावर 'दिवाणखाना' आला.

"काकांचं घर?"

"होय."

ती दोघे देवडीमध्ये प्रविष्ट झाली. आंगणात पुष्कळसे दिवाण (तख्त) घातलेले होते. निर्मनुष्यतेमुळे ती जागा वास्तव भकास वाटत होती.

"इथं तर कुणीच राहात नाही ?" कमालाने काहीसे घाबरून विचारले.

"नाही !" चंपाने थंडपणे उत्तर दिले. "हा इमामबाडा आहे. हे जे इथं तख्त पडलेले आहेत...पाकिस्तानच्या निर्मितीपूर्वी या ठिकाणी आमच्या इथली मशहूर 'तख्तों की मजलिस' होत असे.

"आता हिनं पुनः जुनं रडगाणं सुरू केलं." कमाल वैतागून स्वतःशी म्हणाला.

"मुख्य घर आतल्या बाजूस आहे." चंपा सांगू लागली, "ये ना ! तुझ्याशी कुणी पडदा करणार नाही."

तो देवडीतून आत गेला. आंगणात खुर्च्या व खाटा मांडल्या होत्या. एका खाटेवर भरतकाम केलेला पलंगपोस अंथरलेला होता. स्वयंपाकघरातून फोडणीचा खमंग घमघमाट येत होता. दोन-तीन मामुली माणसे इकडे-तिकडे बसलेली होती. आकाशात ढग जमलेले होते. परंतु वारा बंद होता, यामुळे फारच काहिली होत होती. पावसाळी किडे दिव्यांभोवती घिरट्या घालीत होते.

"चा अब्बा (काका) ! हे कमाल आलेत !" अंधारात चंपाचा आवाज ऐकू आला.

"ये, ये ! बैठो मियाँ ! इथं पायधूळ झाडून तू आमचा केवढा सन्मान केलास !" पलंगावर पहुडलेल्या काकांनी उठून बसत म्हटले.

एक मुलगी कंदील घेऊन स्वयंपाकघराकडे धावली. आणखी एक मुलगी दिवाणखान्यात मेजाशी बसून अभ्यास करीत होती. "या अल्लाह ! मध्यमवर्ग इतका डिप्रेसिंग (विषण्णकारक) असतो !" कमाल मनाशी म्हणाला. त्याचे सर्वांग थरारले. आंगणात आलेल्यांची चाहूल ऐकून दिवाणखान्यातील मुलीने मान वर करून कमालाकडे पाहिले. कमाल झटकन मान वळवून दुसरीकडे पाहू लागला. त्याने मध्यमवर्गातील मुलींच्या रोमान्सप्रियतेविषयी पुष्कळच ऐकले होते; आणि ही जी मुलगी स्वयंपाकघरात आपल्याकरिता चहा बनवीत आहे तिने आपल्या प्रेमात पडून रोमान्स सुरू करावा आणि नंतर लांबलचक प्रेमपत्रे आपल्याला लिहावीत, अशी त्याची मुळीच इच्छा नव्हती. त्याची अस्वस्थता वाढू लागली.

"या दोघी माझ्या चुलतबहिणी आहेत." चंपा खाटेच्या पायथ्याशी बसून त्याच आवाजात त्याला सांगत होती. "ती आहे झेबुन्निसा. ती दिल्ली विद्यापीठातून एम. ए. झालीय. धाकटीचं नाव आहे मरियम जमानी. ती ॲग्रिकल्चरमध्ये एम. एससी. करते आहे. अरे, पण तू असा गप्प का ?"

"छेः छेः ! तसं काही नाही, चंपाताई."

थोड्या वेळाने चचा मियाँ हलक्या आवाजात त्याच्याशी बोलू लागले. नेहमीच्याच गोष्टी. पाकिस्तान-हिंदुस्थानच्या. "आमचं तर कंबरडं मोडलंय, बाबा !" त्यांनी सांगितले.

• "इथं इतकी सामसूम का आहे?" कमालाने अस्वस्थपणे पुनः विचारले. परंतु लगेच आपला मूर्खपणा त्याच्या लक्षात आला. "सारी माणसं गेली कुठं?"

"जिथं तू गेला आहेस, तिथं!" काकांनी उत्तर दिले. "खोखरापारच्या मार्गाने निघून गेले. सगळा रोहिलखंड रिकामा झालाय. फक्त आम्हीच काय ती चार म्हातारी-कोतारी माणसं उरलो आहोत. दोन-तीन वर्षं हे असं चालेल. पुढं आम्हीही मरून गेलो म्हणजे इथं गाढवं लोळतील."

कमाल उठून येरझाऱ्या घालू लागला. मरियम जमानी मोठ्या मोकळेपणाने चहा तयार करून आणीत होती. रोमान्स सुरू करण्याचा तिचा विचार मुळीच दिसत नव्हता. कमालाने जरा समाधानाचा सुस्कारा सोडला. परंतु त्यात उदासपणाही भरलेला होता.

"पाकिस्तानची काय हालहवाल आहे?" चा अम्मा विचारीत होते. "असं ऐकतोय की इथून तिकडे गेलेले पिंजारी आणि कोष्टी लक्षाधीश झालेत म्हणे. खरंच काय रे? माझ्या भाच्यानं लिहिलंय की, 'इथं प्रत्येक ठिकाणी पंजाब्यांनी यू. पी. वाल्यांना सळो की पळो करून सोडलंय. सगळी अंदाधुंदी आहे.' मियाँ, आम्ही तर बरबाद झालोत....पार वाटोळं झालं...बाकी तिथं जाऊन तरी काय मोठे लाडू मिळणार आहेत म्हणा! अग आई ग!" त्यांनी कण्हत कूस बदलली. "मरियम, भैयासाठी बिस्किटंही घेऊन ये ग!... कमाल मियाँ, या देवडीवर चार-चार नोकर सेवेसाठी हजर असत. आता इथं दिवसा घुबडं ओरडू लागलीत."

कमाल गप्प बसून राहिला.

"इथं अजून वीज आलेली नाही." चंपा निर्लिप्त सुरात सांगत होती. "मोहल्ल्यात कधीची वीज आलीय. तिथं फू-अम्माचा (आत्याचा) वाडा होता. ती गेली हैदराबाद सिंधला. घरच्या सगळ्या मंडळींसह. तेव्हा मग वाडा ताब्यात घेतला कस्टोडियननं. तिथं आता शिखांनी आपली शाळा उघडलीय. त्यांना वीज मिळाली. आमच्या घरात आली नाही." चंपाचा आवाज त्या पुसट काळोखात घुमत राहिला.

"वीज घ्यायची म्हणजे, मियाँ, पैसे हवेत!" चा अब्बांनी चहाचा ट्रे जोराने स्टुलावर आदळत म्हटले. ट्रेचा समतोल बिघडला. दुधाचे मांडे खाली पडले. सारे दूध फरशीवर सांडले. चंपा दुःखाने त्याच्याकडे पाहात राहिली. "आता अशा अवेळी दूध कुठून मिळणार?" ती म्हणाली.

"जाऊ दे चंपाताई. त्याबद्दल वाईट वाटून नको घेऊस." कमाल भरून आलेल्या आवाजात हळूच म्हणाला.

चंपाने मान वर करून त्याच्याकडे पाहिले आणि ती हसली.

कमालाने चंपाला तिच्या जीवनातील एका वेगळ्याच पायरीवर, दुसऱ्या पार्श्वभूमीवर पाहिले. तिची खरी पार्श्वभूमी हीच होती. त्याने क्षणभर डोळे मिटून घेतले. लखनौ, पॅरिस, केंब्रिज आणि लंडन येथील चंपा; आणि मुरादाबादच्या या काळोख्या घरातील चंपा. 'मिडल क्लास' चंपा, बहादुर चंपा!

वाह चंपाताई! तुझ्यासारखी तूच! आपण मानलं तुला!

कमाल मुरादाबादेत दोन दिवस राहिला. तो प्रथम ज्या वाड्यात गेला होता त्याच वाड्याच्या तपकिरी व नारिंगी काचा लावलेल्या, गच्चीवरील दिवाणखान्यात रात्री त्याच्या झोपण्याची व्यवस्था करण्यात आली. मध्यरात्र उलटेपर्यंत तो सज्जात उभा राहून समोरचे दृश्य पाहात राहिला. त्या ठिकाणी चंद्राने आपला मळकट प्रकाश घरांची छते, मशिदींचे मनोरे व कडुलिंबाची झाडे यांवर पसरला होता.

दुपारी झोपण्यासाठी त्याची खाट जिन्याच्या शेवटच्या पायरीवर घालण्यात आली. तेथे रामगंगेच्या बाजूने चांगला गार वारा येत होता.

"तुमच्याकडे हिंदी साड्यांना फार मागणी आहे, म्हणे." चंपाताईने उंबऱ्यावर आरामात बसून त्याच्याशी उत्साहाने गप्पा मारण्यास सुरुवात केली. "तुझ्या देशातल्या, उच्च समाजातल्या बायका, सोसायटी लेडीज, इथं आल्या की प्रथम कापडाच्या दुकानांवर तुटून पडतात. असं ऐकलंय की तुमच्या इथल्या उच्च समाजातल्या..."

"ही 'उच्च समाजा' ची काय पिरपिर लावली आहेस ग!" कमाल वैतागून म्हणाला. "चंपाताई, तू हे विसरू नकोस की तुला स्वतःला 'क्लास कॉन्शसनेस' (वर्गजाणीव) प्राप्त करायला पुरी पंधरा वर्षे लागली."

चंपा खदखदून हसली. "क्लास कॉन्शसनेससंबंधी बोलायचं असेल तर माझ्या चुलतबहिणींशी बोल. झेबुन आणि मरियम दोघीही मोठ्या स्टूडंट वर्कर्स आहेत."

कमालाच्या लक्षात आले. त्याची शंका निरर्थक होती. या मध्यमवर्गातल्या मुलींनी आपल्या वैफल्यावर व रोमान्सप्रियतेवर विजय मिळविला होता. पंधरा वर्षांपूर्वी त्या चंपाच्या जागी असत्या तर कदाचित त्याही तिच्यासारख्याच रोमान्सप्रिय झाल्या असत्या. या नवीन तरुणी होत्या. चंपा मधल्या काळातली होती. त्यामुळे तिने प्रयोग करावेत आणि ठोकरा खाव्यात हे अपरिहार्यच होते.

झेबुन आणि मरियम—गरीब परंतु हिम्मतवान मुली. त्यांच्या डोकीत कसलाच गोंधळ नव्हता.

"मी १९४१ साली त्या दोघींसारखी असते तर किती बरं झालं असतं!" चंपाने जणू कमालाच्या मनातली गोष्ट सांगितली.

"या गोष्टी काही आपल्या हातात नसतात." कमालाने उत्तर दिले. आपण खूप म्हातारे झालो आहोत, असा त्याला भास झाला. त्याच्यासमोर उंबऱ्यावर बसलेली चंपाही जणू किती म्हातारी होती! "आम्ही दोघांनी मनोविश्वात किती दूरवर मजल मारली आहे." त्याने आश्चर्याने मनाशी विचार केला.

तो यावेळी एका अपरिचित शहरात एका काळोख्या जिन्यात बसला होता. नदीवरून येणारा पावसाळी वारा त्याचे केस विस्कटत होता. मातृभूमीतील पावसाळा! परंतु ही काही त्याची मातृभूमी नव्हती. त्याच्या व्हिसाची मुदत संपत आली होती. उद्या सकाळी तो येथून आपल्या देशाला जाणार होता. मुरादाबाद, हा जिना, चंपा अहमद, झेबुन, मरियम, चा अब्बा सारे इथेच राहाणार होते. या वस्तुस्थितीवर आपण अश्रू ढाळले पाहिजेत काय? परंतु त्याला वाटले, आता आपण म्हातारे झालो आहोत. आपल्यात संयम आला आहे, सहनशक्ती आली आहे. 'संयम, समतोल व शांतता हे प्राचीन ग्रीक आदर्श आहेत.' त्याला हरिशंकराचे शब्द आठवले.

चंपाने पुनः त्याच्या मनातील गोष्ट ओळखली. आपल्या जुन्या सवयीप्रमाणे तिने विचारले, "कुठं आहे तो तुझा हमजाद[1] हरिशंकर?"

"चंपाताई," तो किंचित रागावून म्हणाला, "हरिशंकर आता माझा हमजाद नाही. सध्या तो कुठं असतो हे मला काय माहीत?"

"का बरं? त्याला पत्र लिहीत नाहीस तू?"

"मी मित्रांना पत्रं लिहीत नसतो, हे तुला अजूनपर्यंत माहीत झालं नाही? मी हरिशंकर श्रीवास्तवाला काय लिहिणार? आणि का लिहावं?"

"अजूनही तू सेंटिमेंटल आहेस?"

"नाही!" तो चडफडून उद्गारला. चंपाने त्याला पुनः चोरी करताना पकडले होते. "ते जाऊ दे, चंपाताई!" तो वैतागून म्हणाला, "खुदाची कसम, हा जो इंडोपाकिस्तान मेलोड्रामा चाललाय, त्या साऱ्या नाटकाला मी विटलोय. हरिशंकर आजकाल बहुधा बंगलोरमध्ये असावा. आता काय मी तिथं जाऊन त्याला रडतरडत मिठी मारू? लाहौल विलाकूवत!"

"अजून तू भक्कम बनला नाहीस." चंपा सावकाश म्हणाली, "तू हरिशंकरला भेटू इच्छीत नाहीस; कारण तुला भीती वाटते की आपण खरोखरीच त्याला मिठी मारून रडू म्हणून? तर मग मला भेटायला का आलास तू?" तिचे हे विधान म्हणजेही

---

१. हमजाद म्हणजे जुळा भाऊ. तसेच प्रत्येक व्यक्तीबरोबर जन्मास येणारे व सदैव बरोबर राहणारे एक भूत असाही त्याचा अर्थ आहे.

भयंकर मेलोड्रॅमॅटिक प्रश्न होता.

"अखेर माणूस आपल्या जुन्या मित्रांना भेटतच असतो." कमालला त्या प्रश्नाचे नीट उत्तर देता आले नाही. तो खिन्नपणे म्हणाला, "आणि शिवाय, मुरादाबाद वाटेत लागत होतं."

पावसाचे थेंब सज्याच्या पत्र्यावर वाजू लागले. गल्लीतील मातीचा सुगंध कमालीचा नाकात शिरला एक बाई तंग पायजमा घालून, आंब्यांची टोपली डोक्यावर घेऊन साद घालीत खालून पुढे गेली. चंपा उंबऱ्यावर बसल्या बसल्या झरोक्यातून खाली पाहू लागली.

बऱ्याच वेळापासून कमालाच्या मनात एक प्रश्न घोळत होता. परंतु तो विचारण्याची हिम्मत त्याला होत नव्हती. अखेर दबकत-दबकत, दुसरीकडे पाहात त्याने विचारलेच.

"चंपाताई! आता तू काय करणार आहेस?"

हा अत्यंत निर्दय प्रश्न होता. कोणालाही त्याच्या भविष्यासंबंधी विचारण्याचा आपल्याला काय अधिकार आहे?

"मी?" चंपाने उत्तर दिले, "सरतेशेवटी मी बनारसला परत जाणार आहे. माझ्या पूर्वजांच्या शहराचं नाव काय आहे, तुला माहीत आहे?"

"शिवपुरी!"

"होय! आनंदनगरी. देशातल्या इतर शहरांप्रमाणे आज ना उद्या तेही खरोखरी आनंदाचं नगर बनेल. या देशाला दुःखाचा डोंगर किंवा आनंदाचं घर बनवणं, हे माझ्या स्वतःच्या हातात आहे. मला इतरांशी काय करायचंय?" तिनं आपल्या तळहातांकडे निरखून पाहात म्हटलं, "हे हात नर्तिकेचे, लेखकाचे किंवा कलावंताचे नाहीत. हे केवळ एका सामान्य, मध्यम दर्जाच्या समजूतदार मुलीचे हात आहेत; आणि ती मुलगी आता काम करू इच्छिते."

एवढे बोलून ती गप्प राहिली. थोड्या वेळाने मशिदीतून मध्यान्हीच्या नमाजासाठी दिल्या जाणाऱ्या बांगेचा आवाज कानी आला. त्याबरोबर चंपाने नकळत आपल्या दुपट्ट्याने आपले डोके झाकून घेतले.

"कमाल!" काही वेळाने तिने असहायपणे आपली बोटे मोडत म्हटलं, "तू का गेलास?" मी तुझ्या पाकिस्तानात आले तर मला एकापेक्षा एक वरचढ हुद्दे मिळणार नाहीत? मी केंब्रिजहून किती पदव्या घेऊन आलेय, माहीत आहे ना तुला?"

प्राजक्ताच्या फुलांनी रंगविलेले दुपट्टे अंगावर घेऊन आणि केसरी साड्या नेसून चंपाच्या नातेवाईक मुली खालच्या खोलीत काहीतरी तळत होत्या. "अग, इकडेही थोडं पाठवून द्या, हं!" चंपाने खिडकीतून डोके बाहेर काढून सांगितले.

"अच्छा बिजिया! आत्ता पाठवते" असे म्हणून त्यांनी एक गाणे सुरू केले : 'झुला किन्ने डाली री अमरैयाँ!' (आंबराईत झोपाळा कुणी टांगलाय ग!)

कमालाने खाटेवर पडल्या पडल्या डोळे मिटून घेतले. तो लहानपणापासून हे गाणे ऐकत आला होता. पावसाळा सुरू होताच त्याच्या कुटुंबातील मुलीही चुलीवर कढई चढवून हे गीत गाऊ लागत.

जिन्यावर पायजम्याच्या तळाचा घेर दिसला. झेबुन फुलऱ्यांची प्लेट घेऊन वर येत होती. ती सहजपणे आत आली आणि प्लेट जमिनीवर ठेवून गुणगुणत परत गेली.

चंपा उंबरठ्यावर बसून राहिली. "तुला असं वाटतंय की," ती हल्क्या आवाजात म्हणाली, "हिच्या दारात आता कोण येणार? परंतु कमाल, मला वाटतं, वैयक्तिक यशापयशाचा विचार केल्यास मी तुझ्यापेक्षा जास्त भाग्यवान आहे. मला मार्ग सापडलाय."

"तुझं म्हणणं बरोबर आहे, चंपाताई!"

खालच्या हौदात पावसाच्या थेंबांचा ढोल वाजत होता. पावसामुळे सगळीकडे हिरवेगार झाले होते आणि टवटवीतपणा पसरला होता. गल्ल्यांतून लहान-लहान नाले वाहू लागले होते. सज्ज्यांतून आणि मोऱ्यांतून पाण्याचे धबधबे पडत होते. खाली अंगणात पाण्याचे एक लहानसे निर्मळ तळे बनले होते. वरती चिनी मातीच्या कुंड्यांत लावलेली झाडे तरारली होती. "हा माझा जलमहाल आहे." चंपा हळूच म्हणाली, "इथं माझ्या अश्रूंचं पाणी वाहातं."

दिवाणखान्यात मुलींचे दुपट्टे फडफडले.

"मी एक सर्वसामान्य, मध्यम दर्जाची स्त्री आहे." चंपा सांगू लागली, "मी परमेश्वराची खास लाडकी मुलगी असते—मीरा, मुक्ताबाई, सेंट सोफिया यांच्यासारखी —तर माझ्या शरीरावर जखमांच्या खुणा दिसल्या असत्या. माझे कपडे माझ्या पवित्र रक्तानं लाल झाले असते. हातांत खिळे ठोकलेले असते. माझ्या मस्तकाभोवती तेजोवलय दिसलं असतं. माझ्याकडे विषाचे प्याले आणि सापांचे पेटारे पाठविण्यात आले असते. परंतु मी नुसतीच चंपा अहमद आहे. माझ्या जखमा कुणाला दिसणार नाहीत; कारण माझ्याकडे पाहाणारेही माझ्याप्रमाणेच जखमी झालेले आहेत. ते दुबळे आणि नश्वर मानव आहेत. त्यांच्याजवळ दिव्यचक्षू नाहीत. सेंट सोफियाची पूजा केली जाते. परंतु लोक मला हसतही असतील कदाचित."

वाऱ्याच्या झोतासरशी बरीचशी जांभळे टपटप करीत पायऱ्यांवर येऊन पडली. चंपाने आपल्या केसांत अडकलेले एक पिवळे पान काढून टाकले.

"कमाल," ती विचार करीत म्हणाली, "मी नाना प्रकारच्या जीनियस

(प्रतिभाशाली) समजल्या जाणाऱ्या लोकांच्या सहवासात काळ घालविला. त्यांच्यापैकी प्रत्येकजण कधी आनंदी असे तर कधी दुःखी. 'तुम्ही आनंदित का आहात?' असं मी प्रत्येकाला विचारी. 'इतकं सखोल अन् सूक्ष्म ज्ञान तुम्हांला असूनही तुम्ही मजेत राहाता म्हणजे कमाल आहे!' असं मी रागावून म्हणे. परंतु शेवटी मी असं पाहिलं की, पुष्कळशा लोकांनी आपलं दुःख जगाच्या दुःखात मिसळून टाकलं होतं. किती सोपी गोष्ट होती! डोंगराच्या पायथ्याशी पोचल्यावर लक्षात आलं की आपण स्वतः आणि आपलं वैयक्तिक दुःख ही किती क्षुद्र आहेत.

"आठ वर्षांनंतर तुझ्याप्रमाणे मीही माझ्या मातृभूमीला परत आले आणि येथील परिस्थिती पाहिली. इथं मी अशा काही गोष्टी पाहिल्या की त्यामुळं माझं मस्तक अभिमानानं उंच झालं आणि अंतःकरण आनंदानं भरून आलं. अशाही काही गोष्टी मी पाहिल्या की त्यांमुळं माझं मस्तक लज्जेनं खाली झुकलं आणि माझं हृदय दुःखानं भरून आलं. माझ्यासमोर प्रश्नांचा भला मोठा डोंगर उभा होता. अशा वेळी काय झालं, माहीत आहे? मुंगीनं काय केलं? तिनं कानांत हवी भडकवून डोंगरावर चढायला सुरुवात केली.

"मी काय करणार, ते जाणून घ्यायची इच्छा अजूनही तुझ्या मनात शिल्लक उरलीय काय?"

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी कमाल तेथून निघाला. टांगा गल्लीतून बाहेर पडून स्टेशनकडे चालू लागला. कमालाने पाहिले, चंपाताई पुनः एकदा दूर राहिली— मोडकळीस आलेल्या वाड्याच्या दरवाजात! याचप्रमाणे त्याने तिला ऑक्सफोर्ड स्ट्रीटवरील 'कोंबडीच्या खाणावळीत' काचेच्या दारामागे एकटीला सोडून दिले होते. ती अशीच एकदा—जेव्हा भैयासाहेब तिला सोडून पाकिस्तानात निघून गेले होते तेव्हा—'गुलफिशाँ'च्या फाटकासमोर काळोख्या रस्त्यावर उभी राहिली होती.

परंतु यावेळी मात्र ती एकटी नव्हती. आता ती एका समुदायाचे अंग होती. सरतेशेवटी तिने बिनशर्त समुदायाचे अनुयायित्व मान्य केले होते. चंपा आता एकटी नाही. ती मिरवणुकीत सामील झाली आहे आणि पुढे चालली आहे. तिच्याबरोबर मोहल्ल्यातील गल्ल्या, मशिदीचे मनोरे, झेबुन व मरियम, रस्त्यावर गोट्या खेळणारी मुले, हातगाडीवाले, गरीब, बुरख्यात वावरणाऱ्या स्त्रिया आणि आम जनता आहे. चंपाताई त्या सर्वांची सहकारिणी बनली आहे. ही मंडळी पुढे जाण्यासाठी तयार आहेत. आज नाही तर उद्या नक्कीच. केव्हा ना केव्हा, फार लौकर लोक खूप वरच्या पातळीवर जाऊन पोचलेले असतील. या बिंदूवर पोचल्यानंतर खिलच्या तत्त्वज्ञानाच्या साऱ्या अदृश्य तारा झंकृत होऊन तुटून गेल्या.

"काय करू, पार्टनर!" आगगाडीत बसता बसता कमाल स्वतःशी म्हणाला, "माझा फार दुःखद शेवट झाला आहे."

गाडी शिवालिक टेकड्यांमधून वाट काढीत हिमालयाच्या हिरव्यागार परिसरात पोचली. देहरादून स्टेशनवर उतरून तो डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या कोर्टात गेला. स्थावर-जंगम मालमत्तेची कागदपत्रे व घराची खरेदी-विक्री खते वगैरे काढण्यात आली. त्यानंतर तो डालनवालाच्या सुंदर रस्त्याने हिंडू लागला.

समोर रसपना काल्वा वाहात होता.

"यार हरिशंकर!" कमाल म्हणाला.

"हाँ यार!"

"यार, तो प्रोफेसर हॅमिल्टन म्हणत होता ते बरोबरच होतं. आपण कसल्या जंजाळात अडकलो आहोत, खुदाची कसम."

त्या दिवशी त्यांनी त्यागाविषयी खूप चिंतन केले आणि पुष्कळच सखोल दार्शनिक मूड त्यांच्या मनावर पसरला होता.

"चल, आपण बंगल्यांची नावं वाचू. नावांच्या निवडीवरून घरमालकांच्या सायकॉलॉजीची कल्पना येते." चालता-चालता एका फाटकाजवळ थांबून हरिशंकर म्हणाला.

"आपण तर बुवा, कधीही घर बांधणार नाही. कारण 'शाही बनाता नहीं आशियाना'!" कमाल म्हणाला.

"खरं आहे. पाहा ना, बूर्ज्वापणा किती भयंकर सेंटिमेंटल असतो. ही नावं तर वाचून बघ."

"ख्वाबिस्तान...लाहोलविलाकूवत!"

"परंतु तू स्वतःही 'गुलफिशाँ' आणि 'खयाबाँ' मध्ये राहातोस की!"

"माहीत आहे."

"यार कमाल!"

"हाँ यार!"

"जरा विचार कर. लोकांनी घरं बांधली आहेत—या टोकापासून त्या टोकापर्यंत! एकापेक्षा एक सुंदर. सबंध जगभर घरं बांधलेली आहेत."

"हाँ यार, मोठी विचित्र गोष्ट आहे."

ते दोघे एका फाटकाजवळच्या पुलावर बसले आणि पुनः या प्रश्नासंबंधी विचार करू लागले. खरे म्हणजे त्यांना प्रोफेसराच्या वैराग्याने फारच अस्वस्थ करून सोडले होते. एक शहाणासुरता माणूस, शास्त्रज्ञ, ...आणि आपला सरळ अरण्यात निघून जातो. कमाल आहे!

"यात काहीतरी अर्थ अवश्य असला पाहिजे. अर्थ म्हणजे काय..." कमाल म्हणाला.

अंधार पडेपर्यंत ते डालनवालाच्या शांत, सुगंधित रस्त्यांवरून घरांची नावे वाचीत भटकले. 'नस्तरन', 'दौलतखाना', 'आशियाना', 'राजमहल'... !

या घरांभोवतालच्या बागांतील डोंगरी फुलांचा वास सर्वत्र दरवळत होता. जग हे मोठे रम्य स्वप्न होते.

ते दोघे गाल फुगवून पुनः एका फाटकाजवळच्या पुलावर बसले, आणि कालव्याच्या पाण्याकडे पाहू लागले. हा कालवा रस्त्याच्या कडेकडेने वाहात होता. पाण्यातून एक फाटका जोडा प्रवाहाच्या वेगाबरोबर वरखाली होत वाहात चालला होता.

एक भली मोठी मोटार त्याच्याजवळ येऊन थांबली. तो दचकला. त्याने डोळे चोळून चोहोकडे पाहिले. हरिशंकर गडप झाला होता. तो १९४२ सालातील नव्हे तर १९५६ सालातील देहरादूनमध्ये होता. त्याने पुनः डोळे चोळले. तो आपल्या फाटकात बसला होता. मोटारीतून उंची कपडे घातलेले एक सरदारजी त्याच्याजवळ आले.

"तुम्हांला कोण हवंय ?"

"मी...मला..." तो गडबडला. त्याचे हृदय धडधडू लागले. सरदारजींना बहुधा वाटले असावे की आपल्या दिवाणखान्यातील रेडियो चोरण्यासाठी टपून बसलेला हा कोणीतरी लफंगा असावा. त्याने पुनः एकदा फाटकावर लावलेली संगमरवरी पाटी वाचली.

'नवाब तकी रजा बहादुर ऑफ कल्याणपुर'

हे त्याचे घर होते. तो पुलावरून उठला. त्याच्या घशाला कोरड पडली. त्याने पुरावा म्हणून घरच्या मालकीहक्काची कागदपत्रे काढून त्यांना दाखविली आणि तो वरमल्या-सारखा हसला.

"अच्छा ! म्हणजे तुम्ही जंगम मालमत्तेच्या संबंधात आला आहात तर ! या, या !"

तो सरदारजींबरोबर बागेतील रस्त्याने चालू लागला.

"तुमचं कोठारघर कडीकुलुपात बंद आहे. तुम्ही किल्ली आणलीय ?"

"हो आणलीय ना !"

त्याला दिवाणखान्यात नेऊन सरदारजींनी चहा दिला आणि जेवणाचा आग्रह करू लागले.

सरदारजी रावळपिंडीचे राहाणारे होते आणि तेथे फार मोठे ठेकेदार होते. बराच वेळपर्यंत आपल्या जुन्या देशाची आठवण काढून ते उसासे सोडत राहिले. कमाल अस्वस्थ होऊन उठला आणि म्हणाला, "बॉक्सरूम उघडायला मी उद्या सकाळी आलो तर चालेल ना ?"

"काहीच हरकत नाही. आपलंच घर आहे असं समजा." सरदारजी म्हणले आणि त्यांनी त्याला स्वतःच्या मोटारीतून त्याच्या मुक्कामाच्या जागी नेऊन पोचविले.

सकाळी तो पुनः 'खयाबाँ' मध्ये गेला. आता चांगले ऊन्ह पडले होते. बागेत दोन तरुण मुली अनवाणी पायांनी बॅडमिंटन खेळत होत्या. सरदारीणबाई म्हशीचे चारापाणी करीत होत्या. आत रेडियो वाजत होता. मोठे शांत वातावरण होते. तो जवळच्या वाटेने कोठारघराकडे गेला आणि कुलूप काढण्यापूर्वी व्हरांड्याच्या पायऱ्यांवर बसला.

तो त्या पायऱ्यांवर बसलेला असताना आपण विसाव्या शतकातील हिंदुस्तानच्या, स्वतःला हरवून बसलेल्या पिढीतील एक व्यक्ती आहोत, अशी जाणीव त्याला झाली. त्यांच्या कुटुंबीजनांचे जग पाने गळून पडलेल्या जंगलांचे, गुलाबाच्या फुलांचे, पहाडी कॉटेजांचे आणि तिसऱ्या प्रहरीच्या चहातील चांदीच्या चमकदार चहादाणीचे जग होते. समोर दोन भिंतींच्या मधून जी पायवाट जात होती तिच्यावरून रंगीत छत्र्या घेऊन चालणाऱ्या त्याच्या कुटुंबांतील स्त्रिया जुन्या तुर्की किंवा युरोपीय कादंबऱ्यांतील स्वप्निल जगात वावरणाऱ्या स्त्रियांसारख्या दिसत असत.

हिवाळ्यात जेव्हा ते लखनौहून येथे येत तेव्हा मधल्या दिवाणखान्यातील फर्शीवर गाद्या घातल्या जात. पहाडी खानसामा फकीरा चहाचा ट्रे आणून शेगडीजवळ ठेवी. थंडीच्या दिवसांत रात्रीच्या वेळी कमाल व तलअत यांच्यासमोर पुस्तकांचा ढीग रचलेला असे. रंग भरण्याची पुस्तके, परीकथा, बाहुल्या आणि मेकॅनोसेट. जेव्हा हे गोदाम उघडले जाई तेव्हा इतर मुलांप्रमाणे तोही मोठ्या जिज्ञासेने अम्माबेगमच्या मागोमाग त्यात घुसे. किती रहस्यपूर्ण वस्तू यात असत. पेटारे, टोपल्या, भांडी, हंड्या-झुंबरे, मोठमोठे दिवे, जुनी मासिके, पत्रांचे गठ्ठे, नवारीचे गोळे आणि सतरंज्या.

थंडीच्या दिवसांत बाहेर अंगणात खुर्च्या टाकून बाबा गुडगुडी ओढत असत. लीची फळांच्या झाडांवरील धुके हळूहळू विरून जाई. नोकर-निवासात राहाणाऱ्या तिरलोचन माळ्याने आपल्या खोलीच्या भिंतीवर एक मलेमोठे रंगीत चित्र खळीने चिकटविले होते. जे लोक जगात वाईट कृत्ये करतात, त्यांची नरकात काय दशा होते ते त्या चित्रांत दाखविले होते. (उदाहरणार्थ, एका चित्रात असे दाखविले होते की एक माणूस मरतुकडे बैल जुंपलेल्या गाडीत खंडीभर ओझे लादून त्या बैलांना हाकत आहे. त्याच्या शेजारच्या चित्रात असे दाखविले होते की त्याच माणसाला नरकामध्ये एका गाडीला जुंपले असून हातभर लांब जीभ काढलेले माकडांसारखे यमदूत त्याला लोखंडी सळ्यांनी मारून हाकत आहेत.) रोबी नावाची एक झाडूवाली होती. तिची मुलगी इंग्रजांच्या घरी आया म्हणून काम करीत असे. चहादाणीच्या तळाशी उरलेला चहाचा चोथा

कचऱ्याच्या बादलीत टाकला की रोजी तो चोथा बाहेर काढून तो गवतावर पसरून वाळवीत असे आणि त्याचा चहा करून पीत असे.

लखनौहून सगळा लवाजमा बरोबर येत असे. कदीर ड्रायव्हर हिरव्या रंगाची घोंगडी पांघरून तीन पाय असलेल्या मोडक्या खुर्चीत मोठ्या रुबाबात आपल्या खोलीसमोर बसून राही. स्वयंपाकघरासमोर फणसाचे झाड होते. हुसैनीची बायको रोज त्याच्याखाली उभी राहून त्याची फळे मोजी.

फर्निचरवर लाल रंगाचे कापड मढविले होते. मुंज (मोळ) गवताचे तरट, त्यावर लाल व किरमिजी रंगांचे गालिचे. समोरच्या व्हरांड्यातील भिंतीवर एक रंगीत चित्र फ्रेम करून लावलेले होते. त्या चित्रात शिकारी कुत्रे एका सांबराचा पाठलाग करीत होते. दिवाणखान्यातील भिंतीतील शेगडी बनातीच्या भरतकाम केलेल्या झालरीने सजविलेली होती. त्याच्या वरच्या बाजूस चांदीच्या चौकटीत बसविलेली कुटुंबातील मंडळींची छायाचित्रे ठेवलेली होती. कोपऱ्यांमध्ये पितळेचे बोलस्टँड्स होते. त्यांवर पामच्या कुंड्या ठेवलेल्या असत. ड्रॉइंगरूममधील हात धुण्याच्या तस्तात रोज ताजी पाने भरली जात. त्यांचा फार छान सुगंध दरवळे. डिनरच्या प्रसंगी टेबलाची सजावट अस्सल इंग्रजी पद्धतीची करण्यात येई. सुऱ्या-काटे, जेवणानंतर हात धुण्याच्या फिंगर-बाउलमध्ये गुलाबाच्या पाकळ्या तरंगत असत. बबर्ची नेहमी बंद गळ्याचा कोट घालून कमरेला पट्टा बांधी व साफ्यावर न चुकता बिल्ला लावी.

उन्हाळ्यात दुपारच्या वेळी सारे घर झोपी गेले की कमाल हळूच बाहेर पडून लीचीच्या झाडांच्या राईत जाऊन बसे. तेथे खूप गारवा असे. एक महान अलौकिक आळस सर्वत्र पसरलेला असे. मनात अत्यंत शांततेचे विचार येत. दूरवर देवदारांच्या बनात एक पक्षी सारखा ओरडत असे 'मैं सोता था...मैं सोता था...' (मी झोपलो होतो). असे सांगतात की हा पक्षी शिवालिक डोंगरदऱ्यांखेरीज इतरत्र कोठेही आढळत नाही; आणि तो कधी कोणाला पाहायलाही मिळत नाही. पहाडी नोकर सांगत असत की, जेव्हा परमेश्वर सृष्टीची निर्मिती करीत होता आणि सर्व प्राण्यांना त्यांची भाग्ये व गुण देत होता (जेव्हा मोराला पिसे मिळाली, कोकिळाला आवाज मिळाला वगैरे) त्यावेळी हा पक्षी इथेच कुठे तरी झोपी गेला होता. म्हणून तो आता जन्मोजन्मी रडतो आहे. नीट कान लावून ऐकले तर स्पष्ट ऐकू येई : 'मैं सोता था!'

सरदारीण अनवाणी पायांनी फदकफदक मारीत एका खोलीतून दुसऱ्या खोलीत फेऱ्या घालीत होती. तिने धाडकन कोठीचा दरवाजा लावला.

कमाल दचकला आणि १९३५ च्या देहरादूनमधून परत आला.

पायऱ्यांवरून उठून त्याने खिशातून किल्ली काढली व गोदामाचा दरवाजा उघडला.

मोठमोठी दारे असलेला व्हरांडा होता. सक्सेना साहेब, रिझवी साहेब, ठाकुर राम-नारायण साहेब, मसऊद उल हसन साहेब—किती विचित्र माणसे होती ती—साधी भोळी, गरीब, सज्जन, सरळ! फसवाफसवी बहुधा त्यांच्यापैकी कोणालाच येत नसावी. 'रॅकेट' चालविण्यात त्यांना मुळीच रस नसावा. 'फ्रॉड' आणि 'चारसो बीस' या गोष्टी जणू त्यांच्या गावीही नव्हत्या. किती मूर्ख लोक होते! त्यांचे आपले खास शोक होते. त्यांच्या अभिरुचीचे विषय वेगळे होते—मुशायरे, कोर्टबाजी, शिकार, शास्त्रीय संगीताच्या मैफली. किती शांततापूर्ण जीवन त्यांनी चालविले! त्याला लोकांच्या गमती-जमती आठवल्या. रिझवीसाहेबांना गुलाबजामुन मुळीच आवडत नसत. त्यांच्यासमोर गुलाब-जामुनांचा द्रोण धरला की ते आकाशपाताळ एक करीत. ठाकुर-साहेबांच्या पोटाच्या नगाऱ्यावरून थट्टामस्करी केली जाई. मेरठच्या नौचंदीला (जत्रेला) हजर राहण्याचे कार्यक्रम आखण्यात येत. 'छड़ियों का मेला' (उरूस) पाहायला जाण्यासंबंधी चर्चा चालू असे. साले-मेहुणे यांच्यातील चिमटे-बोचकारे चालू असत. किती शांततापूर्ण समाज होता त्यांचा! कमाल त्या तसबिरीकडे पाहात राहिला. त्यांच्या पिढीपेक्षां आमची पिढी अधिक श्रेष्ठ आहे, असे आम्हांला सिद्ध करता आले काय? बिचाऱ्या वृद्धांनो, मी तुमच्यासमोर शरमिंदा आहे. मी तुम्हांला माझे तोंड दाखवू इच्छीत नाही. हे तोंड घेऊन मी दूर पळून चाललो आहे. खुदा हाफिज! त्याने तो ग्रूप फोटो हलकेच जमिनीवर टाकला आणि गोदामाला कुलूप घालून तो बाहेर पडला.

देवदारांमध्ये तो पक्षी पूर्वीप्रमाणेच ओरडत होता. "मैं सोता था!...मैं सोता था!"

"अरे बाबा, झोपला होतास म्हणून काय बिघडलं? जागा असतास तरी ब्रह्मदेवानं असं काय मोठं सुख तुला दिलं असतं?" कमाल शाब्दिकपणे स्वतःशी म्हणाला, "परंतु पश्चात्तापाची जाहिरात आणि आरडाओरडा यांमुळेही स्वतःच्या श्रेष्ठत्वाची जाणीव होत असते ना! अरे पण मी विचारतो, तुम्ही मंडळी किस झाड की पत्ती आहात?...कमाल रजा, सिरिल ॲशले आणि गौतम नीलांबर...का उगीच टुरटुर चालवलीय तुम्ही?"

दिल्लीच्या स्टेशनवर मामीजी त्याला उतरून घेण्यासाठी आले होते. त्यांच्याबरोबर तो बेलारोडवर आला. लाजवंती व्हरांड्यात उभी राहून त्याची वाट पाहात होती. ती त्याला मिठी मारून रडू लागली. "तू भको जाऊस, कम्मन! निर्मला देवाघरी गेली. शंकर रात्रंदिवस बाहेरच असतो. तू पाकिस्तानला निघून गेलास...!" रडता-रडता तिला धाप लागली.

तो गप्प राहिला. "अग, रडतेस काय अशी?" तो हळुवारपणे म्हणाला, "रडू नकोस."

त्याची गाडी संध्याकाळी अमृतसरला जाणार होती. परंतु तो लाजवतीच्या घरून शक्य तितक्या लौकर पळून जाऊ इच्छीत होता. जेवण झाल्यावर तो भावोजींच्या बरोबर नव्या दिल्लीत जाण्यास तयार झाला.

"अरे, गौतमला तर फोन कर. तो चंदीगढला गेला होता. बहुधा परत आला असेल." भावोजींनी सांगितलं.

कमालाने अनिच्छेने टेलिफोन डिरेक्टरी उचलली आणि तो तिची पाने उलटू लागला. नरूला, हरिश्चंद्र, नारायण, एम. जे., नीलांबर, गौतम! त्याने नंबर फिरविला.

"हॅलो गौतम, अरे, तू इथंच आहेस? उल्लू के पट्ठे!" त्याने महत्प्रयासाने नॉर्मल आनंदी स्वरात बोलण्यास सुरुवात केली. "अबे यार...हाँ यार.. आज सकाळीच देहरादूनहून ..आँ? होय. ढाक्याहून येतोय. लखनौला? होय. अप्पीनं तुला दुआ-सलाम सांगितलाय...होय. मजेत आहे ती...सगळे मजेत आहेत, फक्त मी वगळून!...काय म्हणालो मी? काही नाही...मी म्हणत होतो की आजकाल मीही मजा मारून राहिलोय...ओळखीपाळखीच्या सर्वांची नावनिशीवार खुशाली सांगू तुला? विचार ना!...कदीर अन कमरून? भई वाह! खूप आठवण राहिलीय तुला... तुला कुणाची आठवण नाही? सगळे आठवतात? तुझी स्मरणशक्ती भलतीच तीव्र आहे. माशाअल्लाह! कदीर तर कधीच मिर्जापूरला परत गेला. मोटार केव्हाच विकली गेली. का विकली? अरे इथं तर माणसाची आयुष्यच विकली गेलीत. तुला मोटारीची चिंता पडलीय! तू नाही विकला गेलास?...अरे हो, हो, मी कुठं म्हणतोय? मी स्वतःसंबंधी बोलत होतो. मी स्वतःला विकून टाकले. चांगली किंमत येत होती... बोहनीची वेळ होती!

"आणखी विचार. कुणाकुणाची खुशाली जाणून घ्यायचीय तुला?...चुटकी, रमदैया?...कमाल आहे! तुला चुटकीची अजून आठवण आहे? ती बिचारी परलोकवासी झाली. होय. फार दुःख झालं?...कशी मेली?...पावसाळ्यात मरहूम 'गुलफिशाँ'च्या बागेतलं गवत काढीत होती. साप चावला. अरे कितीतरी वर्षं झाली...गंगादीन आजकाल मध्यप्रदेशात कुठंतरी ट्रॅक्टर चालवतोय. अप्पी सांगत होती की तो एफ. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाला म्हणून...हो ना! याला म्हणतात खरी प्रगती...विकास! गंगादीनच्या उन्नतीची हकीगत ऐकून मला फार आनंद झाला... आणखी बोलू?...छेः छेः! तुला भेटता येणार नाही मला. सवडच नाही...तुझी बैठक तीन वाजता संपेल, त्यानंतर तू माझी वाट पाहणार, 'आल्प्स' मध्ये?...काय करणार वाट पाहून? अंऽहं! मी कस्टोडियनला भेटायला चाललोय. 'पी' ब्लॉक...त्यानंतर... अच्छा, मी प्रयत्न करतो यायचा...पण माझी वाट पाहू नकोस...अच्छा...सो लॉंग!"

मोठमोठी दारे असलेला व्हरांडा होता. सक्सेना साहेब, रिझवी साहेब, ठाकुर राम-नारायण साहेब, मसऊद उल हसन साहेब—किती विचित्र माणसे होती ती—साधी भोळी, गरीब, सज्जन, सरळ! फसवाफसवी बहुधा त्यांच्यापैकी कोणालाच येत नसावी. 'रॅकेट' चालविण्यात त्यांना मुळीच रस नसावा. 'फ्रॉड' आणि 'चारशे वीस' या गोष्टी जणू त्यांच्या गावीही नव्हत्या. किती मूर्ख लोक होते! त्यांचे आपले खास षोक होते. त्यांच्या अभिरुचीचे विषय वेगळे होते—मुशायरे, कोर्टबाजी, शिकार, शास्त्रीय संगीताच्या मैफली. किती शांततापूर्ण जीवन त्यांनी घालविले! त्याला लोकांच्या गमती-जमती आठवल्या. रिज्वीसाहेबांना गुलाबजामुन मुळीच आवडत नसत. त्यांच्यासमोर गुलाब-जामुनांचा द्रोण धरला की ते आकाशपाताळ एक करीत. ठाकुर-साहेबांच्या पोटाच्या नगाऱ्यावरून यट्टामस्करी केली जाई. मेरठच्या नौचंदीला (जत्रेला) हजर राहण्याचे कार्यक्रम आखण्यात येत. 'छडियों का मेला' (उरूस) पाहायला जाण्यासंबंधी चर्चा चालू असे. साले-मेहुणे यांच्यातील चिमटे-बोचकारे चालू असत. किती शांततापूर्ण समाज होता त्यांचा! कमाल त्या तसबिरीकडे पाहात राहिला. त्यांच्या पिढीपेक्षा आमची पिढी अधिक श्रेष्ठ आहे, असे आम्हांला सिद्ध करता आले काय? बिचाऱ्या वृद्धांनो, मी तुमच्यासमोर शरमिंदा आहे. मी तुम्हांला माझे तोंड दाखवू इच्छीत नाही. हे तोंड घेऊन मी दूर पळून चाललो आहे. खुदा हाफिज! त्याने तो ग्रूप फोटो हलकेच जमिनीवर टाकला आणि गोदामाला कुलूप घालून तो बाहेर पडला.

देवदारांमध्ये तो पक्षी पूर्वीप्रमाणेच ओरडत होता. "मैं सोता था!... मैं सोता था!"

"अरे बाबा, झोपला होतास म्हणून काय बिघडलं? जागा असतास तरी ब्रह्मदेवाने असं काय मोठं सुख तुला दिलं असतं?" कमाल त्रासिकपणे स्वतःशी म्हणाला, "परंतु पश्चात्तापाची जाहिरात आणि आरडाओरडा यांमुळेही स्वतःच्या श्रेष्ठत्वाची जाणीव होत असते ना! अरे पण मी विचारतो, तुम्ही मंडळी किस झाड की पत्ती आहात?... कमाल रजा, सिल ॲश्ले आणि गौतम नीलांबर... का उगीच टुरटुर चालवलीय तुम्ही?"

दिल्लीच्या स्टेशनवर मामीजी त्याला उतरून घेण्यासाठी आले होते. त्यांच्याबरोबर तो बेलारोडवर आला. लाजवती व्हरांड्यात उभी राहून त्याची वाट पाहात होती. ती त्याला मिठी मारून रडू लागली. "तू नको जाऊस, कम्मन! निर्मला देवाघरी गेली. शंकर सदोदित बाहेरच असतो. तू पाकिस्तानला निघून गेलास...!" रडता-रडता तिला धाप लागली.

तो गप्प राहिला. "अग, रडतेस काय अशी?" तो हळुवारपणे म्हणाला, "रडू नकोस."

त्याची गाडी संध्याकाळी अमृतसरला जाणार होती. परंतु तो लाजवतीच्या घरून शक्य तितक्या लौकर पळून जाऊ इच्छीत होता. जेवण झाल्यावर तो मावोजींच्या बरोबर नव्या दिल्लीत जाण्यास तयार झाला.

"अरे, गौतमला तर फोन कर. तो चंदीगढला गेला होता. बहुधा परत आला असेल." मावोजींनी सांगितले.

कमालाने अनिच्छेने टेलिफोन डिरेक्टरी उचलली आणि तो तिची पाने उलटू लागला. नरुला, हरिश्चंद्र, नारायण, एम. जे., नीलांबर, गौतम! त्याने नंबर फिरविला.

"हॅलो गौतम, अरे, तू इथंच आहेस? उल्लूके पठ्ठे!" त्याने महत्प्रयासाने नॉर्मल आनंदी स्वरात बोलण्यास सुरुवात केली, "अबे यार...हाँ यार...आज सकाळीच देहरादूनहून...ऑं? होय. ढाक्याहून येतोय. लखनौला? होय. अप्पीनं तुला दुआ-सलाम सांगितलाय...होय. मजेत आहे ती...सगळे मजेत आहेत, फक्त मी वगळून!...काय म्हणालो मी? काही नाही...मी म्हणत होतो की आजकाल मीही मजा मारून राहिलोय...ओळखीपाळखीच्या सर्वांची नावनिशीवार खुशाली सांगू तुला? विचार ना!...कदीर अन् कमरून? भई वाह! खूप आठवण राहिलीय तुला... तुला कुणाची आठवण नाही? सगळे आठवतात? तुझी स्मरणशक्ती भलतीच तीव्र आहे. माशाअल्लाह! कदीर तर कधीच मिर्जापूरला परत गेला. मोटार केव्हाच विकली गेली. का विकली? अरे इथं तर माणसांची आयुष्यच विकली गेलीत. तुला मोटारीची चिंता पडलीय! तू नाही विकला गेलास?...अरे हो, हो, मी कुठं म्हणतोय? मी स्वतःसंबंधी बोलत होतो. मी स्वतःला विकून टाकलं. चांगली किंमत येत होती... बोहनीची वेळ होती!

"आणखी विचार. कुणाकुणाची खुशाली जाणून घ्यायचीय तुला?...छुटकी, रमदैया?...कमाल आहे! तुला छुटकीची अजून आठवण आहे? ती बिचारी परलोकवासी झाली. होय. फार दुःख झालं?...कशी मेली?...पावसाळ्यात मरहूम 'गुलफिशाँ'च्या बागेतलं गवत काढीत होती. साप चावला. अरे कितीतरी वर्षे झाली...गंगादीन आजकाल मध्यप्रदेशात कुठंतरी ट्रॅक्टर चालवतोय. अप्पी सांगत होती की तो एफ. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाला म्हणून...हो ना! याला म्हणतात खरी प्रगती...विकास! गंगादीनच्या उन्नतीची हकीगत ऐकून मला फार आनंद झाला... आणखी बोलू?...छेः छेः! तुला भेटता येणार नाही मला. सवडच नाही...तुझी बैठक तीन वाजता संपेल, त्यानंतर तू माझी वाट पाहणार, 'आल्प्स' मध्ये?...काय करणार वाट पाहून? अंऽहं! मी कस्टोडियनला भेटायला चाललोय. 'पी' ब्लॉक...त्यानंतर... अच्छा, मी प्रयत्न करतो यायचा...पण माझी वाट पाहू नकोस...अच्छा...सो लॉंग!"

कमालाने टेलिफोन बंद केला. लाजवती दारात उभी होती. "अच्छा! मी चाललो!"

"लौकर ये हं!"

"बरं...बरं!"

"तुझ्यासाठी खायला काय करू?"

"नेहमी जे काही करतेस तेच कर." तो किंचित त्रासून म्हणाला. "तू आपलं हे बंधुप्रेमाचं जाळं कशाला पसरवते आहेस? त्यानं माझं मन थोडंच विरघळणार आहे? माझे पाय मुळीच डगमगणार नाहीत. मी मजबूत आहे. मी म्हातारा आहे. माझ्या ठिकाणी संयम, समतोल आणि शांती आहे." तो मनाशी म्हणाला.

तो जमनारोडच्या बाजूने निघून कॅनॉट प्लेसमध्ये गेला आणि त्या ओळखीच्या भागात तो अनोळखी माणसासारखा भटकत राहिला. मोटारगाड्या, समृद्ध, समाधानी माणसे, उद्योगधंद्यात गढून गेलेले व्यावसायिक, भव्य दुकाने या सर्वांच्या समुदायात उभे राहिल्यानंतर त्याला फार भीती वाटली. येथून जाण्यापूर्वी सिव्हिल लाइन्सच्या पोलिस-चौकीवर जाऊन आपण भारत सोडून जात असल्याची वर्दी द्यावयाची आहे, याचीही त्याला आठवण झाली.

भाद्रपदातील उन्ह खूपच कडक पडले होते. तो फारच उद्विग्न झाला होता आणि पार थकून गेला होता. पंख लावून येथून थेट कराचीला उडून जावे असे त्याला वाटत होते. आता यापुढे आपण पुनः कधीही भारतात यावयाचे नाही, असा त्याने मनाशी निश्चय केला.

"तो पाहा, समोरून कोण येतोय." त्याने डॉक्टर हॅन्स क्रेमरला पाहून कृत्रिम उल्हासाने म्हटले. भयंकर कंटाळवाणी दुपार त्या गृहस्थांच्या सहवासात कशीबशी घालविता येईल या विचाराने त्याला मनातल्या मनात बरेही वाटले.

"हॅलो, हॅलो माय डियर बॉय!" डॉक्टर हॅन्स क्रेमरनी हात पुढे करीत म्हटले. "कसा विचित्र योगायोग आहे, पाहा!"

त्यांच्याबरोबर माहिती खात्यातील एक मुलगी होती. तिने गंभीरपणे कमालाला प्रतिनमस्कार करीत म्हटले, "मी डॉक्टरांना राष्ट्रीय वस्तुसंग्रहालयात घेऊन चाललेय. तुम्हांला सवड असली तर तुम्हीही चला ना!" तिचे नाव कुमारी अरुणा बाजपेयी असे होते. कमालाने डोळे मिटून घेतले. निर्मला हयात असती तर आज अशाच कामात गढून गेली असती!

"हो हो! अवश्य!" त्याने उत्तर दिले.

ब्रॉडकास्टिंग हाउसमधून आणखी दोन युरोपीय बुद्धिजीवी गृहस्थांना बरोबर घेऊन ते राष्ट्रपतिभवनाकडे निघाले. डॉक्टर हॅन्स क्रेमर आणि त्यांचे सहकारी ज्या जगात

वावरत होते त्याच जगात कमालही काही काळापूर्वी वावरत होता. त्यांचाही दृष्टिकोण जीवनापेक्षा अधिक विशाल होता. त्यांनाही वस्तूंमध्ये रहस्य दिसत असे. त्यांच्याजवळही ज्ञानाव्यतिरिक्त अनुभूती होती. ते बुद्धजयंतीसाठी भारतात आले होते; आणि श्रीनगरच्या एका हाउसबोटीत राहून भारतीय मूर्तिकलेसंबंधी एक पुस्तक लिहीत होते. त्यांना भेटण्यास त्यांच्यासारखेच इतर परदेशी व स्थानिक बुद्धिजीवी लोक त्यांच्याकडे जात असत. ते हात चोळत, जमिनीवर चटया व तक्के ठेवून बसत आणि हिरवा चहा तयार करून घेत.

राष्ट्पतिभवनाच्या पायऱ्यांवर जाऊन पोचल्यानंतर डॉक्टर हॅन्स क्रेमर यांनी हात चोळत मान वर करून पाहिले आणि सोनेरी सिंहाच्या खाली लिहिलेले 'सत्यमेव जयते' हे वाक्य मोठ्याने उच्चारले. "सत्याचाच विजय होतो." त्यांनी कमालासाठी त्या वाक्याचा अनुवाद केला. त्यानंतर ते सर्वजण कुमारी अरुणा हिच्या मार्गदर्शनाखाली आत प्रविष्ट झाले. माजी व्हाइसरीगल लॉजच्या भव्य दिवाणखान्यात चांगलाच गारवा होता. बाहेरच्या कडक उन्हाच्या तुलनेने तो गारवा खूपच शांतताप्रद वाटला. प्राचीन काळातील व मध्ययुगीन मूर्ती कमालाकडे आपल्या निस्तेज डोळ्यांनी रोखून पाहू लागल्या. डॉक्टरमजकूर एकेका मूर्तीसमोर थांबून फ्रेंच किंवा जर्मन भाषेत आपले विचार व्यक्त करीत. एके ठिकाणी महात्मा बुद्धांची एक भव्य प्राचीन मूर्ती ठेवलेली होती. मूर्तीच्या मागे किरमिजी रंगाच्या मखमली पडद्यांचा जणू धबधबा होता. कमाल सिंहासनाच्या पायऱ्यांवर जाऊन बसला.

"हे संग्रहालय हंगामी आहे." त्याच्याजवळ येऊन क्षमायाचना करीत असल्याप्रमाणे कुमारी अरुणा म्हणाली, "आमचं राष्ट्रीय संग्रहालय आमच्या प्राचीन परंपरेला साजेल असं व्हायचं आहे. त्याचं बांधकाम चालू आहे."

"जी हाँ, नक्कीच!" कमाल उत्तरला. एक वर्षापूर्वी तो स्वतः याच दिल्लीत टॅमशी याच सुरात बोलत होता.

"या, इकडे या. आमच्या मोहन-जो-दडोच्या प्राचीन संस्कृतीतली नर्तकी तुम्ही पाहिलीय?"

कुमारी अरुणा त्यांना संगमरवरी गॅलऱ्यांमधून फिरवू लागली. चनहो-दडो, मोहन-जो-दडो, स्वातचे खोरे, हडप्पा, तक्षशिला, रूपड..."आता आपण आधुनिक कालखंडाच्या जवळ येत चाललो आहोत." ती एका जागी थांबून सांगू लागली, "हे दगड पाहा. हा अश्वमेध यज्ञ इसवी सनापूर्वी तिसऱ्या शतकात देहरादूनच्या परिसरात आयोजित करण्यात आला होता. या अहिच्छत्रातील मूर्ती आहेत. अहिच्छत्रालाच हल्ली जिल्हा बरेली असं म्हणतात." तिने हॅन्स क्रेमरकडे वळून म्हटले.

चालता चालता ते एका तरुणीच्या मूर्तीसमोर आले. ती पुरातन (आर्काइक) शैलीची मूर्ती होती. "ही श्रावस्तीच्या उत्खननातून यंदाच मिळाली आहे." तरुणी कदंबाची फांदी वाकवून वृक्षाच्या खोडाला टेकून उभी होती. "लाल मातीच्या या मूर्तीचा काळ बहुधा इसवी सनापूर्वीचं चौथं शतक असावा." डॉक्टर हॅन्स क्रेमरनी आपली वही काढून व्यावसायिक पुरातत्त्वशास्त्रज्ञाच्या थाटात आपल्या फ्रेंच सहकाऱ्याला सांगितले.

ते थंड फरशीवर मूर्तीसमोर बसले. मूर्तीच्या घडणी तसामर्थ्य होते. जीवनाची लालिमा व ऊब होती. जीवनाच्या कल्पनेऐवजी ते प्रत्यक्ष जीवनच होते. धरतीची ती खास निर्मिती होती.

तिचे बाहू चांगले मजबूत दिसत होते. डोळे टपोरे, शरीर सुदृढ व डौलदार होते. तिच्या अंगप्रत्यंगांतून समतोल, शांती, लवचिकपणा व चैतन्य यांचा अद्भुत समन्वय साधलेला दिसत होता. "एक रोमांचकारक सौंदर्य पाषाणातून साकार झालं आहे— वजनदार, भरभक्कम, भयंकर!" मोसियो रावल डब्ल्यू. बी. यीट्सच्या शैलीत म्हणाले.

"पाषाणावरील शिल्पकलेच्या भावी शैलींचा प्रारंभ इथूनच झाला." डॉक्टर क्रेमर म्हणाले, "हा मथुरा शिल्पकलेच्या पूर्वीचा नमुना आहे. आता आपल्याला या कलेच्या इतिहाससंबंधीचे अनेक सिद्धांत बदलावे लागतील."

त्या युगातील कलाकारांसमोर हा प्रश्न उपस्थित झाला असावा की विचार हा केवळ प्रतीकाच्या द्वारेच प्रेक्षकांपर्यंत नेऊन पोचविता येतो. या दृष्टिकोणामुळेच वेदांच्या काळानंतर मूर्तिपूजेचा प्रसार झाला असावा." अरुणाने विचार व्यक्त केला.

"रूप आणि अरूप, भाव आणि अभाव यांच्यासंबंधी मला जी काही माहिती आहे ती आता मी कुणाला सांगायला जाऊ? या साऱ्या ज्ञानाचा आता मला काही उपयोग नाही!" कमाल स्वतःशी उद्गारला. त्या अद्भुत मूर्तीजवळ त्याच्यासाठी काहीच संदेश नव्हता.

"वेदान्ताप्रमाणं विशुद्ध सौंदर्यानुभव हा मुक्त आनंद असतो." मोसियो रावल म्हणाले, "तो विजेसारखा अखंड, अविभाज्य असतो. तो स्वयंप्रकाशी आहे. ज्याप्रमाणे कलाकाराची कल्पना विश्वकर्म्याच्या कल्पनेत समाविष्ट असते त्याचप्रमाणे पाहाणारा हा आत्म्यात किंवा स्वतःमध्ये विद्यमान असतो. तो प्रत्येक क्षणी पाहात असतो आणि त्याचे स्वरूप हे साऱ्या सृष्टीचे उगमस्थान आहे. विश्वरूप. रूपं रूपं प्रतिरूपं! वेदांताच्या या दृष्टिकोणासंबंधी तुमचं काय मत आहे? तुम्हांला ही मूर्ती आवडली की तुम्ही मथुरा शैलीला प्राधान्य द्याल?" मोसियो रावलनी कमालाकडे वळून त्याला विचारले.

"बुभुक्षितं न प्रतिभाति किंचित्. (उपाशी माणसाला कोणतीच गोष्ट आवडत नाही) सौंदर्यशास्त्र आणि ब्रह्मज्ञान यांचं हे सूक्ष्म विवेचन माझ्या आवाक्याच्या पलीकडचं आहे." कमाल उत्तरला. त्याच्या स्वरातील आत्यंतिक कटुता आणि उदासपणा यांमुळे सर्वजण चपापले.

"हा कम्युनिस्ट दिसतोय." डॉक्टर स्टुअर्टनी मनाशी ठरविले.

"याच्या या वैफल्याचं कारण काय असावं बरं?" कुमारी अरुणाच्या मनात विचार येऊन गेला. ती अमेरिकेहून मानसशास्त्रातील डॉक्टरेट घेऊन आलेली होती. तिने मान वर करून कमालाकडे पाहिले आणि मनाशी म्हणाली, "चांगला शिकलासवरलेला दिसतोय. आणि किती देखणा आहे!" "तुम्ही संस्कृतही शिकला आहात वाटतं?" तिने प्रशंसात्मक स्वरात विचारले.

"शिकलो होतो. कधीकाळी थोडीबहुत!" कमालाने संक्षिप्तपणे उत्तर दिले.

आणि त्याने घड्याळाकडे पाहिले. कस्टोडियनला भेटण्याची वेळ होऊ लागली होती.

मूर्तीच्या चौथऱ्यावर हात टेवून कमाल उठून उभा राहिला. मूर्तीचा दगड थंडगार होता. दगड हे 'टाइमलेस बिकम'(कालरहित अस्तित्वा)चे प्रतीक आहे. वर्तमान-काळाचा प्रवाह इतका जोरदार आहे की अनेक कल्पांपासून वाहात येणारी पाने आता चिखलात रुतून बसली आहेत. तो मनाशी म्हणाला, "म्हणून तर मी म्हणतोय की एक कुदळ घेऊन या पानाचा कचरा काढून साफ करा. आजकाल मी सफाई करून राहिलोय—मेंदूची, हृदयाची, बुद्धीची!...स्प्रिंगक्लीनिंग!" या भूतकाळाशी असलेला माझा संबंध मी तोडून टाकलाय—असे त्या युरोपीय विशेषज्ञांना ओरडून सांगावे, अशी त्याला इच्छा झाली. नंतर तो त्या मूर्तीकडे वळला. "म्हणूनच, श्रावस्तीच्या हे 'सुदर्शन यक्षिणी', जो कुणी तुझा निर्माता होता तो आपला संदेश माझ्यापर्यंत पोचवू शकलेला नाही. तुझा स्रष्टा आता माझ्याशी 'कम्युनिकेट' करू शकणार नाही. रूप आणि अरूप यांच्या चर्चेत उतरण्याची माझी इच्छा नाही. हा राष्ट्रीय संग्रहालय साऱ्या भूतकाळासह, साऱ्या भारतासह, मी कुमारी अरुणा बाजपेयींकडे सोपवितो."

तो तेथून निघाला आणि सावकाश चालत-चालत गॅलरीतून जाऊ लागला. युरोपीय विशेषज्ञांचे शब्द त्याच्या कानांवर पडत राहिले :

"ज्या मूर्तिकारानं ही मूर्ती बनवली त्याचं नाव काय होतं, ते आपल्याला समजलं असतं तर किती बरं झालं असतं! परंतु या विचित्र देशात इतिहासाला काही महत्त्वच नाही." डॉक्टर क्रेमर बोलत होते, "घटनांना काही महत्त्व नसतं. दंतकथाच वास्तविक असतात. काळाच्या अंतराला काही महत्त्व नाही. क्षण शाश्वत आहे. मानव नामरहित

आहे. त्याच्या रचना, कलाकृती व साहित्य यांचेही अनंताच्या या सागरात काही वेगळे स्थान मानले जात नाही."

"होय." मोसियो रावल म्हणाले, "माणूस मेला की त्याला जाळून टाकतात; कारण त्याला ऐतिहासिक दृष्ट्या काही अर्थ नसतो."

"कोणतेही संकट हिंदी बुद्धीवर परिणाम करू शकत नाही; कारण संकट हेही काळाच्या अंतर्गत असते. तो इतिहास असतो. भूत, भविष्य, नाश, अनश्वरता—कशाचंच अस्तित्व नाही. तेव्हा आता या शरीराला जाळून टाका, कारण हे आता वर्तमान-काळाच्या अंतर्गत उरले नाही." डॉक्टर स्टुअर्ट म्हणाले.

"म्हणून तर पौर्वात्य कलाकारांना आपलं नाव अंकित करून ठेवण्याची गरज कधी भासली नाही. या शिल्पकारांसंबंधी काही माहिती आपल्याला मिळाली असती तर किती बरं झालं असतं!" डॉक्टर क्रेमर सभोवती दृष्टिक्षेप करून म्हणाले, "इथं किती मायकेल एंजलो शांतपणे, हसतखेळत, आपलं नावही मागे न ठेवता मरून गेले."

कमाल गॅलरीतून बाहेर पडला.

"आपण स्वतःच काळ आहोत, ही जाणीव..." मोसियो रावल बोलत होते.

"विस्ताराचा अनुभव घेता येतो; परंतु काळाच्या बाबतीत मात्र फक्त विचारच करता येतो." डॉक्टर क्रेमर सांगत होते.

कमाल पायऱ्या उतरून बाहेरच्या लाल मुरूम पसरलेल्या रुंद रस्त्यावर आला आणि 'पी' ब्लॉककडे निघाला.

कस्टोडियनशी डोकेफोड केल्यानंतर तो गौतम नीलांबराला भेटण्यासाठी 'आल्प्स' हॉटेलात गेला नाही. तो सरळ लाजवतीच्या घरी गेला आणि त्याने लाजला सांगितले, "माझा फोन आला तर मी अजून परत आलो नाही, म्हणून सांग." आणि मग आपल्या खोलीचे दार बंद करून स्टेशनवर जाण्याच्या वेळेपर्यंत तो स्वस्थ पडून राहिला.

* * *

गौतम एक तासभर हॉटेलात कमालाची वाट पाहात राहिला. त्याने अनेक ठिकाणी फोन केला. जेव्हा कमालाचा काहीच थांगपत्ता लागला नाही तेव्हा तो आपल्या कचेरीत परत गेला. बुद्धजयंतीच्या समारंभाचा खूप जोरदार प्रचार सरकारच्या वतीने चालू होता आणि त्याला दिवेलागणी होईपर्यंत ऑफिसचे काम करीत राहावे लागे. एका अत्यंत जरुरीच्या फायलीच्या संदर्भात त्याने आपली 'नंबर टू' कुमारी अरुणा बाजपेयी हिला फोन केला. परंतु कु. अरुणा बाजपेयी डॉक्टर हॅन्स क्रेमरना घेऊन नॅशनल म्यूझियमकडे गेली असल्याचे त्याला सांगण्यात आले.

"लाहौल विलाकूवत!" तो रागारागाने उद्गारला. कमालाची भेट न झाल्यामुळे तो फार चिडला होता. त्याला या देशाचा, स्वतःचा, कमालचा, जगातल्या प्रत्येक गोष्टीचा भयंकर राग आला होता. त्याचे चालले असते तर त्याने डॉक्टर क्रेमर, डॉक्टर स्टुअर्ट व कुमारी अरुणा बाजपेयी यांना फाडून खाल्ले असते.

फाइल अत्यंत आवश्यक होती आणि ती तावडतोब विभागाच्या जॉइंट सेक्रेटरीकडे पोचवावयाची होती. तो गाडीत बसून राष्ट्रपतिभवनात गेला. म्यूझियममध्ये जाऊन त्याने चोहोंकडे नजर फिरवली. परंतु ती मंडळी तेथून निघून गेली होती. विमनस्कपणे तो तेथील खोल्यांतून फिरू लागला.

एका मूर्तीसमोर माहिती विभागाची पॅम्फ्लेट्स पडली होती. ती बहुधा डॉक्टर क्रेमर तिथे विसरून गेले असावेत. गौतमाने खाली वाकून ती उचलून घेतली. नंतर त्याने सहज त्या मूर्तीकडे पाहिले. 'श्रावस्तीची सुदर्शन यक्षिणी.'

"हिचे हे रूप कसे दिसते?" तो मनाशी विचार करू लागला. आणि मग रागारागाने चालता चालता त्या संगमरवरी फरशीवर आपले पाय जोराने आपटून तो स्वतःशी म्हणाला. "तू समजतेस तरी काय स्वतःला? मी तुला मुळीच किंमत देत नाही. मी तर तुझं रूपही विसरून चाललोय. रूप हे नुसती 'मॅटर' असते. माझ्या मनात जे रूप सुरक्षित आहे त्याला फक्त विश्वकर्माच ओळखू शकतो."

श्रावस्तीच्या उत्खननातून मिळालेली ती मूर्ती कदंबाची फांदी वाकवून आपल्या टपोऱ्या डोळ्यांनी त्याच्याकडे पाहात राहिली. गौतमाने जवळ जाऊन तिच्या चेहऱ्याला स्पर्श केला.

"आर्काइक शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना आहे." तो मनात म्हणाला, "सांस्कृतिक प्रचारपत्रिकेमध्ये या नवीन शोधासंबंधी एक लेख द्यायला हवा." त्याने कर्तव्यपरायण प्रचारविशेषज्ञाप्रमाणे मनाशी विचार केला आणि तो बाहेर आला.

* * *

गाडी सुटायची वेळ झाली. लाजवती आणि भावोजी यांचा निरोप घेऊन कमाल डब्यात जाऊन बसला. गाडी हळूहळू स्टेशनातून बाहेर निघाली. यमुनेचा पूल, लाल किल्ल्याचे तट, बाजार, रस्ते, घरे—सारे हळूहळू दृष्टिआड होत होते. तो खिडकीतून त्यांच्याकडे पाहात राहिला.

जीवन सतत चालत राहाणार. एक व्यक्ती निघून गेली म्हणून त्यात काही फरक पडत नाही. हे लोक आता वेगळे होते. दुसऱ्या मार्गावरून चालले होते. त्यांच्यात व कमालात कोणतीही गोष्ट समाईक नव्हती. त्याला आता त्यांच्याशी काही कर्तव्य नव्हते. त्यांनाही कमालाची गैरहजेरी आता जाणवणार नव्हती.

गाडी शेतांतून जाऊ लागली. "प्रत्येक प्रवासाला खूप अर्थ असतो. आपलं इकडून तिकडे जाणं..." एकदा गौतम म्हणाला होता. त्यावेळी तो, तलअतच्या म्हणण्याप्रमाणे, खलील जिब्रानच्या अलमुस्तफासारखे संवाद म्हणत असे.

"भारताचे एकूण प्रतीक प्रवास हे आहे—चालत राहाण्याचा, शोध घेत राहाण्याचा स्वभाव." हे बहुधा स्पेंग्लरने म्हटले असावे.

त्याने राधाकृष्णन् यांचे पुस्तक वाचावयास घेतले.

"भारतीय तत्त्वज्ञानात कोणी कोणाला हुकूम सोडत नसतो. हे तू अवश्य केले पाहिजेस, किंवा तुला असे करावे लागेल, अशी आज्ञा दिली जात नाही. इथे मनुष्याला आपल्या कर्मांच्या बाबतीत पूर्ण स्वातंत्र्य असते."

त्याने ते पुस्तक खिडकीतून बाहेर फेकून दिले; आणि तो आपल्या जागेवर आडवा झाला.

पंजाबातील स्टेशने मागे पडू लागली—अंबाला, लुधियाना, जालंदर. भिंतींवर उर्दूमध्ये बोलपटांच्या जाहिराती चिकटविलेल्या होत्या. प्लॅटफॉर्मच्या धुतलेल्या फर्शीवर शीख स्त्रियांच्या रंगीत सुरवारी रात्रीच्या प्रकाशात चमचम करीत होत्या.

सकाळ झाली. गाडी अमृतसरजवळ आली होती. जागजागी मुसलमान पिरांच्या ओसाड पडलेल्या कबरी होत्या. शीख बायकांचे घोळके पायवाटांनी चालले होते. शीख शेतकरी शेतांत जाऊन पोचले होते. जागजागी अजूनही जळकी घरे दिसत होती. अमृतसरच्या प्लॅटफॉर्मवर गरीब बुरखाधारी स्त्रिया व म्हातारे लोखंडी गजांच्या पलीकडे विहसावर स्वार होण्याची वाट पाहात बसले होते.

गाडी निघाली. दोन्ही बाजूंचे शिपाई डब्यांत चढले.

एकाएकी दुसरा देश सुरू झाला. दोन सरदारजी गवतावर उभे राहून पहारा देत होते.

"मी आता पाकिस्तानात आहे. हिंदुस्थानातून आलोय. निर्वासित....यू. पी. चा मुसलमान...निर्वासित...शरणार्थी...आसरा शोधणारा...घरदार नसलेला..."

गाडीने सरहद्द ओलांडली आणि इतके दिवस मोठ्या मुष्किलीने आपले अश्रू आवरून धरत आलेला कमाल, सरहद्दीच्या खांबाजवळ दात विचकून, बंदूक रोखून उभ्या असलेल्या एका सरदारजीला पाहून, लहान मुलासारखा ओक्साबोक्शी रडू लागला. थोड्या वेळाने त्याच्या लक्षात आले की आपला सहप्रवासी आपल्याकडे निरखून पाहात आहे. तो पाकिस्तानी बॉर्डर पोलिसदलाचा अधिकारी होता. तो अमृतसरहून लाहोरला परत चालला होता.

कमाल अत्यंत लज्जित झाला. त्याला वाटले, जणू तो पाकिस्तानी पोलिसअधिकारी आपल्याला म्हणतो आहे, "तू अजून दोन परस्परविरोधी निष्ठांच्या चक्रात अडकला आहेस. धिक्कार असो तुझा!"

साऱ्या जगाचे डोळे आपल्याकडे लागले आहेत असा त्याला भास झाला. सर्वजण त्याला म्हणत होते :

"तू हिंदुस्थानी आहेस. हिंदुस्थानी हेर!"

गाडीच्या चाकांतूनही हेच शब्द ऐकू येत होते : हेर–देशद्रोही...जासूस–गद्दार... हेर...

त्याने घाईघाईने डोळे उघडले. गाडी हळूहळू लाहोर स्टेशनातील करटम्सच्या गज लावलेल्या भागात प्रवेश करीत होती. त्याची छाती धडधडत होती.

लाहोरहून तो विमानाने कराचीकडे निघाला. विमान कराचीच्या दिशेने जाऊ लागले.

त्याचे नवे जीवन आता त्याच्यासमोर होते. त्याने खिशातून डायरी काढली. कराचीला पोचल्यानंतर त्याला किती तातडीची कामे उरकावयाची होती. बंगल्यासाठी काळ्या बाजारातून सीमेंट व लोखंड मिळविण्याकरिता खटपट करावयाची होती. मिस्टर एक्स यांना जिमखान्यावर पार्टी द्यावयाची होती. "आता तूच सांग, मी कुठं जाऊ?" त्याने स्वतःलाच प्रश्न केला. सडलेल्या, अधःपतित समाजात माणसाला प्रामाणिक राहाता येणे कितपत शक्य आहे? या प्रश्नासंबंधीही विचार करावयाचा होता. त्याने हवाई सुंदरीकडून पुनः कॉफी मागून घेतली आणि 'डॉन'चा अंक घेऊन वाचू लागला.

"पाकिस्तानच्या मंत्रिमंडळात पेचप्रसंग!...पंतप्रधानांचा राजीनामा...नव्या पंत-प्रधानांचे जहांगीर पार्कमध्ये जाहीर व्याख्यान..."

त्याने खिडकीतून बाहेर पाहिले. आकाशात झपाट्याने ढग गोळा होऊ लागले होते. थोड्याच वेळात पाऊस सुरू होणार!

त्याने खिडकीवरील पडदा ओढून घेतला.

"मी प्रेत आहे, मीच कबर खोदणारा आणि मीच रडणारा आहे." तो मनाशी म्हणाला आणि त्याने बैठकीच्या उशीवर डोके टेकवीत डोळे मिटून घेतले.

## ५८

कच्च्या सडकेवरून एक मुलगा बैलगाडी हाकत चालला होता. एक स्टेशनवॅगन धूर सोडीत, धुरळा उडवीत, एक धक्का देऊन पुढे गेली. समोरून आणखी एक बैलगाडी येत होती. गाडीवानाने बैलाची शेपटी पिरगाळीत मोटारवाल्यांना धमकावले, "अरे, नीट बघून चालवा की गाडी. माझ्या बैलाला धक्का लागला असता म्हणजे!"

अमेरिकन पत्रकाराने लगेच कॅमेरा सरसावून त्याचा फोटो घेतला. मागून आणखी एक मोटार येत होती. तिच्यात बसलेल्या श्रीमती राजवाडे यांनी बाहेर डोकावून पाहिले आणि त्या पुनः लेडी कमलेश वर्मा यांच्याशी गप्पा मारण्यात गढून गेल्या. श्रावस्ती अजून खूप दूर होती. सूर्य ढगांआड लपला होता आणि पाऊस नक्की पडणार असे दिसत होते. मोसियो रावल यांनी पुढच्या स्टेशनवॅगनमध्ये बसलेल्या अरुणा बाजपेयीला काहीतरी विचारण्याचा प्रयत्न केला. तिने लगेच माहिती खात्याच्या पुस्तिकांचा गठ्ठा त्यांच्या नाकात कोंबला आणि त्यांच्या प्रश्नांचा ससेमिरा चुकविण्यासाठी ती निद्रिस्त करू लागली. तिसऱ्या मोटारीत लंका व जपान येथील काही बौद्ध भिक्षू बसलेले होते. त्यांच्याबरोबरच फिल्म्स डिव्हिजनचा कॅमेरामन होता. दोन-तीन शेतकऱ्यांच्या मुली शेताच्या बांधावर उभ्या राहून त्या तांड्याकडे पाहात होत्या. मागल्या बाजस जोरजोरात चर्चा चालू होती. आतापर्यंत गौतम नीलांबर मोटार चालवीत होता. त्याने मागे वळून अरुणा बाजपेयीला म्हटले, "तुम्ही बसा व्हीलवर. म्हणजे मी इथं उतरून पायीच माझ्या घरी जाईन."

"फार 'बोर' झालात वाटतं!" कुमारी अरुणाने विचारले. तिला स्वतःलाही प्रवासाच्या थकव्यामुळे झोप येऊ लागली होती.

"होय! मी इथूनच शेतांमधून, मधल्या वाटेने निघून जाईन. जरा आंघोळ वगैरे करून विश्रांती घेता येईल मला. सकाळी हा सारा खेळ पुनः सुरू होणारच आहे. मोसियो रावल, तुमची परवानगी असेल तर..." त्याने फ्रेंच लेखकाला संबोधून म्हटले.

त्याने मोटार थांबविली आणि खाली उतरून तो शेताच्या बांधावर उभा राहिला. तीन्ही गाड्या एकामागून एक धूळ उडवीत निघून गेल्या. तो थोडा वेळ तेथेच उभा राहिला. पावसाचा एक थेंब टपदिशी त्याच्या डोक्यावर पडला. त्याने हात पसरून हवा हुंगली आणि तुरीची एक फांदी मोडून घेऊन तो पायवाटेने चालू लागला.

पाऊस पडू लागला. त्याच्यापासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी तो आंब्याच्या एका घनदाट झाडाखाली गेला आणि झाडाच्या बुंध्याशी वाऱ्याचे व पानांचे संगीत ऐकू लागला. अर्ध्या तासानंतर तो पुढे चालू लागला. जिकडे पाहावे तिकडे हिरवीगार शेते डोलत होती. शहर अजून बरेच दूर होते.

गौतम नीलांबराने चालता-चालता थबकून मागे पहिले. रस्त्यावरील धूळ पावसामुळे कमी झाली होती. परंतु त्याची स्वतःची पावले मात्र धुळीने व चिखलाने माखली होती. पाऊस पडून गेल्यामुळे झाडेझुडुपे व वृक्ष नितळ हिरव्या रंगाचे दिसू लागले होते. नारिंगी व लाल फुले गडद हिरवळीमध्ये अबीर-गुलालाच्या फुग्यांसारखी चमकत

होती आणि हिऱ्यांप्रमाणे झगमगणारे पाण्याचे थेंब ओघळून गवतावर पसरले होते. घाटावर नावा उभ्या होत्या आणि वडाच्या झाडाखाली कुणा नावाड्याने श्रावणगीत गायला सुरुवात केली होती. आंब्याच्या बनात एक मोर एकटाच पिसारा फुलवून उभा होता. नदीच्या पैलतीरावर लव्हाळे व निळ्या फुलांच्या दाट वेली पाण्यावर वाकल्या होत्या. वडाच्या सावल्या गडद होऊ लागल्या होत्या. सारस व मोर अंग चोरून उदासपणे उभे होते. चार-पाच माणसे खांद्यावर पंचे टाकून घाईघाईने गावाकडे चालली होती.

बहराइचची उपनगरे सुरू झाली. सिव्हिल लाइन्सच्या छायादार रस्त्यावर पोचल्या-नंतर तो आपल्या वडिलांच्या पिवळ्या रंगाच्या दुमजली बंगल्यात प्रविष्ट झाला.

त्याचे वडील सर दीपनारायण हिरवळीवर शतपावली करीत होते.

"हॅलो बाळ!" ते म्हणाले, "मला वाटलं, तू परदेशी पाहुण्यांना घेऊन थेट श्रावस्तीला गेला असशील."

"नाही. बाबा!" तो म्हणाला; आणि आत जाऊन आपल्या आईला भेटला.

"दमयंतीआत्या कुठं आहे?" त्याने स्नानगृहातून, आंघोळ करता-करताच विचारले.

"शहरात त्यांच्याकडेही जाऊन ये."

"जी अच्छा!"

"तुझी तब्बेत ठीक आहे ना, बाळ?"

"छान आहे. बचनचं लग्न कधी आहे?"

"येत्या फाल्गुनात." आईने उत्तर दिले.

"प्रकाशकाकांचा बंगला तयार झाला?"

"नाही. ते आपले खानबहादुर मुहम्मद हुसैन नव्हते का, रिटायर्ड जज? ते पाकिस्तानला गेले. त्यांच्या बंगल्याचा लिलाव झाला. तो प्रकाशनं घेतला. फार स्वस्तात मिळाला."

स्नान करून बाहेर आल्यानंतर जेवणाच्या टेबलाजवळ बसत त्याने अशाच दोनचार घरगुती गप्पागोष्टी त्याने लेडी दीपनारायणांशी केल्या. पाकिस्तानचा उल्लेख येताच तो अस्वस्थ झाला. पाकिस्तानचा विसर पडावा, यासाठी तो नेहमी प्रयत्न करी. परंतु या ना त्या प्रसंगाने त्याचा उल्लेख येईच. अजून त्याला श्रावस्तीच्या त्या परदेशी प्रवाशांनाही काश्मीरचा प्रश्न समजावून द्यायचा होताच.

तो वास्तव अस्वस्थ झाला. काही दिवसांपूर्वी नव्या दिल्लीत जे एक वैराग्य त्याला आले होते त्याच वैराग्याने आताही त्याच्यावर झडप घातली.

"मी जरा नदीपर्यंत फिरून येतो." तो आपल्या आईला म्हणाला.

"अरे, आत्ताच तर एवढा लांबचा प्रवास करून आला आहेस ना? आता पुनः बाहेर जाणार? जरा विश्रांती घे ना!" आईने काळजीच्या सुरात म्हटले.

तो बाहेर आला आणि वडिलांची मोटार घेऊन नदीच्या दिशेने निघाला. पाऊस थांबला होता. वारे पडले होते. नदीच्या काठी जाऊन तो चंडी देवीच्या एका भग्न मंदिराच्या पायऱ्यांवर जाऊन बसला. तेथे पूर्ण एकांत होता आणि तो अगदी शून्यमनस्क होऊ इच्छीत होता. यावेळी आयुष्यात प्रथमच त्याला वाटले, निर्वाण मिळवणं शक्य असतं तर किती बरं झालं असतं! भय, एकान्ताची अनुभूती, दुःख, घृणा, पलायनाची इच्छा, विस्तार व अतिरिक्तता यांची कल्पना...निर्वाण हे जीवन, मृत्यू, जागृती, निद्रा, प्रेम, दया व असंबद्धता यांच्या पलीकडे आहे; आणि तरीही ते सत्य आहे. विलीनता...शून्य...शून्य!

या परदेशी विचारवंतांना भारताच्या आत्म्याची दुःखे काय आहेत ते कळणे शक्य आहे काय? त्याने सिगारेट शिलगावली आणि मंदिराच्या फरशीवर तो लवंडला. पावसाळ्याचे दिवस आहेत, येथे साप व किडेमुंग्या अवश्य असणार—त्याने थंडपणे मनाशी विचार केला. अरण्याशी आपली फार जुनी मैत्री असल्याची जाणीव त्याला झाली. किती झाले तरी तो याच वातावरणात, याच झाडाझुडपांच्या सान्निध्यात लहानाचा मोठा झाला होता.

एकाएकी त्याला कोणाच्या तरी पावलांची चाहूल लागली आणि किंचित स्मिताचा आवाज ऐकू आला.

"तू कोण आहेस, बाबा?" खालून कोणीतरी विचारले, "आणि असा अंधारात का बसला आहेस?"

"मी आहे!" गौतमाने पडल्या पडल्या उत्तर दिले.

दुसरा तरुण तटावरून उडी मारून आत आला.

"अरे हा काय वेडेपणा! मी तुला सगळीकडे शोधतो आहे. तुझ्या घरी गेलो तेव्हा तुझ्या आईवडिलांनी तू नदीकडे गेला असल्याचं सांगितलं."

"हाँ यार! किती भयंकर उकाडा होतोय या वेळी. झाडाचं एक पानही हलत नाही. तुझा दिवस कसा काय गेला?"

"अगदी बोर झालो, बुवा!" हरिशंकर जवळच्या पायरीवर बसता बसता म्हणाला. "ही 'बूडा जयाण्टी' अशीच आणखी काही दिवस चालत राहिली तर आपण अगदी ठार होऊन जाऊ. पाहा ना, याच कटकटीमुळं मला लखनौला जाता आलं नाही जे. एस. ची तार मिळताच बंगलोरहून सरळ दिल्लीला धावलो आणि अरुणा वाजपेयी सांगत होती की आता हे यात्रेकरू इथून सरळ कपिलवस्तूला अन् गयेला जायचा हट्ट

धरून बसलेत. सबंध प्रवासात डॉक्टर हॅन्स क्रेमरनं महायान आणि झेन या पंथातल्या भेदांवर एवढं लांबलचक व्याख्यान सुनावलं की माझा तर मुडदाच पडला. तुझ्या मोटारीत फक्त मोसियो रावलच होते ना!"

आणि तो एकाएकी थांबला. नदीवर मावळत्या सूर्याची लालिमा पसरली होती. ते दोघेही खूप उदास झाले.

"यार गौतम!"

"हाँ!"

"यार, कमाल आपल्याला दगा देऊन गेला." हरिशंकर थोडा वेळ थांबून हळुवारपणे म्हणाला.

"हाँ!"

"तुला माहीत आहे? साला दिल्लीला येऊन गेला. त्यानं मला तार केली असती तर मी त्याला तिथं येऊन भेटलो असतो."

"अरे, मी तर दिल्लीतच होतो. तरीही तो मला भेटला नाही." गौतमाने हळू आवाजात सांगितले.

ते दोघे पुन: गप्प राहिले.

"यावेळी तो कुठं असेल कोण जाणे!" हरिशंकर खोल, उदास स्वरात उद्गारला.

"कराचीत असेल. आणखी कुठं असणार?" गौतमाने खालच्या आवाजात उत्तर दिले.

ते दोघे स्तब्ध राहिले. पायऱ्या उतरून ते नदीच्या काठी गेले आणि वाहत्या पाण्याकडे पाहात राहिले. अबुल मंसूर कमालुद्दीन भारतात कसा आला होता आणि कशा स्थितीत तो भारत सोडून गेला याचा विचार बहुधा त्यांच्या डोक्यात घोळत असावा.

नदी वाहात होती. ते दोघे वाकून तिच्यात आपले प्रतिबिंब पाहू लागले. गौतमाने एक खडा पाण्यात टाकला. पाण्याच्या लाटांची वर्तुळे पसरू लागली. त्यांत त्यांची प्रतिबिंबेही पसरत गेली.

घाटापासून थोड्याच अंतरावर असलेल्या समाजविकास केंद्रामध्ये दिवे दिसत होते. लोकगीतमंडळाने वार्षिक यूथ फेस्टिवलसाठी प्रॅक्टिस सुरू केली होती. त्यांचे आवाज तरंगत त्या दोघांच्या कानांपर्यंत येत होते. दूरच्या एका गावातील चावडीसमोर नौटंकी चालू होती. आंबराईच्या बाहेर आल्हा-ऊदलची गाणी गायिली जात होती. कॉंग्रेस कमिटीच्या कचेरीत निवडणुकांची तयारी चालू होती. समोर सिव्हिल लाइन्समधील डेप्युटी कमिशनराच्या बंगल्यावर युरोपीय पाहुणे डिनरचा समाचार घेत होते.

गौतमाने एका पालथ्या नावेवर पाय ठेवून डोळे मिटून घेतले. नंतर त्याने डोळे उघडून

पाहिले. तो नदीच्या काठी एकटाच उभा होता. हरिशंकर कुणा शेतकऱ्याशी गप्पा मारीत समाजविकास केंद्राकडे निघून गेला होता. ढग एव्हाना नदीवर खूपच खाली आले होते.

त्याने आपल्या थकलेल्या पावलांकडे पाहिले. वाढत चाललेल्या काळोखाकडे दृष्टी फिरविली. परंतु त्यात भिण्यासारखे काय होते? तो धरतीच्या सान्निध्यात होता. धरती त्याची माता होती. धरती त्याला सोबत करणार होती.

तो पुढे चालू लागला.

गवताचा ओला सुवास, दगडांचा शीतळपणा आणि मातीचे सामर्थ्य यांचा अनुभव त्याच्या पायांच्या तळव्यांना येऊ लागला. त्याने बाहू पसरून हवेला स्पर्श केला आणि स्वतःशी पुटपुटू लागला, "हे धरती, तुझे डोंगर, बर्फाने झाकलेले पर्वत, अरण्ये स्मित करताहेत. मी तुझ्या पाठीवर उभा आहे. मी हरलो नाही. मला कसलाही आघात झाला नाही. मला जखमा झालेल्या नाहीत. मी सहीसलामत, परिपूर्ण आहे. माझा नाश कोणीही करू शकले नाही."

नाना प्रकारच्या झाडांच्या व फुलांच्या फांद्या त्याच्या मार्गावर नतमस्तक झाल्या. पक्षी त्याच्याबरोबर शीळ घालीत होते. श्रावणाचे थेंब कमळाच्या पानांवर जलतरंग वाजवीत होते.

तो एका बांधावर उभा राहिला आणि त्याने पाणावलेल्या डोळ्यांनी शेताकडे पाहिले. "वाढा, अशाच वाढत राहा, गव्हाच्या लोंब्यांनो, आमची गाडगीमडकी भरून जावीत म्हणून तुम्ही वादळवाऱ्यांपासून सुरक्षित राहा. हे गव्हाच्या दिव्य लोंब्यांनो, समुद्राप्रमाणं तुम्ही अथांग बना...जे कुणी तुमची सेवा करतील, ते अमर होवोत. तुमची खळी सदैव भरलेली राहोत."

तो बांधावरून उतरून पायवाटेवर आला; आणि नदीच्या काठाकाठाने असलेल्या रस्त्याने चालू लागला. आकाशात काळे ढग गडगडत होते. त्याच्या अंतःकरणात वादळी समुद्राच्या लाटा उसळत होत्या. त्याच्या मेंदूत सुस्वर धबधबे गाणी गात होते; मोर घुमत होते; चातक पुकारत होते; भोवरे गुणगुणत होते. कदंबाची पुष्कळशी फुले फांद्यांवरून सुटून त्याच्या पायांवर येऊन पडली.

गाणाऱ्यांचा आवाज जवळ येऊ लागला. गाण्याचे शब्द होते :

**बंजर आज हरे रे!**
**खेतनमें नाज भरे रे!**
**जीवन आज सफल रे!**
**अच्छी धान अच्छी फसल रे!**

[ओसाड माळराने आज हिरवीगार झाली आहेत. शेतांत धान्य भरले आहे. आज जीवन सफल झाले आहे; कारण पीक फार चांगले आले आहे.]

तो लक्ष देऊन ऐकू लागला. गाण्याचे शब्द त्याला कळले तेव्हा त्याच्या ओठांवर स्मित तरळले.

कडेकपारी, ॲव्हलान्श, ग्लेशियर, वादळे, वावटळी, सोसाट्याचे वारे, या सर्वांमधून वाट काढीत, स्वरांच्या लाटांवर तरंगत तो गौरीशंकराच्या उंच शिखरावर चढून ढगांत लपला. शिखरावर तो गुडघे टेकून बसला. त्याला असे दिसले की सगळीकडे शून्य भरलेले आहे आणि त्या पोकळीत आपण नेहमीप्रमाणेच एकटे आहोत. सृष्टीतील पहिला व शेवटचा मानव—थकलेला, पराभूत, उल्हसित, आशावान मानव—ईश्वरात असणारा व स्वतः ईश्वर असणारा! तो स्मित करून खाली उतरला व त्याने डोळे उघडले.

**जागनेवालोंको जागना मुबारक हो**
**कानूनका प्रचार मुबारक हो**
**संघमें अमन मुबारक हो**
**उन लोगोंकी रियाज़त मुबारक हो**
**जिन्हें शांति मयस्सर आ गयी है।**

[जागृतांना जागृती लखलाभ होवो. न्यायनीतीचा प्रचार लखलाभ होवो. संघामध्ये शांतता नांदो. ज्यांना शांतता लाभली आहे त्यांची साधना धन्य आहे.]

शाक्यमुनी म्हणाले.

तो बांधावरून खाली उतरला. त्याने एक दीर्घ उसासा सोडला आणि सावकाश पावले टाकीत तो शहराकडे परत गेला.

